अनुक्रमणिका

## पुरस्कार

कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे हे महाराष्ट्रांतील गेल्या पिढींतील एक थोर पुरुष होऊन गेले. ते विद्वान व बहुश्रुत होते. समाजोद्धार व धर्मकार्य यास अभेद्य मानून त्यांनीं बहुतेक आयुष्य या क्षेत्रांत सतत कार्य करण्यांत वेंचलें. त्याबरोबरच राष्ट्रीय चळवळींत महाराष्ट्रांत एक नवीन आघाडी उभारण्यांत त्यांनीं पुढाकार घेतला. महाराष्ट्रांतील ब्रिटिश राजवटींतील विद्वान, निःस्वार्थी व लोकहितरत पुढाऱ्यांच्या परंपरेंत त्यांस निःसंशय बहुमानाचें स्थान आहे. हें खरें असलें तरी त्यांच्या हयातींत त्यांच्या गुणांच्या व कार्याच्या मानानें एकंदर समाजावर त्यांची छाप पडली नाहीं, आणि आज तर त्यांचें बऱ्याच अंशीं विस्मरण झालेलें दिसतें. त्यांच्या कार्याची व विचारांची नवीन पिढीस ओळख करून द्यावी व त्यांचा दृष्टिकोन व त्यांचें धोरण यांचें महत्त्व पटवावें हा प्रस्तुत प्रकाशनाचा मुख्य हेतु आहे. महाराष्ट्राच्या सद्यःस्थितींत हें कार्य फार महत्त्वाचें आहे असें मला वाटतें.

आपल्या आयुष्यांत कोणत्याच प्रचलित विचार अगर कार्यप्रवाहांत कर्मवीर शिंदे पूर्णपणें समरस झालेले दिसत नाहींत. धर्मकार्यांतील त्यांचें मूळ अधिष्ठान ब्राह्मोसमाजाचें. महाराष्ट्रांत ब्राह्मोसमाज राहोच, पण त्याची विशिष्ट मराठी आवृत्ति प्रार्थनासमाज यासहि कधीं महत्त्व प्राप्त झालें नाहीं. कर्मवीर शिंदे चिकित्सक व व्यासंगी होते. इतिहास व भाषाशास्त्र या दोन्ही क्षेत्रांतील त्यांचें ज्ञान सखोल व विचार स्वतंत्र होते. आज त्यांचे या विषयांवरील लेख एकत्र छापल्यामुळें त्यांच्या विद्वत्तेची खोली व बुद्धीची चमक आपणांस कळून येते. परंतु प्रसंगोपात्त, वेळांत वेळ काढून केलेलें हें लेखन मधून मधून कोठेंतरी प्रकाशित झालें असल्यामुळें एक नवीन दिशा सूचित करणें यापलीकडे त्यांचें वजन पडलें नाहीं. तसेंच त्या वेळचे मान्यवर संशोधक व विचारांची रूढ दिशा याबाबतचें बरेचसें लिखाण टीकात्मक असल्यामुळें त्याची उपेक्षा झाली हेंहि घडलें असावें. आज त्यांचे मूलग्राही विचार, व्यापक दृष्टि व सडेतोड परंतु संयत टीकापद्धति यांचें कौतुक वाटतें. त्यांच्या कार्याचा अस्पृश्यता-निवारण हा गाभा मानला पाहिजे. या कार्यांत त्यांना मराव यश प्राप्त झालें नाहीं, यांत आज तरी आश्चर्य वाटावयास नको. त्यांच्या या कार्याच्या पूर्वार्धांत स्पृश्य समाजाची फारशी सहानुभूति व मदत त्यांस मिळाली नाहीं. पुनरुज्जीवित सत्यशोधक समाजाची दृष्टि ब्राह्मणावरील हल्ल्यांत केंद्रित झाली व महात्मा ज्योतिरावांच्या कार्याच्या या दुसऱ्या बाजूकडे त्यांचें दुर्लक्ष झालें. पुढील काळांत स्पृश्यांची वृत्ति व त्यांच्या कार्याची गतिमानता यांबद्दल अधिकाधिक निराशा उत्पन्न झाल्यामुळें डॉ. आंबेडकर यांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रांतील अस्पृश्यांनीं चढाऊ धोरण व स्वावलंबी मार्ग

पत्करला, आणि शिंदे साहजिकच बाजूला पडले. राजकारणांतहि तीच गत झाली. कर्मवीर शिंदे यांचा पिंड राजकारणी स्वित नाहीं. ते राजकारणांत पडले तें कोणत्याहि पक्षांत अगर पक्षाकरितां नसून विशिष्ट विचारांच्या पुरस्कारार्थ. दारूबंदी, शेतकऱ्यांची दुरवस्था अशल्या विषयांत ते नेहमींच लक्ष घालत होते. म्हणून गांधीयुगांत समाजकारण, राजकारण व अर्थकारण हें जवळ येत आहे असें दिसल्यामुळें त्यांचें लक्ष थोडेंबहुत राजकारणाकडे गेलें असावें. परंतु ब्राह्मणेतरांचा सवता सुभा ज्यायोगें होईल असें कांहीं करूं नये, असें म्हणणाऱ्याला त्या वेळेस मान्यता न मिळणें साहजिक होतें आणि जे तरुण त्यांच्या विचाराशी तत्त्वतः सहमत होते त्यांचा कल मार्क्सवादाकडे वळल्यामुळें श्री. शिंदे यांची व्यापक भूमिका त्यांस पटणें शक्य नव्हतें.

हा तत्कालीन ऐतिहासिक घटनेचा विचार झाला. सद्यःस्थितीकडे पाहिलें असतां विठ्ठल रामजी शिंदे यांचे विचार व भूमिका यांचें महत्त्व टिकून आहे असें आढळून येतें व त्यांचें चरित्र फार उद्बोधक ठरतें. कर्मवीरांनीं हाताळलेले बहुतेक वाद अजून शिल्लक आहेत. मराठी-कोंकणी, मराठी-कानडी, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, स्पृश्यास्पृश्य, मराठे-मराठेतर या सर्व वादांचें सांप्रतचें स्वरूप कांहींसें बदललें आहे. परतु शिंदे यांनीं याबाबत केलेलें विवेचन इतकें मूलभूत आहे कीं, तें आजहि मार्गदर्शक ठरतें. या सर्व लिखाणाचा विशेष हा आहे कीं, इतिहासाबद्दल लिहितांना ते कधीं वर्तमान परिस्थिति विसरले नाहींत. आणि चालू वादाबद्दल लिहितांना वादांचें ऐतिहासिक स्वरूप व समाजाचें भवितव्य यांवर दृष्टि ठेवूनच त्यांनीं विवरण केलें. यामुळें त्यांच्या सर्वच लिखाणांत सत्यान्वेषणावरील भराबरोबर कळकळ व तळमळ दिसून येतात. उदाहरणार्थ, 'भागवत धर्माचा विकास' या व्यापक व विस्तृत आढाव्यांतील, 'विचित्र मायपोट' व 'ओडिया जगन्नाथ' हे परिच्छेद व्यापक ऐतिहासिक दृष्टि व सद्यःस्थितीचें मर्मभेदी वर्णन याचा परिणामकारक भाषाशैलींत केलेला उत्कृष्ट प्रयोग म्हणून दाखवितां येईल. परतु तळमळ कितीहि असली तरी श्री. शिंदे यांचा तोल कोठेंहि सुटला नाहीं व पूर्वग्रहाला, पक्षपाताला त्यांनीं कोठें थारा येऊं दिला नाहीं. तत्कालीन परिस्थितीमुळें अनेकांवर टीका करणें श्री. शिंदे यांस अपरिहार्य होतें. ब्राह्मण समाज व ब्राह्मण लेखक यांचे दोष दाखविण्याखेरीज त्यांस गत्यंतर नव्हतें. पण यांतहि त्यांनीं कटाक्षानें समतोल राखला; दोषदर्शनाबरोबर गुणग्रहणहि केलें.

महाराष्ट्रांतील त्यांच्या पूर्वकालीन व समकालीन इतर समाजसुधारकांपेक्षा कर्मवीर शिंदे यांची बैठक बरीच निराळी होती. भारतीय तत्त्वज्ञान व वैचारिक परंपरा याचा सखोल अभ्यास त्यांनीं केला होता व या परंपरेवर कितीहि टीका केली तरी तिच्याविषयीं त्यांस निःसंशय आदर व ममत्व होतें. 'कौटुंबिकता हाच आत्मीय शिक्षणाचा पाया' या लहानशा प्रवचनांतहि त्यांची कळकळ, त्यांचें सूक्ष्म निरीक्षण व मूल्यांसंबंधाचा अभिनिवेश हीं सर्व उत्कटपणें आढळतात, आणि त्यांस नवीन समाजाची निर्मिति

करावयाची होती ती परंपरेच्या गाभा व जिवंतपणा राखून सहेतुक करावयाची होती. यामुळें त्यांची भूमिका सत्यशोधक समाजाचे तत्कालीन पुढारी याहून निराळी होती. एवढेंच नव्हे तर आगरकरांसारख्या 'बुद्धिवादी' समाजसुधारकांपेक्षांहि फार भिन्न होती. "सर्व प्रकारच्या भावनामय चळवळी या आध्यात्मिक चळवळी असतात. आपण कोठूनहि सुरुवात करा, शेवटीं एकाद्या उगमापाशीं पोहोंचतो, आणि तो उगम म्हणजे आध्यात्मिक होय." हा त्यांचा मूळ सिद्धान्त होता. योगायोग हा कीं, एका दृष्टीनें फार निराळे वाटणारे डॉ. आंबेडकर यांच्या आयुःक्रमाकडे पाहतां त्यांचे बाबतींतहि हा सिद्धान्त तंतोतंत लागू पडला असें दिसतें.

परंपरेचें जरी महत्त्व मानले तरी प्रचलित राजकीय व आर्थिक परिस्थितीचें कर्मवीर शिंदे यांचें ज्ञान तपशीलवार व मार्मिक होतें व याबाबतची त्यांची मतें 'जहाल' होतीं. शेतकरीवर्गाची व अस्पृश्यांची हीन स्थिति ही त्यांनीं जवळून पाहिलेली होती, आणि म्हणून शेतकऱ्यांस "स्वतःची आर्थिक व सामाजिक उर्फ विधायक घटना करणें हाच आपला मुख्य उद्देश ठेवा आणि त्या कार्याला कोणाचीहि वाट न पाहतां आपल्या पायांवर उभे राहून वागा" असा त्यांनीं उपदेश केला, आणि पूर्वीच्या समाजसुधारकांनीं कितीही कळकळीनें आणि स्वार्थत्यागपूर्वक काम केलें असलें तरी, "समाजस्थिति त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेली नाहीं अथवा तिचा प्रत्यक्ष अनुभवहि त्यांना घडलेला नाहीं. खरा सुधारक निघावयाचा तो सामान्य जनतेमधूनच निघावयाचा आहे." असा त्यांनीं स्पष्ट अभिप्राय दिला.

निर्विकार मनन व चिंतन आणि विविध कार्यांतील अनुभव यांमुळें कर्मवीरांचे प्रगल्भ विचार आजहि मार्गदर्शक ठरतात. मराठेतर या विपयावर त्यांनीं केलेलें निरूपण सद्यःस्थितीत असेंच महत्त्वाचें ठरतें. बहुसंख्यांकांतील मतभेदावर लक्ष ठेवून त्यांत फूट-पाडण्याचा प्रयत्न करणें हें अल्पसंख्यांकांच्याहि अंतिम हिताचें नाहीं, हा त्यांचा इशारा अत्यंत मार्मिक आहे. फुटीचें राजकारण खेळणें कोणासच श्रेयस्कर नाहीं. सर्वांनीं एकी साधण्याचाच प्रयत्न केला पाहिजे, आणि तीहि शक्य तितक्या व्यापक भूमिकेवरून, हेंच त्यांचें पदोपदीं सांगणें आहे. एकी साधणें, सर्वांचा विश्वास संपादन करणें याची जबाबदारी जे श्रेष्ठ आहेत, सत्ताधारी आहेत त्यांजवर पडते, असें ते ठासून बजावीत. त्यांच्या वेळेस महाराष्ट्रांत ब्राह्मणांचें सर्वांगीण वर्चस्व अजून पुष्कळ अंशानें टिकून होतें. म्हणून महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा मार्ग आखण्यांत किंवा अस्पृश्यता निवारण्यांत ब्राह्मणांवर मोठी जबाबदारी आहे, असें त्यांनीं वारंवार प्रतिपादन केलें. सुदैवानें आज परिस्थिति बदलली आहे आणि निदान ब्राह्मणांच्या बरोबरीनें महाराष्ट्राच्या पुढारीपणाचें ओझें मराठ्यांवर पडलें आहे. परंतु कर्मवीरांनीं ब्राह्मणांस उपदेश केला तो सर्व परिस्थितीस लागू पडेल असा मापानेंच केला. "आपल्या हातानें आपल्याजवळची सत्ता देऊन टाकणें हें प्रत्येक सत्ताधाऱ्याचें आद्य कर्तव्य आहे", ही एका तत्त्वज्ञाची उक्ति सांगून, "ब्राह्मणांनीं सर्व समाजाला, मराठ्यांनीं इतर

ब्राह्मणेतरांस व अस्पृश्यांस आपल्याबरोबरीनें सर्व अधिकार देऊन त्यांच्या हितार्थ झटावें यांतच महाराष्ट्राचें कल्याण आहे" असा बहुमोल चिरकालिक उपदेश केला.

कर्मवीर शिंदे स्वतः खऱ्या अर्थानें कर्ते सुधारक होते. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं केलेलें अस्पृश्यांविषयींचें कार्य आज सर्व अनुकूलता असूनहि होणाऱ्या प्रगतीच्या मानानें उपेक्षणीय खास वाटत नाहीं. परंतु त्या कार्याचें स्वरूप पाया-भरणीचें कार्य असें होतें आणि त्याचा पोवाडा व डंका त्यांचे शिष्य म्हणून स्वतःस मानणाऱ्या भाऊराव पाटलांच्या कार्याइतका होऊं शकला नाहीं. परंतु यावरून असेंहि असावें कीं, कर्मवीर शिंदे यांचा पिंड कार्यकर्त्यांपेक्षां मूलतः शास्त्रज्ञाचा, अभ्यासकाचाच होता. यामुळें पुणें विद्यापीठाच्या बोधवाक्याप्रमाणें, "यः क्रियावान् स पंडितः" हें सिद्ध करण्यापुरते ते क्रियाशील झाले तरी विचारानें पंडितच राहिले. ते स्वतः एके ठिकाणीं लिहितात, "अस्पृश्यतेचा छडा लावण्यांत-निवारण्यांत भाग तर राहूं द्या— मला स्वतःला जो जन्मभर अनुभव आला आणि आनंद झाला तो लक्षांत घेतां मला आणखी जन्म मिळाले तरी ते ह्याच शोधनांत आणि सेवाशुश्रूषेंत खर्चीन अशी उमेद वाटत आहे." पण इतर पंडितांपेक्षां ते निराळे होते. पंडितगिरींत आनंद वाटला तरी त्यांची मूळ प्रेरणा अध्यात्माची व हीनदीनांबद्दलच्या करुणेची होती. यामुळें त्यांच्या संशोधनांत व लिखाणांत वास्तविकपणा व जिवंतपणा हे दोन्ही गुण उत्कटत्वें आढळतात. सामान्य पंडित आणि त्यांच्यातील दुसरा ठळक फरक म्हणजे कोणत्याहि अभिनिवेशाचा त्यांच्यात पूर्णपणें अभाव होता, हा होय. ते वारंवार सांगतात कीं अहंकार सोडा, भेद विसरा आणि कांहीं शिकावयाचें असल्यास प्रथम पूर्वग्रह अजिबात टाकून द्या. हा त्यांनीं केवळ उपदेश केला एवढेंच नव्हे तर त्याचें पालन आपल्या कार्यांत व लेखनांत कटाक्षानें केलें. जुन्या परिभाषेंत सांगावयाचें तर त्यांचा आदर्श भक्तिमार्गी योगी हा दिसतो आणि या आदर्शानुसार वर्तण्याचा त्यांनीं आटोकाट प्रयत्न केला.

गेल्या वीस वर्षांत महाराष्ट्रातील परिस्थितींत समाजकारण, अर्थकारण व राजकारण या सर्व क्षेत्रांत बरेंच मोठें स्थित्यंतर घडलें आहे. समाजकारणांत व राजकारणांत महाराष्ट्रातील मुख्य जमात मराठे यांचें महत्त्व पुष्कळ अंशीं वाढलें आहे. अर्थकारणांत शेतकऱ्यांपैकीं बरेच सुधारले आहेत. डॉ. आंबेडकर यांच्या अनुयायांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार केल्यामुळें एक मोठी क्रांति घडली. परंतु मूलतः परिस्थिति बहुतांशीं होती तशीच आहे. जातिविचारांचें महत्त्व व समाजाची त्रिविध विभागणी कायम टिकून आहे. बहुसंख्य शेतकरी आणि अस्पृश्य समाज यांची दरिद्रावस्था संपलेली नाहीं. कर्मवीर शिंद्यांचें चरित्र व विचार यांच्या शिकवणींची महाराष्ट्रांत अजून तीव्रतेनें गरज आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनामुळें या शिकवणीचा प्रसार होऊन महाराष्ट्र सर्वांगीण उत्कर्षाच्या मार्गास लागो एवढीच इच्छा.

—ध. रा. गाडगीळ

## प्रस्तावना

कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्या या लेखसंग्रहाचें वैशिष्ट्य असें कीं इतक्या विविध प्रश्नांवरील त्यांचे संशोधनपर निबंध प्रथमच ग्रंथरूपानें प्रसिद्ध होत आहेत. यापूर्वी १९१२ सालीं 'विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख, व्याख्यानें आणि उपदेश' या नावाचा त्यांचा लेखसंग्रह प्रसिद्ध झाला होता. परंतु त्यांतील लेख हे मुख्यतः इंग्लंडमधील त्यांची प्रवासवर्णनें, प्रार्थनासमाज व ब्राह्मोसमाज यांची शिकवण व तत्सम इतर कांहीं विषय यांच्यापुरतेच मर्यादित होते. या लेखसंग्रहामध्यें त्यांनीं केलेला धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान, भाषाशास्त्र, मराठ्यांचा इतिहास, समाजशास्त्र इत्यादि विषयांचा ऊहापोह समाविष्ट आहे. या लेखसंग्रहामध्यें विषयांची विविधता वैशिष्ट्यपूर्ण आहे.

### लेखन मुख्यतः १९२३ ते १९३५ च्या काळांतील

कर्मवीर शिंदे यांचे या लेखसंग्रहातील निबंध मुख्यतः १९२३ ते १९३५ या काळांत लिहिले गेलेले वा प्रसिद्ध झालेले आहेत. १९०६ पासून १९२३ पर्यंत ते 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन' या संस्थेच्या कामात गढून गेले होते. १९२३ सालीं ते या संस्थेच्या कामांतून मुक्त झाले. त्यामुळे त्यांना स्वाभाविकच तुलनात्मक दृष्ट्या अधिक स्वास्थ्य मिळू लागले. १९३५ सालीं नतर ते मधुमेह, गाऊट व इतर आजारानें अंथरुणाला खिळून होते. त्यामुळे १९३५ नतरहि ते फारसें लेखन-वाचन करूं शकत नव्हते; म्हणून त्यांच्या आयुष्यातील सर्व महत्त्वाचे लेखन १९२३ ते १९३५ या एका तपाच्या काळांतच झालेलें दिसतें. या लेखसंग्रहांतील कांहीं लेख विविधज्ञान-विस्तार, रत्नाकर, केसरी, किर्लोस्कर, विजयीमराठा, सुबोध-पत्रिका यांतून प्रसिद्ध झालेले आहेत. तसेंच कांहीं लेख या संग्रहांत प्रथमच प्रकाशित होत आहेत. गेलीं अनेक वर्षे ते कर्मवीर शिंदे यांच्या खाजगी संग्रहात हस्तलिखित स्वरूपांत पडून होते.

### पिण्ड संशोधकाचा वा तत्त्वचिंतकाचा

श्री. विठ्ठल रामजी शिंदे हे महाराष्ट्राला मुख्यतः समाजसुधारक वा धर्मवीर म्हणूनच परिचित आहेत. परंतु या लेखसंग्रहांतून व्यक्त होणारें त्यांचें व्यक्तिमत्त्व एका तत्त्वचिंतकाचें वा संशोधकाचें आहे असें दिसतें. धर्मवीर शिंदे यांचा पिंड हा ज्या एका धर्मवीराचा होता त्याचप्रमाणें एका तत्त्वचिंतकाचा, संशोधकाचा होता, असें यामधून दिसत आहे. भागवत धर्माचें मूळ कशांत आहे, अस्पृश्यतेचें उगमस्थान कोणतें आहे, मराठ्यांची पूर्वपीठिका कोणती आहे, मराठी भाषेचें उगमस्थान कोठें आहे यासंबंधीं त्यांनीं केलेल्या विवरणामध्यें त्यांच्या तत्त्वचिंतनात्मक मनाचा चांगला प्रत्यय येतो. महाराष्ट्राला त्यांचें हें दर्शन पुष्कळच वेगळें आहे. या दृष्टीनेंहि हा लेख-संग्रह उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

### आर्यपूर्व संस्कृतीचें महत्त्व

धर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनीं आपल्या लेखांतून भारतीय संस्कृतीवर *आर्यपूर्व संस्कृतीची केवढी मोठी छाप होती हें दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे.* अण्णासाहेब शिंदे ज्या काळांत हे विचार मांडीत होते त्या काळाची पार्श्वभूमि या दृष्टीनें विशेष उल्लेखनीय आहे. ज्या काळांत अण्णासाहेब शिंदे हें विवेचन करीत होते त्या काळांत महाराष्ट्रांतीलच नव्हे तर हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व विचारवंत भारतीय संस्कृति म्हणजे केवळ आर्यसंस्कृति आहे, असें समीकरण मांडीत होते. या विचाराचें मूलस्थान जर्मनांतील १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील विचारवंतांच्या मध्यें आहे. आर्यसंस्कृति हीच खरी संस्कृति, आर्यपूर्व संस्कृति अत्यंत रानटी, मागासलेली, जंगली होती, असा विचार जर्मनीमधून १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत जगभर पसरला. या विचारवंतांची छाप हिंदुस्थानांतील व पर्यायानें महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व संशोधकावर पडली होती. त्यामुळें स्वाभाविकच भारतीय संस्कृतीची सुरवात ही केवळ आर्यांच्या आगमनानंतरच झाली, येथील आर्यपूर्व संस्कृति ही अतिशय मागासलेली, केवळ रानटी टोळ्याची होती, असें गृहीत धरूनच ते सर्व विवेचन करतात. याचा प्रत्यय ज्ञानकोशकार केतकर, इतिहासाचार्य राजवाडे, डॉ. भांडारकर, न्यायमूर्ति तेलंग या सर्वच विचारवंताच्याबाबत येतो. आपल्या देशांतील बहुतेक सर्वच विचारवंत वरील विचाराच्या छायेखालीं वावरत असतां भारतीय संस्कृती-वर आर्यपूर्व संस्कृतीची फार मोठी छाप आहे, असें अण्णासाहेब शिंदे आपल्या लेखांतून सांगत होते. त्यांच्या विचाराचें दुसरें वैशिष्ट्य असें कीं, भारतीय संस्कृति म्हणजे केवळ आर्य व आर्यपूर्व संस्कृति नव्हे. या आर्यपूर्व संस्कृतीच्याहि आधीं येथें जे मूळचे रहिवासी राहात होते त्यांच्या जीवनपद्धतीचा आर्यपूर्व व आर्यसंस्कृती-वरहि परिणाम झालेला होता. या सर्व संस्कृतींचा एकत्रित झालेला परिणाम म्हणजे भारतीय संस्कृति आहे. या तिन्ही संस्कृतींमधून तयार झालेली एकात्म जीवनपद्धति

म्हणजे भारतीय संस्कृति आहे, असें ते आपल्या विवेचनांतून सूचित करतात. त्यांची ही अभ्यासपद्धति अधिक वस्तुनिष्ठ व समाधानकारक आहे असें वाटतें.

**योग – भक्ति – तत्त्वें : आर्यपूर्व संस्कृतीचीं वैशिष्टयें**

आर्यपूर्व संस्कृतीचा भारतीय संस्कृतीवर झालेला परिणाम ते अनेक पद्धतींनें दाखवितात. 'भागवत धर्माचा विकास' या लेखांत भक्तिमार्ग हा आर्यपूर्व आहे, असें त्यांनीं सांगितलें आहे. ज्ञान आणि कर्म हीं आर्यसंस्कृतीचीं वैशिष्टयें आहेत तर योग व भक्ति हीं आर्यपूर्व संस्कृतीचीं वैशिष्टये आहेत, असें ते सांगतात. याला त्यांनीं वाङ्मयीन व पुरातन संशोधनाचे आवश्यक ते पुरावे दिलेले आहेत. अण्णासाहेब शिंदे यांचा हा मध्यवर्ती सिद्धान्त पुष्कळच विचारप्रवर्तक व नव्या ज्ञानाच्या कसोटीला उतरणारा आहे, असें वाटतें. सिंधमध्यें मोहेंजोदारो, हराप्पा येथें सांपडलेल्या उत्खननांतील पुराव्यांवरून शिवपूजा या लिंगपूजा आर्यपूर्व असावी असें वाटतें. तेथें तर सांपडलेल्या नागपूजा व वृक्षपूजेच्या पुराव्यांवरून भक्तिमार्ग हा आर्यपूर्व असावा असें वाटतें. आर्यांच्या अगदीं प्रारंभींच्या वाङ्मयांत योग व भक्ति यांचे उल्लेख अगदीं तुरळक तुरळक आहेत. अगदीं प्रारंभींच्या या वाङ्मयाकडून अलीकडच्या काळांत जसजसें यावें तसतसें त्याचे पुरावे अधिकाधिक मिळूं लागतात. यावरूनहि आर्यपूर्व संस्कृतीचा आर्यांशीं दीर्घकाळ सहवास आल्यानंतरच हीं दोन्हीं तत्त्वें आर्यसंस्कृतींत आलेली असावीत, असें वाटतें. शिवाय भक्तितत्त्व हें दक्षिणेकडून उत्तरेकडे सरकत गेलें आहे. हें तत्त्व आर्यसंस्कृतींत असतें तर तें उत्तरेकडून दक्षिणेकडे सरकत गेलें असतें. यावरूनहि भक्तितत्त्व हें आर्यपूर्व असावें, असेंच वाटतें.

**अस्पृश्यता आर्यपूर्व संस्कृतींतच असली पाहिजे**

भक्तितत्त्वाच्या मीमांसेप्रमाणेंच अस्पृश्यतेची मीमांसाहि मूलगामी व विचारप्रवर्तक आहे असें वाटतें. भारतीय अस्पृश्यतेचें मूळ शोधीत असतांनाहि अस्पृश्यता आर्यपूर्व असावी, असें अण्णासाहेब शिंदे यांना वाटतें. याला पुरावे म्हणून त्यांनीं दोन गोष्टींचा उल्लेख केला आहे. पहिला पुरावा असा कीं, आपण उत्तरेकडून दक्षिणेकडे जसजसे जातों तसतशी अस्पृश्यतेला अधिक धार प्राप्त होते, यावरून अस्पृश्यता ही मुळांत दक्षिणेकडे व आर्यपूर्व असावी, असें त्यांना वाटतें. शिवाय वाङ्मयीन पुरावे शोधिले तरी आर्यांच्या अगदीं प्रारंभींच्या वाङ्मयांत अस्पृश्यतेचा उल्लेख आढळत नाहीं. अगदीं प्रारंभींच्या वाङ्मयाकडून अलीकडे अलीकडे बुद्धकालाकडे येऊं लागतों तसतसे यासंबंधींचे उल्लेख जास्त प्रमाणावर आढळूं लागतात. यावरूनहि अस्पृश्यता आर्यपूर्व असावी, असें त्यांनीं सूचित केलें आहे.

### अस्पृश्यतेचें मूळ आग्नेय आशियांत असण्याचा संभव

भारतीय अस्पृश्यतेचें मूळ आर्यपूर्व संस्कृतींत असावें असें त्यांनीं म्हटलें आहे. परंतु भारतात या आर्यपूर्व संस्कृतींतहि हें तत्त्व कोठून आलें असावें याचीहि त्यांनीं मीमांसा करण्याचा प्रयत्न केला आहे. याबाबत ते म्हणतात, भारतीय अस्पृश्यता ही आग्नेय आशियांतील देशांतून आर्यपूर्व संस्कृतीमध्यें दक्षिणेकडे प्रथम आलेली असावी. याचा पुरावा देतांना ते असें म्हणतात, कीं उत्तरेपेक्षां दक्षिणेंत अस्पृश्यता तीव्र प्रमाणांत आहे. परंतु दक्षिणेंतहि ती मलबारांत अधिक तीव्र स्वरूपांत आढळते. याचें कारण पूर्वी दक्षिण हिंदुस्थानचा समुद्रमार्गे आग्नेय आशियातील देशांशीं संबंध असावा, असें त्यांना वाटतें. पुढें आर्यांच्या काळात हिंदुस्थानचा संबंध वायव्येकडून मध्यआशियांतील संस्कृतीशीं मोठ्या प्रमाणावर आला. त्याचप्रमाणें आर्यपूर्व काळांत हिंदुस्थानचा संबंध दक्षिणेकडून आग्नेय आशियांतील देशांशीं अधिक आला होता असें संशोधकांच्या संशोधनावरून दिसत येतें. हटनसारख्या विचारवंतानेंयाच गोष्टीवर विशेष भर दिला आहे. अस्पृश्यतेचें *मूळ आर्यपूर्व संस्कृतींत व या आर्यपूर्व संस्कृतींतील अस्पृश्यतेचें मूळआग्नेय आशियांतील* देशांत असावें, असेंच त्यानें आपल्या ' Castes in India ' या ग्रंथांत सुचविलें आहे. अद्यापहि आग्नेय आशियातील बेटांतून राहणाऱ्या जंगली जातींच्या लोकांत ह्या अस्पृश्यत्वाचा व तद्द्योतक शब्दांचा प्रचार जारत आहे. या दृष्टीनें भारतीय अस्पृश्यतेचें मूळ आग्नेय आशियांतील बेटांतून असावें हा अण्णासाहेब शिंदे यांनीं मांडलेला विचार अतिशय महत्त्वाचा आहे, असें वाटतें.

### जातिव्यवस्थादेखील आर्यपूर्व असावी

हटन याच्याप्रमाणेंच इतरहि कांहीं मानववंश शास्त्रज्ञांनीं केवळ अस्पृश्यताच नव्हे तर जातिव्यवस्था ही देखील आर्यपूर्व असावी, असें म्हटलें आहे. प्रत्येक जातिजातींत आढळणाऱ्या चालीरीति, लग्नपद्धति, अंत्यसंस्कार, त्यांच्या धर्मकल्पना, वेगवेगळ्या समजुती यावरून या कल्पनेस पुष्टिच मिळते. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं हा विचार प्रथम फार स्पष्ट स्वरूपात १९०९ व १९११ सालीं प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या ' History of Caste ' या पुस्तकांतून मांडला. आर्यां या देशात चार वर्ण होते व त्यातून वर्णसंकरानें व इतर कारणामुळे या देशात शेंकडो जाति निर्माण झाल्या अशी कल्पना अनेक वर्षे रूढ होती. डॉ. केतकर यांनी याबाबत बरोबर उलटा सिद्धान्त मांडला. त्यांनीं असें सांगितलें कीं, या देशात अगोदर शेंकडो रानटी टोळ्या होत्या. त्यांच्याच पुढें *जाति निर्माण झाल्या. या शेंकडो जातींतून आर्यांनीं चार वर्ण निर्माण केले. या सर्व* जातींचें त्यांनीं वेगवेगळ्या प्रातात वेगवेगळ्या वेळीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या वर्णांत वर्गीकरण केलें. हें वर्गीकरण करीत असतांना निरनिराळ्या ठिकाणीं त्यांनीं निरनिराळे मानदंड वापरले. जाति या आर्यपूर्व होत्या हें सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं कांहीं समाजशास्त्रीय पुरावे दिलेले आहेत. डॉ. केतकर यांच्यानंतर वेगवेगळ्या भूमिकेंतून

यासंबंधीं संशोधन झालें आहे. त्यावरूनहि जाति या आर्यपूर्व असाव्या या कल्पनेला पुष्टिच मिळते. डॉ. इरावती कर्वे यांनीं पंचवीस-तीस वर्षे मानववंश शास्त्राच्या आधारें संशोधन करून जो निष्कर्ष काढला आहे तो वरील कल्पनेस पुष्टीच देत आहे. ' Hindu Society – an Interpretation ' या नुकत्याच प्रकाशित झालेल्या आपल्या पुस्तकांत डॉ. इरावती बाईंनी कर्वे हाच विचार समाजशास्त्रीय व मानववंशशास्त्रीय पुराव्यांच्या आधारें मांडला आहे. जातिव्यवस्था ही आर्यपूर्व असावी असें मानावयाला आता पुष्कळ नवे पुरावे पुढें येत आहेत. जातिव्यवस्थाच आर्यपूर्व असेल तर अस्पृश्यताहि स्वाभाविकच आर्यपूर्व असावी असें समजावयाला अधिक बळकटी येते. या दृष्टीनें कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनीं यासंबंधीं केलेल्या विचाराला पंचवीस-तीस वर्षांनंतर नव्या संशोधनानें पुष्टिच मिळत आहे, असें दिसून येईल.

' अस्पृश्य एके काळचे राजवैभव भोगलेले राजे

भारतीय अस्पृश्यांची मीमांसा करताना ते असे म्हणतात कीं, येथील अस्पृश्य मूळचे येथील राजवैभव भोगलेले मोठमोठे राजे असले पाहिजेत. परंतु केवळ जेत्यांनीं त्यांचा पराभव केल्यामुळे त्यांच्या कपाळी ही अस्पृश्यता आलेली असावी. आजचे अस्पृश्य हे एके काळचे मोठे राजे होते, असे त्यांना अनेक पुराव्यांवरून वाटते. ' ब्रह्मदेशांतील बहिष्कृत जमाती ' या आपल्या लेखांतून त्यांनीं हाच विचार मांडला आहे. ब्रह्मदेशांतील बहिष्कृत जमातींचें संशोधन करताना त्यांना वरील सिद्धान्ताला अगदीं अनपेक्षितपणे म्हणजे दहाव्या शतकातला पुरावा मिळाला. त्यामुळे त्यांच्या वरील संशोधनाला विशेष महत्त्व आहे, असें ते मानतात. भारतीय अस्पृश्यतेचें मूळ त्यामुळेच राजकीय गुलामगिरीत असावें, असें त्यांनीं म्हटलेलें आहे. अस्पृश्य मानलेले वंश सारे संस्कृतिहीनच होते असे मुळींच नाही. ब्रह्मदेशांत तुहा याजा ( अशुभ राजा ) फया चुन वगैरे जे अस्पृश्य वंश आढळत आहेत ते जिकले जाण्यापूर्वी राजवंश होते असें अण्णासाहेब शिंदे आपल्या ' अस्पृश्यांचें राजकारण ' या लेखांतूनहि सांगतात. ( पान-९७ )

अण्णासाहेब शिंदे यांनी मांडलेला हा विचार पुढें डॉ. आंबेडकर यांनीं ' Who were the Shudras ? How they came to be the furth in the Indo-Aryan Society ' या १९४६ सालीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या ग्रंथात मांडलेला आहे. डॉ. आंबेडकरांनी यासाठी महाभारतातील शांतिपर्वांत उल्लेख केलेल्या पैजवन राजाचा आधार आपल्या विवेचनाच्या पुष्ट्यर्थ दिलेला आहे विजवन राजाचा मुलगा सुदास् याचा पुरोहित वाल्मीकि होता असें निरुक्तांतील वचनावरून डॉ. आंबेडकर यांनी वरील ग्रंथांत दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. आजचे अस्पृश्य हे एकेकाळचे लढवय्ये शूर राजे होते हेंच सिद्ध करण्याचा प्रयत्न डॉ. आंबेडकर यांनीं आपल्या वरील ग्रंथांतून केला आहे. महाराष्ट्रांत हा विचार प्रथम महात्मा फुले यांनी १८६७ सालीं

आपल्या 'गुलामगिरी' या पुस्तकांतून मांडला आहे. म. फुले, कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे व डॉ. आंबेडकर यांनीं याबाबत एकच विचार मांडला आहे असें दिसतें. परंतु कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे आणि महात्मा फुले व डॉ. आंबेडकर यांच्या भूमिकेंत कांहीसा फरक आहे. म. फुले व डॉ. आंबेडकर हे मुख्यतः आजचे अस्पृश्य एके काळचे माळी, कुणबी वगैरेसारखे शूद्र व क्षत्रिय होते. वंशानें ते सर्व आर्यच होते हे दाखविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. उलट कर्मवीर शिंदे हे अस्पृश्य हे आर्यपूर्व वंशाचेहि असण्याचा संभव आहे, असें सुचित करतात. त्यांच्या भूमिकेंतील वरील फरक लक्षांत घेऊनसुद्धां या संशोधकांची अस्पृश्यांबाबत भूमिका पुष्कळशी समान आहे, असें दिसतें.

मानवी समाजांतील अस्पृश्यतेचें मूळ

जगांतील अस्पृश्यतेचें मूळ कशांत आहे यासंबंधीं निरनिराळ्या समाजशास्त्रज्ञांनीं व मानववंशशास्त्रज्ञांनीं वेगवेगळे सिद्धान्त मांडले आहेत. होकार्ट, इमाइल सेनार्ट, डॉ. घुर्ये, डॉ. आंबेडकर, हटन यांनीं यासंबंधीं केलेली मीमांसा महत्त्वाची आहे. परंतु कर्मवीर शिंदे यांनीं या प्रश्नांची केलेली समीक्षा वरील सर्व समाजशास्त्रज्ञांपेक्षां वेगळी आहे. मानवाच्या प्राथमिक अवस्थेंत त्याचा जादूटोणा, मंत्रतंत्र यांवर विश्वास होता. रोग बरे करायचे झाले व इडापीडा टाळायची झाली तर तो या जादूटोण्याकडे वळे. या जादूचे दोन प्रकार होते. त्यांतील एका प्रकारची जादू संकटें दूर करण्यासाठीं वापरली जाई आणि दुसऱ्या प्रकारची जादू शत्रूला त्रास देण्यासाठीं उपयोगांत आणली जाई. या जादूटोणा करणाऱ्या वर्गाला कोणी स्पर्श करायचा नसे. एका अर्थानें ते अस्पृश्यच होते. ही अस्पृश्यता प्रथम प्रथम वैयक्तिक व प्रासंगिक होती. परंतु पुढें तिला गूढ आणि दृढ स्वरूप प्राप्त होऊं लागलें व पुरोहितांच्या द्वारें त्याची परंपरा व घटना बनत चालली तसतशी अस्पृश्यता वैयक्तिक आणि स्थानिक स्वरूपांत न राहतां तिला जातीचें व सार्वत्रिक स्वरूप प्राप्त होऊं लागलें. अस्पृश्यतेचें मूळ अशा प्रकारें मंत्रतंत्राच्या (Magic) कल्पनेंत आहे, असें कर्मवीर शिंदे यांनीं म्हटलें आहे. आपल्या या विचाराचा प्रपंच करतांना ते आपल्या 'भारतीय अस्पृश्यांचा प्रश्न' या पुस्तकांत म्हणतात—

"अस्पृश्यता ही एक स्वतंत्र मानवी संस्था आहे. हिचा उदय मानवी जातीच्या अगदीं प्राथमिक स्थितींतच झाला असला पाहिजे. भूत, प्रेत, पिशाच्च, इत्यादि कल्पना मानवी जातीच्या प्राथमिक म्हणजे अगदीं रानटी स्थितींत सर्वत्र पसरलेल्या होत्या. तौलनिक धर्मशास्त्रांत ह्या कल्पनासमुच्चयाला भूतवाद (Animism) असें नांव आहे. हा भूतवाद व ह्याप्रमाणेंच इतर प्राथमिक धर्माच्या अज्ञाणी कल्पना व त्यावरून बनलेल्या जादूटोणा, धातुरमातुर, इत्यादिकांना मीं पुढें अपधर्म असें नांव दिलें आहे. ज्या धर्माचा पाया मानवी प्रज्ञा आहे तो जरी निष्काळजीपणामुळें विकृत झाला

तरी त्याला मी अपधर्म हें नाव देणार नाहीं. रागावलेल्या भुतांना संतुष्ट करणें किंवा एखाद्या भुताला टाळून टालवून किंवा एखाद्या भुताला भेडसावून त्याच्याकडून आपल्याला इष्ट असा अर्थ किंवा अनर्थ घडवून आणणें शक्य आहे, अशी प्राथमिक मानवाची समजूत असे. ह्या समजुतीप्रमाणें जादू, टोणा, मंत्र, तंत्र, यंत्र, वगैरे जे अपधर्माचे अनेक प्रकार असत त्याला अभिचार ( Magic ) असें एक सामान्य नागर नांव देतां येईल. ह्याचे कृष्ण अभिचार ( Black magic ) आणि भेषज ( Medicinal ) अथवा शुक्ल अभिचार ( White magic ) असे दोन मुख्य प्रकार सुधारलेल्या वैदिक काळ तहि होते. ... ... जन्म, मृत्यु, सांथीचे रोग व इतर आकस्मिक आपत्ति ह्यांचा संबंध प्राथमिक जगांत भुताखेतांकडे आणि क्षुद्र देवतांकडे लावण्यांत येत असे. त्याचें निवारण करण्यांत निष्णात असे पंचाक्षरी अथवा वैदु ( Medicine men ) होते. तेच पूर्वकाळचे ऋषि आणि पुरोहित असत. त्यांच्या चऱ्यावाईट क्रियांना जादू किंवा अभिचार म्हणतां येईल. ह्याप्रमाणें ह्या जादूचा प्राचीन धर्मात समावेश झाला, तो अद्यापि पुष्कळ ठिकाणीं सामान्य जनतेंत प्रचलित आहे. ह्या अपधर्मातच अस्पृश्यतेचा उगम आहे.

प्रथम प्रथम ही अस्पृश्यता वैयक्तिक व प्रासंगिक ऊर्फ नैमित्तिक होती. बाळंतीण व तिची खोली, मृतांची जागा व आप्त, विशिष्ट रोगी, झपाटलेलीं माणसें, विक्षिप्त झाडें, खुनाखारल्या अपघाताचीं ठिकाणें वगैरे यांची अस्पृश्य आणि वर्जनीय ठरल्या. जादू करणारे जादूगार आणि पुरोहित हे देखील सोवळे म्हणजे एक प्रकारें अस्पृश्यच असत. देवपूजा करणाऱ्या ब्राह्मणाला आणि यज्ञपरिषद् चान्द्र असेतोपर्यंत सर्व ऋत्विजाना आणि इतर याज्ञिकांना नेहमीं सोवळ्यांत म्हणजे अस्पृश्य अथवा अलग स्थितींतच राहावें लागे. ... ... अशा अपधर्माला उत्तरोत्तर जसजसें गूढ आणि दृढ स्वरूप प्राप्त होऊन पुरोहितांच्या द्वारें त्याची परंपरा आणि घटना बनत चालली तसतशी ह्या अस्पृश्यतेच्या वैयक्तिक आणि स्थानिक स्वरूपाची परिणती जातीय आणि सार्वत्रिक उर्फ नित्य स्वरूपांत होऊं लागली. ... ... आणि अस्पृश्यतेचें मूळ कारण हा जो अभिचारमूलक अपधर्म तो जरी पुढें लुप्त होऊन विस्मृत झाला तरी जातीय अस्पृश्यता शिल्लक उरलीच. ”

( भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न, पृ. १२–१४ )

### अस्पृश्यता हिंदुस्थानांतच कां स्थिरावली ?

अस्पृश्यता मानवाच्या प्राथमिक अवस्थेत सर्वत्रच उद्‌याला आली, परंतु ती हिंदुस्थानांतच शेंकडो वर्षे कां स्थिरावली व तिला इतकें घृणास्पद स्वरूप कां प्राप्त झालें हा महत्त्वाचा प्रश्न आहे. यासंबंधीं कर्मवीर शिंदे यांनीं वरील ग्रंथांत मीमांसा केली आहे. भारतीय समाजांत अस्पृश्यता शेंकडों वर्षे टिकून राहिली याचें मुख्य कारण हा समाज स्वयंपूर्ण ग्रामरचनेवर उभारला आहे, असें त्यांना वाटतें. आमच्या ग्रामसंस्थेबरोबर

अस्पृश्यतेमागील तात्त्विक भूमिका महत्त्वाची आहे. कर्मविपाकाचा सिद्धान्त, पुनर्जन्माची कल्पना हा जातिव्यवस्थेचा व अस्पृश्यतेचा तात्त्विक पाया आहे. अस्पृश्यतेविरुद्ध रोकठोक वैचारिक बंड होऊं शकलें नाहीं याचें प्रमुख कारण या तत्त्वज्ञानात्मक अधिष्ठानांतहि असण्याचा संभव आहे. कर्मवीर शिंदे यांच्या विवेचनांतून हा विचार निसटलेला असावा असें वाटते.

महाराष्ट्रांतील मराठे शकवंशाचे

'मराठ्यांची उपपत्ति' या लेखांत कर्मवीर शिंदे यांनीं महाराष्ट्रांतील मराठ्यांचें मूळ शोधण्याचा प्रयत्न केला आहे. भाषाशास्त्र, समाजशास्त्र व लिखित पुरावे यांच्या आधारें मराठे हे शक वा पल्लव वंशाचे असावे असें त्यांनी या लेखांत म्हटलें आहे. त्यांच्या वरील तीन प्रकारच्या पुराव्यांमध्यें समाजशास्त्रीय पुरावे विशेष महत्त्वाचे आहेत. शक वा पल्लव आणि मराठे यांच्या चालीरीति, आहार, पश्य-पद्धति, धर्म-कल्पना, व्यवसाय, पोशाख-पद्धति, यांमध्यें मोठें साम्य आहे. यावरुन मराठे हे शक वंशाचे असावे असे त्यांनी सुचविलें आहे. गेल्या कांहीं वर्षांत महाराष्ट्रांतील लोक-समूहाचें मानववंशशास्त्रदृष्ट्या जें संशोधन झालें आहे त्यावरुन कर्मवीर शिंदे यांच्या वरील निष्कर्षास पुष्टीच मिळते असे दिसतें. डॉ. इरावती कर्वे यांनीं महाराष्ट्रांतील वेगवेगळ्या जातींची मानववंशशास्त्रदृष्ट्या जी पाहणी केली त्यावरुन त्यांनी वरीलसारखाच निष्कर्ष काढला आहे. 'मराठी लोकांची संस्कृति' या ग्रंथांत त्या म्हणतात, "मराठे व इतर जाती आल्या कोठून हा प्रश्न शिल्लक राहतोच. मध्ययुगाच्या सुरुवातीस रजपुतांचें नाव प्रथम ऐकूं येतें. नतर गुर्जरांचें ऐकूं येतें व गुर्जर रजपुतांपैकीच एक टोळी असावी असे दिसतें; पण त्यांच्याहि आधीं महाराष्ट्राच्या इतिहासात अतिप्राचीन काळीं महाराष्ट्राचे पहिले राजे जे शातवाहन ते पश्चिमेकडून येणाऱ्या शकांच्या आक्रमणाला तोंड देत होते असा इतिहास आहे. आर्यांच्या टोळ्या उत्तरेकडून दक्षिणेकडे ज्याप्रमाणें शतकेंच्या शतकें येत होत्या व जुन्या स्थायिक आर्यांचें जसे नव्यांशीं युद्ध होत होतें, तसेच शकांच्या बाबतींत झाले असणार. शक लोक उत्तरेकडून येऊन गुजरातेंतून महाराष्ट्रात शिरले, ते एका लहानशा कालखंडात नसून त्यांचे वार्षिक आक्रमण कित्येक शतकें चाललेलें असण्याचा संभव आहे. ह्या शकांपैकींच अगोदर आलेल्या वर्गांतील शातवाहन राजे असावेत असे दिसते. ह्या राजांचें राज्य जरी प्रतिष्ठानी होते तरी सर्व महत्त्वाचे शिलालेख पश्चिमपट्टींत आहेत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे व त्या शिला-लेखांत स्वतःस महारठी व महारठीणी म्हणविणारे लोक म्हणजेच मराठे असावे असा कयास करण्याजोगा आहे. रजपुत लोक हिंदुस्थानांत येण्याच्या आधीं कित्येक शतकें मराठी लोक महाराष्ट्रांत स्थायिक होउन, राज्ये स्थापून, राहिले होते व ते इतिहासात प्रसिद्ध पावलेल्या शक वंशांपैकीं अगदीं पहिल्याने आलेले वसाहतकार असावे असा तर्क करण्यास सध्या हरकत दिसत नाहीं." (मराठी लोकांची संस्कृति, पृ. १५३.)

धर्मवीर शिंदे आपल्या वरील लेखांत रजपूत व मराठे हे एकाच वंशाचे असावे असें भाषाशास्त्रीय पुराव्याच्या आधारें म्हणतात. परंतु डॉ. इरावती कर्वे यांनीं मानववंशशास्त्राच्या आधारें काढलेल्या निष्कर्षांशीं तो जुळतामिळता नाहीं. 'रजपूत लोक दीर्घमस्तक आहेत' व 'मध्य महाराष्ट्रांतील ब्लाढ्य मराठा शेतकरी मध्यम-कपाल आहेत' व यावरून मराठे व रजपूत एकाच वंशाचे नव्हेत, असें डॉ. इरावती कर्वे म्हणतात. कोणताहि समाज पूर्णपणें एकाच वंशाचा आहे असें शास्त्रीय दृष्ट्या म्हणणें अवघड आहे. प्राचीन काळीं अनेक वंशाची परस्परांमध्यें मिसळ झाली आहे. त्यामुळे वरील विधान काटेकोरपणें करतां येणार नाहीं. स्थूल अर्थानेंच तें आतां घ्यावें लागेल.

मराठी भाषेचा प्रवास

धर्मवीर शिंदे यांनीं अस्पृश्यता, मनिमार्ग, महाराष्ट्रांतील मराठे यांचें मूळ शोधण्याचा जसा प्रयत्न केला आहे त्याचप्रमाणें मराठी भाषेचें मूळ कोठें आहे याचाहि त्यांनीं शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. याहिशाबत त्यांची मीमांसा भाषाशास्त्राच्या दृष्टीनें विचारप्रवर्तक ठरेल, निदान विचारवंतांच्या विचाराला खाद्य पुरविणारी ठरेल, असा विश्वास वाटतो. महाराष्ट्रांतील मराठी ही मगध, पश्चिम बंगाल, ओरिसा, तेलगण या प्रांतांतून प्रवास करीत करीत महाराष्ट्रांत आलेली असावी असें त्यांना वाटतें. आपल्या या विचाराचें विवरण करीत असतां ते म्हणतात, "बंगाल, ओरिसा, तेलगण आणि दक्षिण कोंकण ऊर्फ केरळ या चार प्रांतांतून गेल्या दोन वर्षांत मला प्रवास करावा लागला. त्यावरून हल्लींची मराठी ही केवळ महाराष्ट्री असें नाव असलेल्या एका प्राचीन प्राकृतांतूनच आलेली नसून ती मगध देशांतून पश्चिम बंगाल, ओरिसा, तेलंगण, वऱ्हाड आणि एक हजार वर्षांपूर्वीचा उत्तर कर्नाटक (कृष्णा आणि गोदावरी मधमधला भाग) या प्रांतांतून प्रवास करीत आलेली एक भाषा असावी, असा माझा पूर्ण मत बनत चालला आहे. इतकेंच नव्हे तर अशा अर्धवट बनलेल्या स्थितींतच ही प्रगमनशील भाषा सुमारें हजारबाराशें वर्षांत उत्तर कोंकण ऊर्फ अपरांत या प्रांतीं आणि तेथून खालीं दक्षिण कोंकण ऊर्फ केरळ या प्रांतांत उतरली आणि त्या दोनहि प्रांतांत हल्लीं ही मालवणी, गाडेनी आणि कोंकणी या नावांनीं रूढ आहे." (पृ. १६६.) याला पुरावा म्हणून त्यांनीं भाषाशास्त्रांतील काहीं वाक्यरचनेच्या वैशिष्ट्यांना दिला आहे. मराठीच्या रूपांचा कल गुजराथी, सिंधी अगर हिंदीपेक्षा बंगाली अथवा ओरिसा भाषेंतील शब्दांच्या आणि प्रयोगाच्या रूपाकडे अधिक झुकता आहे, असें त्यांनीं दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. याशिवाय स्वरवैशिष्ट्याच्या दृष्टीनेंहि मराठी, कोंकणी, बंगाली या परस्पराला अधिक जवळच्या भाषा आहेत. धर्मवीर शिंदे यांनीं या भाषेंतील ध्वनि, त्यांच्यांतली रूपसिद्धि यांच्या साहाय्यानें मराठीचें मूळ मगध व पश्चिम बंगाल येथें शोधण्याचा जो प्रयत्न केला आहे तो भाषाशास्त्राच्या दृष्टीनें

चिंतनीय ठरेल असा विश्वास वाटतो.

कोंकणी व मराठी यांच्या परस्पर संबंधाबद्दल कर्मवीर शिंदे यांनी भाषाशास्त्राच्या भूमिकेवरून चिकित्सा केली आहे व कोंकणी ही मराठीचीच पोटभाषा आहे, असें त्यांनी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. यासंबंधीं भाषाशास्त्रज्ञांमध्यें दोन विचारप्रवाह स्पष्ट दिसून येतात. यांतील एका विचारप्रवाहाचें असें मत आहे कीं, कोंकणी ही मराठीची पोटभाषा नसून ती तिची भाषाभगिनी आहे. गुजराथी, हिंदी या इतर भाषाभगिनी ज्याप्रमाणें संस्कृतापासून स्वतंत्रपणें निर्माण झाल्या त्याचप्रमाणें कोंकणी ही देखील संस्कृतपासून स्वतंत्रपणें जन्माला आलेली आहे. या भाषाशास्त्रज्ञाच्या प्रतिपादनाचें मुख्य सूत्र असें कीं, कोंकणीची उच्चारणपद्धति, हेल, आंदोलन, आघात, इत्यादि बाबतींत कोंकणी ही मराठीपेक्षां पुष्कळच भिन्न आहे. शिवाय ऐतिहासिक पार्श्वभूमीच्या दृष्टीनें या दोन्ही भाषाचा अभ्यास केला तर असें दिसून येईल की ज्या स्थित्यंतरांतून परिवर्तित होत संस्कृताची ध्वनिरचना मराठी ध्वनिरचनेपर्यंत येऊन पोहोचली आहे त्याच मार्गानें संस्कृतचे ध्वनि कोंकणीपर्यंत येऊन पोहोचलेले असण्याचा दाट संभव आहे. याशिवाय या विचाराचे प्रवक्ते आणखी असा एक पुरावा पुढें मांडतात कीं, कोणतीहि भाषा दुसऱ्या भाषेची पोटभाषा आहे कीं नाहीं हें ठरविण्याचा एक साधा निकष आहे. ही पोटभाषा बोलणाऱ्या माणसाची भाषा दुसऱ्या माणसाला पूर्वीचा अभ्यास नसताना व फारसे आयास न घेतां जर ती समजत असेल तरच ती भाषा मुख्य भाषेची पोटभाषा आहे असे समजावें. पोटभाषा आहे कीं नाहीं हें ठरविण्याचा हा एक अतिशय महत्त्वाचा मानदंड आहे, असेंहि पहिल्या विचारप्रवाहाचे प्रवक्ते सांगतात. या दृष्टीनें कोंकणी ही विशेषतः दक्षिण कोंकणी ही मराठी भाषिकाला विनायास व पूर्वाभ्यास नसतांना समजणें केवळ अवघडच नव्हे तर अशक्य आहे. या दृष्टीनें कोंकणी ही मराठीची पोटभाषा नव्हे तर भाषाभगिनी आहे, असें भाषाशास्त्रज्ञ सांगतात. या प्रवाहाचे मुख्य प्रवक्ते म्हणून डॉ. सु. मं. कत्रे व डॉ. ना. गो. कालेलकर यांचा उल्लेख करता येईल. याबाबतचा दुसरा विचारप्रवाह असें मानतो कीं, कोंकणी ही मराठीचीच एक पोटभाषा आहे. हा विचार मुख्यतः डॉ. भांडारकर, डॉ. पां. दा. गुणे, डॉ. ग्रिअर्सन यांनी शास्त्रीय पद्धतीनें मांडण्याचा प्रयत्न केला आहे. कर्मवीर शिंदे हे याबाबतींत या दुसऱ्या विचारप्रवाहाचे एक प्रमुख प्रवक्ते आहेत. कोंकणी ही मराठीचीच पोटभाषा कशी आहे हें दाखवितांना ते म्हणतात, "क्रियापदांच्या काळाचीं रूपें पाहिलीं असतां कोंकणीचें इतर कोणत्याहि चालू प्राकृतापेक्षां मराठीशीं विलक्षण साम्य आहे. इतकेंच नव्हे तर, गुजराथी, सिंधी अगर हिंदीपेक्षांहि बंगाली अथवा ओरिया भाषेंतील काळांच्या आणि प्रयोगाच्या रूपांशीं तिच्या रूपाचा अधिक फार घनिष्ठ संबंध आहे. आणि तसाच मराठीच्याहि रूपाचा संबंध आहे. ह्या गोष्टीवरून मराठी भाषा बंगालचा पश्चिम भाग आणि ओरिसा ह्या प्रांतांतून प्रवास करून दक्षिणेंत आल्यावर तिचें जे रूप बनलें तें रूप सारस्वतांनीं कोंकणांत नेलें असावें असें अनुमान होतें."

पुढें मराठीचा व कोंकणीचा संबंध ज्ञानेश्वरकालीं कांहीं वर्षे आला. परंतु त्यानंतर ज्ञानेश्वरकालीन मराठी घेऊन कांहीं लोक गोव्याकडे गेले व पुढें सह्याद्रि पर्वतामुळें व त्याकाळीं दळणवळणाचीं साधनेंहि मर्यादित असल्यामुळें त्यांचे संबंध पुढें पुरेसे राहूं शकले नाहींत. पुढें कोंकणीची व मराठीची वाढ कांहींशा वेगळ्या पद्धतीनें झाली. परंतु तरीदेखील आजच्या कोंकणीवर ज्ञानेश्वरकालीन मराठीची छाप आहे, असें कर्मवीर शिंदे सांगतात. ज्ञानेश्वरकालीं कांहीं काळ एकत्र आल्यानंतर मराठीचा प्रवास कोंकणांत कसा झाला असावा यासंबंधींचें विवेचन करताना ते म्हणतात, " मराठीचा आणि सारस्वत ब्राह्मणांचा समागम इ. स. १२०६ आणि १२९० च्या दरम्यान घडला असावा व त्यानंतर हे लोक ही नवीन अर्धवट संपादिलेली ज्ञानेश्वरीच्या काळची जुनी मराठी घेऊन कोंकणांत गेलेले असावेत. त्यानंतर त्यांचा आणि सह्याद्रीच्या पूर्वेकडील मराठीचा संबंध तुटल्यामुळे त्यांच्या पुढील विकासात फरक पडलेला असावा. " ( पृ. क्र. १४७-४८ ) कर्मवीर शिंदे यांचें हें विवेचन पुष्कळच विचार करण्यासारखें आहे. पुढें मराठीवर फारशी आणि इंग्रजीचे दीर्घ आणि दृढ संस्कार झालेले आहेत. त्याचप्रमाणें कोंकणीवर, विशेषतः अतिदक्षिणेकडील कोंकणीवर कानडी आणि पोर्तुगीज याचा ठसा उमटला आहे. त्यामुळें पुढील काळांत दोन्ही भाषांच्या वाढीमध्यें फरक पडणें स्वाभाविक आहे.

कर्मवीर शिंदे यांनी हें विवेचन केल्यानंतर गेल्या कांहीं वर्षांत याविषयी जे नवीन पुरावे पुढें आले आहेत त्यावरुन त्यांच्याच विचाराला पुष्टी मिळत आहे. खांडोळे या गांवाच्या गांवकऱ्यांनीं तयार करविलेल्या इ. स. १३०० मधील ताम्रपट, वेरे गांवचा इ. स. १३४८ मधील ताम्रपट, वेळुस व फोंड्यांतील वाडोडे गांवचे इ. स. १४१३ मधील शिलालेख जे उपलब्ध झाले आहेत त्यांवरुन कोंकणी ही मराठीचीच पोटभाषा असावी असें दिसतें. कारण या सर्व लेखांतील भाषा व महाराष्ट्रांतील तत्कालीन लेखांतील भाषा यांत फार मोठें साम्य आहे, असें भाषाशास्त्रज्ञांचें मत आहे. त्याचप्रमाणें गोमंतकांतील ग्रामसंस्था, देवालयें, पाटील-कचेऱ्या यांचें दफ्तर फार प्राचीन कालापासून अद्यापपर्यंत मराठींतून असे व सर्व दर्जाचे गोमंतकीय हिंदु आपले खाजगी व्यापारविषयक पत्रव्यवहार व टिपणें मराठींतूनच करीत असत. अद्यापहि ते मराठींतूनच करतात. एवढेंच नव्हे, तर फादर स्टिफन्स, पाद्री इ तेव द भूज, पाद्री आंतोनिओ द साल्वांज इत्यादि मिशनऱ्यांनीं सोळाव्या सतराव्या शतकांत ख्रिस्तावरील पुराणें रचलीं तीं मराठींतूनच. त्या काळीं बहुसंख्य समाजाची भाषा मराठीच असल्यामुळें त्यांच्या गळीं उतरविण्यासाठीं त्यांना आपले धर्मग्रंथ मराठींतूनच लिहावे लागले. शिवाय पोर्तुगीज सरकार देखील आपल्या सरकारी गॅझेटांत विशेषप्रसिद्धि द्यावयाच्या मजकुराचें मराठींत भाषांतर देत असे. यावरूनहि त्या काळांतील बहुजन समाजाची भाषा मराठीच असावी असें दिसतें. कर्मवीर शिंदे यांनीं यासंबंधीं केलेले विवेचन त्यामुळेंच काळाच्या कसोटीला उतरत आहे, असें वाटतें.

ज्ञानेश्वरकालीन मराठी घेऊन गेलेल्या सारस्वतांच्या कोंकणीमध्यें त्या काळांतील

मराठी शब्द मोठ्या मुख्येनें आढळतात. हें भाषाशास्त्रज्ञांचें मतहि विचारांत घेण्यासारखें आहे. शिवकालामध्यें छत्रपति शिवाजी महाराजांचे बंधु व्यंकोजी यांच्या बरोबर कांहीं मराठी कुटुंबें शिवकालीन मराठी घेऊन तंजावरकडे गेलें. त्यानंतर त्यांच्या मराठीचे व मध्यवर्ती मराठीचे संबंध तुटले. त्यामुळें आज तंजावरकडील मराठी व महाराष्ट्रांतील मराठी यांत पुष्कळच फरक पडला आहे. परंतु तंजावरकडील मराठीवर अद्यापहि शिवकालीन मराठीची छाप दिसते. त्याचप्रमाणें गोव्यांतील सारस्वतांच्या कोंकणी भाषेबाबत झालेलें असण्याचा संभव आहे.

हा प्रश्न भाषाशास्त्रज्ञांचा आहे. भाषाशास्त्रीय कसोटीवर घासून पुसूनच या प्रश्नांचें निर्णायक उत्तर दिलें गेलें पाहिजे. परंतु एखाद्या भाषेचा अभ्यास करीत असतांना केवळ एकाच भाषाशास्त्रीय भूमिकेवरून अलगअलगपणें विचार करतां येणार नाहीं. त्या भाषिक गटाचे सांस्कृतिक संबंध, त्यांचे धर्मग्रंथ इत्यादि इतर अंगांचाहि विचार झाला पाहिजे. या सर्वांगीण विचारपद्धतींतूनच या प्रश्नांचाहि अभ्यास झाला पाहिजे. या दृष्टीनें कर्मवीर शिंदे यांनीं प्रतिपादलेल्या विचाराला अधिकाधिक पुष्टि मिळेल, असें वाटतें.

खरा प्रश्न नैतिक मूल्यांचा आहे

इ. स. १९२० नंतर म. गांधींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रीय चळवळीला नवा जोम प्राप्त होऊं लागला. त्यानंतर या चळवळीचे पडसाद कमी जास्त प्रमाणांत संस्थानीं मुलुखांत उमटूं लागले. संस्थानांतूनहि लोकप्रतिनिधींनीं जबाबदार राज्यपद्धति सुरू करावी अशी मागणी संस्थानीं चळवळींतून होऊं लागली. अशा या काळांत भोर संस्थानांतहि लोकांनीं अशा प्रकारची मागणी करण्यासाठीं चळवळ सुरू केली होती. भोर संस्थानांतील चळवळीचें नेतृत्व त्या वेळीं शेटे पोतनीस यांच्याकडे होतें. अशा वेळीं (इ. स. १९२८) *कर्मवीर शिंदे यांच्या अध्यक्षतेखालीं* '*अखिल भोर संस्थान* परिषद' भरली होती.

या वेळीं कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनीं सत्ता हस्तांतरित होण्याच्या संदर्भांत कांहीं मूलग्राही विचार मांडलेले आहेत. सत्ता केवळ राजाच्या हातांतून लोकप्रतिनिधींच्या हातांत जाणें म्हणजे महत्त्वाचें स्थित्यंतर नव्हे तर सर्वसामान्य माणसांबद्दल व प्रजेबद्दल सहानुभूति ठेवून त्याच्याकडे पाहण्याची दृष्टि निर्माण करणें *ही खरी सुधारणा होय. सत्ता केवळ एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातांत जाऊन हा* प्रश्न सुटणार नाहीं. खरा प्रश्न सत्तेच्या हस्तांतराचा नसून नैतिक मूल्यांचा, शीलाचा या विशाल अंतःकरणाचा आहे. आपला हा विचार मांडीत असतांना ते आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणतात, "लोक-कल्याण म्हणजे नुसतीच सनदेची अदलाबदल नव्हे, शीलाची व अंतःकरणाची पालट होय. ही पालट सावकाश घडत असते आणि ती घडवून आणण्याचें अधिक कठीण काम भावी शेटे-पोतनिसांवर अवलंबून आहे. ते

कोणीहि असोत, हे काम करीत एवढेच आमचें म्हणणें आहे. हल्लींचेंच ब्रिटिश हिंदुस्थान घ्या. त्यांत लोकनियुक्त कौन्सिलें थोड्याफार प्रमाणांत का होईना आहेतच. तेथील कारभार किती निर्वेधपणाचा आहे, केवळ पगारासाठी भुकेलेल्या नामधारी लोकमंत्र्यांना परकीय नोकरशाही कशी बोटांवर नाचविते, हें काय सत्यानिष्ठांनो, तुमच्या नजरेत येत नसेल? खालसांतल्या म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डे, युनिव्हर्सिट्या, फार काय पण मोठमोठीं लोकाचीं हॉस्पिटलें, शाळा आणि वसतिगृहें यांत तर परकीय नोकरशाहीचा हात नसतो ना? मग तीं कितीशीं खऱ्या दीनदुबळ्या प्रजेच्या इच्छांना व गरजांना जबाबदार आहेत? नव्हत्यास कां नाहीत? कारण तेथें शीलाची अद्याप आलटापालट झाली नाहीं. म्हणूनच महात्मा गांधींसारखे मोठमोठे शासनाचार्य कळवळयानें सांगत आहेत, कीं बाबांनों, नुसत्या सनदेची पालट करूं नका, तर शीलाची नव्हे प्रत्यक्ष हृदयाची—करा." (पृ० पान २८६.) केवळ सत्ता एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातांत जाण्यापेक्षां मूल्यांच्या परिवर्तनावर दिलेला हा भर केवळ त्या काळांतच नव्हे, तर आज ना यापुढेंहि अनेक वर्षे महाराष्ट्रात मार्गदर्शक ठरणार आहे.

शासनयंत्रणेबाबत दोन विचारप्रवाह

महाराष्ट्राच्या शासनयंत्रणेविषयीदेखील त्यांनीं कांहीं महत्त्वाचे विचार मांडलेले आहेत. स्थूल मानानें १८१८ नंतर इंग्रजी राजवटीमुळें आपल्यापुढे नवीन शासनयंत्रणा सुरू झाली. अगदी प्रारंभीपासूनच येथील शासनयंत्रणेसंबंधी महाराष्ट्रांत दोन विचारप्रवाह निर्माण झाले. ते जवळ जवळ समांतर रेषेनें आमच्या समाजजीवनात वाहात आहेत. येथील एका विचारप्रवाहानें मुख्यतः नागर भागातील उच्चवर्गीय समाजाच्या शासनविषयक प्रश्नाचा विचार केला व या संदर्भात त्यांनी या देशातील शासनयंत्रणेचे जास्तींत जास्त लवकर भारतीयीकरण झालें पाहिजे, आय. सी. एस्. श्रेणीमध्यें जास्तींत जास्त हिंदी लोकांचा समावेश झाला पाहिजे, यासाठी आय. सी. एस्. ची परीक्षा इंग्लंडप्रमाणेंच हिंदुस्थानातहि एकाच वेळीं सुरू झाली पाहिजे, या परीक्षेसाठीं बसावयाची वयोमर्यादा एकवीसवरून तेवीसवर नेली पाहिजे इत्यादि गोष्टींवर भर दिला. याशिवाय मोठमोठ्या शहरांतून इंग्रज अधिकारी नागरिकांवर अन्याय, जुलूम, जबरदस्ती करीत, त्याविरुद्धहि आवाज उठविला. नागर भागांतील अन्यायाविरुद्ध आवाज उठवून परकीय नोकरशाहीवर येथील विचारवंतांच्या एका शाखेनें टीका केली. या विचारप्रवाहाचे प्रवक्ते मुख्यतः लोकमान्य टिळक, नामदार गोखले, फिरोजशहा मेहता हे होते.

येथील दुसऱ्या विचारप्रवाहानें मुख्यतः खेड्यापाड्यांतील शासनविषयक प्रश्नांचा विचार करून स्वकीय नोकरशाहीचे दोष उजेडात आणले व ही शासनयंत्रणा अधिक लोकाभिमुख व विशुद्ध करण्याच्या कल्पनेवर भर दिला. या विचारप्रवाहाचें जनकत्व महात्मा फुले यांच्याकडे जातें. त्यांनीं आपल्या 'गुलामगिरी' या पुस्तकातून

आमचेच अधिकारी खेड्यापाड्यांतील अडाणी शेतकरी, गरीब मजूर, अस्पृश्य यांच्यावर कशी जुलूमजबरदस्ती करीत असतो याचें विदारक चित्र उभें केलें. खेड्यापाड्यांतील या मामलेदार, कुलकर्णी, सबजज्ज यांच्याकडून ग्रामीण जनतेची कशी अडवणूक होत आहे याचें तपशीलवार वर्णन केलें. शासनविषयक यंत्रणेच्या प्रश्नांचा विचार करणाऱ्या या दुसऱ्या परंपरेंत कर्मवीर शिंदे यांचें महत्त्वाचें स्थान आहे. त्यांच्या अनेक लेखांतून व भाषणांतून त्यांनीं आमचीच खेड्यापाड्यांतील नोकरशाही कशी अधिक लोकाभिमुख व ' मानवी ' होणें जरूर आहे, याच्यावर भर दिला आहे. दुसऱ्या विचारप्रवाहाचे एक प्रवक्ते म्हणून महाराष्ट्राच्या शासनविषयक इतिहासात कर्मवीर शिंदे यांना महत्त्वाचें स्थान आहे असें वाटतें.

प्रज्ञेला व्यापक सामाजिक जाणिवेची बैठक हवी

वरील संशोधनपर लिखाणाप्रमाणें महाराष्ट्राच्या उत्कर्षाच्या दृष्टीनेंहि कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनीं (महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा एकमेव मार्ग) या लेखांत कांहीं महत्त्वाचे विचार मांडले आहेत. महाराष्ट्राच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें त्यांनीं मांडलेले दोन विचार अधिक चिंतनीय आहेत असें वाटतें. महाराष्ट्रांतील पुढारलेल्या बुद्धिजीवी वर्गाबद्दल ते म्हणतात, हा वर्ग बुद्धिमान् व कर्तबगार आहे. परंतु या वर्गानें आपल्या सामाजिक जाणिवा व्यापक करून बहुसंख्य समाजाच्या प्रश्नांचा आत्मीयतेनें विचार करणें जरूर आहे. हा वर्ग आत्मकेंद्रित असल्यामुळें समाजाचें नेतृत्व तो करूं शकत नाहीं. या पुढारलेल्या बुद्धिमान् वर्गाच्या प्रज्ञेला व्यापक सामाजिक जाणिवेची बैठक मिळाली तरच ती अधिक फलदायी व उपकारक ठरेल. अण्णासाहेब शिंदे यांचा हा विचार मूलगामी आहे असें वाटतें. माणसाची प्रज्ञा ही व्यापक सहानुभूतीच्या आधारानें पावलें टाकूं लागली तरच ती अधिक समाजास उपकारक ठरते. प्रज्ञेचें महत्त्वहि त्यामुळें वाढतें. महात्मा गौतम बुद्धाचें श्रेष्ठत्व त्याच्या प्रज्ञेंत आहे, त्याचप्रमाणें त्याच्या व्यापक करुणेंत वा सामाजिक जाणिवेंत आहे. प्रज्ञा व करुणा यांचा सुंदर मिलाफ त्याच्या जीवनकार्यात झाला यांतच बुद्धाच्या मोठेपणाचें रहस्य आहे. याचाच प्रत्यय आपणांस सॉक्रेटिस, बुद्ध, टॉल्स्टॉय यांच्याहि जीवनकार्यांत येतो. या दृष्टीनें बुद्धिमान वर्गाच्या प्रज्ञेला व्यापक सहानुभूतीची वा करुणेची बैठक मिळणें जरूर आहे, असा जो विचार अण्णासाहेब शिंदे यांनीं मांडला आहे तो खासच महत्त्वपूर्ण आहे.

वैश्य वर्ण वाढला पाहिजे

महाराष्ट्राच्या उत्कर्षासंबंधीं त्यांचा दुसरा विचार देशांतील व्यापार, कारखानदारी, उद्योगधंदे यांच्या वाढीसंबंधींचा आहे. महाराष्ट्रांत मुख्यतः ब्राह्मण व क्षत्रिय हे दोनच वर्ण वाढले. तिसरा वैश्य वर्ण येथें वाढलाच नाहीं. औद्योगिक क्रांतीनंतरच्या नव्या उद्योगप्रधान समाजांत तिसरा वैश्यवर्ण वाढल्याशिवाय कोणताहि समाज उत्कर्षाला

जाऊं शकत नाहीं, असें त्यांनीं सुचविलें आहे. या दृष्टीनें महाराष्ट्रानें आपलें लक्ष या उपेक्षित अशा तिसऱ्या वर्णाकडे यावें असें त्यांनीं आग्रहानें सांगितलें आहे. महाराष्ट्राच्या गेल्या दोन हजार वर्षांच्या इतिहासांत येथील तिसरा वैश्यवर्ण फारसा वाढलाच नाहीं, असें आपणांस दिसून येईल. येथील व्यापार त्यामुळेंच उत्तरेकडून आलेल्या गुजराथी, मारवाडी लोकांच्या हातांत आहे वा दक्षिणेकडून आलेल्या लिंगायत लोकांच्या हातांत गेला. फाळणीनंतर आतां तो सिंधी लोकांच्याकडे चालला आहे. या दृष्टीनें महाराष्ट्रांत वैश्यवर्ण हा उपेक्षितच राहिला, असें आपणांस दिसून येईल. याचीहि मीमांसा झाली पाहिजे व महाराष्ट्र या उपेक्षेच्या वृत्तींतून बाहेर पडला पाहिजे. गुजराथ, सौराष्ट्र व सिंध येथील गुजराथी, मारवाडी वा सिंधी समाजांत व्यापार व उद्योगधंदे यांची वाढ झाली याचें कारण बहुधा या भागाला लागून असलेला समुद्रकिनारा असावा. समुद्रमार्गे या भागाचा अगदीं प्राचीन काळापासून बाहेरच्या देशांशी व्यापारउदीम चालत होता. हिंदुस्थानांतला व्यापार येथील जैनधर्मीयांच्या हातांत अनेक शतकें होता व आहे. याचें मूळ त्यांच्या धार्मिक दृष्टिकोणामध्यें आहे असें वाटतें. जैन धर्म हा अहिंसा हाच परमधर्म आहे असें मानतो. त्यामुळें या धर्मांतील अनुयायी युद्धाकडे मोठ्या प्रमाणांत वळूं शकले नाहींत किंवा शेतीकडेहि वळूं शकले नाहींत. कारण शेतींतहि कळत न कळत जीवनहिंसा होते अशी या धर्माची श्रद्धा आहे. हे दोन्ही मार्ग बंद झाल्यामुळें हा समाज स्वाभाविकच मोठ्या प्रमाणावर व्यापारउदीमाकडे वळला. निरनिराळ्या ठिकाणीं वरील वेगवेगळे समाज वैश्य वर्णाकडे कां वळले याचीं वेगवेगळीं कारणें आपणांस सांपडतील, परंतु महाराष्ट्रांत हा वर्ण कां वाढूं शकला नाहीं याचें समाधानकारक उत्तर अद्यापहि मिळत नाहीं. येथें कदाचित् ब्राह्मण व क्षत्रिय या वर्णांप्रमाणें तिसऱ्या वैश्य वर्णाला पुरेशी सामाजिक प्रतिष्ठा मिळालेली नसावी आणि स्वाभाविकच समाजांतील कर्तबगार माणसें प्रतिष्ठेच्या व्यवसायाकडे वळतात. त्यामुळेंहि या तिसऱ्या वर्णाची उपासमार झाली असावी. परंतु पुन्हां असा प्रश्न उपस्थित होतो कीं, येथें या तिसऱ्या वर्णाला प्रतिष्ठा तरी कां नाहीं प्राप्त झाली. याचीं कारणें येथील भौगोलिक व आर्थिक परिस्थितींत कितपत होतीं याचेंहि सशोधन झालें पाहिजे. या वर्णाच्या उपेक्षेचीं कारणें कांहीहि असोत, महाराष्ट्रानें व्यापार, उद्योगधंदे, कारखाने इकडे यापुढील काळांत उपेक्षेनें पाहून चालणार नाहीं, हा अण्णासाहेब शिंदे यांचा इशारा महत्त्वाचा आहे, यांत शंका नाहीं.

### महाराष्ट्र, हिंदुस्थान व जग : परस्पर संबंध

महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा विचार करताना महाराष्ट्रीयांना ते आणखी एक महत्त्वाचा विचार सागत आहेत. महाराष्ट्राच्या प्रकृतींतील जातिभेद, प्रांतभेद हे सर्व गेले पाहिजेत व येथील समाजांत एकात्मता निर्माण झाली पाहिजे, हें ते आग्रहानें सांगतात. परंतु महाराष्ट्रांत एकात्मता निर्माण करीत असतांना महाराष्ट्र हा व्यापक

अशा भारताचा एक घटक आहे हा विचार सुटूं नये असेंहि ते आग्रहानें सांगतात. व्यापक हिंदुस्थानचा एक घटक या संदर्भातच महाराष्ट्राचा विचार झाला पाहिजे. भारतीय समाजाच्या एकात्मतेच्या दृष्टीनेंहि त्यांचा हा विचार महत्त्वाचा आहे. परंतु भारतीय एकात्मतेचा विचार करीत असतांना भारत हाहि मोठ्या विश्वाचा एक घटक आहे याचें अवधान सुटूं देऊं नका, असें त्यांनीं सुचविलेलें आहे. प्रांत, देश व जग याचे परस्पर संबंध त्यांच्या दृष्टीसमोर स्पष्ट आहेत. आणि अखेरीस आपल्याला विश्वकुटुंबवादाकडे जावयाचें आहे या दृष्टीनेंच या सर्व घटकांचा विचार झाला पाहिजे. याहिसंबंधीं त्यांची भूमिका स्पष्ट आहे. आपला हा विचार मांडीत असतांना अण्णासाहेब शिंदे आपल्या मुलाखतींत म्हणतात, "आतांपर्यंत झालें तें सर्व लक्षांत घेऊन तरुण पिढीनें आपण केवळ हिंदी आहोंत येवढें ध्यानात ठेवावें. एकी करावयाची तीसुद्धां महाराष्ट्रापुरती न करतां प्रांतिक भेद वा मात्सर्य यांना आपणांमध्यें येऊं देऊं नये." इतकें सांगून राष्ट्राचा जगाशीं काय संबंध आहे हें स्पष्ट करतांना ते म्हणतात, "महात्मा गांधी तर विश्वकुटुंबीय आहेत. तरुणांनीं आपला दिलदारपणा विश्वकुटुंबीयत्वाला शोभेल असाच ठेवला पाहिजे." (पृ. क्र. १०७) अण्णासाहेब शिंदे याचे हे विचार तरुण पिढीला स्फूर्तिदायक नाहींत असें कोण म्हणेल!

आण्णासाहेब शिंदे यांच्या या लेखसंग्रहास प्रा. ध. रा. गाडगीळ यांनीं आपल्या कामाच्या व्यापांतून सवड काढून पुरस्कार लिहून दिला याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. महाराष्ट्रांतील एका उपेक्षित विचारवंतांच्या कार्याकडे व विचाराकडे लक्ष वेधण्याच्या दृष्टीनें त्यांच्या पुरस्काराचें महत्त्व मी विशेष मोलाचें मानतों.

या लेखसंग्रहांतील लेख आण्णासाहेब शिंदे याचे चिरंजीव श्री. प्रतापराव शिंदे व रवींद्र शिंदे याच्याकडून मिळाले याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. माझे स्नेही श्री. ग. ल. ठोकळ यांनीं या संग्रहाच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली व एक महत्त्वाचें सामाजिक कार्य पार पाडलें याबद्दल त्यांना मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे. ग्रंथाच्या संपादन-कार्यामध्यें माझे स्नेही प्राचार्य व. द. देसाई व श्री. अशोक अक्कलकर यांचें मला प्रथमपासून महत्त्वाचें सहकार्य मिळालें याबद्दल त्यांचाहि मी मनःपूर्वक आभारी आहे.

'कालभैरवप्रसाद',
मार्डीवाले कॉलनी, पुणें २.
वर्षप्रतिपदा, २६ मार्च १९६३

मा. प. मंगुडकर

## ती. अण्णांच्या लेखसंग्रहाबाबत

कुठल्याही गोष्टीस मग ती कोणत्याही स्वरूपांत असो ती घडून येण्यास योग हा निश्चित यावा लागतो. तशी संधि प्राप्त व्हावी लागते परन्तु या सर्व घटना प्रत्यक्षात उतरण्यास अनुरूप अशी परिस्थिति निर्माण जेव्हां होते त्याच वेळेस त्या घडूं शकतात. तसाच कांहींसा प्रकार आमचे तीर्थरूप कै. महर्षि अण्णासाहेब उर्फ विठ्ठलराव रामजी शिंदे यांचे मृत्यूनंतर १९ वर्षांनीं आज महाराष्ट्रापुढें त्यांचा 'शिंदे लेखसंग्रह' हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, हे परमभाग्य होय. त्यांच्या हयातींत तो जर प्रसिद्ध झाला असता तर अधिक बरें झालें असतें असें मला वाटतें, पण उशीरा कां होईना तो शेवटीं प्रसिद्ध झाला, हें पाहून माझ्या जिवास समाधान व शांति प्राप्त होत आहे.

या ग्रंथांत त्यांचे निवडक असेच कांहीं लेख घेण्यांत आले आहेत. त्यांचे इतर अनेक लेख आणि वर्तमानपत्रांतून झालेलीं त्यांचीं भाषणें हीं सर्वच्या सर्व छापावयाचीं झाल्यास हा ग्रंथ बराच मोठा करावा लागेल, म्हणून विस्तारभयास्तव ती योजना रद्द करणें भाग पडलें.

आमचे अण्णांनीं कॉंग्रेसच्या १९३० सालच्या कायदेभंगांत उडी घेतली, बेकायदेशीर मिठाची विक्री केल्याचा आरोप ठेवून पिनल कोड ११७ कलमाप्रमाणें त्यांना कोर्टाकडून सहा महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा ठोठावण्यांत आली, आणि हिंदमातेच्या मंदिरांत, येरवड्याच्या तुरुंगांत ता. १२ मे १९३० सोमवारीं, या सत्याग्रही वीराचा प्रवेश झाला. कारागृहांत ता. २१ जुलै १९३० पासून त्यांनीं आपली रोजनिशी लिहिण्यास सुरुवात केली, ती अत्यंत उद्बोधक आणि महत्त्वपूर्ण अशी आहे. आपल्या रोजनिशीच्या वहीमधील अगदीं पहिल्या पानावर त्यांनीं दिलेला उतारा त्यांच्याच शब्दांत मी देत आहे तो असा : "येथें मी केवळ खासगी अनुभव व स्मरणार्थ टिपणें लिहिणार आहे—विशेषतः धार्मिक विचार लिहीत असा बेत आहे. राजकारण, समाजकारण अगर कोणतेंही सार्वजनिक विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. अध्यात्मिक चिंतनाला हा तुरुंगवास मला अनुकूल दिसतो. तुरुंग माझ्यापुरतेंच पाहिल्यास मला स्वतःला तुरुंगाचा त्रास झाला नाहीं !"

त्यांच्या "माझ्या आठवणी" या पुस्तकाची रूपरेषा आणि टिपणें यांचा जन्मसुद्धां तुरुंगातच झाला आहे.

आमचे अण्णांना अभंग, पदें, कविता आणि पोवाडे करण्याचा छंद होता. ते उत्कृष्टशैलीचे कीर्तनकार होते ही गोष्ट पुष्कळांना माहीत नाहीं. कीर्तनसंस्था ही प्रभावी शक्ति आहे. अनेक व्याख्यानें देऊन सुद्धां जें लोकमनावर ठसवितां येत नाहीं तें कीर्तनद्वारें केलेल्या प्रचार आणि उपदेशाचा परिणाम यांचा बहुजनसमाजाच्या

मनावर अधिक पगडा बसतो हें ओळखूनच की काय अण्णा नेहमीं कीर्तनें करीत असत. त्याद्वारां अनायसेंच प्रार्थना समाजाचे धार्मिक तत्त्वज्ञानाचा प्रचार करण्यास सुलभ जात असे.

सामाजिक समता आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य या दोन ध्येयांसाठीं ते आमरण झगडले, सार्वजनिक सेवेंत सारें आयुष्य खर्ची घातलें आणि हे करीत असतांना त्यांना कधीच शारीरिक आणि मानसिक विश्रांती मिळाली नाहीं. त्यामुळें शांतपणें त्यांना लेखन आणि चिंतन करण्यास जी मनाची एकाग्रता व स्थैर्य लागतें तीं मुळींच त्यांना लाभलीं नाहींत. पण आरामखुर्चीवर बसून आणि लायब्ररीच्या सान्निध्यात, सर्व सोयी उपलब्ध असतांना ग्रंथ लिहिणें ही बाब सोपी आहे. तें आमच्या अण्णांना कधींच जमलें नाहीं. त्यांचे सारें जीवन धांवपळींत, कटकटींत आणि प्रवास करण्यात गेल्यामुळें त्यांचे हातून म्हणावी तशी ग्रंथरचना परिस्थितीनुरुप ते करूं शकले नाहींत, ही माझ्या मतें एक महान दुर्दैवाची गोष्ट आहे. त्यांच्या उतारवयांत त्यांना मधुमेहाचे रोगानें पछाडिलें. त्यामुळें तर कोणतीच शक्ति व उत्साह त्यांच्या अंगी उरला नाहीं. म्हणून सरस्वतीची सेवा अधिक करण्यांत त्यांच्या हातून खंड पडला.

देवानें मला या थोर पुरुषाच्या पोटीं जन्मास घातलें, म्हणून मी स्वतःला धन्य आणि भाग्यवान समजत आहे. माझें पूर्वसंचित म्हणूनच मला हा लाभ घडला असावा. माझा जन्म १९०० सालीं ११ सप्टेंबरला झाला आणि आमचे अण्णा ता. २ जानेवारी १९४४ रोजीं दिवंगत झाले. त्यांच्या सहवासांत आणि कृपाछत्राखालीं मी वाढलें आणि वागडलें. त्यांच्या प्रेमाचा आणि मार्गदर्शनाचा लाभ मला ४४ वर्षे सतत लाभला. त्यांच्या जीवन-स्मृति चित्रपट अजूनहि ताजातवाना माझ्यासमोर उभा आहे. ते कधीं कधीं मला प्रवासाला बरोबर घेऊन जात असत. विशेषतः देवास, इंदोर, बडोदे आणि कोल्हापूर येथील राजेमहाराजांचे दरबारांत सरकारी पाहुणे म्हणून वडिलांचे बरोबर असतांना श्रीमंतांच्या पंक्तीचा लाभ आणि समोर ताटांतले मिष्टान्न-यावर मीच चापून हात मारीत असें. इस्टेट, धनसंपत्ति या जड वस्तूंच्या आनंदा-पेक्षा त्यांनीं जो आपला आध्यात्मिक ठेवा मागें ठेऊन गेले, तो वारसा हक्क आणि ती परंपरा मी मोठा झाल्यावर पुढें चालूं ठेवण्यात मला कर्तव्याची जाणीव झाली. “ आम्ही थोरांचीं लेकुरें टाकूं जपून पाऊलें ” ही संतांची शिकवण आणि त्याची प्रत्यक्ष ओळख आमचे अण्णांनी आपल्या आध्यात्मिक जीवनांत जी वाटचाल केली आणि त्याप्रमाणें कुटुंबांत ती शिस्त आम्हांला त्यांनी घालून दिली. दर मंगळवारी घरामध्यें ते नियमितपणें कौटुंबिक उपासना करीत असत. हें व्रत त्यांनीं कधींच मोडलें नाहीं. या त्यांच्या प्रेरणेनें मी त्यांचे मागून प्रार्थना समाजाचा सभासद झालो. पुढें सेक्रेटरीचें कामहि केलें. प्रार्थना समाजांत उपासना आणि प्रवचनें करण्याची शक्ति त्यांच्यामुळेंच मला आली आणि हें कार्य करण्यांत मला सात्त्विक आनंद व समाधान वाटतें, हे काय थोडें झालें !

आमचे अण्णांचें घरच्या संसाराकडे कधींच लक्ष नव्हतें. घरांत कांहीं कमी जास्त आहे कीं नाहीं याची चौकशीसुद्धा ते करीत नसत. आम्ही लहान होतों तेव्हां बाजारांतून कांहीं आणावयाचे झाल्यास आमची आईच आणीत असे. मुलांचे शिक्षणाकडे वेळ देण्यास कधीच झालें नाहीं. म्हणून आम्ही सर्व भावंडें शिक्षणांत मागासले राहिलों. स्वतःच्या संसारांत लक्ष घालण्यापेक्षां समाजाच्या आणि राष्ट्राच्या प्रपंचांत ते अधिक तन्मयतेनें पडले. अण्णांच्या कामांत आमचे आयाबाईचा--जनाबाईचा सर्वांत मोठा वाटा आहे. अस्पृश्य स्त्रियांच्या शिक्षणाच्या उन्नतीसाठीं त्यांनीं फार मोठें कार्य केलें आहे. आमची आईसुद्धां महारमांगांच्या झोपड्यांत जाऊन अडलेल्या स्त्रियांचीं बाळंतपणें स्वतः करीत असे. अस्पृश्यतानिवारणाचे कामांत अण्णा पडलेमुळें कट्टर सनातनी सजातिबांधव हे निराळे दृष्टिकोणांतून आमचे घराण्याकडे पाहत असत. पण या आमच्याचा विशेष असा त्रास कधीं झाला नाहीं.

१९०६ सालीं डिप्रेस्ड क्लासेस मिशन ही संस्था मुंबई येथें अण्णांनीं स्थापिली. तिच्या अनेक शाखा वडाच्या झाडाच्या पारंब्यांप्रमाणे महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं अद्यापी विखुरल्या आहेत. ही संस्था म्हणजे त्यांचा आत्मा होय. तिच्यावर पुत्रवत् प्रेम त्यांनीं केलें, परंतु दैवदुर्विलास हा कीं त्याच संस्थेतील कांहीं सेवकवर्ग आणि अस्पृश्य समाज यांच्याकडून त्यांना त्यांच्या वृद्धापकाळांत विरोध आणि अपमान सहन करावा लागला.

मान अपमान गोवे । अवघे गुंडूनी ठेवावें ॥
हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥

हें समाधान अण्णांचे जीवनांत त्यांना पूर्णत्वानें लाभलें. त्यांची सेवा लौकिका-पुरती नव्हती. संत ज्ञानेश्वर महाराजांना असाच छळ आणि अपमान समाजाकडून सोसावा लागला. त्यामुळें निराशेनें स्वतःला घरांत कोंडून ते स्वस्थ बसले. त्या वेळीं त्यांची बहीण मुक्ताबाई हिनें उपदेश केला कीं,

मजवरि दया करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
मत जेणें व्हावें । जग बोलणें सोसावें ॥

तरीच अंगीं संतपण । जया नाहीं अभिमान ॥
संतपण जेथें वसे । भूत दया तेथें वसे ॥

रागें भरावें कोणासी । आपण ब्रह्म सर्व देशी ॥
ऐसी समदृष्टी करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥ १ ॥

असाच एका प्रसंगीं अण्णांचा भयंकर अपमान झाला. त्यामुळें मन बरेंच अस्वस्थ झालें. कांहीं सुचेना. त्यांच्यासाठीं मी ध्येयवादानें सतत झगडलों होतों.

त्यांचेकडूनच मला निंदा, अपमान हीं सर्व सहन करावीं लागत आहेत. म्हणून दुःखी अंतःकरणानें असले असतां भगिनी जनाबाई त्यांच्या जवळ जाऊन सद्‌गदित कंठानें म्हणाल्या, "विठू, हे रे काय? असें करून कसें चालणार? धैर्य धर. मन शांत ठेव. तुझ्यासारख्या पुरुषांनीं एवढे मनाला लावून घेतल्यावर कसें होणार? तुला जगाचे आघात सोसलेच पाहिजेत. रागावून काय उपयोग?" ह्या त्यांनीं केलेल्या उपदेश आणि मुक्ताबाईनीं संत ज्ञानेश्वराला केलेला उपदेश, या दोन्हींचें साम्य-चित्र क्षणभर माझ्या डोळ्यांपुढें उभें राहिलें!

शेवटीं 'शिंदे लेखसंग्रह' बाबत सांगावयाचें झाल्यास महाराष्ट्राच्या वाङ्मयीन इतिहासांत ही नवीन मौलिक अशी भर पडत आहे. त्यांचें विविध लेख हे संशोधनात्मक व मूलगामी विचारांना चालना देणारे आहेत.

संसाराची सर्व जबाबदारी माझेवरच असे आणि माझा सर्व वेळ नोकरीमध्यें गेल्याकारणानें अण्णांचें पुस्तक लिहून काढण्याचें काम मला शक्य नव्हतें. पक्षघातामुळें अण्णांचे हातपाय लुळे झालेले असत. त्या कारणानें ते स्वतः लिहू शकत नसत. आणि मी कामांत गुंतलेला. तेव्हां माझे धाकटे बंधू चि. रवींद्र हे घरींच मोकळे होते. अण्णा तोंडानें मजकूर निवेदन करीत आणि तो लिहीत असे. हें काम मात्र त्यांनीं तत्परतेनें केलें. माझें सेवानिवृत्तीनंतर माझें लक्ष समाजसेवेकडे लागलें. आणि अनुभवानों समाजसेवा करणे किती कठीण आहे, हें नंतर कळून चुकलें. त्यामुळेच मी अण्णांचे राहिलेले अप्रकाशित लेख प्रसिद्ध करण्याच्या खटपटीस नेटानें लागलो.

या पुस्तक प्रकाशनाच्या बाबतींत मला फार मोठी आणि मोलाची अशी मदत माझे मित्र श्री. ग. ल. ठोकळ यांची झाली. केवळ त्यांचेच कृपेमुळें आणि सहकार्यानें हे पुस्तक आज वाचकांच्या हातीं पडत आहे. इतके दिवस जिवापाड जतन केलेल्या या साधनसामुग्रीचें पुढें काय करावें या चिंतेनें माझें मन सतत व्यग्र झालें असतानाच श्री. ठोकळ यांनी ते मनावर घेऊन, स्वतः झीज सोसून हें प्रकाशनाचें कार्य अंगावर घेतलें व माझ्यावरच नव्हे तर अखिल महाराष्ट्रावर अगणित उपकार केले. यांचे आभार कसे आणि कोणत्या तऱ्हेनें मानावेत तें मला समजत नाहीं.

तसेंच माझे स्नेही डॉ. मा. प. मंगुडकर यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन जी विद्वत्तापूर्वक विस्तृत अशी प्रस्तावना लिहिली आणि लेखांना योग्य परामर्श घेऊन शिंदे यांचे जीवनकार्याचें मूल्यमापन योग्य शब्दांत केलें, याबद्दल त्यांना बरेच परिश्रम घ्यावे लागले याची मला पूर्ण जाणीव आहे. विशेषतः अस्पृश्यांचा उगम आणि विकास, तौलनिक भाषाशास्त्र वगैरे लेखासंबंधीं पाश्चात्य पंडितांनीं मतें हीं शिंदे यांच्या मतांशीं कशी मिळतीं जुळतीं आहेत याचें सुंदर विवेचन आणि समालोचन त्यांनीं केलें. याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानण्यास शब्द अपुरे पडतात.

महाराष्ट्रांतील एक थोर प्रज्ञावंत विद्वान डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनी जो आपला अमूल्य असा वेळ खर्चून समतोल बुद्धीनें शिंदे लेखसंग्रहाचें रसग्रहण आणि सूक्ष्म परिक्षण अत्यंत मार्मिक व सुदेसूद पद्धतीनें करून जो अभिप्राय दिला तो फारच सुंदर, मार्गदर्शक आणि बोधयुक्त असाच झाला आहे. माझ्यासारख्या सामान्य माणसानें त्यांचेबद्दल अधिक काय लिहावें! मी त्यांचा शतशः आभारी आहे.

शेवटीं ईश्वराची महान कृपा म्हणूनच सर्वांच्या मदतीनें हा 'शिंदे लेख-संग्रह' वाचकांच्या भेटीसाठीं पुढें येत आहे, म्हणून माझें अंतःकरण आनंदानें भारावून गेलें आहे. आमचे वडिलांची चिरंतन स्मृति ग्रंथरूपानें जनताजनार्दनापुढें आली आहे. त्यांचें कार्य, त्यांचा उद्देश आणि त्यांच्या विचारांचें हे लेणें-हा महाप्रसाद "सेवितो हा रस वाटितो आणिकां" या शब्दानें पुरा करतो.

प्रतापराव विठ्ठलराव शिंदे

## ती. अण्णांच्या लेखसंग्रहाबाबत

नीर्थरूप अण्णांना मी धाकटा मुलगा. माझ्या पाठची बहीण लहानपणींच १९२० सालांत वारली. त्यामुळें साहजिकच अण्णांचा माझ्याकडे ओढा लागला. म्हणूनच बालवयांत माझा अण्णांबरोबर हुबळी, बंगलोर, मंगळूरपासून तें कलकत्ता, नागपूर वगैरे भागांपर्यंत प्रवास घडला. याच कारणानें त्यांच्या साप्ताहिक प्रार्थना, उपासना, नैमित्तिक सभा-संमेलनांसारख्या समारंभांत माझी उपस्थिति होत असे. इतकेंच नव्हे तर १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळींत अण्णांनी जे दौरे काढले त्यांमध्येंहि मला त्यांनीं आपल्याबरोबर नेलेलें होतें !

पुष्कळसा पत्रव्यवहार ती. अण्णा मजकरवींच करून घेत. त्याचप्रमाणें वृत्तपत्रांत छापण्यासाठीं म्हणून जो कांहीं व्याख्यानाचा मजकूर असे तो ते स्वतः मलाच कथन करीत आणि मी तो लिहून काढीत असे. याच पद्धतीनें त्यांनीं आपल्या आत्मचरित्राचा समग्र मजकूर मला कथन केला आणि तो मी लिहून काढला. असें करण्यांत कदाचित् त्यांचा हेतु एवढाच असावा कीं, माझें सामान्यज्ञान वाढावें, आणि शालेय भाषेपेक्षा अधिक भाषाशुद्धि व्हावी. १९४० सालानंतर ती. अण्णा वार्धक्यानें आणि मधुमेहाच्या विकारानें अधिकच दुर्बल झाले. त्यांची वृत्तीच प्रसिद्धिपराङ्मुख असल्यानें चरित्राच्या बाबतींत मींच नेट धरून तें कसेंबसें तडीस नेलें. त्यामुळें समग्र आत्मचरित्र पुस्तकरूपानें प्रकाशित पहाण्याचें भाग्य कांहीं त्यांना लाभलें नाहीं. ही खंत मला लागलेली असावयाची व ती मी वारंवार त्यांचेजवळ व्यक्त करीत असें. तेव्हां ते माझ्या भावुकतेची आल्यागेल्यादेखत टरच उडवीत.

ती. अण्णांची वृत्ति अतिशय शिस्तबद्ध तर माझी अगदीं उलट प्रकारची. याकरतां मला पुष्कळदा बोलणीं खावीं लागत. प्रस्तुत लेखसंग्रहाबाबतहि असाच एक प्रसंग घडला. अण्णांच्यापाशीं बऱ्याचसा ग्रंथसंग्रह होता. एक-दोन प्रशस्त कपाटांत तो ग्रंथसंग्रह सामावलेला असे. पुढें त्याची हयगय आमचेकडून होऊं लागलेली अण्णांच्यानें बघवेना. तेव्हां त्यांनीं तो साराच्या सारा ग्रंथसंग्रह एका सार्वजनिक संस्थेला तिच्या वाचनालयाकरितां देणगीदाखल देऊन टाकला. कारण ग्रंथसंग्रहाचें वाचन तर दूरच राहो; पण त्यावरील धूळ देखील दूर करण्याचें काम आम्हां दोघा भावाकडून महिनो-महिने कांहीं होत नसे ! म्हणून ग्रंथसंग्रहाची विल्हेवाट ती. अण्णांनीं आपल्या डोळ्यांदेखत लावली तें योग्यच झालें. तसाच प्रकार प्रस्तुत लेखसंग्रहाबाबत घडला. हे लेख निरनिराळ्या वृत्तपत्रांतून, किंवा मासिकांतून प्रसिद्ध झालेले होते. हे सर्व छापील लिखाण एका कापडी गाठोड्यांत मी बांधून ठेवलेले होतें. एके दिवशीं या लेखांच्या गाठोड्यास वाळवी लागल्याचें अण्णांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. अण्णांनीं

माझ्यावर जो गहजब केला तो माझा मलाच ठाऊक. इतकेंच नव्हे तर दुसरे दिवशीं हें सारें लेखसंग्रहाचें बोचके देखील सार्वजनिक वाचनालयास देण्याकरतां म्हणून जेव्हां अण्णांनी त्या वाचनलयाचे व्यवस्थापकांस बोलावलें तेव्हां मात्र मला राहवेना. अगदीं गयावया करून मी ह्या लेखांचें बोचकें त्या इसमाचे हातून घरीं आणून ठेवलें अन् अण्णांचेजवळ आणाभाका वाहून त्यांचे योग्य प्रकारें जतन करण्याचें मी अभिवचन दिलें. ह्या वचनास मीच नव्हें तर माझे गैरहजेरींत माझे बंधु श्री. प्रतापराव देखील अक्षरशः जागले. हेंच आमचे परी एक मोठें कार्य म्हणावें लागेल.

आत्मचरित्राच्या प्रकाशनाबाबत किती अडचणी आल्या, त्यांत किती यातायात झाली, किती निराशा पदरांत पडली, ते मींच जाणें. तेव्हां ह्या छापील लेखांचें प्रकाशन कधीं काळीं होईल अशी मला चुकूनदेखील कल्पना नव्हती. परंतु आत्मचरित्राच्या प्रकाशनाचे बाबतींत जसा श्री. ठोकळ यांनी मला दिलेल्या आपला शब्द पुरा केला, तसाच या लेखसंग्रहाच्या बाबतींत देखील पुरा केल्यानें माझ्या आनंदास आणि आश्चर्यास पारावार राहिला नाही. चालू महागाईच्या काळांत देखील श्री. ठोकळ यांनीं अण्णाच्या लेखसंग्रहाच्या पुनर्मुद्रणाचें खर्चिक काम यथोचित रीत्या तडीस नेले याबद्दल मीं त्यांचा शतशः आभारी आहे. त्याचप्रमाणे श्री. ठोकळांच्या इतकीच आगळी आस्था बाळगून अण्णांच्या लेखाचें संकलन व त्यांना परिशीलनपूर्वक प्रस्तावना लिहिण्याचें जें महत्कार्य प्राचार्य मा. प. मंगुडकर यांनीं केले, त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानण्यात मी माझा बहुमान समजतो.

ती. अण्णाच्या आत्मचरित्रावरून लोकांना त्यांच्या एकंदर जीवनाबद्दल इत्थंभूत माहिती मिळेल, तर या लेखसंग्रहावरून त्यांचे विचार कसे होते, त्याची वृत्ति कशी होती, त्यांची राजकीय, सामाजिक आणि धार्मिक दृष्टि कशी होती, याचा सुगावा लागेल, असा भरवसा वाटतो. पण हे मागणें देखील ल्हान तोंडी मोठा घांस घेण्यासारखेंच वाटतें.

रवींद्र विठ्ठलराव शिंदे

## विठ्ठल रामजी शिंदे

| | |
|---|---|
| २३ एप्रिल १८७३ | जन्म (जमखंडी). |
| १८९१–९२ | माध्यमिक शिक्षण पूर्ण. |
| १८९२–९८ | पुणें येथील फर्ग्यूसनमध्यें शिक्षण, बी. ए. |
| १८९८ | प्रार्थना-समाजाचे सभासद. |
| १९०१–०३ | इंग्लंडमध्यें मॅंचेस्टर कॉलेजमध्यें तुलनात्मक धर्मशास्त्राचा अभ्यास. |
| १९०६ | मुंबई येथें भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळाची स्थापना. |
| १९१० | जेजुरी येथें मुरळी प्रतिबंधक सभा–पुढील मुरळी प्रतिबंधक चळवळीचीं बीजें यामध्यें सांपडतील.<br>—प्रार्थना समाजाचा अधिकृत संबंध तुटला. |
| १९१२ | भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळीच्या पुणें शाखेसाठी पुण्यास वास्तव्य. |
| १९१७ | कलकत्ता येथील कॉंग्रेस अधिवेशनात अस्पृश्यता निवारणाचा ठराव संमत. मुख्य प्रेरणा कर्मवीर अण्णासाहेब शिंदे यांची होती. |
| १९१८ | साउथ बरो कमिशनसमोर साक्ष. ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळ व डॉ. आंबेडकर यांच्या नेतृत्वाखालील अस्पृश्यांची चळवळ यांच्याशी झालेल्या मतभेदाची बीजे या साक्षीत आढळतात.<br>—मुंबई येथे श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली अखिलभारतीय अस्पृश्यता-निवारण परिषद भरविली. |
| १९२० | मुंबई कौन्सिलच्या निवडणुकीसाठीं उभे. पराभूत. |
| १९२३–२४ | निराश्रित साह्यकारी मंडळीचा प्रत्यक्ष चालकत्वाचा संबंध तुटला. ब्राह्म समाजाचे पुन्हा प्रचारक झाले. हिंदुस्थानच्या नैर्ऋत्य किनाऱ्यावरील मंगळूर येथील ब्राह्म समाजाचे आचार्य झाले. |

| | |
|---|---|
| १९३० | असहकाराच्या चळवळींत भाग. सहा महिने सश्रम कारावास. |
| १९३३-३४ | राममोहन रॉय यांच्या शतसांवत्सरिक तिथि-प्रित्यर्थ महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्रांत मोठा दौरा. यात्र वेळीं मधुमेहाची तीव्र व्यथा झालेली आढळली. |
| १९३५ | बडोदें येथील साहित्य संमेलनांत 'तत्त्वज्ञान व समाजशास्त्र' या शाखासंमेलनाचे अध्यक्ष. |
| २ एप्रिल १९४४ | मृत्यु. |

*ग्रंथ :*

( १ ) विठ्ठल रामजी शिंदे यांचे लेख, व्याख्यानें आणि उपदेश —संपादक बी. बी. केसकर १९१२.

( २ ) भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न १९३५.

( ३ ) माझ्या आठवणी व अनुभव १९५८.

*इतर माहिती .*

लहानपणीं कुटुंबांत धार्मिक संस्कार. पुढें कॉलेजमध्यें प्राचार्य गो. ग. आगरकर, ना. ह. आपटे, जॉन स्टुअर्ट मिल, स्पेन्सर यांचे संस्कार. नास्तिकवादाकडे कल. मॅक्समुलर याच्या विचारानें पुन्हा धर्मश्रद्धेकडे कल. पुढें आयुष्यभर जीवनाला धर्मश्रद्धेची बैठक.

—राष्ट्रीय चळवळीकडे १८९५ पासून कल. महाराष्ट्रांतील सर्वांगीण सुधारणावादाचे प्रवर्तक.

• •

१

# भागवत धर्माचा विकास

भागवत धर्माचा जवळ जवळ तीन हजारांहून जास्त वर्षांचा इतिहास अवघ्या पाच व्याख्यानांत आणणें म्हणजे पाच श्रोटांच्या ओंजळींत गंगानदी धरणेंच म्हणावयाचें. भाषणाचे द्वारें एका तासांत आटोपणें, किंवा लेखाच्या द्वारें वर्तमानपत्राच्या दोन रकान्यांत ती कुसडणें म्हणजे तर एक अजब धाडस. साराशरूपानें तेंहि करावयाचें आहे. म्हणून श्रोत्यांची व वाचकांची सपशेल माफी मागण्याशिवाय गत्यंतरच नाही. टीकाकारांनी ही माफी ध्यानात ठेविल्यास मेहरबानी होईल.

## वैदिक धर्म

हिंदुस्थानच्या कसल्याहि इतिहासाची सुरुवात करावयाची म्हणजे साधारण माणसाची धाव वेदाकडे जाते. त्याचे कारण वेद हे हिंदुस्थानच्या संस्कृतीचा उगम, असे मुळीच नव्हे. केवळ वेदांहून इतर लेखी पुरावे नाहीत, म्हणूनच असे करावें लागतें. भारतीय संस्कृति वेदाहून फारच प्राचीन आहे. हिंदुस्थानांतील आर्यांच्या संस्कृतीचा उगम वेद असतील! द्राविड (ताम्रवर्णी), मोंगल (पीतवर्णी), शुद्ध कृष्णवर्णी, मिश्रवर्णी असे कितीतरी असंख्य मानववंश ह्या भरतखंडांत अनादि कालापासून राहात आहेत. त्यांच्या एकंदर संस्कृति-महासागराला आर्य संस्कृतीची एक तेजस्वी पण लहानशी नदी मिळाली आहे; एवढ्यावरूनच अखिल भारतीय संस्कृतीचा उगम वैदिक किंबहुना आर्य संस्कृतीचा आहे, असें सांगत व ऐकत सुटणें, किती धाडसाचें आहे, हें तज्ज्ञांनाच माहीत!

वेदांमध्येंहि त्रैविद्या म्हणजे ऋक्, साम आणि यजुः आणि चौथा वेद अथर्व असा भेद प्राचीन आहे. अथर्व वेदाचें पहिलें नांव अथर्वांगिरस. ह्या दोन शब्दांच्या रूढ अर्थानेंहि श्रौत वाङ्मयामध्यें भेद आढळतो तो असा. अथर्व वेद म्हणजे एकंदरींत एक मोठें जादू ऊर्फ अभिचारशास्त्र. अथर्व म्हणजे भेषज अभिचार आणि अंगिरस् म्हणजे घोर अभिचार! म्हणजे प्रकृति सुधारण्यासाठीं वेदकालीन आरोग्यशास्त्राचा चालू असलेला एक जादूचा प्रकार; घोर अभिचार म्हणजे जारण, मारण, उच्चाटण इ. जादूचे अत्याचारी भयंकर प्रकार. जादूचे हे दोन्ही प्रकार आर्यांमध्यें हिंदुस्थानांत येण्यापूर्वी व आल्यावरहि चालू होते. हे प्रकार हिंदुस्थानांत आल्यावर दुसऱ्या भयंकर प्रकारावर कदाचित् आळा बसला असेल. हिंदुस्थानांतील आर्यांच्या ग्रंथांना 'वेद' ही संज्ञा आहे. इराणांतील आर्यांच्या ग्रंथांना 'अवेस्ता' ही संज्ञा आहे. वेदांच्या ज्या निरनिराळ्या संहिता ऊर्फ चांपण्या झाल्या, त्यांत पहिले तीन वेद 'त्रैविद्या' ह्या नावानें व चौथा अथर्वांगिरस् हा वेद '*अथर्व*' *ह्या संक्षित नांवानें ओळखण्याचा* पूर्वी प्रघात होता. ह्याचा अर्थ पहिले तीन वेद पूज्य व चौथा त्याज्य असा मुळींच नव्हे तर पहिले तीन सामान्य आचरणासाठीं आणि चौथा विशेष क्रिया तज्ज्ञांच्याच आचरणासाठीं,एवढाच अर्थ. ह्या चौथ्या वेदाला क्षत्रवेद, राजाचरण (राजकारण), ब्रह्मवेद अशींहि नावें होतीं. ह्या वेदांत नुसती बरीवाईट जादून नव्हती तर आर्यांची विश्वविद्या (Cosmogony) आणि ब्रह्मविद्या (Theosophy) हींहि विशेष शास्त्रें होतीं. यावरून चौथ्या वेदाचें महत्त्व आणि पावित्र्य समजून येतें. इतकेंच नव्हे तर अथर्वांतच काय तीं जादू ऊर्फ अभिचारशास्त्र होतें आणि पहिल्या तीन वेदांमध्यें तें नव्हतें असेंहि नव्हे, तर तें शास्त्र भेषज म्हणजे औषधोपचारासाठीं व इतर सौम्य उपायांसाठीं सर्व वेदांत आढळतें. किंबहुना वेद म्हणजे जादू आणि जादू म्हणजे वेद, असा जो मेरा ब्लूमफील्ड ह्या अमेरिकन वेदवेत्त्यानें दिला आहे, त्यात बरेंच तथ्य आहे.

वरील विवेचनावरून वेद-धर्माचें स्थूलमानानें लक्षण समजण्यासारखें आहे. वेद म्हणजे जादू! शुक्ल आणि कृष्ण असे तिचे दोन भाग करता येतील. दुसऱ्याचें अहित न करतां आपल्या हितासाठीं केलेली ती पांढरी, व दुसऱ्याचें अहित करूनहि आपलें हित साधण्यासाठीं केलेली ती काळी, असे ह्या दोन जादूचे प्रकार असतील. पहिलीच्या साह्यानें इंद्र, चंद्र, वरुण, सूर्य, रुद्र, पर्जन्य अशा बलवत्तर देवतानाहि वश करून घेण्यात येत असे व दुसरीच्या द्वारां अनन्वित अत्याचारांचे प्रयत्न होत असत. हे दुसरे प्रयत्न सिद्ध न झाल्यास ते करणाऱ्यांवर भयंकर रीतीनें उलटत, असाहि समज आर्यांचा होता. ह्या समजांत व प्रयत्नांत अम्मल वैदिक धर्माचें मुख्य लक्षण आहे.

वैदिक धर्मांत वरील लक्षणाहून अधिक चांगला मार्गहि आहे. विशेषेंकरून वरुण ही मुख्य देवता, आणि तिच्या प्रभावळींत जी ७ पासून १२ आदित्यांची गणना आहे, ती सर्व प्रभावळ नैतिक दृष्ट्या फारच सुंदर आहे, हें विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कांहीं पाश्चात्त्य पंडितांचा तर्क, वैदिक धर्माची ही नैतिक बाजू केवळ अपवादकच

असून ती बाबिलोनियन अथवा इतर प्राचीन सेमेटिक संस्कृतींतून आर्य संस्कृतींत आली असावी, असा आहे. ह्या तर्काला बळकट पुरावा नाही. प्रो. विकलरच्या शोधा- अंतीं मेसोपोटेमियामध्यें बोगाझकुई येथें एक महत्त्वाचा प्राचीन लेख मिळाला. तो इ. स. पूर्वी १४०० वर्षांचा आहे. सुब्बीलुल्युमा (आर्य ?) राजा आणि मितानी ह्या सेमेटिक राष्ट्राचा राजा तुसाटा ह्याचा मुलगा माट्युअझा ह्या दोघांमध्यें घडलेल्या इ. स. पूर्वीच्या १४०० वर्षांमागच्या तहासंबंधीं हा लेख आहे. ह्यांत मित्र, वरुण, इंद्र आणि नासत्य (अश्विनीकुमार) ह्या आर्य दैवतांचा स्पष्ट आणि प्रामुख्यानें उल्लेख आहे. पण ह्या उल्लेखावरून प्राचीन आर्य कास्पियन समुद्राच्या उत्तरेकडून मध्य आशियांत आले ते सरळ न येतां कदाचित् मेसोपोटेमियामध्यें कांहीं दिवस सेमेटिक लोकांच्या सहवासांत राहून नंतर ईशान्येकडे व पूर्वेकडे वळले, असा अर्थ होईल, किंवा हिंदु- स्थानांत आल्यावर देखील आर्यांच्या कांहीं टोळ्या, भारतीय संस्कृति घेऊन पश्चिमेकडे वळल्या, त्या तहत मेसोपोटेमियापर्यंतहि पोंचल्या, असाहि अर्थ होईल. अर्थात् सिंधू नदीच्या पूर्वेकडे येण्यापूर्वी हिंदी इराणी आर्यांच्या अविभक्त काळीं देखील आर्य- संस्कृतीवर इतर संस्कृतींचा विशेषतः सेमेटिक संस्कृतींचा परिणाम झाला नसावा, असा माझा आग्रह नाही. असा आग्रह धरणें कोणालाहि शक्य नाही. पण वैदिक धर्मांचा यच्चयावत् सर्व नैतिक अथवा भागवत भाग आर्यांनी बाहेरूनच घेतला, असें समजा- वयाला मी तयार नाहीं. या तर असा आग्रह धरावयाचा तर झरतुष्ट्रानें इराणमध्यें विशेषतः बॅक्ट्रियामध्यें व आर्य धर्मामध्यें जी पहिली मोठी नैतिक क्रांति घडवून आणिली, तीहि बाहेरूनच आली असें म्हणावें लागेल.

वर सांगितल्याप्रमाणें आर्यांच्या अविभक्त स्थितींत जरी नैतिक भाग खास आढळतो, तरी पण हे आर्य सिंधू नदीच्या पूर्वेकडे आल्यावर त्यांच्या आणि पश्चिमे- कडच्या इराणी आर्यांमध्यें जी कांहीं अज्ञात कारणांवरून स्पष्ट दुफळी झालेली दिसते, ती लक्षांत घेतां हा नैतिक भाग हिंदुस्थानांतील आर्यांच्या वैदिक धर्मांत कितपत उरला, ह्याविषयीं मात्र समयाला जागा आहे. इराण्यांना असुर पूज्य तर हिंदीयांना देव पूज्य; इतकेंच नव्हे तर इराण्यांना देव शत्रु तर हिंदीयांना असुर शत्रु, असा हा विरोध पुढें वाढवत गेला. ह्या उपास्यांच्या विरोधावरून असुरयज्ञ आणि देवयज्ञ अशा नावाखालीं उपासकांचाहि दारुण विरोध असलेला या दोघांच्याहि ग्रंथांमधून दिसून येतो. इतकेंच नव्हे, तर पुढें पुढें पूर्वेकडील आर्यांत मित्र, वरुण आणि त्यांच्या प्रभावळींतील सर्व आदित्यांचें महत्त्व कमी कमी होत जाऊन शेवटीं नाहींसें झालें; तर तिकडे पश्चिमेस इराणी आर्यांना इंद्र आणि इतर पूर्वेकडील देव म्हणजे मोठी पिशाच्चेंच होऊन बसलीं. इंद्र हा अत्याचारी लष्करी देव. त्याला सोमरसाच्या किती हि घागरी भरून पाजल्या तरी तो अतृप्त: तो फेरां सोमरसाच्या लालसेनें दारुड्याहि वरा होईल, ह्याचा भरंवसा नसे. अशीं वर्णनें इराणाभिमानी हिंदी आर्यांच्या वेदांतच आढळतात. पुढें तर इंद्र हा देवांचा राजा झाला असूनहि अतिशय भित्रा व मत्सरी अशा कथा आढळतात. कोणी १००

यज्ञ करणारा मनुष्यहि आपलें पद हिरावून घेईल, अशा भीतीनें आपल्यापेक्षांच नव्हे तर सर्वांत लहान जो आदित्य—विष्णु त्याला वेळोवेळीं शरण जाणारा अशीं वर्णनें पुराणांतून आहेत. ह्यावरून अविभक्त स्थितींतील आर्य संस्कृतींचा नैतिक भाग इराणांत झरतुष्ट्रानें कांहींसा वाढविला, पण हिंदी आर्यांनीं तो कायमहि ठेविला नाहीं कीं काय, अशी शंका येते. वरुण आणि त्याच्या भोंवतालच्या मोठमोठ्या आदित्यांची सुंदर प्रभावळ ही स्मृतिशेष झाली. इतकेंच नव्हे तर त्यांच्या पदीं विराजमान झालेल्या इंद्र, चंद्र (सोम), पर्जन्य, मरुत् इ. देवता उपास्य स्थानावरून च्युत होऊन उलट शक्ति, शिव, गणपति इ. केवळ परकीय असलेल्या संस्कृतींतील पराक्रमी देवतांना आर्यांना आपल्या उपास्य करावीं लागलीं व त्यांचीं थोडींबहुत स्तोत्रें पर्यायानें प्रत्यक्ष वेदसंहितांतून क्वचित आणि इतर वैदिक वाङ्मयांतून पुष्कळ चमकूं लागलीं. हा कशाचा महिमा ! ब्रह्मणस्पति (ब्रह्मा), विष्णु हीं (आर्य ?) दैवतें मागून पुढें आलीं तरी, शिव आणि शक्ति या लोकप्रिय देवतांच्यापुढें ब्रह्मणस्पतीचीहि डाळ शिजेना, असें कां व्हावें ? शेवटीं विष्णु तेवढाच आर्यांचा उरला, पण तोहि अथर्व वेदामध्यें (नव्हे तर नारायण पण) ज्ञानापेक्षां जादूमंत्रालाच अधिक वश होणारा असा वर्णिलेला आहे, हें काय गूढ ! तें कसेंहि असो. हा विष्णु देखील प्रत्यक्ष आपल्या जोरावरच पुढें न येतां, वासुदेव कृष्ण या थोर मानवाच्या आश्रयानें पुढें येतो, याचें मर्म काय ? एकंदरीत वैदिक संस्कृतींत नैतिक ऊर्फ भागवत धर्मांचें जें उदात्त क्वचित् आढळतें तें त्या संस्कृतीच्या पचनीं नाहीं, असें मानावें लागत नाहीं काय ? जरी पुढें उपनिषत्काळीं अथर्ववेदानें आपल्या ज्ञानमार्गाच्या जोरानें विकास केला आणि ब्रह्म विद्येच्या द्वारा हिंदुस्थानावरच नव्हे तर अखिल जगावर तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अनिर्वचनीय उपकाराचें ओझें केलें, तरी भागवत धर्माची वाट काय ? हा प्रश्न शिल्लक राहतोच. तो प्रश्न तर आमचा प्रस्तुत विषय आहे.

## भागवत धर्म

अतिसंक्षेपानें वर वैदिक धर्माचें लक्षण सांगितलें. आतां भागवत धर्माचें असेंच थोडक्यांत लक्षण ओळखावयाचें आहे. ईश्वराचें केवळ संख्यावाचक एकत्व हें भागवत धर्माचें लक्षण नव्हे. निदान तें मुख्य लक्षण तरी नव्हे. भागवत धर्माचें मुख्य लक्षण भक्ति (प्रेम) आणि श्रद्धा (विश्वास) हींच होत. हा भगवत् किंवा भगवान् एक आहे कीं अनेक आहेत, तो कोणी ऐतिहासिक पुरुष होता किंवा तत्त्व दृष्टीनें ओळखली जाणारी एक कैवल्य वस्तु (Metaphysical Absolute) होती, वगैरे विषय तत्त्वज्ञानाचे आहेत. ह्या विषयांचा धर्माशीं संबंध आहे, पण तेच विषय म्हणजे धर्म नव्हत. निदान भागवत धर्म नव्हत. अशी या विवेचनापूर्वी तरी माझी समजूत आहे. कर्म, ज्ञान, वैराग्य आणि भक्ति अशा मानवी मनाच्या चार अवस्था आहेत. त्यांतील शेवटची अवस्था भागवत धर्माचा

अगदीं प्राण किंवा आत्माच म्हटलें तरी चालेल. कर्म ( म्हणजे बाह्यविधि ) आणि ज्ञान ही वेदांमध्यें आहेत. पहिल्या तिन्ही वेदांत व ब्राह्मण ग्रंथांत कर्म आहे आणि चौथ्या वेदांत आणि विशेषतः उपनिषदांत उच्च प्रकारचें तत्त्वज्ञानहि आहे. शेवटीं शेवटीं हिंदुस्थानांत आल्यावर आर्यांच्या संस्कृतींत वैराग्याच्याहि छटा दिसूं लागल्या. पण वैराग्य हे आर्यांचें मुख्य लक्षण नव्हे. आर्यवंश हा एक अत्यंत तेजस्वी, परंतु प्रवृत्ति-प्रधान मानववंश होऊन गेला. श्रुति ग्रंथांत आणि संहिता काळीं चार आश्रमांची घटना नव्हती, फार तर काय भगवद्गीतेंतहि आश्रमांचा उल्लेख नाहीं ! इतकेंच नव्हे, चौथ्या ज्ञानप्रधान अथर्ववेदाचा तर गीतेंत नुसता उल्लेखहि नाहीं. स्मृति ग्रंथांतून चार आश्रमांचे उल्लेख भरपूर सांपडतात; तरी सर्व आश्रमांपेक्षां गृहस्थाश्रमाचें फार महत्त्व स्मृतींतून वर्णिलें आहे. वैराग्य आणि देहदंडन हीं तत्त्वज्ञानें केवळ पातकेंच गणलीं आहेत ! उपासातापासाचा अत्यंताभाव कोठें असेल तर तो हल्लींच्या पार्शी धर्मांतच आहे.

दोवटचें तत्त्व भक्तीचें, तें केवळ पांचरात्र अथवा सात्वत धर्मांतच प्रथम उदयास आलें, पण ह्याचा खरा परिपोष बौद्ध आणि जैन धर्मांचे संस्थापक व प्रचारक भगवान् बुद्ध आणि महावीर ह्यांच्या प्रभावशाली आणि प्रेमी प्रयत्नानंतरच हिंदुस्थानांत झाला. श्रीकृष्ण महात्म्यानें हा भक्तिधर्म प्रथम स्थापिला, असे प्राचीन वैदिक वाङ्मयात अंधुक पुरावे आहेत, पण ह्या धर्मांचे वैदिक धर्मांशी धागेदोरे उपलब्ध नाहीत. इतकेंच नव्हे तर इतरहि कोठें त्याविषयीं ऐतिहासिक पुरावे मिळावे तितके मिळत नाहींत, ही किंचित् निराशेची गोष्ट आहे. उलट भगवद्गीता हा ग्रंथ जो वासुदेव-कृष्ण-विष्णु धर्माचा बळकट पाया आणि किल्ला, त्यांतहि हा नवीन धर्म वैदिक त्रयीवर अवलंबून नाहीं; इतकेंच नव्हे तर त्याच्या मोक्षाला वेद अपुरे आहेत, असें स्पष्ट आणि वेळोवेळीं म्हटलें आहे. ॥ त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ॥४५॥ अध्याय २ श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला। समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥५३॥ अध्याय २ रा. त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ॥......क्षीणे पुण्ये मर्त्यलोके विशन्ति ॥ २०-२१ ॥ अध्याय ९ यान्ति देवव्रता देवान...यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥ अध्याय ९ इ. अनेक उतारे देता येतील.

भगवद्गीता हा ग्रंथ मिश्र मतांचा ग्रंथ आहे. त्यांत कोणकोणत्या काळीं कोणकोणतीं मतें कशीं मिसळण्यात आलीं, हें अस्पष्टपणानेंहि ठरविण्याचें दुर्घट काम आहे. तें प्रोफेसर गार्बे ह्यांनी आपल्या Introduction to the Bhagavat Gita ह्या लेखांत केलें असून त्याचें इंग्रजींत भाषांतर रा. उदगांवकरांनीं केलेलें ह्या प्रकरणीं वाचनीय आहे (*Indian Antiquary 1918*). भिन्न मतें कशींहि मिसळली असोत, सर्व भगवद्गीता गौतम बुद्धाच्या कालानंतरची असून तिच्यावर उमटलेले गौतम बुद्धाच्या शिकवणीचे स्पष्ट ठसे दिसून येत आहेत. विशेषतः कर्मयोग, मध्यमाप्रतिपत्ति आणि निर्वाण ह्या ज्या तीन गोष्टी सिद्धार्थांच्या शिकवणीच्या मुख्य भागभूत, त्या गीतेमध्यें स्पष्ट उमटलेल्या आहेत. तेलंग आणि टिळक ह्या दोघां विद्वानांनीं यांचा केवळ ओझरताच

उद्योग केला आहे. कित्येकांनीं तर भगवद्गीतेवरूनच पुढें महायान बौद्ध धर्माला प्रेरणा मिळाली, असे दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे; पण हिंदुस्थानांतल्या भागवत धर्माचा उगम श्रीकृष्ण कीं बुद्ध हा वाद यथासांग करण्यास येथें अवकाश नाहीं. तरी तत्त्वज्ञानाची कसलीहि दृष्टि असो, भक्ति आणि श्रद्धा यांना जैन आणि बौद्ध धर्मात स्थान होते, इतकेंच नव्हे तर या आध्यात्मिक अवस्थांना परिपोष निदान हिंदुस्थानांत तरी *महावीर नाट-पुत्र आणि सिद्धार्थ शाक्य-पुत्र, हे महात्मे जन्मले नसते, तर इतका झाला असता कीं नाहीं हा एक चिंतनीय प्रश्न आहे.*

असो. वरीलप्रमाणें वैदिक धर्म आणि भागवत धर्म यांचीं लक्षणें ढोबळ मानानें व संक्षेपतः सांगितलीं. शाक्त आणि शैव धर्मांविषयीं अद्यापि सांगावयाचें उरलेंच. जरी वेदांत ह्या दैवतांचा उल्लेख आहे किंवा उल्लेख झाल्याचा निदान भास होत आहे, तरी हीं दैवतें मूळ आर्यांच्या संस्कृतींत नाहींत. निदान हा वाद चालविण्याला येथें अवकाश नाहीं. गुरुवर्य सर डॉ. भांडारकर आपल्या Vaishnavism & Shaivism ह्या अमूल्य ग्रंथांत पान २४२ वर म्हणतात कीं "रुद्र–शिव ह्या कल्पनेचा माग काढण्यासाठीं गृह्यसूत्रा ( च्या काळा ) पर्यंत आम्हीं वैदिक वाङ्मयाचा तपास केला, पण तेथें कोठेंहि कोणा देवीचा, मातब्बर दैवत अशा रूपानें, शोध लागला नाहीं." प्रो. मॅक्समुल्लर ह्यांनीं आपल्या Anthropological Religion, Gifford Lecture in 1891 ह्या ग्रंथात पान ४१० वरील परिशिष्टांत म्हटलें आहे कीं, "ऋग्वेदांतील १० व्या मंडलांतील १२७ स्तोत्रांपुढें एका खिलामधील रात्री ह्या देवतेच्या स्तोत्राच्या चार चरणानंतर **दुर्गा** ह्या देवीचा स्पष्ट उल्लेख आहे." पण मुख्य व्याख्यानांत पुष्कळ *प्रमाणांचा* विचार करून ह्या जगप्रसिद्ध पंडितानें आपली स्पष्ट कबुली पुढील शब्दांत दिली आहे. "म्हणून माझें असें मत आहे कीं, दुर्गा किंवा **शिव** हीं दैवतें वेदांतील कोणत्याहि दैवतांचीं विकसित किंबहुना विकृतहि रूपें नव्हत." पान १६६. ह्या दैवतांचा संबंध वैदिक धर्माशीं नाहीं उलट पुरातन कालापासून ह्याचा निकट संबंध भागवत धर्माशीं आहे. इतकेंच नव्हे, तर विष्णु भागवतांच्याहि पूर्वी शिव भागवताचे आणि देवी भागवताचेहि स्वतंत्र ग्रंथ उपनिषत्काळांत आणि पुराणकाळांत भरपूर आढळतात. पण ह्या प्रकरणांचा तपशील पुढील व्याख्यानांत येथेंच बरें होईल. तूर्त एवढेंच ध्वनित करणें बरें कीं, कर्म ( बाह्य विधि ) आणि ज्ञान हीं जशीं आर्य संस्कृतीचीं विशिष्ट लक्षणें, तशीच वैराग्य, गूढज्ञान आणि भक्ति अथवा श्रद्धा हीं द्राविड संस्कृतीचीं मुख्य लक्षणें होत, *आणि ज्याअर्थीं भागवत धर्माचा ह्या दुसऱ्या मानसिक अवस्थांचा अधिक निकट* संबंध आहे त्याअर्थीं भागवत धर्माचा विकास समजून घेण्यासाठीं आर्यांच्यापेक्षां इतरांच्या संस्कृतींचाच अधिक अभ्यास करणें जरूर व इष्ट आहे.

## भागवत धर्माचा पाया

पहिल्या व्याख्यानांत 'भागवत' धर्माचा 'वैदिक' धर्माशीं

किती अत्यल्प संबंध आहे, खरा संबंध पाहावयाचा असल्यास वैदिक धर्माच्याहि फार पलीकडे गेलें पाहिजे, हें सांगितलें. आधुनिक जाडे विद्वान् देखील हिंदुस्थानच्या कोणत्याहि बाबीचा इतिहास पाहावयाचा झाल्यास वेदांकडे धाव घेतात. ह्याचें कारण वेद हे इतिहासाचे उगम नव्हत, तर नुसते अशा विषयाचा एक उपलब्ध लेखी पुरावा येवढ्यामुळेंच, हेंहि प्रथमदर्शनींच सांगितलें; व शेवटीं ह्या भागवत धर्माचें संशोधन करण्यासाठीं हिंदुस्थानांतील वैदिक किंबहुना आर्य संस्कृतीपलीकडील द्राविड, कोल, मंगल किंवा त्याहूनहि प्राचीन इतर आर्येतर संस्कृतींचाहि शोध करणें क्रमप्राप्त आहे, असें सांगितलें. मात्र ह्या शोधासाठीं कागदोपत्रीं किंवा लेखी पुरावाच पाहिजे. अशा लेखी पुराव्याशिवाय कोणत्याहि गोष्टीला आम्ही सत्य म्हणणारच नाहीं, असा येथे आग्रह धरून चालावयाचें नाहीं. लेखी पुरावा म्हणजेच केवळ बिनतोड पुरावा, व इतर अनुमानें म्हणजे टाकाऊ, असें कोणी सुज्ञ म्हणणार नाहीं. इतकेंच नव्हे तर एखाद्या गोष्टीविषयीं अगदीं स्पष्ट लेख मिळाला, म्हणून त्या गोष्टीविषयीं अगदीं प्रत्यक्ष पुरावा मिळाला, असेंहि म्हणतां येणार नाहीं. नुसत्या पोषाखावरूनच सभ्य गृहस्थाला ओळखतां येत नाहीं, तसेंच नुसत्या लेखावरूनच त्यांतील गर्भितविषय सत्य आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. आमच्या विद्यार्थिदशेंतील एक विनोद आठवतो, तो सांगणें प्रासंगिक आहे. डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी आम्हां फर्ग्यूसनवाल्यांना टिनपॉट् कॉलेजवाले, असें पूर्वी हिणवीत असत. डेक्कन कॉलेजांतील टेनिसक्लब, बोटक्लब वगैरे मजेच्या संस्था, विद्यार्थ्यांची आणि अध्यापकांची अकडबाज राहणी पाहून निदान माझे तरी डोळेच दिपत. इतकेंच नव्हे, एकदा तर कडक इस्त्री केलेला लिननशर्ट अंगांत नसलेल्या माणसाला सुशिक्षित तरी कसें म्हणावें, अशी शंका नवीन भरती झालेल्या कांही तरुण डेक्कन कॉलेजवाल्यांना आलेली पाहून, मी कधीं तरी सुशिक्षित होईन की नाहीं, ह्याची मला तेव्हां खात्री नसे! असो. कडक इस्त्रीचा व सुशिक्षणाचा गेल्या पिढींत जितका संबंध होता, तितकाच किंबहुना कांकणभर जास्तच संबंध, लेखी पुरावा आणि ऐतिहासिक सत्य ह्यांमध्यें असावा, अशी कांही संशोधकांची अद्यापि समजूत असलेली आढळते; निदान आर्यानार्य वादांत तरी ही समजूत फार नडते, ही गोष्ट सर्व इतिहाससंशोधकांनी समजून असणें सुरक्षितपणाचें आहे.

हिंदुस्थानांतील आहे नाहीं ते सर्व सत्य आणि शुभ चार वेदांतच आहे, बाकी उरेल तो अंधकार अशी भाविक समजूत केवळ जुन्या कर्मठ ब्राह्मणांचीच नसून अगदीं आजच्या कांहीं आर्यसमाजी प्रोफेसरांचीहि आहे. प्रोफेसर मॅक्समुल्लर हे परकीय असूनहि त्यांना आर्यत्वाचाच नव्हे तर वेदांचाहि त्यांच्या पांडित्यामुळें मोठा अभिमान होता. त्यांनीं आपल्या पौरस्त्य पवित्र ग्रंथमालेंतील, उपनिषदांवरील ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे कीं, राममोहन राय ह्यांनीं उपनिषदांचें भाषांतर केलें, तुलनात्मक धर्माचें पहिलें अधिष्ठान उभें केलें व त्यांचे अनुयायी देवेंद्रनाथ, केशवचंद्र सेन आणि 'साधारण

ब्राह्मसमाजा"चे संस्थापक व चालक ह्या सर्वांना आपल्या धर्मांची प्रेरणा उपनिषदांतून झाली आहे, हें मॅक्समुल्लरचें म्हणणें सर्व खरें आहे. पण शेवटीं देवेंद्रनाथांनींच उपनिषदांतून जरी स्वतः प्रेरणा घेतली तरी वेदांचें प्रामाण्य गौतम बुद्धाप्रमाणेंच झुगारून दिलें, हेंहि पण तितकेंच खरें आहे. ह्या गोष्टींत जें रहस्य आहे, तें हेंच कीं, वेद संहिता काळचा जो आर्यांचा असल 'वैदिक' धर्म तो पुढें उपनिषत्काळांत आपल्या शुद्ध आर्यस्वरूपांत उरला नाहीं प्रस्थानत्रयीचा शेवटचा टप्पा जो भगवद्गीता धर्म त्यांत तर तो फारच कमी उरला, आणि शेवटीं देवेंद्रनाथांच्या काळीं तर तो धर्म आपल्या कीर्तिरूपानेंच केवळ उरला, प्रामाण्यरूपानें उरणें शक्यच नव्हतें. तात्पर्य इतकेंच कीं, उपनिषत्काळीं म्हणजे गौतम बुद्धाच्या पूर्वी १।२ शतकांचा धर्म म्हणजे वैदिक धर्म नसून बाहेरून आलेल्या आर्य धर्मावर, सुमेरियन ऊर्फ सुमेरु, आसुर, नाग, द्राविड, मोंगल, कोल, इ. आर्यांच्या इतकेंच किंबहुना कांहीं बाबतींत आर्यांहूनहि निःसंशय अधिक सुसंस्कृत मानववंश सिंधू नदीच्या पूर्वेकडे हिंदुस्थानांतच जे राहात होते, त्यांच्या धर्माचा, भाषेचा व इतर संस्कृतीचा संस्कार घडून बनलेला मिश्रधर्म तत्कालीन वरिष्ठ वर्गांत चालू होता. आर्यांहून अधिक वैभवाची संस्कृति, ते येण्यापूर्वीं हिंदुस्थानांत होती; तिचे प्रत्यक्ष आणि आश्चर्यकारक अवशेष नुकतेच सिंध आणि पंजाब प्रांतांत ब्रिटिश सरकारच्या संशोधनखात्याला सांपडले आहेत. ते डोळ्यांनीं पाहूनहि उपनिषत्काळाच्या अत्यंत संकीर्ण संस्कृतीमुळें नवीन निर्माण झालेल्या स्वतंत्र व उदार धर्माचें सर्व श्रेय अस्सल पण आर्य 'वैदिक' धर्मालाच देणें म्हणजे आजकालचें तुलनात्मक धर्माचें शास्त्र आणि वाङ्मय वाचून, ख्रिस्ती अथवा त्याहूनहि कडव्या इस्लाम धर्माच्या कांहीं सुशिक्षित प्रचारकांमध्यें आज जें मनाचें औदार्य व दृष्टीचा मोकळेपणा आला आहे, त्याचें सर्व श्रेय बायबलला किंवा कुराणाला देण्यासारखेंच आहे. श्रेयाच्या ह्या मोठ्या वाटणीला अगदींच सौम्य नांव द्यावयाचें झाल्यास 'अनैतिहासिक' ह्यापेक्षा दुसरें यथार्थ नांव सांपडावयाचें नाहीं.

## "भागवत" शब्दाचा इतिहास

***भग*** हा शब्द हिंदी वेदांत पुष्कळ वेळा आढळतो. बग ह्या रूपानें इराणी अवेस्तामध्येंहि आढळतो. हीं दोन्हीं रूपें सूर्यदेवतेचीं नांवें आहेत. स्लाव ( रशियन ) भाषेंत **बोगू** म्हणजे देव ह्या सामान्य अर्थीं हा शब्द होता, असें भाषाभिज्ञ मॅक्समुल्लर म्हणतात. ह्यावरून हा शब्द फारच प्राचीन आहे, हें सिद्ध होतें. छांदस् भाषेंत ( मागाहून ह्या भाषेला संस्कृत हें नांव पडलें ) भग शब्दाचा धात्वर्थ पूर्वीचा भज्–विभागणें, वांटून देणें, असा आहे संपत्ति अथवा सुखें मनामध्यें वांटून देणारा अशा अर्थी म्हणजे उदार श्रीमान् कृपाळु देव, अशा नंतर भग शब्दाचा विशेषनामवाचक अर्थ झाला. श्रीमंती, भाग्य, धन्यता असा सामान्यनामवाचक अर्थ पूर्वी होता. पुढें उपनिषत्काळीं विशेषतः महावीर आणि

बुद्धाच्या काळीं ह्या शब्दाचा कदाचित् सामान्यनामवाचक अर्थ उरला असवा, म्हणून त्याला वत् असा प्रत्यय लागून भगवत् असें रूप सिद्ध झालें. भगवान् ही संज्ञा इंद्र, सूर्य वगैरे देवतांनाच नव्हे तर वासुदेव, महावीर, गौतम बुद्ध वगैरे थोर आणि पूज्नीय पुरुषांनाहि लागू लागली. ही पूज्नीय संज्ञा मनुष्याला लावण्यांत आली, ती प्रथम जिन् बुद्धाला लागून नंतर वहिवाटीच्या जोरावर वासुदेवालाहि लागली किंवा उलट प्रकार झाला, हें निश्चित सांगतां येत नाहीं. पण सात्वत आणि पांचरात्रांच्या ग्रंथापेक्षां कांहीं पाली ग्रंथ अधिक प्राचीन असल्यामुळें भगवान् ही संज्ञा वतहुकून्न महावीर आणि सिद्धार्थ ह्या महन्तांनाच अगोदर लागलेली असणें, अधिक संभवनीय आहे, असें वाटतें.

भग शब्दांतील भज् ह्या धातूपासून भक्ति ह्या शब्दाची व्युत्पत्ति आहे. हा धातू जेव्हां आत्मनेपदी चालतो, तेव्हां ह्या शब्दाचा अर्थ 'आवडणें' असा होतो; हा अर्थ पाणिनीलाहि माहीत होता. पण साखर, तूप, करंजी, लमंग चढणी वगैरे साऱ्या वस्तूंवर जी भौतिक आवड असते, त्या भौतिक अर्थी ह्या भक्ति शब्दाचा तेव्हा अधिक प्रचार असे. भक्ति ह्या शब्दाचा पारमार्थिक अर्थ एखाद्या देवतेसंबंधीं, असा समग्र वेदांत किंवा बुद्धकालापूर्वीच्या वैदिक वाङ्मयांत नाहीं, क्वचित् बुद्धानंतरच्या उपनिषदांमध्यें आढळतो. (MaxMuller : Natural Religion Giff. Lec. पान ९७) गुरुवर्य भांडारकरांचें मत असें आहे कीं, भक्तीची भावना वैदिक कर्वांच्या अंतःकरणांत होती. पण ती बाह्यविधीचें अवडंबर माजविणाऱ्या ब्राह्मण काळात मावळली. उपनिषत्काळात ती पुन्हा कांहीं अंशी उदयाला आली. तरी तिचा अर्थ 'देव.विषयीं एकान्तिक भाव किंवा अनन्यपणा' इतकाच होता. श्वेताश्वेतरोपनिषदामध्यें मात्र 'देवावरील' प्रेम असा अर्थ आहे. गीतेमध्यें देखील भक्ति ह्या पदाचा अर्थ उपासना ह्या अर्थीच आहे. इतकेंच नव्हे तर पुढें रामानुजांनीं देखील ह्या शब्दाची योजना उपनिषदातल्याप्रमाणें सतत चिंतन किंवा उपासना ह्या वैदिक अर्थानें नेहमी केली असून प्रीति ह्या भावनात्मक अर्थानें नाहीं वगैरे (Vaishnavism lec. पान २८,२९). ह्या दोघा पंडिताच्या मतानेंहि भागवत धर्माचें जें मुख्य प्रेममय लक्षण ते वैदिक धर्मात सापडणें फारच दुर्मिळ होतें, असें सिद्ध होतें. यास्कानें इंद्रभक्तीनि, अग्निभक्तीनि अशी कर्मकर्तेरि प्रयोगात भज् धातूची योजना केली आहे; पण तेथेहि इंद्रसंबंधीं वस्तु, अग्नीला प्रिय असलेल्या वस्तु असा अर्थ आहे. श्वेताश्वेतर उपनिषदात देवावरील प्रेम असा भक्तीचा अर्थ असला तरी हें उपनिषद् यथेच अर्वाकडचें आहे, व त्यांतील उपास्य दैवत रुद्रशिव हें असून हें दैवत वैदिक अथवा आर्यांचें मुळींच म्हणतां येत नाहीं. असो.

भगवान किंवा भगवान् कोणी देव, देवी, अथवा पूज्नीय पुरुष असा होऊं लागल्यावर त्या भावनेला भजणारे ते भागवत आणि त्यांचा धर्म तो, भागवत धर्म, असा अर्थ सिद्ध झाला. ह्या धर्मात श्रद्धापूर्वक भक्ति (प्रेम) हें मुख्य लक्षण आहे. बाह्य कर्मठपणाचा जो ब्राह्मणांत अथवा पूर्वमीमांसा दर्शनांत ऊत आला, त्या अर्थाच्या

कर्मवादाला भागवत धर्मात मुळींच महत्त्व नाहीं. ज्ञानाला व आणिखेरहि फार तर जैन आणि बौद्धांच्या भागवत धर्मात महत्त्व आहे, पण शाक्त, शैव, किंवा वैष्णव भागवतांमध्ये केवळ तत्त्वज्ञानाला गौणत्वच आहे. श्रद्धा, भक्ति आणि शरणागति ह्यांनाच मुख्य स्थान आहे. *किंबहुना शरणागतीचें तत्त्वहि बौद्ध धर्मांतच महावीर आणि सिद्धार्थ बुद्ध* ह्यांना अनुलक्षून प्रथम अस्तित्वांत आलें असावें. बुद्धाच्या निर्वाणानंतर तीनचार शतकांतच महायान नांवानें बौद्धांचा एक जगभर पसरणारा पंथ निघाला. त्यात बुद्ध हाच ईश्वर, परब्रह्म, आदि तत्त्व असून, त्याचे केवळ अवतार हे निरनिराळ्या युगांत झालेले अथवा पुढें होणारे बुद्ध असा अवतारवाद निर्माण झाला. हाच अवतारवाद मोठ्या प्रामुख्यानें पुढें विष्णु भागवतांच्या धर्मांत शिरला. येणेंप्रमाणें शाक्त भागवत, शिव भागवत, जैन भागवत, बौद्ध भागवत, शेवटीं वासुदेव ऊर्फ विष्णु भागवत, असे इतिहासक्रमानें भागवताचे पांच प्रकार सिद्ध होतात. सौर, गाणपत्य इत्यादि आणखीहि बारीक बारीक भागवताचे प्रकार सांपडतील, पण त्यांचा हल्लीं प्रचार नाहीं, किंवा ते फारच गौण आहेत; म्हणून त्यांची ह्या व्याख्यानांत गणना केली नाहीं. भागवत धर्माचा पाया घालण्याच्या कामीं ह्या पांचहि प्रकारच्या भागवतांची कामगिरी रुजू आहे. जैन आणि बौद्ध आपल्याला भागवत म्हणून घेण्यास तयार नसतील, किंवा इतर भागवत त्यांना भागवत म्हणावयास तयार नसतील पण कोणी म्हणवून घेण्यास किंवा म्हणण्यास तयार आहे किंवा नाहीं, हा प्रश्न आम्हापुढें नाहीं. तर भागवत धर्माच्या विकासांत कोणाची किती व कशी कामगिरी आहे हें पाहणें इतिहासाचें काम आहे. ह्या विशिष्ट पंथाला अभिमान अथवा तिरस्कार करण्याशीं इतिहासशास्त्राचा संबंध नाहीं.

## निराळे भागवत पंथ

शाक्त आणि शैव पंथाचा 'वैदिक' धर्माशीं फारच अल्प आणि अप्रत्यक्ष संबंध आहे, हें पहिल्या व्याख्यानांत सांगितलेंच. शैवांतील विशेषतः लिंगायत पंथ तर वेदाला मुळींच न मानतां आगमाला मानतो. द्राविड शैवाचा शैवसिद्धान्त स्वतंत्रच आहे. त्याचा वेदापेक्षां आगमाशींच जास्त संबंध आहे. जैन व बौद्धहि वेदाला जुमानीत नाहींत. राहतां राहिलेले विष्णु भागवत. हे वेदापेक्षां आपल्या अंतःकरणांतील श्रद्धाभक्तीवर आणि भगवंताच्या कृपेवरच जास्त अवलंबून असतात. ह्या भक्ति आणि कृपा तत्त्वांचा विकास प्रस्थानत्रयींतील शेवटले ठाणें जी भगवद्गीता तिच्यापासून तो आतांपर्यंत सारखा वाढत्या प्रमाणावर होत आला आहे. गीतेंत जरी बहुदेवांच्या त्रैगुण्यविशिष्ट वेदांना गौणत्व आणि अनन्य भक्तीला श्रेष्ठत्व दिलें आहे, तसेंच *भागवत धर्माचा ज्याला 'कळस' अशी पदवी* वारकऱ्यांनीं दिली, त्या आधुनिक तुकोबालाहि वेदाचें महत्त्व फारसें वाटलें नाहीं. बाकी उरले जे शंकर, वसुगुप्त, रामानुज (काश्मीरचा), मध्व, निंबार्कवल्लभ इ. शाक्त, शैव,

वैष्णव आचार्य. त्यांनीं मात्र आपल्या मतांचा संबंध वेदांशीं, उपनिषदांशीं, निदान ब्रह्मसूत्रांशीं तरी लावला आहे, पण भागवत धर्म जसे एक मत आहे, तसाच तो एक धर्महि आहे. किंबहुना त्याच्या मतापेक्षां त्याच्या उपासनाभागाचा किंवा भक्तितत्त्वाचा परिणाम हिंदुस्थानांतील लहानथोर सर्व समाजावर अधिक सात्त्विक आणि टिकाऊ असा झाला आहे, हें निर्विवाद आहे. म्हणून ह्या धर्मातील आचार्यांपेक्षां ह्या धर्मांतील संतांवरच विष्णु भागवतांचा अधिक भर आहे. असो. ह्या भागवत धर्माचा पाया ज्या वरील पांच भागवतांनीं घातला त्यांचा आता क्रमशः विचार करूं या.

## शक्ति अथवा देवी भागवत

ह्याचें मूळ हिंदुस्थानांतच होतें कीं बाहेरून आलें हें सांगणें इतिहासाच्या आटोक्याबाहेरचें काम आहे. कारण हा विषय वेदांहिपेक्षां इतका पुरातन आहे, कीं त्याला लेखी पुरावा नाहीं, ह्यांत कांहींच आश्चर्य नाहीं. मार्कंडेय पुराण व देवी भागवत अशीं पुस्तकें आहेत, पण तीं वैदिक धर्मियांनीं व अगदीं अलीकडच्यांनीं लिहिलीं असल्यानें अशा लेखी पुराव्यांत फारसा राम नाहीं. तुलनात्मक भाषा आणि लोकरूढी (Folk Lore) ह्यांवरून काहीं अनुमानें काढतां येतील, पण कालनिर्णयाच्या बाबतींत हीं प्रमाणें अगदीं पंगू ठरतात. दुर्गा हें नांव वेदांतील रात्री ह्या देवीला होतें; काली, कराली, केशिनी, रुद्राणी, रोदसी इत्यादि नांवें अग्नि अथवा रुद्र ह्या वैदिक देवतांवरून जरी पडलीं असावीं, तरी ही देवी वैदिक नाहीं अशी स्पष्ट कबुली मॅक्समुल्लरनें दिली आहे. कदाचित् ही देवी ईशान्येकडून आली असावी असा मॅक्समुल्लरचा तर्क आहे. तिबेटांतून आलेल्या मोंगलांनीं (मुद्गलांनीं) किंवा ब्रह्मदेश सयामांतून आलेल्या ऑष्ट्रिकांनीं ही देवी आणिली असावी. देव अथवा सैतान वाचक मारू असा एक शब्द अथवा नांव पाली भाषेंत आहे, आणि मारी असें अत्यंत प्राचीन नाव ह्या देवीला आहे. त्यावरून ही देवी ईशान्येकडून आली असावी असा संभव दिसतो. मध्य प्रांतांतील डोंगरी प्रदेशांत, तेलंगणात, महाराष्ट्रांत आणि सर्व द्राविड देशांत विशेषत ग्रामदेवता ह्या नात्यानें ह्या मरीआईची पूजा अद्यापि बळवत्तर आहे. हिचा संबंध पटकी, गोवर, देवी इत्यादि सांसर्गिक आजारांशीं विशेषतः लहान अर्भकांच्या आरोग्याशीं निकट आहे. गृह्यसूत्रांत शूलगव नांवाचा विधि आहे; त्यांत रुद्राच्या नांवानें बैलाचा बळी द्यावा लागत असे व त्याची वपा गांवाबाहेर फिरवून बैलाच्या गोठ्यांत पुरण्यांत येत असे, व जनावरांच्या आजारावर हा एक तोडगा करण्यात येई. इंद्राणी, रुद्राणी, भवानी, शर्वाणी वगैरे देवींच्या नांवानें ह्या विधींत स्वाहा करावा लागत असे. हल्लीं मरीआईची जी रेडा मारून भयंकर गांवजत्रा दक्षिण महाराष्ट्र, तेलंगण आणि द्राविड देशांत करण्यांत येते, ती आर्यांनीं वरील शूलगव

विधीच्या रूपानें किती प्राचीन काळीं घेतली हें दिसतें. चंडी, मुंडी, मातंगी अशीं जीं नांवें ह्या देवींचीं आहेत त्यांवरून चंड, मुंड आणि मातंग – खरें नांव मांग किंवा मॉंग हें आहे – ह्या ईशान्येकडून आलेल्या राष्ट्राची ही देवी असावी. सर्व हिंदुस्थानांत उत्तरेपेक्षांहि विशेषतः दक्षिणेंत आणि पूर्वेस, हिचें अधिक साम्राज्य आहे. ह्यावरून ही देवता कदाचित् हिंदुस्थानांत मूळचीच असावी, असाहि बराच संभव आहे. कित्येक मानववंशशास्त्रवेत्त्यांचें असें मत आहे कीं, ही देवी असीरिया किंवा बाबिलोनिया देशांतून आलेल्या असुर लोकांनीं ह्या देशांत आणिली असावी. असुर अथवा द्राविड आर्यांप्रमाणेंच वायव्येकडून, परंतु आर्यांपूर्वी हजारों वर्षें येथें आले असावेत. आर्यांनीं जसा घोडा हा प्राणी हिंदुस्थानांत प्रथम आणिला, तसा द्राविडांनीं बैल प्रथम आपल्याबरोबर आणिला; त्यांच्याहि अगोदर आलेल्या किंवा येथेंच मूळचे असणाऱ्या कोल, मांग वगैरे लोकांजवळ म्हैस, रेडा हा प्राणी होता. ह्या असिरियांनीं ऊर्फ द्राविडांनीं आपल्या देवीच्या साह्यानें ह्या म्हैस पाळणाऱ्या कोल ( मॉंग ) जातींचा पराजय केला, म्हणून त्या देवीला महिषासुरमर्दिनी हें नांव पडलें. अगदीं दक्षिणेकडच्या तिनेवल्ली जिल्ह्यांत आदिचनल्लूर गांवीं संशोधकाला नुकतेच कांहीं अत्यंत प्राचीन स्मशानघाट सांपडले आहेत त्यांत कांशाचीं चित्रें आणि मूर्ति मिळाल्या, त्या मद्रास म्यूझियममध्यें हल्लीं ठेविल्या आहेत. ह्या मूर्तींत कुत्र्याच्या आणि रेड्याच्याच आकृति आहेत, इतर प्राण्यांच्या नाहींत. ह्यावरून दक्षिण हिंदुस्थानांतील कोल, मांग इ. मूळच्या म्हैसवाल्यांच्या आणि उत्तरेकडून आलेल्या द्राविड बैलवाल्यांच्या लढाया होऊन बैलवाल्यांची सरशी होऊन महिषासुरमर्दिनीचा उदय झाला असावा. महिषासुरमर्दिनीच्या सुंदर मूर्ति जावा आणि सुमात्रा बेटांतील जुन्या हिंदु देवळांतहि आढळतात.

चंडी, मुंडी, काली, कराली इ. देवींचीं अशीं उग्र रूपें आहेत, तशींच त्रिपुरसुंदरी, सरस्वती, अन्नपूर्णा, वरदा, शीतला वगैरे सौम्य रूपेंहि आहेत. विशेषतः बंगाल्यांतील नवग्रहादि मालांत शेतकरी वर्गांत ह्या सौम्य देवींच्या मूर्ति मीं घरोघरीं धान्याच्या संचयावर ठेविलेल्या पाहिल्या आहेत. सरस्वती व अन्नपूर्णा ह्यांचा संबंध जमिनींतील पिकांशीं अधिक दिसतो. अशाच प्रकारच्या उग्र आणि सौम्य स्वरूपाच्या देवी इष्टार अथवा अस्टोरेथ ह्या नावाच्या प्राचीन बाबिलोनिया आणि फिनिशिया देशांत होत्या; आणि फिनिशिअनांचें हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्याशीं समुद्रमार्गानें तसेंच बाबिलोनियाचें सिंध देशाशीं पूर्वीपासून दळणवळण होतें. तरी पण द्राविड राष्ट्र हें बाहेरून आलें व त्यांनीं बैल हा प्राणी प्रथम हिंदुस्थानांत आणिला, ह्या सिद्धान्ताच्या उलट जे सिंध प्रांतांत अलीकडे अतिशय महत्त्वाचे शोध लागले आहेत, त्यावरून पुरावा मिळतो. सिंधमध्यें उकरून काढलेल्या ८०००।५००० वर्षांमागच्या शहरांतून ज्या प्राचीन मातृकांच्या असंख्य वस्तु पुणें येथील आर्किऑलॉजिकल ऑफिसमध्यें ठेवल्या आहेत, त्यांत शिंदे बैलांच्या अत्यंत सुरेख आणि सुंदर आकृति आहेत. ही संस्कृति आर्यांपूर्वी हजारों वर्षें येथें असलेल्या द्राविड अथवा सुमेरियन सुमेरवंशी राष्ट्राची आहे. मुंबई इलाख्यांतील आर्किऑ-

लॉजिकल सुपरिटेंडंट रा. दीक्षित ह्यांनीं सांगितलें कीं, बाबिलोनिया देशांत ख्रिस्ती शकापूर्वी १००० वर्षापूर्वी बैल हा प्राणी नव्हता. तें कसेंहि असो. काली, कराली, चंडी इ. उग्र आणि सरस्वती, त्रिपुरसुंदरी, अन्नपूर्णा इ. सौम्य अशीं देवींचीं दोन्ही रूपें हिंदुस्थानांतील मूळच्या देवींचींच आहेत, असें मानण्यासहि अद्यापि विशेष हरकत दिसत नाहीं. स्त्रीजननेंद्रियाला संस्कृतांत भग असा शब्द आहे. त्यावरून किंवा भग ह्याचा भौतिक संपत्ति किंवा ऐश्वर्य असाहि अर्थ आहे. त्यावरून देवीला भगवती अशी संज्ञा मिळाली. देवी भागवत हें पुराण प्रसिद्धच आहे. अठरा पुराणांत त्याची गणना आहे. श्रीमद्भागवत हें फारच अलीकडचें म्हणजे सन १२०० नंतरचें आहे.

## शिव-भागवत

शक्ति आणि शिव ह्या देवतांचा पूर्वापार निकट संबंध आहे. सूर्य, तुफानी वारे (मरुत्), वीज आणि अग्नि ह्या भौतिक शक्तींशी शिवाचा संबंध आहे. वेदांतील रुद्र आणि मरुत् ह्या देवतांशी जरी शिवाचा संबंध पोंचतो तरी ही देवता अस्सल द्राविडांचीच असावी. संसर्गामुळें ती आर्यांनीं द्राविडांपासून स्वीकारली असावी. आर्यांचा द्राविडांशीं समान दर्जाचा तह होऊन त्यांच्यामध्यें परस्पर शरीरसंबंध झाल्याचे पुष्कळ दाखले जुन्या पुराणांत आहेत. ऐल ऊर्फ **सोमवंशी** राजा **ययाति** ह्याच्या दोघी बायका असुर अथवा दैत्य ऊर्फ द्राविड कुळांतल्या होत्या. पहिली **शर्मिष्ठा**, ही असुरांचा राजा **वृषपर्वन्** ह्याची मुलगी. दुसरी **देवयानी** ही तर दैत्यांचा गुरु **उशनासशुक्राचार्य** ह्याची मुलगी. पहिलीच्या पोटीं **द्रुह्यु, अनु, पुरु** आणि दुसरीच्या पोटीं **यदु, तुर्वसु** असे मिळून पुढील सोमवंश कुळाचे पांच मूळ पुरुष जन्मले. **हिडिंब** नावाच्या राक्षस राजाची मुलगी **भीमानें** लढाईच्या शेवटीं तह करताना वरिली. **श्रीकृष्णांनीं** तर जांबवती ह्या अस्पृश्य कुळांतील तरुणीशीं तिच्या बापाचा पराजय केल्यावर विवाह लाविला. तिला मुलगा होईना म्हणून कांहीं वर्षे हिमालयांत **महादेवाजवळ** तप करून त्याच्या प्रसादानें **सांब** हा मुलगा मिळविलें, वगैरे माहिती महाभारतांत आहे. पण बौद्धांच्या जातक कथेत जांबवतीची माहिती थोडी वेगळी आहे ती अशी:—**वासुदेव** राजा एके दिवशीं शिकारीला निघाला असतां वेशीपाशीं त्याला एक **अस्पृश्य** वर्गाची तरुणी दिसली, तिला त्यांनीं वरिलें. पुराणांतील विषयाचें अगदीं शास्त्रीय पद्धतीनें अध्ययन करून कलकत्त्याचे माजी जस्टिस् **पार्जीटर** ह्यांनीं आपल्या Ancient Indian Historical Tradition ह्या ग्रंथांत जे नवीन आश्चर्यकारक सिद्धान्त स्थापिले आहेत, त्यांतील एक असा आहे कीं, प्राचीन काळचे ब्राह्मण हे अनार्य होते. **वसिष्ठ, कश्यप, भार्गव** इ. प्रसिद्ध ब्राह्मण कुळें **हिरण्यकशिपु** ह्या दैत्य राजाचे पुरोहित होतीं (पान ३०७). इतकेंच नव्हे तर **इक्ष्वाकु** वगैरे सूर्यवंशी क्षत्रियहि द्राविड वंशाचे

राजे होते (पान २९५). ते कसेंहि असो; ह्या क्षत्रियांचें आणि इतर द्राविडांचें उपास्य दैवत शिव हेच होतें, हें निर्विवाद आहे. दाशरथि रामचंद्रानें शतकोटी लिंगांची स्थापना आपल्या दक्षिणेकडील मोहिमेंत केली. भारतीय युद्धांत जय मिळविण्यासाठीं कृष्णानें जसें **अर्जुनास** दुर्गेची प्रार्थना करावयास लाविलें, तसेंच **रावणावर** जय मिळविण्यासाठीं **त्वरजा उर्फ तुळजांबिका** ह्या देवीची आराधना ह्या रामचंद्राला करावी लागली. राम आणि कृष्ण पुढें विष्णूचे अवतार बनले; पण स्वतः त्यांचेंच उपास्य दैवत विष्णु असणें शक्य नव्हतें, तें त्यांचें दैवत शिवच होतें. तदनंतर स्नेहसंबंध दृढ व्हावा म्हणून पूर्वी जसे राजे लोकांमध्यें परस्पर शरीरसंबंध उर्फ बायकांची देवघेव होत असे (अकबराची हीच राजनीति होती) तशीच देवांचीहि देवघेव होणें साहजिक आहे. ह्या न्यायानें शक्ति आणि शिव ह्या दोन देवता आर्यांनीं मोगलां द्राविडांपासून घेतल्या असाव्यात. द्राविड क्षत्रियांनीं विष्णु हें दैवत घेतलें असावें.

आर्योंना शिव ह्या देवाचा स्वीकार करण्यापूर्वी हा आर्येतरांचा होता, व ह्यांना आर्य लोक तिटकारा करीत असत, असा पुरावा वेदांत आहे. **शिश्नदेव** म्हणजे ज्या **निषाद** आदिकरून लोकांचा देव **शिश्न (लिंग)** होता, त्यांचा इंद्रानें पराभव करून त्यांची मोठमोठीं शहरें लुटून संपत्ति आणिली, अशी इंद्राची स्तुति केलेली वेदांत आढळते. (ऋक् मंडळ ७ स्तोत्र २१–५) ह्यावरून हे लोक केवळ जंगली नसून ते आर्यांपेक्षां अधिक मातबर संस्कृतीचे व संपत्तिपूर्ण शहरांत राहणारे होते असें दिसतें. *आकाश हा पिता आणि भूमि ही माता आणि ह्या दोघांचा संयोगदर्शक* **लिंग** आणि **योनीची** पूजा ही अतिप्राचीन कालापासून चालत आलेली गोष्ट आहे. गेल्या ५।६ वर्षांत सिंध आणि पंजाबांत जे सरकारी संशोधन खात्यानें सुमारें ५००० वर्षांपूर्वीच्या सुमेरिअन् उर्फ समरु लोकांच्या वैभवशाली संस्कृतीचे अवशेष उकरून काढले आहेत, त्यांतील शिश्नाच्या आकृति हुबेहूब प्रदर्शनासाठीं ठेविल्या आहेत. तेव्हां ही शिव-शक्तीची उपासना ह्या देशांत मुळापासूनच असणें संभवतें. ह्या पूजेचा ईजिप्त देशाशीं मूळ संबंध कित्येक दाखवितात तो येणेंप्रमाणें :–पिंडीवर घातलेलें पाणी वाहून जाण्या-साठीं पन्हाळ असतें. आकाशांतून भूमीवर जो पर्जन्य पडतो तें आकाश देवाचें रेत आणि तें भूमीवर पडल्यावर वाहून नेणारी पन्हाळ म्हणजे ईजिप्त देशांतील जी **नाईल** नदी, ती उत्तरवाहिनी आहे. चमत्कार हा कीं, जेथें जेथें हिंदुस्थानांत अगदीं जुनीं व नवीं शिवालयें जीं आजवर मीं पाहिलीं आहेत, त्यांतील पिंडीच्या पन्हाळी बहुतकरून उत्तराभि-मुख आहेत. मला दोनच ठिकाणीं एक अपवाद आढळले. म्हैसूर संस्थानांतील शिमोगा येथील व्यंकटरमणाच्या देवळाच्या ओवरीतील एक पिंडी पूर्वाभिमुख दिसली तेव्हांच. पण पुजाऱ्याजवळ शोध करतांना सांगितलें कीं, ही पिंडी नवी असून ती म्हैसूर सरकारच्या एका अटाणी अधिकाऱ्यानें परपरा लक्षांत न आणतां देवळाच्या नवीन दुरुस्तीचे वेळीं अशी चुकीनें मांडली आहे. दुसरा अपवाद उज्जनी येथील प्रसिद्ध महां-काळेश्वर ज्योतिर्लिंगाचा. याची पन्हाळ पूर्वाभिमुखी आहे ! तरी पण ह्या मत्य देवळाच्या

आधारांतील पुष्करणीभोंवतील ओंव्यावरून जीं अनेक लिंगें आहेत त्या सर्वांच्या पन्हाळी निरपवाद, उत्तराभिमुखीच दिसल्या! कैलास पर्वत उत्तरेकडे आहे म्हणून पिंडीचा प्रवाह उत्तरेकडेच असावा, असें कांहीं नाहीं. नाईल नदीच्या उत्तरवाहिनी-त्वाकडेच हा संबंध अधिक चांगला जमतो. ह्या व इतर अनेक उदाहरणांवरून शिव ही देवता आणि विशेषेकरून तत्प्रीत्यर्थ लिंगपूजा ही पश्चिमेकडील ईजिप्त, बाबिलोनिया इत्यादि देशांतून आली असावी, असा तर्क करण्यास जागा आहे, असें कांहीं विद्वान् समजतात. पण ज्या अर्थी ही लिंगपूजा महाभारत कालापासून अगदीं आतांपर्यंत ह्या देशांत चालू आहे व लिंगायताचा तर एक विशिष्ट पंथच आपल्या देशांत आहे, त्या अर्थी ही पूजा व हा देव हीं दोन्ही मुळात एथलीच असावीं, किंबहुना ह्या विशिष्ट पूजापद्धतीचें मूळ अनेक देशांत असावें असें समजणें तूर्त अधिक सुरक्षित आहे.

शिव-भागवताचा उल्लेख पतंजलीच्या सूत्रांत आहे. शांतिपर्वांतील नारायणीय उपाख्यानात ( भाग ३४९ श्लोक ६४ ) शिव-श्रीकंठानें ह्या मताचा प्रथम उपदेश केला, असा उल्लेख आहे. वायुपुराण ( भा. २३ ), लिंगपुराण ( भा. २४ ) ह्यांत उल्लेख आहे कीं, प्रत्यक्ष महेश्वरानें ब्रह्मदेवाला सांगितलें कीं, वासुदेवाच्या जन्मकाळीं आपणहि लकुलिन् नांवाच्या एका ब्रह्मचाऱ्याच्या रूपानें अवतार घेऊं व तो कुशिक, गर्ग, मित्र आणि कौरुष्य ह्या चार शिष्यांना पाशुपतशास्त्राचा उपदेश करील. हा ह्या शिवभागवतांचा मूळ आचार्य भट्टारक लकुलीश नांवानें गुजराथ ( लाट ) देशांतील **भडोच** जिल्ह्यांत उदयास आला, व तो शिवाचा अवतार होता वगैरे गोष्टींना १० व्या आणि ११ व्या शतकांतल्या कांहीं शिलालेखांतहि आधार आहे [ सर भांडारकर Vaishnavism and Shaivism पान ११६ ]. ख्रिस्ती शकापूर्वी दुसऱ्या अथवा तिसऱ्या शतकां-तील **सांची** येथील शिलालेखांत देणगी देणाऱ्यांचीं जीं नांवें आढळतात, त्यावरून **मूलर** ह्यांनीं असें अनुमान काढिलें कीं, विष्णु आणि शिव–भागवतांचा संप्रदाय बौद्धांच्या व जैनांच्याहि पूर्वीचा असावा, पण या म्हणण्यात पूर्ण सत्य नाहीं. सर भांडारकर म्हणतात कीं, विष्णूची साम्प्रदायिक पूजा शिवपूजेनंतर सुरू झाली. त्याला त्यांनीं गृह्यसूत्रांत रुद्राची पूजा कशी करावी, ह्याविषयीं नियम आहेत ह्या गोष्टीचा पुरावा दिला आहे. ( Vaishnavism and Shaivism पान ११५ ). ह्यावरून आणि इतर बऱ्याच पुराव्यावरून शिव-पूजा ही बुद्धाच्या पूर्वीची होती, पण विष्णु-कृष्ण पूजा मात्र बुद्धानंतरची असावी असें होतें. पाली *ग्रथामध्यें वासुदेवोपासकाचा उल्लेख आहे,* तथापि पांचरात्र आणि सात्वत [ भागवतांचा ] संप्रदाय बौद्धानंतरचाच असावा इतकेंच नव्हे तर **श्वेताश्वेतर** उपनिषदांतील शिव भक्तीचा नमुना आणि पाशुपत सांप्रदाय-देखील बुद्धानंतरचेच असावेत.

रुद्र शिव हें दैवत वेदाहूनहि बऱ्याच प्राचीन काळापासून चालत आल्यामुळें त्याच्या स्वरूपांत ज्याप्रमाणें अनेक परिवर्तनें झालीं, त्याचप्रमाणें त्यांच्या पूजेच्या प्रकारांतहि होणें साहजिकच आहे. वेदांच्या व त्यापूर्वींच्या आर्य काळीं आर्यांमध्यें

मूर्तिपूजेचा संभवच नव्हता. तेव्हां शिव [आकाशपिता] आणि शक्ति [भूमाता] यांची पूजा लिंग आणि योनि [स्त्रीपुरुषांचीं जननेंद्रियें] ह्या चिन्हांच्या द्वारेंच होत असावी. हें वेदांतील शिश्नदेवाच्या उल्लेखावरून दिसतें. बाबिलोनिया, इजिप्त वगैरे प्राचीन राष्ट्रांत अशा प्रतीकांची पूजा होती. पुढें तीं ह्या पुरातन महादेवाचा बऱ्याच कालानंतर रुद्र [भयंकर] स्वरूपांतून शिव (सौम्य) स्वरूपांत विकास झाल्यावर त्याच्या उपासनेसाठीं मनुष्याच्या आकाराच्या मूर्ति करण्यांत आल्या असाव्यात. इ. स. पूर्वी २०० वर्षांच्या सुमारास शिवाच्या लहान लहान मूर्ति करून बाजारांत विकण्यास ठेवण्यांत येत, असा पतंजलीच्या भाष्यांत उल्लेख आहे. तथापि लिंग-योनि पूजेचा त्या वेळीं अगदीं लोप झाला असावा, अशी जी सूचना गुरुवर्य भांडारकरांनीं केली आहे, ती मात्र पटत नाहीं. कारण महाभारतांत उपमन्यूनें आणि कृष्णानें शिवाची आराधना केल्याची जी गोष्ट आहे तिच्यांत उपमन्यूनें अशा पूजेचा लोकांत प्रचार असल्याचा उल्लेख केला आहे. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या एकदोन शतकांतील कनिष्क, हुविष्क वगैरे कुशान राजांचीं जीं नाणीं सांपडलीं आहेत, त्यांवर शिवाचीं दोन हातांचीं किंवा चार हातांचीं, त्रिशूल, पाशुपत (कुऱ्हाड) इ. आयुधें असलेलीं मनुष्यरूपी चित्रें छापलेलीं आहेत. त्यांच्याहि बऱ्याच अगोदरच्या गोंडोफेरस नावाच्या इराणांतील पार्थीयन (पल्हव) राजाच्या नाण्यावरून शिवाच्या त्रिशूलधारी मनुष्याकृति मुद्रा आढळतात. ह्यावरून शिवाच्या ह्या मूर्ति, किंबहुना शिवाचें सौम्य आणि कल्याणकारी ध्यानहि पश्चिमेकडील इजिप्त बाबिलोनियादि देशांतून आलें असण्याचा जितका संभव दिसतो, तितकाच संभव रुद्र शिवाच्या स्वरूपांतील आणि उपासनेंतील घडून आलेला विकास पुरातनकाळापासून ह्याच देशांतहि घडून येण्याचा दिसतो. मात्र पुढें पुढें हिंदुस्थानांत शिवाचें हें सौम्य स्वरूप कायम राहून रौद्ररूप जसें मागें पडलें, तसेंच त्याच्या पूजेंतील मूर्तिपूजा मागें पडून लिंगपूजाच चिन्हरूपानें कायम राहिली; ह्यावरून शैव भागवत पूर्वींपासूनच विशेषतः ज्ञान आणि वैराग्य मार्गाचे अभिमानी असल्यामुळें त्यांना मनुष्याकृति मूर्तिपूजेपेक्षां जगदुत्पत्तीचें एक पुरातन परंपरेचें केवळ चिन्ह अथवा द्योतक म्हणून लिंगपूजाच अधिक पसंत झाली असावी असें दिसतें. असो.

## श्वेताश्वतरोपनिषद् ऊर्फ शिवगीता

अनेक दृष्ट्या हें उपनिषद् फारच महत्त्वाचें आहे. ही एक शैवांची भगवद्गीताच म्हणण्यास हरकत नाहीं; तथापि हा केवळ सांप्रदायिक ग्रंथ नसून ह्यांत उपनिषत्काळाचा ईश्वर धर्म अथवा एकान्तिक भागवत धर्म कसा कळसास पोंचला होता हें गुरुवर्य सर भांडारकरांनीं आपल्या (Vaishnavism & Shaivism पान १०६–११२) ग्रंथांत एका स्वतंत्र भागाच्या रूपानें फार मार्मिकपणानें दाखविलें आहे. गुरुवर्यांचें

स्वतःच्या भक्तिमार्गविषयक सात्त्विक अभिमानाचें ह्या भागांत अतिसुंदर प्रतिबिंब दिसून येत आहे. प्रकृति, जीव, ईश्वर परब्रह्म इत्यादि वेदान्तांतील तत्त्वांचा परस्पर संबंधच केवळ ह्या उपनिषदांत आहे, असें नव्हे, तर ह्याच्या कर्त्यानें भक्ताची शरणागति, भक्तीचें माहात्म्य, ईश्वरी कृपा आणि सर्वव्यापित्व वगैरे भागवत धर्माला प्राणभूत अशी इतर तत्त्वेंदेखील थोडक्यांत पण स्पष्ट निरूपिलीं आहेत. रुद्र, शिव, ईशान, महेश्वर हीं नावें आलीं असून शिव हेंच ह्या उपनिषदाचें मुख्य आणि एकान्तिक दैवत उपास्य आणि अंतिम आदर्श आहे. श्रीकृष्णाच्या भगवद्गीतेंत "रुद्राणां शंकरश्चास्मि" (अ. १० श्लो. २३), "ब्रह्माणमीशं कमलासनस्थम्" (अ. ११ श्लो. १५), "सर्व लोकमहेश्वरम्" (अ. ५ श्लो. २९) वगैरे शैव नांवें आढळतात. पण श्वेताश्वेतरांत विष्णु, कृष्ण अथवा वासुदेव अशीं वैष्णव नांवें चुकूनहि आलीं नाहींत. कृष्णगीतेंत अनेक मतांची कालवाकालव आहे, तशी ह्या उपनिषदांत नाहीं. हें भाष्या शुद्ध आणि आटपसर रुपांत आहे, तर उलट पक्षीं भगवद्गीतेंत फार ढवळाढवळ झालेली स्पष्ट दिसत आहे. कृष्णगीतेनें आपल्या अध्याय १३ ह्यांतील १३ वा सबंध श्लोक आणि १४ व्या श्लोकाचा पहिला अर्धा भाग ह्या उपनिषदांतून घेतला आहे. दुसऱ्या अनेक अंतरस्थ रचनांवरून व तत्त्वांच्या मांडणीवरून कृष्णगीता ही ह्या उपनिषदानंतरचीच नव्हे, तर ह्या उपनिषदांतील तत्त्वांच्या धोरणावरून फक्त उपास्य दैवत तेवढें बदलून रचलेली असावी अशी शंका येते. गीतोपनिषद् असें ज्या अर्थी कृष्णगीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटच्या समाप्तिवाक्यांत म्हटलें आहे, त्या अर्थी न जाणों ती ह्याच उपनिषदाचें रुपान्तर असणेंहि अगदीं अशक्य नाहीं. तें कसेंहि असो, कृष्णगीतेचें हल्लींचें स्वरुप श्वेताश्वेतराच्या काळानंतरचें खास आहे. श्वेताश्वेतरोपनिषदाच्या कर्ता श्वेताश्वेतर ह्या नांवांतहि रहस्य आहे. कृष्णार्जुनाची जोडी पुरातन आहे. ह्यांचेच अवतार नर आणि नारायण रुपानें बद्रिकाश्रमांत राहात होते. श्वेताश्व हें नांव अर्जुनाचें होतें, मग श्वेताश्वेतर हें नांव कृष्णाचें तर नसेल? आणि इतर म्हणजे अर्जुन असा अर्थ होईल. श्वेताश्वेतर म्हणजे कृष्णार्जुन हें जोडपें व कृष्ण हा शैव होता, वैष्णव असणे शक्यच नाहीं. भगवद्गीतेपेक्षां श्वेताश्वेतराचाच संबंध कृष्णाशीं अधिक प्रत्यक्ष नसेल कशावरून?

## जैन आणि बौद्ध भागवत

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें सर्व भागवत संप्रदायांना पाया सांख्य आणि योग ह्या सर्वांत प्राचीन दर्शनावरून झालेला दिसतो. पूर्व मीमांसेच्या कर्मठपणाशीं मेळ घालण्याचाहि भागवत संप्रदायाचें जुळणें शक्य नाहीं. उत्तर मीमांसेंतील शुद्धद्वैत भागाशीं थोडी भागवताचें फारतर अंशतः जुळण्याला सुमत आहे. जैनबुद्धांपैकीं जैन मत पूर्वीचें. दोन्ही निरीश्वरवादी आणि वेदाशीं तुटून असलेली परंतु

सांख्य–योगाशीं दोन्हींचें पूर्ण सख्य. त्यांतल्या त्यांत सांख्यांचीं आणि जैनांचीं फारच गट्टी. सांख्य-दर्शनहि निरीश्वर व वेदाला न मानणारें म्हटलें तरी चालेल. सांख्य दर्शन प्रकृति आणि पुरुष ( अनेक जीव ह्या अर्थी ) दोनच तत्त्वें शाश्वत स्वरूपाचीं मानितें, तद्वत् जैन दर्शनहि जड आणि अजड ( जीव ) हीं दोनच शाश्वत तत्त्वें मानतें. ईश्वर हें तिसरें तत्त्व जैन, बौद्ध, अथवा सांख्य दर्शन मानीत नाहींत. पतंजलीच्या काळीं योगां-मध्यें ईश्वर प्रथम केवळ चित्ताची एकाग्रता होऊन लय लागावा, येवढ्याच सबबीवर आला. पुढें कायमचेंच ठाणें धरून बसला. पतंजलि हा स्वत: ईश्वरवादी शिवभागवत होता. त्यानें योग दर्शनांत ईश्वर कल्पनेचा शिरकाव जोरानें केला, याचें कारण श्वेताश्वे-तरोपनिषदच असावें. जैनांनीं मात्र ईश्वरतत्त्वाचा आपल्या ज्ञानांत शिरकाव होऊं दिला नाहीं. पण त्यांच्या उपासनेंत तीर्थंकरांनीं ईश्वराची जागा घेतली आहे. बुद्ध मुनि ईश्वरालाच नव्हे तर आत्म्याला किंबहुना ब्रह्म ह्या केवल्य वस्तूलाहि मानण्याची आवश्यकता निर्वाणाला नाहीं, असें सांगत असे. पण त्याचा अतुल स्वार्थत्याग, करुणा, मैत्रिभावना, संघटनाशक्ति व चातुर्य इत्यादि गुणांचा त्यांच्या निकटवर्ती अनुयायांवर इतका मोहून टाकणारा परिणाम झाला असावा कीं, तो बुद्ध हा केवळ लोकोत्तर पुरुषच नव्हे तर मनुष्य कोटीवरील पायरी साक्षात् ब्रह्माचेंच एक स्वरूप होता, इ. वाद त्याचे तरुण भक्त उपस्थित करूं लागले. बुद्धाच्या निर्वाणानंतर लगेच भरलेल्या वैशाली येथील परि-षदेंतच त्यांच्या अनुयायांत स्थविरवादी आणि महासंघिक असे दोन तट पडले. पहिला पक्ष जो वृद्धांचा तो बुद्धाला एक लोकोत्तर महापुरुष येवढेंच समजत राहिला; पण दुसरा तरुणांचा पक्ष बुद्धाला देव किंबहुना शाश्वत ब्रह्माचेंच रूप मानूं लागला. असें होतां होतां ३–४ शतकांनीं अश्वघोष आणि नागार्जुन ह्या आचार्यांनीं तर महायान पंथ नांवाच्या बौद्धाचा एक स्वतंत्र पंथ स्थापला. ह्या नवीन पंथाचे बुद्ध म्हणजे साक्षात् सगुणब्रह्म असें मत आहे. तोच पंथ पुढें सर्व आशियाभर पसरला. मूळच्या बौद्धाचा ऊर्फ स्थविरवाद्यांचा पक्ष अल्पसंख्याक स्थितींत आपल्या स्वत:च्या निर्वाणापुरताच विचार करणारा असा होता, आणि तो प्रत्यक्ष बुद्धाच्या शिकवणीचा ज्या पाली ग्रंथांत समा-वेश आहे, अशाची पूर्वीच्या शुद्ध अनात्मवादी स्थितींत राखण करणारा असा सिंहल-द्वीप आणि ब्रह्मदेशांतच काय तो हीनयान या नावानें आहे. इतरत्र तिबेट, नेपाळ, चीन, जपान वगैरेकडे महायान पक्षाचाच विस्तार झाल्या आहे. ह्या महायानाचे मूळ ग्रंथ संस्कृत भाषेंत असून त्यांचीं भाषांतरें चीन, तिबेट, जपानी, सयामी भाषेंत ख्रिस्ती शकाच्या आरंभीच्या शतकांतच होऊन चुकलीं आहेत. हीनयानाचे सर्व ग्रंथ प्रथम सिंहली भाषेंत लिहिले होते, ते सुमारें ५ व्या शतकांत पाली भाषेंत लिहिले गेले. ते हल्लीं उपलब्ध आहेत.

जैन धर्माच्या मतांत अगर उपासनेंत बौद्धाप्रमाणें विकार झाला नाहीं. त्याचा हिंदुस्थानाबाहेर फैलावहि झाला नाहीं. तरी पण हिंदुस्थानाच्या पश्चिम आणि दक्षिण भागांत ह्या धर्मानें संस्कृत आणि प्राकृत ( देशी ) वाङ्मय, साहित्य, शिल्पकला, राज-

कारण, लौकिक सुधारणा इ. अनेक बाबतीत विशेषकरून कर्नाटकांत आणि द्राविड देशांत अप्रतिम कामगिरी बजाविली आहे. ह्या धर्माला पाश्चात्य पंडित जुन्या मताचा, स्थितिस्थापक, अल्पसंतोषी, निवृत्तिपर, वाढ खुंटलेला अशी कित्येक नांवें आपापल्या दृष्टिभेदानुसार देत आले आहेत; पण हा धर्म ह्या गुणांमुळेंच हिंदूंच्या उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या तिरस्काराला आणि घोर छळाला तोंड देऊन अद्यापि अल्प प्रमाणांत का असेना, पण जीव धरून राहिला आहे, हेंच विशेष अभिनंदनीय आहे. उलट बुद्ध धर्म स्पष्टवादी, उदार, प्रगमनशील, जगदुद्धाराच्या आणि प्रचाराच्या बाबतींत अत्यंत धाडशी आणि महत्त्वाकांक्षी असूनहि, शिवाय अत्यंत सहनशील, अहिंसावादी आणि अनत्याचारी असल्यामुळें तो अखेरीस हिंदुस्थानांतील उत्तरेकडील मुसल्मानांच्या पशुतुल्य आणि क्रूर अत्याचाराखालीं दडपून गेला आणि दक्षिणेंतील हिंदु राजांच्या बळावर उन्मत्त झालेल्या नूतन हिंदुधर्माच्या आचार्यांच्या महत्त्वाकांक्षी विजिगिषुतेपुढें सपशेल हार खाऊन बिचारा शेवटीं आपल्या जन्मभूमींत केवळ नामशेष होऊन गेला !

जैन धर्म अल्पसंख्याक उरला आणि बौद्ध धर्म केवळ नामशेष झाला, हा जो हृदयद्रावक परिणाम घडून आला, तो कांहीं एक दोन शतकांतच घडला, अशांतला प्रकार नाहीं. हे दोन्ही धर्म भरपूर दीड हजार वर्षें आपलें सत्कार्य करून, विशेषतः बौद्ध धर्म आपले शुभाशुभ परिणाम अद्यापि पूर्ण रूपानें मागें ठेवून बाहेर गेला आहे. परंतु वैदिक धर्माचा मात्र आतां मागमूसहि उरला नाहीं. इतकेंच नव्हे तर हल्लींच्या शैव आणि वैष्णव धर्मांतहि आमूलाग्र उत्क्रांति होऊन त्यांची वैदिक धर्माशीं फारकत झाली; आणि भारत देश आतां अगदींच एकेश्वरी हिंदु धर्माचें ऊर्फ भागवत धर्माचें आचरण करीत आहे. परंतु ह्या सुधारणेचें बहुतेक श्रेय बौद्धांनीं व जैनांनीं जी धर्मसुधारणेची भक्कम खंबीर पाचर मारली, हिंदुस्थानांतील धर्माचा इतिहास ढुंडाळून टाकला आणि आपल्या दीड हजार वर्षांच्या विरक्त, प्रेमी आणि परोपकारी प्रयत्नानें, नूतन आणि विशुद्ध भागवत धर्माची वाट खुली केली, ह्या गोष्टीकडेच आहे. असें असूनहि ही ऐतिहासिक उत्क्रान्ति आम्हां हिंदूंच्या डोळ्यांत भरावी तशी भरत नाहीं. त्याचें कारण आम्ही बौद्धांना व जैनांना अद्यापि परके, पाखांडी, नास्तिक म्हणून त्याज्य समजतों हेंच. आणि ते त्याज्य कां तर

प्रामाण्य बुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।

उपास्यानामनियम एष धर्मः सनातनः ।।

ही आमच्या हिंदु धर्माची टिळकासारख्यांनीं केलेली धेड गुजरी व्याख्या ! प्रचलित हिंदु धर्माची टिळकांनीं जी व्याख्या केली ती कांहीं खोटी नाहीं. पण ती दुष्ट आहे, इतकेंच नव्हे तर ती विष्णुपुराणाहूनहि प्राचीन काळापासून उघड माथ्यानें वहिवाटत आहे हें खालीं मान घालून कबूल करावें लागतें ! म्हणून बिचारे बौद्ध व जैन त्याज्य झाले.

## बौद्धांचा इतर भागवतांशीं संबंध

स्वतः बुद्धमुनि अनात्मवादी होता, निदान जीव, ईश्वर, ब्रह्म इ. आत्मवाद्यांचा मोक्षाशीं कांहीं संबंध नाहीं असें सांगत असे. त्यानें अशा अनेक वादांचें जें त्याच्या काळीं शुष्क बंड माजविण्यांत आलें होतें, त्याचा प्रसार आपल्या अनुयायांत माजूं दिला नाहीं, हें सर्व खरें आहे तरी त्याच्या मागून त्वरेनच त्याच्या अनुयायांत हा आत्मवाद कोणत्याना कोणत्या तरी रूपानें शिरलाच. पाली मार्गांतील जातक कथांच्या द्वारां बुद्धास देव मानण्यांत येऊन त्याचे अनेक अवतार कल्पण्यांत आले. बुद्धानें आपल्या मागें आपल्या अनुयायांचा कोणी शास्ता नेमला नव्हता. केवळ आपलें स्मरण आणि आपल्या शिकवणीचें अनुपालन तेवढेंच करण्याविषयीं त्यांनीं सांगितलें होतें, त्यामुळें बुद्धाच्या अनुस्मरणासाठीं मूर्ति आणि मंदिरें उद्भवलीं. पुढें क्रमप्राप्त महायानाचा विकास होऊन प्रत्यक्ष बुद्धालाच परब्रह्म प्राप्त झालें. तेव्हां बुद्ध, धर्म आणि संघ ह्या तीन तत्त्वांच्या पृथक् पृथक् तीन देव आणि त्यांच्या तीन मूर्तीहि बनल्या. अहिंसावाद, अवतारवाद, मूर्तिपूजा, मंदिरस्थापना, उपोसथ किंवा उपासनेचे दिवस, उपवासादि व्रतें, गुरुभक्ति, इतकेंच नव्हे तर रथयात्रेसारखे सार्वजनिक उत्सवाचे प्रकार आणि तीर्थ स्थळें वगैरे जीं लौकिक भागवत धर्माचीं अनेक उपांगें आतां सर्वमान्य होऊन बसलीं आहेत, तीं सर्व जैन व बौद्ध ह्या धर्मांतूनच प्रचलित हिंदु धर्मांत हळूहळू शिरलीं आहेत, यांत शंका नाहीं. तीं वेदांच्या संहिता काळांतहि नव्हतीं, इतकेंच नव्हे तर बुद्धापूर्वीच्या प्राचीन उपनिषत्काळांतहि नव्हती. महाभारतांत नारायणीय पर्वांत प्रथम अवतारवाद दिसतो, पण हें पर्व निखालस बुद्धानंतरचें आहे. भारतात मूर्ति आणि देवळें नाहीत. क्वचित् उल्लेख असले तरी ते बुद्धोत्तरकालीनच समजले पाहिजेत. विष्णुपुराणात स्वतः बुद्धालाच विष्णूचा अवतार बनविलें आहे. फार तर काय पण वेदान्ताचें निसरें व विष्णुभागवताचें मुख्य प्रस्थान म्हणून ज्या भगवद्गीतेची प्रसिद्धि आहे तिच्यांतील शिकवणीवरहि बुद्धाच्या मुख्य तत्त्वांचे कसे संस्कार झालेले आढळतात, यांचा उल्लेख पहिल्या व्याख्यानांत केला आहेच.

वरील विवेचनावरून विष्णु–भागवताच्या मतावरच नव्हे तर उपासना, भक्ति आणि आचारावरहि बौद्ध संप्रदायाचा कसा संस्कार घडला आहे किंबहुना बौद्ध सांप्रदायिक तपशिलांवरच वैष्णव सांप्रदायिक बहुतेक तपशिलांची उभारणी केली आहे, हें सूक्ष्म आणि निर्विकार दृष्टीनें पाहिल्यास दिसून येईल. इतकेंच नव्हे तर पुढें वैष्णव अथवा शैव सांप्रदायांत ज्या अनेक अनिष्ट गोष्टी शिरून त्यांची अवनति झाली, त्यांनाहि कांहीं अंशीं कारण बौद्ध महायान धर्माचें जें पुढें तांत्रिक धर्मांत रूपांतर झालें तेंच होय, हें पुढील व्याख्यानांत सांगण्यात येईल. बौद्ध महायानाशीं शैव मतांचा आणि उपासनांचा वैष्णवांच्याहूनहि अधिक निकट संबंध आहे. शैवमत बौद्धाहून अगोदरचें असल्यामुळें कदाचित् शैवांचाच महायान बौद्धांवर परिणाम झाला असणें अधिक संभवनीय

आहे. नेपाळ, बंगाल, ओरिसा प्रांतांत ह्या दोन्ही संप्रदायाची फारच भेसळ झालेली दिसते. इतकेंच नव्हे तर पुढें इ. स. १००० नंतर जो मच्छिंद्रानें नाथपंथ उभारिला तो तर ह्या भेसळीचाच एक उघड पुरावा होय. मच्छिंद्राचा तेजस्वी शिष्य गोरखनाथ हा तर स्वतः बौद्ध योगी होता. शाक्तांमध्यें जो वाम मार्ग अद्यापि गाजत आहे, त्याचा संबंध तिबेटांतून आलेल्या बोद्धांच्या वज्रयानाशीं विशेषतः त्यांच्या तंत्रमार्गाशीं आहे, हेंहि पुढील व्याख्यानावरून कळेल. तूर्त इतकेंच ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, जैन आणि बौद्ध धर्म हे " हिंदु " म्हणविणाऱ्यांना पूर्वीपासून कोणत्याहि कारणांनीं आणि कितीहि नकोसे झाले असले, तरी वैदिक धर्माच्या आर्य स्वरूपाला मागें टाकून हल्लीं गाजत असलेले शैव आणि वैष्णव संप्रदाय जे बहुजन समाजापुढें आहेत, त्यांचें प्रत्यक्ष नाहीं तरी पर्यायानें बरेंच श्रेय आणि कांहीं अंशीं अपश्रेयहि जैन बौद्धांकडेच आहे.

## विष्णु–भागवत

शिव–भागवत आणि बुद्ध–भागवत ह्यांच्यासंबंधीं जें ऐतिहासिक विवेचन वर केलें आहे त्यावरून विष्णु–भागवताच्या उत्पत्ती-विषयीं बराच मजकूर वर येऊन गेलाच आहे. कृष्णानें स्थापलेल्या धर्मसुधारणेला पूर्वी ' सात्वत धर्म ' एवढेंच नांव होतें. कृष्ण हा बुद्धाप्रमाणेंच वेदाला फारसे न मानणारा पण शिव देवतेला मानणारा एक भाग्यवान् मुत्सद्दी पुरुष होता. नीतिधर्मापेक्षां युक्तिधर्माविषयीं त्याची प्रसिद्धि जास्त आहे. भारतीय युद्धासारख्या अवनतीच्या काळांत त्यानें मोठीच राष्ट्रीय कामगिरी केली असणें अगदीं शक्य आहे. पण बुद्धासारखें जगदुद्धाराचें काम त्याच्या हातून झाल्याचा पुरावा नाहीं. तो आर्य होता, कीं सुमेरुवंशीय होता, कीं द्राविड होता, हे निश्चित कळण्यास मार्ग नाहीं. कृष्ण हें व्यक्तीचें नांव नाहीं. कृष्णायन ऊर्फ कण्हायन नांवाचें गोत्र होतें. नांवाप्रमाणें तें खरेंच काळें असल्यास ते आर्यवंशीय नसावें हें उघड आहे. कृष्ण म्हणून कोणी एक वैदिक ऋचा करणारा ऋषिहि होता. ८ व्या मंडळातील ७४ वें सूक्त त्यानें रचिलें आहे. तो आंगिरस म्हणजे ( घोर अभिचार करणाऱ्या कुळांतला ) होता. तो ब्रह्मज्ञानी, राजकारणी, अथर्ववेदी क्षत्रिय असावा, " तद्धैतद् घोरः आंगिरसः कृष्णाय देवकी-पुत्राय उक्त्वोवाच अपिपासः एव स बभूव " हें वाक्य छांदोग्य उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायाच्या १७ व्या खंडांतील ६ व्या श्लोकांत आहे. ह्यावरून घोर आंगिरसाचा एक शिष्य देवकीपुत्र कृष्ण होता, असें दिसतें. हा कृष्ण व वेदांतील ऋचा करणारा कृष्ण एकच असावा, असें कांहीं खात्रीनें सांगतां येत नाहीं. पण देवकीपुत्र कृष्ण यादव कुळांत जन्मला व त्यानें कांहीं एक नवीन गुप्त धर्म स्थापन केला. त्याचा प्रसार वृष्णि कुळांतील यादवांनीं प्रथम आपल्यापुरताच केला असे दिसतें. ज्या कृष्णानें हिंदुस्थाना-

नील धर्माच्या इतिहासांत ही सुधारणा केली त्याचें नांव वासुदेव असें असून तो देवकीचा मुलगा होता. तो स्वतः आर्य असो किंवा अनार्य असो, ती सुधारणा त्यानें आर्य लोक हिंदुस्थानांत आल्यावर केली; व ती बुद्धापूर्वी कांहीं शतकापूर्वी केली, हें इतिहाससिद्ध आहे; आणि तो कृष्ण शिवोपासक असल्यामुळें त्याचा एकान्तिक ऊर्फ एकेश्वरी धर्म शिव–भागवत धर्मच असण्याचा संभव आहे. बुद्धाच्या काळापूर्वी वासुदेव हीच एक उपास्य देवता झाली नसली, तरी निदान वासुदेव हा एक वंदनीय महापुरुष झाला होता, असें कांहीं पाली ग्रंथांतील उल्लेखांवरून दिसतें. तरी पण हा वासुदेव–कृष्ण विष्णूचा अवतार हें मत मात्र नारायणीय पर्वाचा महाभारतांत शिरकाव होईपर्यंत अस्तित्वांत नव्हतें. तें मत बुद्धानंतरचेंच नव्हे–अशोकाच्याहि नंतर जी शुंग नावाच्या ब्राह्मणी धर्माच्या कुळानें राज्याची व धर्माची क्रांति मगध देशांत केली तिच्यानंतरचें असावें, हें खाली सांगितलें आहे.

## वासुदेव आणि एकान्तिक धर्म

वरील माहितीवरून वासुदेव ह्या व्यक्तिविशिष्ट नांवाचा आणि कृष्ण ह्या आडनांवाचा क्षत्रिय कुळांतला, कोणी महापुरुष, गौतम बुद्धाप्रमाणेंच पण त्याच्या पुष्कळ पूर्वी एक मुत्सद्दी ( संत नव्हे ) एका नवीन धर्माचा संस्थापक होऊन गेला असें सिद्ध होतें. तो शैव होता. ह्यावरून शिवोपासना त्याच्याहि पूर्वीची ह्या देशांत होती असें मानणेंहि क्रमप्राप्तच आहे. त्याचा धर्म एकान्तिक ब्रह्मवादी अहिंसावादी, यज्ञयागादि बाह्य विधीला अजीबात थारा न देणारा, तरा पण वेदप्रामाण्याचें बंड न माजविणारा असा होता. जनक-भीष्मादि क्षत्रिय राजे, व्यावहारिक सहिता सपादक क्षत्रियच नव्हत, तर याज्ञवल्क्यादि उपनिषदें आणि स्मृत्या रचणारे ब्राह्मणहि ह्या नूतन धर्माचे अनुयायी होते. पुढें पुढें तर पुष्कर-संहिता, परम संहिता, सात्वत संहिता नावाची पांचरात्र ऊर्फ सात्वत दर्शनें लिहिणाऱ्या ब्राह्मणांनीं तर जवळ जवळ हा धर्म आपलासाच केला; इतकेंच नव्हे, ते आपले वर्चस्वहि स्थापूं लागले; आणि मूळ स्थापक आणि आदि प्रचारक कृष्ण, भीष्मादिकांच्या क्षत्रिय जातीला कमी मानूं लागले. पण ह्या ब्राह्मणकृत पांचरात्र संहिता भगवद्गीता-काळानंतरच्या असाव्यात; कारण ह्यांत वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, आणि अनिरुद्ध अशीं जीं मुख्य एकान्तिक देवतेचीं चार पृथक् रूपें ( व्यूह ) सांगितलीं आहेत त्यांचा भगवद्गीतेंत कोठेंच उल्लेख नाहीं. इतकेंच नव्हे तर भगवद्गीतेच्या काळापर्यंत क्षत्रियांचेंच वर्चस्व अबाधित असून तेच भूदेव, धर्मसंस्थापक आणि मोक्षदाते होते ह्या गोष्टीला गीतेच्या १८ व्या अध्यायांतील विभूति–संग्रहांतील " नराणां च नराधिपम् " ह्या उक्तीचा आधार तेलंगांनींहि दिला आहे. तथापि गीता–काळाच्या किंचित् पूर्व किंवा कदाचित् तिचेच काळीं अशोक मौर्याच्या नंतर ब्राह्मणी धर्माची जी प्रचंड लाट उस-

ळली आणि बौद्ध व जैन धर्मांवर तिचे प्रत्याघात पडूं लागले, त्या काळापासून सात्वत धर्म पूर्ण ब्राह्मणाच्या कवजांत आऊन त्याला केवळ सांप्रदायिक रूप प्राप्त झालें. इतकेंच नव्हे तर ज्या अशोकाच्या मौर्य कुळानें शिकंदराच्या परचक्राला न जुमानतां भरतखंडांत पहिलें आसेतुहिमाचल प्रचंड आणि वैभवशाली साम्राज्य उभारलें, त्याच कुळानें अकबराप्रमाणें तुलनात्मक धर्माचें नवें बंड उभें केलें, सर्व धर्मांना सारखें महत्त्व दिलें, आणि विशेषतः बौद्ध धर्माला आश्रय दिला; ह्या सर्व गोष्टी ब्राह्मण धर्माच्या पुरस्कर्त्यांना अर्थातच फार असह्य झाल्या; म्हणून त्यांनीं " नंदान्तं क्षत्रियकुलं " हें थोतांड उभें करून मौर्य कुळाची नालस्ती आरंभिली ,आणि अशोकाच्या तुलनात्मक धर्माची कामगिरी तर निःशेष गारद करून टाकली !

## अशोक आणि वैष्णव धर्म

प्रसिद्ध सम्राट् अशोक हा महान् बौद्ध भागवत होता हें खरें. त्यानें राजाश्रय दिला नसता तर बौद्ध धर्म सर्व आशिया खंडांतच नव्हे पण भरतखंडातहि जितका पसरला तितका पसरला नसता. ज्यानें प्रत्यक्ष आपल्या युवराज मुलाला आणि मुलीलाहि भिक्षूची दीक्षा देऊन त्यांना संचारासाठीं सिंहलद्वीपांत पाठविलें आणि ज्यानें सर्व आशिया खंडभर चहूंकडे बौद्ध प्रचारक पाठवले, त्याची बुद्धभक्ति काय वर्णावी ! पण ह्या भक्तीचा विपरीत परिणाम अशोकाच्या कुळालाच नव्हे तर हिंदुस्थानांतील बौद्ध धर्मालाहि भोगावा लागला हे ( इतिहास पुढें प्रांजळपणें ज्याला सांगेल तेव्हां सांगो ) दूर तरी एक कटु सत्य आहे येवढें खरें. अकबरानें सर्व धर्मांना विशेष हिंदु धर्माला जवळ केलें म्हणून पुढें त्याच्या मुलानातवांच्या वेळीं आणि विशेषत औरंगजेबाच्या वेळीं जसे हिंदूंचे हाल झाले, तसेंच किंबहुना जास्त मगध राजवटींत बौद्ध धर्माचे हाल झाले. कारण अशोकामागून जे राजे त्याचे गादीवर बसले ते अनत्याचारी, व कदाचित् दुर्बल निघाल्यामुळे पुष्यमित्र नांवाच्या एका सेनापतीनें त्याचें राज्य बळकावून मोठ्या जोरजबरीनें ब्राह्मण धर्माचा प्रचार चालविला. त्याच्या घराण्याचें नांव शुंग घराणें असे होतें. ह्यानें फार अनन्वित कृत्यें केलीं. विशेषतः त्यानें मौर्य घराण्यांतील व बौद्ध धर्माचा प्रसार करणाऱ्या इतर राजकुलांचा भयंकर उच्छेद माडिला. शुंग घराणें काण्व नांवाच्या ब्राह्मण मंत्र्यानें बुडवून त्याचें राज्य बळकाविलें. त्याचें घराणें फार अप्रिय झालें म्हणून त्याचें राज्यहि फार दिवस टिकणें अशक्य झालें. पुढें ह्या काण्व घराण्याचा कलिंगाच्या खारवेल नावाच्या महाप्रतापि शैव-जैन राजानें पराभव केला. शेवटीं दक्षिणेंत आंध्रभृत्यांचें साम्राज्य स्थापन झाल्यानें मगध साम्राज्याचा अस्त झाला. तथापि ह्या धामधुमींत वैष्णव धर्माचा बराच जम बसला हें खरें. महाभारताची सुधारून वाढविलेली आवृत्ति निघाली. अश्वलायन गृह्यसूत्रांत ज्याचा भारत ह्या नांवानें उल्लेख आहे, त्याचे पुढें महाभारत

होऊन त्याचीहि छपाइयानें हल्लींच्या प्रचंड महाभारतांत वाढ होऊं लागली, ती खास बौद्धांच्या व जैनांच्या उलट उठविलेल्या धामधुमीच्या काळीं झालेली असावी, असा पुष्कळ तिन्हाईत विद्वानांचा तर्क आहे. ही सर्व वाढ नुसती बौद्ध–जैनांच्याच नव्हे तर त्यांच्याहून जुनाट असलेल्या शैव धर्माच्याहि उलट होती. महाभारतांत शिवदेवतेचा पुष्कळ गौरव करण्यांत आला आहे. कदाचित् मूळ भारत नांवाचें महाभारतांत रूपान्तर शिव भागवतांनींच किंवा सात्वतांनीं केलें. श्वेताश्वतर–उपनिषद्कर्ते आणि पुढील पतंजलि भाष्यकार ह्या शिव भागवतांतलाच होता. पुढें मौर्य कुळाचा उच्छेद करून शुंग नांवाचें ब्राह्मणी साम्राज्य मगध देशांत सुरू झालें तेव्हां महाभारताच्या शैव स्वरूपांतून हल्लींच्या वैष्णव स्वरूपांत प्रचंड विस्तार झाला. पण शांतिपर्व, अनुशासन पर्व इत्यादि अवाढव्य नवीन पर्वांची भर पडून वासुदेव कृष्णाचेच नव्हे तर तो ज्याचा अवतार कल्पण्यांत आला, अशा काल्पनिक विष्णु देवाचेंहि नवीन देव्हारे पसरविण्यात आले. ह्या धामधुमींत बौद्धांच्या पाली वाङ्मयाला तोंड देण्यासाठीं महाभारताचीच नुसती वाढ नव्हे, तर कित्येक नवीन स्मृत्या व निरनिराळ्या सात्वत संहितेसारख्या सांप्रदायिक भागवत संहिताहि संस्कृतांत निर्माण झाल्या. मौर्य साम्राज्य आणि त्याचा बौद्ध धर्माला आश्रय अबाधित चालू राहिला असता तर वैष्णव संप्रदाय कदाचित् अस्तित्वांतहि आला असतां कीं नसतां ह्याची शंका आहे. ह्या साम्राज्यकर्त्यांनंतर कित्येक हिंदी राजवंशांतील कित्येक प्रसिद्ध पुरुषांनीं वैष्णव धर्म स्वीकारून मथुरेंतील व मध्य हिंदुस्थानांतील इतर देवळांना इमारती, जयस्तंभ वगैरे स्मारक देणग्या दिल्याचे ऐतिहासिक पुरावे आहेत.

## शैव, बौद्ध आणि वैष्णवांची परंपरा

हिंदुस्थानांतील भागवत धर्मांच्या विकासाचा किंवा इतिहासाचा प्रश्न किती गुतागुंतीचा आहे, ह्याविषयीं थोडीबहुत कल्पना वरील विवेचनावरून येण्यासारखी आहे. अत्यंत प्राचीन उपास्य दैवत म्हणजे शक्ति अथवा देवी. तिच्यानंतर शिव अथवा रुद्र-शिव हीं उपास्यें आर्य लोकांचा हिंदुस्थानांत शिरकाव होण्यापूर्वींच येथें होतीं. द्राविड ब्राह्मण व द्राविड क्षत्रिय सर्व हिंदुस्थानभर शिरतांना बलुचिस्थानांतहि होते. त्यांचीं दैवतें हींच होतीं. राम, कृष्ण, भीष्मादिकांचीहि हींच दैवतें होतीं. नंतर वासुदेवानीं वसुदेवांची उपासना टाकून एकांतिक धर्म संस्थापिला. देवकी पुत्र वासुदेवाला ह्या धर्माची दीक्षा घोर आंगिरस ह्यानें दिली. कृष्णानें आपल्या गुरूला जी दक्षिणा दिली ती छांदोग्य उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायाच्या १७ व्या खंडांतील ४ थ्या श्लोकांत अशी सांगितली आहे : "अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणा" ह्यावरून दान, तप, आर्जव (सरळपणा), अहिंसा, सत्य वचन हीं पाच सत्त्वें कृष्णाच्या भागवत धर्मांत होतीं. तीच पुढें जैनांच्या व बौद्धांच्या

भागवत धर्मांत उतरली. पण हीं नैतिक तत्त्वें वैदिक धर्माची नसून मूळ भागवत धर्माचीं होतीं हें ध्यानांत ठेवले पाहिजे. श्वेताश्वतर उपनिषदांत शिव हे एकांतिक उपास्य आणि हीं पांच लक्षणें अधिक रूढ झालेलीं दिसतात. मात्र हें उपनिषद ऊर्फ शिवगीता ही बौद्धांच्या बरीच नंतरची आहे ह्यामुळें बौद्ध धर्माचाहि परिणाम तिच्यावर झाला असावा. तिच्या काळापर्यंत ब्राह्मणावर क्षत्रियांचाच वरचष्मा होता. जनक, भीष्म, कृष्ण, राम, (दाशरथ), कृष्णद्वैपायन (व्यास), महावीर, सिद्धार्थ (बुद्ध), अशोक मौर्य वगैरे क्षत्रिय केवळ राज्यकर्तेच झाले नाहींत तर धर्मसंस्थापक आणि प्रवर्तकहि होते, म्हणून भगवद्गीतेच्या काळापर्यंत त्यांची " नाराणां (विभूति) नराधिप " अशी कीर्ति साक्ष देत आहे. परंतु जेव्हां जैनांनीं व बौद्धांनीं वेदांची परंपरा झुगारून दिली; इतकेच नव्हे तर वेदान्ताचें मुख्य तत्त्व जो ब्रह्मवाद तोहि टाकून नुसतें ब्रह्मचर्य म्हणजे प्रज्ञा, शील, समाधि इ. नैतिक तत्त्वें प्रत्यक्ष आचरणात आणण्याविषयीं आग्रह धरूं लागले; तेव्हां त्यांच्या उलट पुष्कळ ब्राह्मण आणि जुन्या मताचे क्षत्रियहि जाऊं लागले. इतकेच नव्हे, सम्राट अशोकांनी जेव्हा ह्या नैतिक भागवत धर्माला राजाश्रय दिला, तेव्हां त्यांच्या घराण्यालाच नव्हे तर सर्व जगांत वणव्याप्रमाणें पसरणाऱ्या बौद्ध धर्मालाहि आग लावणारे निखारे त्याच्या अन्तर्गतूनच बाहेर पडले. त्यांचा विरोध नुसता जैनांशीं व बौद्धांशींच नसून, शिव-भागवतांशीं व क्षत्रियांशीं देखील होता म्हणून मौर्यांचा उच्छेद करणारें जें शुंग, कण्वादिकांचें ब्राह्मणी राजकारण पुढें आलें, त्यामुळें पूर्वी जो वासुदेव—भागवतांचा धर्म होता, त्यांचा संस्थापक वासुदेव हा विष्णूचा अवतार होता असे अवतारमत पुढें ढकलण्यांत आलें. त्यामुळें प्रत्यक्ष वासुदेवहि मागें पडून विष्णूच पुढें आला. हा अवतारवाद श्वेताश्वतर उपनिषदांत नाहीं; किंबहुना मूळच्या भगवद्गीतेंतहि नव्हता. कारण हे दोन्ही ग्रंथ मुळीं साम्प्रदायिक ग्रंथच नव्हत. शैव (पाशुपत), वैष्णव (पांचरात्र) इ. सांप्रदायिक मतें ह्या अवतारवादामुळेंच निघालीं; ह्यामुळें भगवद्गीतेचेंहि पहिले वासुदेवप्रधान स्वरूप जाऊन विष्णु-प्रधान हें स्वरूप बनलें. आणि भगवद्गीतेंत वासुदेवाला विष्णूचा अवतार आणि परब्रह्म बनवून त्याच्या ऐतिहासिक स्वरूपाचा अगदीं लोप करण्यात आला. येणेंप्रमाणें प्रथम कृष्णानें स्थापलेला शिव-भागवत नंतर जैन व बौद्ध भागवत आणि नंतर ह्या सर्वांना तोंड देण्यासाठीं ब्राह्मणांच्या वर्चस्वाखालीं निघालेला विष्णु-भागवत असे ह्या भागवत धर्माच्या विकासाचे टप्पे स्पष्ट दिसत आहेत. आता शेवटीं भगवद्गीतेचें थोडक्यांत दिग्दर्शन करून हें लांबलेलें दुसरें व्याख्यान समाप्त करूं.

## भगवद्गीता

भागवत धर्माचें ऐतिहासिक अवलोकन करतां करतां आम्ही वेदान्ताचें शेवटचें प्रस्थान जी अतिशय पवित्र भगवद्गीता तिचे जवळ आलों. हें प्रस्थान भागवत धर्माचें केवळ केंद्रच होय. सर्व

हिंदुमात्रांनें हें आध्यात्मिक पाळीजच म्हटलें असतां अतिशयोक्ति मुळींच होत नाहीं. ह्या ग्रंथाच्या उपासना, विवेचनें, पारायणें, भाष्यें, भाषांतरें आणि गुणगौरव जितके झाले आहेत तितके हिंदूंच्या दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाचे झाले नाहींत. ह्या गौरवाच्या अनेक कारणांपैकीं एक कारण हें कीं, हा ग्रंथ हिंदूंच्या अनेक तत्त्वज्ञानांचा किंबहुना धार्मिक भावनांचाच नव्हे तर त्यांच्या धार्मिक इतिहासाचाहि एक अतिसंक्षिप्त निष्कर्ष आहे. इतकेंच नव्हे तर ह्या ग्रंथानंतर हिंदुस्थानांतील अनेक भिन्न भिन्न धर्मांचा जो पुढें विकास झाला त्याला हा चिमुकला आणि चटकदार काव्यमय ग्रंथच प्रत्यक्ष अथवा पर्यायानें कारणीभूत झाला आहे. हें सर्व अत्यंत श्रद्धापूर्वक मानूनच आम्ही पुढील टीकात्मक विवेचन करीत आहों.

ही गीता अगदीं संक्षिप्त असली तरी अगोदर हल्लींहूनहि अधिक संक्षिप्त असावी आणि तिच्यांत वेळोवेळीं मागाहून भर टाकण्यांत आली असावी, हें सूक्ष्मदर्शीयांना सहज दिसण्यासारखें आहे. बाराव्या अध्यायानंतर गीताकारांनीं ती संपवली असती, तरी गीतेंत कांहीं उणीव भासली असती, असें नाहीं. पण हिंदूंच्या अनेक ग्रंथांप्रमाणें प्रस्तुत गीतेचेहि अनेक कर्ते असावेत असें दिसतें व ते मूळ गीतेंत भर टाकणारे निरनिराळ्या मताचे व मतलबाचे लोक असावेत, त्यामुळें ह्या ग्रंथाला केवळ अवास्तव पुनरुक्तीचाच नव्हे तर परस्पर विसंगतपणाचाहि दोष कांहीं अंशीं जडला आहे. अनेक इतर तेजस्वी गुणांत हे दोष झाकल्यासारखे आहेत, पण टीकेच्या दृष्टीला ते ढळढळीत दिसतात. ज्ञान, भक्ति, कर्म आणि वैराग्य ह्या चारी मानसिक अवस्थांची ह्या काव्यांत जी भेसळ झाली आहे, ती अगदीं बेमालूम एकजीव झालेली नाहीं. त्यामुळें जरी पुष्कळदा पृथक् पृथक् अवस्थांच्या माणसांना ही गीता मोहनीसारखी मोहून टाकीत आहे, तरी ज्यांच्यामध्यें ह्यांपैकीं कोणतीच अवस्था असावी तितकी उत्कट झालेली नसते, अशा वाचकांना ही गीता म्हणजे एक भली थोरली भाडकुदळच गवसल्यासारखी होते. पहिल्या व्याख्यानांत सांगितल्याप्रमाणें प्रो. गार्बे ह्यांनीं ह्या गीतेंत निरनिराळ्या संप्रदायांचे सिद्धान्त आणि विश्वास ह्यांची निरनिराळ्या काळीं भर पडून हल्लीं उपलब्ध असलेलें हिचें स्वरूप किती संकीर्ण किंबहुना विसंगत झालें हें चांगलें दाखविलें आहे. थोडक्यात गार्बे यांचा गीतेंतील धर्माविषयीं निर्णय असा आहेः—मुळांत या भागांत धर्माचा वेदाशीं कांहीं संबंध नव्हता, कृष्ण अथवा वृष्णि कुळांतील यादवांमध्यें श्रीवासुदेवानें ह्याचा प्रथम प्रसार केला. पुढें कांहीं बौद्धांनी जसें बुद्धाला देवाप्रमाणेंच मानून त्यांनीं एक महायान पंथ स्थापला तसेंच कांहीं सोमवंशीय क्षत्रियांनीं ह्या वासुदेवाला भगवान बनवून कृष्णोपासक एकान्तिक ईश्वर-धर्म स्थापून त्याचें त्यांनीं एक मूळ गीतोपनिषद् रचलें असावें. ही गोष्ट बुद्धानंतर परंतु ख्रिस्तपूर्वीं अगदीं ढोबळ मानानें ३०० वर्षांच्या सुमारास झाली असावी. जैन आणि बौद्ध ह्या पूर्वेकडच्या सूर्यवंशी क्षत्रियांना जशीं सांख्य आणि योग दर्शनाचीं मतें पसंत होतीं, तशींच पश्चिमेकडील ह्या सोमवंशीय क्षत्रियांनाहि हींच मतें पसंत होतीं. वेदान्तदर्शनाला विशेषतः पुढें आद्य शंकराचार्यांचे

वेळीं जें शुद्ध अद्वितीय वादाचें स्वरूप प्राप्त झालें तें ह्या वेळीं रूढ झालें नसावें, आणि पूर्वमीमांसेचा तर सर्व क्षत्रियांना कंटाळा येऊन त्यांतील कर्मठपणाचा अभिमानी जो ब्राह्मणवर्ग त्याच्याशीं ह्या दोहोंकडच्या सूर्य आणि चंद्र वंशी क्षत्रियांचे खटके उडूं लागले असावेत. बुद्धोपासक, जिनोपासक, आणि कृष्णोपासक क्षत्रियांमध्येंहि आपसांत एकी होती असें मुळींच नव्हे. त्या प्रत्येकांचे इतिहास, पुराण आणि चरित्र-ग्रंथ ऊर्फ गीता अथवा जातकें अर्थात् निरनिराळे ग्रंथ चालले. ह्या भानगडीमुळें भारताप्रमाणेंच तदंगभूत मूळ भगवद्गीतेंतहि वेळोवेळीं सांप्रदायिक भर पडत चालली असावी. सांख्य योग, पूर्व-उत्तर मीमांसा, न्याय-वैशेषिक अशीं षड्दर्शनाचीं परस्पर संलग्न जोडपीं आहेत. गीतेंचे सांख्य-योगपर भाग आणि पूर्व-उत्तर मीमांसापर भाग कोणकोणते आहेत, हें गार्बे ह्यांनी अत्यंत परिश्रमानें तपशीलवार पृथक् करून दाखविले आहेत. त्यांच्या मतें गीतेच्या विस्ताराचा काळ इ. स. पूर्वीं २०० पासून नंतर २०० वर्षांपर्यंत आहे. ह्या विस्तारांत मूळच्या एकेश्वरी गीतेंत अगदीं शेवटीं शेवटीं ब्राह्मण वर्गानें आपलीं पूर्व आणि उत्तर मीमांसेचीं मतें घुसडलीं असें गार्बे म्हणतो. मला वाटतें अशोक मौर्याचें राज्य, त्याच्या मागें लवकरच पुष्यमित्र **शुंग** नावाच्या सेनापतीनें बळकावून जी ब्राह्मणी धर्माची धामधूम अखिल भरतखंडांत उठविली तिच्याच साहानें पुढें **कण्व** नांवाच्या ब्राह्मण मंत्र्यानें क्षत्रियांना कायमचें चित् केलें; बौद्ध, जैन आणि शैव भागवतांना प्रायश्चित्त लावलें; राम, कृष्ण इ. क्षत्रिय विभूतींच्या ऐतिहासिक स्वरूपाचा लोप करून त्यांचे नुसते पौराणिक देव्हारे माजविण्यासाठीं वेदांतील विष्णु ही अगदीं गौण देवता पुढें आणिली. क्षत्रियांच्या वर्चस्वालाच नव्हे तर सर्वसाधारण सनातन भागवत धर्मालाहि वैष्णव सांप्रदायाचें कायमचें ग्रहण लावून, पुढील युगांतील चिरस्थाई ब्राह्मणी वर्चस्वाची कायमची मेढ रोविली; वगैरे वगैरे ज्या क्रांतिकारक गोष्टी ख्रिस्ती शकापूर्वीच्या व नंतरच्या ह्याच एकदोन शतकांत घडल्या, त्याच आणिबाणीच्या काळांत वर गार्बेनें सिद्ध केल्याप्रमाणें मूळ गीतेला हल्लींचे संकीर्ण स्वरूप प्राप्त झालें असावें.

येथवर भागवत धर्माचा आमच्या देशांत निरनिराळ्या बाजूनें पाया कसा घालण्यात आला व तो कोणीं, केव्हां, कोणकोणत्या नावाखालीं घातला, हें सांगितलें. ह्यापुढील भाग ह्या धर्माच्या सांप्रदायिक प्रसाराचा फार मनोवेधक आहे. तो पुढील तिसऱ्या व्याख्यानांत सांगूं.

## राष्ट्रधर्म आणि सार्वत्रिक धर्म

मागील व्याख्यानांत भागवत धर्माचा निरनिराळ्या स्वरूपानें कसा पाया पडला ह्याची विस्तारानें परिस्फुटता केली. कोणत्याहि धर्माचा आरंभ होतो. तो एका विशिष्ट जातीच्या अगर मापेच्या राष्ट्रामध्यें स्थानिक स्वरूपानें प्रथम होतो. हिंदुस्थान देश तर अशा अनेकविध राष्ट्रांचा

एक प्रचंड समुदाय होय. गौतम बुद्धानें जरी आपला सुधारलेला धर्म मुळांतच सार्वत्रिक रूपानें जाहीर केला आणि ज्यानीं आपल्या सर्वस्वाचा त्याग केला होता अशा प्रतिभासंपन्न प्रचारकांना चारी बाजूंनीं दूरवर पाठविलें आणि स्वतः आपण सतत ५१ वर्षे प्रचार केला, तरी त्याच्या भिक्षुसंघाप्रमाणें परिभ्रमण करणारे त्याच्या काळीं इतरहि पुष्कळ भिक्षुसंघ होते; त्या सर्वांवर वरचढ होऊन हिंदुस्थानाबाहेरहि प्रसार होण्यासारखी अनुकूल परिस्थिति प्राप्त होण्याला आणखी दोन शतकें लागलीं. भरतखंडाचा पश्चिम एशिया आणि पलीकडे ईजिप्त आणि ग्रीस इ. संस्कृतींशीं परिचय झाला. तो प्रथम अलेक्झांडराच्या हिंदुस्थानावरील इ. स. सव्वातीनशें वर्षांपूर्वी झालेल्या स्वारीमुळेंच, असें जें समजण्यांत येतें ते बरोबर नाहीं. इराणांत त्याच्याहि पूर्वी २०० वर्षे सायरस आणि डायरियस वगैरे ऐश्वर्यवान् आर्य वीरांनीं बादशाही स्थापिली, सायरसनें बाबिलोनिया जिंकला, त्याचा मुलगा कँबेसिसनें ईजिप्तवर आणि पुढें डारियसनें हिंदुस्थानावर स्वाऱ्या करून नाईल नदीपासून तों सिंधू नदीच्या अलीकडेपर्यंत पर्शियाचें जगांतील जेव्हां पहिलें भाग्यशाली साम्राज्य स्थापिलें, तेव्हांच भरतखंडाचा पश्चिमेकडील संबंध जडला होता. अलेक्झांडरच्या टोळधाडीमुळें कायमचा अनिष्ट असा हिंदुस्थानावर कांहींच परिणाम घडला नाहीं. उलट त्यामुळें हिंदुस्थानांत जागृति होऊन पूर्वी कधीं नव्हतें असें ह्या देशांत एकछत्री साम्राज्य मात्र उदयास आलें. अलेक्झांडरची पाठ वळली न वळली तोंच पंजाबांत दबा धरून बसलेला आर्य छावा चंद्रगुप्त मौर्य आणि त्याचा पाताळयंत्री चाणक्यमंत्री ह्यांनीं उचल खाल्ली. त्यांनीं अस्ताव्यस्त पसरलेल्या आर्य वीरामध्यें नवीन दम भरून त्यांच्या साह्यानें, पाटलीपुत्र येथें धुंदींत लोळणाऱ्या नद राजाला गारद करून, मगध देशाचें राज्य कार्बीज केलें. विंध्याद्रीच्या उत्तरेकडे हिमालयापर्यंत आणि आसामपासून सिंधूच्याहि पलीकडे आपली निरंकुश सत्ता स्थापन केली. चंद्रगुप्ताची तलवार आणि चाणक्याची लेखणी ह्या अद्वितीय जोडीनें ह्या नवीन बादशाहीची उत्तम घडी बसविली. पुढें चंद्रगुप्ताचा प्रतापी व पुण्यशील नातू महात्मा अशोक इ. स. पूर्वी २६८ व्या वर्षी गादीवर बसला. त्यानें दक्षिणेंतहि आपली सत्ता वाढवून आपल्या वचक आसेतुहिमालयापर्यंत चिरतोड बसविला, आणि सर्व भरतखंडाला एकजीव बनविलें; इतकेंच नव्हे तर बाहेर पूर्वेकडे व पश्चिमेकडे दूरवर पसरलेल्या दरबारांतूनहि आपलें प्रत्यक्ष दळणवळण आणि वजन वाढविलें!

एवढी जय्यत तयारी झाल्यावर अशोकानें एकदम बौद्ध धर्माचा स्वीकार केला व त्याचा सर्व जगांत प्रसार करण्याच्या कामीं आपली सर्व बादशाही सत्ता व संपत्ति अगदीं श्रद्धापूर्वक अर्पण केली. बुद्धाचा शुद्ध स्वार्थत्यागी, आणि उदार धर्म व त्याच्या प्रसारार्थ सज्ज असलेली अशोकाची निस्सीम भक्ति आणि अतुल शक्ति हा योगायोग नुसत्या भारताच्याच नव्हे तर अखिल जगाच्या इतिहासांत अश्रुतपूर्व क्रांति करणारा झाला होता म्हणून नाहीं! स्वातंत्र्य, शांति आणि प्रगतीच्या ध्वजा खांद्यावर घेऊन धीरोदात्त बुद्धभिक्षु पूर्वेकडे चीन, जपान, कोरिया, उत्तरेकडे तिबेट आणि मध्य

आशिया, पश्चिमेकडे मेसापोटेमिया आणि ईजिप्त व दक्षिणेकडे सिंहलद्वीप इ. भागांत उतरले. मगध देशात चंद्रगुप्ताचे वेळींच स्वतः चंद्रगुप्त आणि चाणक्य ह्यांनी जैन धर्माचा स्वीकार केला होता. इतकेंच नव्हे तर म्हातारपणीं मुलावर राज्य सोपवून चंद्रगुप्त हा भद्रबाहू ह्या जैन संन्याशाबरोबर दक्षिणेंत धर्मप्रसारार्थ म्हैसूरजवळ श्रावण-बेळगोळा येथें आमरण राहिला अशी दंतकथा प्रसिद्ध आहे. ह्याप्रकारें मौर्य घराणें ही एक पुण्यकीर्ति राजर्षींची खाणच होती. भागवत धर्माचे जे निरनिराळे प्रकार पूर्वी राष्ट्रीय स्वरूपांत होते, त्यांना ह्या राजर्षींनीं अगदीं सार्वत्रिक स्वरूप दिलें व त्यांचा पाया स्वातंत्र्याच्या आणि लोकसत्तेच्या पायावर उभा करून आपण केवळ त्याचे नम्र सेवक बनले ! शेवटीं अशोकानें राज्यकारभाराची दगदग सोडून आपल्या आज्ञाप्रमाणें संन्यासदीक्षा घेतली. त्याचा सख्खा भाऊ, बहीण आणि मुलांनी तर हीच दीक्षा घेऊन ते सर्व स्वतः धर्मप्रसाराच्या कामाला लागले. सिंहलद्वीपांतील बौद्धमठ त्याचा भाऊ महेंद्र ह्याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

ह्याप्रकारें बुद्धधर्माचा व जैनधर्माचा आणि पुढें त्यांच्याच चाकोऱ्यांतून शैव आणि वैष्णवधर्माचा जो देशोदेशीं प्रसार झाला त्याचा शिरकाव निरक्षर आणि अज्ञ अशा बहुजनसमाजाच्या कानाकोपऱ्यांत कोणत्या बहुविध साधनांनीं झाला, त्याचा तपशील आतां पाहूं.

## मंदिरें आणि मूर्ति

प्राचीन आर्यामध्यें व द्राविडामध्यें वास्तुशास्त्राचा आणि शिल्पशास्त्राचा प्रचार बराच होता. ऋभु नांवाच्या ब्राह्मण रथकाराला तर वेदकाळीं अगदीं देवासारखा मान होता. त्यांनी इंद्रास पिवळ्या रंगाचे दोन घोडे करून दिले (ऋक्. १।७।३२). अश्विनीकुमारास एक हलकासा पृथ्वीभोंवतीं फिरणारा रथ करून दिला (ऋक्. मं. १ अ. १ सू. २०). ते मोठे कारागीर होते. " उध्यानानि, विमानानि, दिवौकसां। यंत्रदुर्गाणि बाप्यश्च कवचान्यायुधानिच। वाजी कर्माणिमांसि चित्राणि विविधानिच। मृदश्च हेमकुम्यादि धातूनां विक्रियाः क्रियाः॥ " ......(विश्वंभर वास्तुशास्त्र). ह्या प्रकरणीं बाळशास्त्री क्षीरसागर ह्यांनी ' विश्वब्रह्मणाचा इतिहास ' ह्या नांवाचा जो एक अतिशय परिश्रम करून विस्तृत ग्रंथ लिहिला आहे, तो फार वाचनीय आहे. रुद्रयामल, सूर्यसिद्धान्त, शिल्पमयमत, विश्वकर्म शिल्प, इ. ग्रंथांतून शिवाय पुष्कळ स्मृत्या, पुराणें व आगमांतून आणि तंत्रग्रंथांतून ह्या विषयाचें विस्तारपूर्वक विवेचन आहे. तथापि प्राचीन आर्यांना आणि प्रतिष्ठित द्राविडांना देवादिकांच्या बनावट मूर्ति करून पूजा करणें हें समत नव्हते, व उपासनेसाठीं त्यांची देवळेंहि नव्हतीं ही गोष्ट इतिहाससिद्ध आहे. आर्यांच्या उपासना आणि यज्ञयाग मोकळ्या मैदानांतून किंवा टेकडीच्या माथ्यावरून होत. द्राविडांचीं पूजास्थानें

म्हणजे झाडींमधून वर्तुलाकार अखंड दगड रोवून तयार केलेली शिला–मंडलें असत. अथर्व वेदामधून मूर्तींचा प्रयोग होत असे, तो पुष्कळसा नग्न अभिचार म्हणजे जादूगारीं होत असे. तो प्रतिष्ठित समाजांत निषिद्ध मानला जाई. तें कसेंहि असो; अशोकाच्या काळापूर्वी भरतखंडांत मोठमोठीं दगडी देवळें असल्याचा पुरावा नाहीं. इमारती व शिल्पकला होती. पण सर्व कामें लाकडाचीं व धातूचीं असत; दगडाचीं नसत. बहुतेक शहराची वस्ती नद्यांकांठीं असे. नद्यांचे प्रवाह वेळोवेळीं बदलत असल्यामुळें घरें उचलून दुसरीकडे न्यावीं लागत. अशोकानें साम्राज्य स्थापन केल्यावर त्याचें ऐश्वर्य वाढलें. पर्शियन बादशहाच्या धर्तीवर त्यानें पाटलीपुत्र येथें आपला दगडाचिरेचा भव्य वाडा बांधिला. तो इराणांतील सुसा एकबाटना येथल्या राजवाड्यापेक्षांहि अधिक भपकेदार होता, असें मेगास्थिनीसनें वर्णन केलें आहे. पुढें तर हा वाडा माणसांची कृति नसून दैवी प्राण्यांची सृष्टि होती, अशी लौकिक समजूत दंढ झालेली आढळते. भरहूत व सांची येथें जे अशोककालीन बौद्धांचे स्तूप, तोरणें, कठडे अद्यापि आहेत, त्याच्यावरील शिल्पकाम बऱ्याच परिणत अवस्थेला पोचलेलें असून तें सर्व एतद्देशीय आहे. विशेष इतकाच, अशीं कामें पूर्वी लाकडांत होत होतीं, तीं अशोकानें दगडांत करण्यास सुरुवात केली. सामग्री बदलली पण घाट पूर्वीचाच होता. लाकूड हा टिकाऊ पदार्थ नसल्यामुळें पूर्वीचीं कामें राहिलीं नाहींत, दगडी कामें मात्र अद्यापि टिकून आहेत. कांहीं कारागीर इराणांतून आणिले असले तरी मुख्य शिल्पकार व त्याची निर्मिति पूर्ण आणि निर्मळ एतद्देशीयच आहे, असा शेरा फर्ग्युसन आणि हॅवेल ह्या दोघांहि शिल्पज्ञांनीं दिला आहे.

## कुशान-काळ

पुढें मौर्यांचा अस्त होऊन, कुशान ह्या तुर्की राजकुलाचा उदय झाला. ह्यांची पेशावर आणि तक्षशिला येथें राजधानी होती. हे परकीय जातीचे होते तरी पण धर्मानें बौद्धच होते. तसेंच कंदाहार (गांधार) येथील ग्रीक राजांनींहि बौद्ध धर्मच स्वीकारला होता. ह्या सुमारास सर्व मध्य एशियाभर बौद्धाचा विस्तार होता. अशोकाच्या काळापर्यंत प्रत्यक्ष बुद्धाच्या मूर्ति बनवून त्याची पूजा करण्याची वहिवाट नव्हती. भव्य स्तूप आणि विहार होते, तरी त्यांतून अश्वत्थ वृक्ष, बुद्धाच्या पादुका वगैरे चिन्हांचीच पूजा होत असे. हत्ती, मोर, वानर, बोकड, बैल इ. प्राण्यांचीं सुंदर उठावदार चित्रें, यक्ष, गंधर्व, किन्नर इ. देवादिकांच्या मूर्तीदेखील बुद्ध गुरूची पूजा करीत आहेत, असें देखावे कोरलेले असत. पण पुढें कुशान आणि यवन ह्या परकीय लोकांनीं आपल्या पूर्वसंस्कारानुरूप बुद्धाच्याच सुंदर मूर्ति कोरण्यास सुरुवात केली. इतकेंच नव्हे तर देव म्हणून त्यांनीं त्याची पूजाहि चालविली. ह्यामुळें बौद्ध धर्माचें रूप विकृत झालें. कुशान सम्राट् कनिष्क ह्यानें एक

मोठी परिषद् भरविली. त्यांत बुद्धालाच परमेश्वर मानणाऱ्या पक्षाचा जय होऊन, बुद्धाच्या राजरोस मूर्ति करण्याला परवानगी मिळाली. ह्या पंथालाच महायान हें नाव पडलें. कंदाहारी घाट ग्रीस देशांतील कलेच्या वळणावर बांधेसूद व प्रमाणबद्ध असा होता. त्याचा छाप हिंदुस्थानांतील भावी शिल्पकलेवर व मूर्ति कलेवर पडला. पण ह्या बाबतींत तज्ज्ञ लोकांत मोठा वाद माजून राहिला आहे. फर्ग्युसन वगैरे ग्रीक (पाश्चात्त्य) पक्षाचें मत आहे कीं, हिंदुस्थानांत ही चित्रकला पश्चिमेकडून आली व ती अगदीं पूर्णतेला पोंचली नाहीं. उलट ई. बि. हॅवेल ह्या तज्ज्ञाचें मत आहे कीं, हिंदुस्थानांतील चित्रकला स्वतंत्र असून ती गुप्तांच्या काळीं पूर्णतेला गेली इतकेंच नव्हे तर तिच्यांतच कलेचा खरा प्राण आहे. प्रमाणबद्धपणा, नीटनेटकेपणा हीं केवळ कलेचीं शरीरें होत. प्रेरणा हीच तिचा प्राण होय. पाश्चात्त्यांची धाव शरीरापर्यंतच पोंचते. आत्मप्रतीति पौरस्त्यांनाच घडली आहे, वगैरे.

## गुप्तांचा काळ

पुढें कुशानाचा ऱ्हास होऊन सुमारें १०० वर्षें अराजक माजलें. शेवटीं चंद्रगुप्त ह्या नवीन राजानें इ. स. ३२० वें वर्षी पाटलीपुत्र येथील गादीचा जीर्णोद्धार केला. ह्या वेळेपर्यंत साम्राज्याचें ऐश्वर्य वायव्येस पेशावर येथें कुशानांच्या व दक्षिणेंत कृष्णेच्या काठीं धनकटक येथें शातवाहनांच्या राजवटींत होतें. मध्यंतरीच्या अराजकानंतर चंद्रगुप्तानें पुनः पूर्वीचें मागधी साम्राज्य स्थापिलें. हें घराणें धर्मानें वैष्णव होतें. तरी ह्या घराण्यानें बौद्ध धर्माचा छळ न करतां त्याला आश्रय दिला, त्याचा मानमरातब राखला. केव्हां केव्हां काहीं राजे बौद्धांना आपले खासगी गुरु करीत. तरी मुख्य राजधर्म वैष्णवच होता. ह्या घराण्यांत पुढें समुद्रगुप्त व विक्रमादित्य असे एकाहून एक प्रतापी व शहाणे राजे झाले. ह्यांचा काल हिंदुस्थानच्या इतिहासांतला सोन्याचा काल समजण्यांत येत आहे. भव्य देवळें, सुंदर मूर्ति, ह्यांचाच नव्हे तर संस्कृत भाषा, वाङ्मय, नाटकें इत्यादि साहित्याचाहि प्रसार ह्या काळांत फार झाला. कालिदास आणि नऊ कविरत्नें ह्याच वेळीं होतीं. महाभारत, रामायण, मनुस्मृति वगैरे ग्रंथांना हल्लींचें स्वरूप ह्याच काळीं प्राप्त झालें. एकंदरींत आतां ब्राह्मणी हिंदुधर्मानें बरीच उचल केली. बौद्ध धर्महि जोरांत होता, पण तो भांबून पोखरून जात होता. बौद्धांच्या संघामध्यें पूर्वीचा जोम राहिला नव्हता. राजाश्रयामुळें त्याला जे थोर सुखें तेंच त्याला घातक झालें. मौर्यांचा ऱ्हास झाल्यापासून बौद्ध संघांत ब्राह्मणाचाच बहुतेक शिरकाव होऊं लागला होता. नागार्जुन ह्या विद्वान् ब्राह्मणानें महायान पंथ काढला, तेव्हांच बौद्ध धर्माला ब्राह्मणी स्वरूप प्राप्त झालें. संस्था काय किंवा व्यक्ति काय, ती वाढीला लागते, तेव्हांच तिच्यांत विनाशाचीहि बीजें दिसतात. एकंदरींत महायान स्वरूपांत बौद्ध धर्म भोळ्याभोळ्या बहुजनसमाजाला

पूर्णपणें मोकळा झाला, हें खरें; पण त्याला भरीवपणा आऊन तो पोकळ होऊं लागला, हेंहि खरें. भर्ताबरोबर त्याच्यामध्यें भोळेपणा शिरून त्याच्या मागोमाग भामटेगिरी व ऐतखाऊपणाचाहि सुकाळ होऊं लागला. ब्राह्मण जात केव्हांहि चतुर आणि समंजस. "अशोकाच्यानंतर पैकीं बौद्धांचा संघ बहुतेक सर्व ब्राह्मणांनीच आक्रमिला होता; हल्लीं जसें ब्रिटिश सरकारचें राजयंत्र ओंतून ब्राह्मणांनीं व्यापिलें आहे, तसेंच महमदाटीचेंहि काळीं बौद्धांचे संघ ब्राह्मणमयच बनले होते." ( History of Aryan Rule ) पान १४८ इ. वि. हॅवेलचें असें जें म्हणणें आहे, ते " धूर्त चिटणिसापुढें काय कलेक्टर बापुडें " ह्या सत्यशोधकी म्हणण्याप्रमाणेंच मोठें मार्मिक आहे, यांत शंका नाहीं.

## हर्ष आणि चालुक्य

गुप्तांच्यानंतर उत्तरेकडे इ. स. ७ व्या शतकाचे आरंभी हर्षवर्धनाचें आणि दक्षिणेकडे चालुक्यांचें अशीं साम्राज्यें झालीं. हीं दोन्हीं घराणीं शैव होतीं, तरी बौद्ध धर्मांचा आश्रय त्यांनीं बंद केला नाहीं. तथापि प्रथम शैवांचा आणि मागाहून वैष्णवांचा हल्ला दक्षिणेकडे व प्रथम वैष्णवांचा आणि मागाहून शैवांचा हल्ला उत्तरेकडे होऊं लागल्यामुळे जैन व बौद्ध धर्मांचा पाय एकसारखा मागेंच पडूं लागला. ह्या झटापटींत कोणाचा कसा काय जय झाला, हें ठरविणें कठीण आहे. बौद्धांनीं वैदिक धर्माला हुसकावून लावलें, पण ब्राह्मणांनीं मंदिरें, मूर्ति, तंत्र, ध्यानें, उत्सव, पुराणें व तीर्थस्थळें इत्यादि बौद्धांच्याच सर्व साधनसामग्रीची हळूहळू आणि बेमालूमपणानें नक्कल करून त्यांचेंच सर्वस्व बळकावून त्यांना वाटेला लावलें; आणि अशा चातुर्यानें नवीन राजांच्या आश्रयाखालीं आपल्या शैव व वैष्णव संप्रदायाची उभारणी केली. "वैदिक देवतांना न मानणाऱ्या व त्यांची पूजा न करणाऱ्या लोकांची मनधरणी करण्यासाठीं नवीन दैवतकल्पनांना अनुसरून ब्राह्मणांना आपलें वाङ्मयच फिरवावें लागलें. जुन्या गोष्टींस नव्या कल्पनांना पटेल असलें काव्यमयरूप देण्याच्या भरांत ऐतिहासिक दृष्टि नष्ट झाली. ब्राह्मणांनीं यज्ञकार्याचें नेतृत्व टाकून देऊन लोकांच्या कल्पनांना काव्यमयरूप देण्याचें पतकरलें: त्यांच्या देवाचे जेव्हां त्यांनीं पोवाडे गाण्यास सुरुवात केली, तेव्हांच त्यांना आपलें वर्चस्व राखतां आलें." ( ज्ञानकोश विभाग ४ पान १८८) इंद्र, चंद्र, सूर्य, वरुण इ. वैदिक देवांच्या आराधना बंद पडून त्यांच्या जागीं शिव, विष्णु, देवी, गणपति इ. लौकिक देवतांचे देव्हारे पसरून त्यांचीं पुराणें ब्राह्मणांना रचावीं लागलीं. वेदमंत्र व यज्ञयाग मागें पडून तान्त्रिक मूर्तिपूजा माजली. गोमांस खाणारे व सोमरस पिणारे ब्राह्मण आतां कांदे-लसणासहि शिवेनातसे झाले. महायान बौद्धांचा धर्मपाल तोच शैव हिंदूचा नटराजा, प्रज्ञापारमिता ती सरस्वती, मंजुश्री ती शीतला, वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे वैष्णवांचे चार व्यूह ते बौद्धांचे

ध्यानीबुद्ध वगैरे वगैरे देवाणघेवाण होऊन, शैव, बौद्ध आणि वैष्णवांच्या उपास्य दैवतांची परस्पर सारखी सरमिसळ झालेली होती. ह्या दगलींत कोण जिंकला व कोण हरला हे ठरविणारानें कसें ठरवावें ? जो आपलें रूप अधिक वेळां व अधिक लवकर पालटील, जनमनाचें अधिक रंजन करील, वेळोवेळीं बदलणाऱ्या राजसत्तेचा रंग ओळखून उगवत्या सूर्याची उपासना नेहमीं करीत राहील, त्याला जय हा ठेवल्यासारखाच असतो ! पण असल्या जयाचा धर्मांच्या शुद्ध स्वरूपाशीं आणि त्याच्या खऱ्या विकासाशीं कसा संबंध पोंचतो, हे शोधून काढून त्याचा खरा अर्थ करणें, इतिहासकारांना फार जड जातें.

## मंत्र आणि तंत्र

वैदिक ऊर्फ ब्राह्मण धर्माची आणि शैव, शाक्त, बौद्ध, जैन, वैष्णव आणि इतर वेदबाह्य ऊर्फ भागवत धर्मांची झटापट सुमारें २००० वर्षांपूर्वी भरतखंडांत कशी लागली, हे वर सांगितलें. [बौद्ध व जैनांप्रमाणेंच शैव व वैष्णवादिक संप्रदायांना मी वेदबाह्य म्हणत आहें, ह्याचें बऱ्याच तज्ज्ञांनाहि आश्चर्य वाटेल. वैदिक धर्माला मी ब्राह्मण धर्म म्हणत आहे, ह्यासंबंधीं कांहींजण आक्षेप घेतील, पण विचार व शोधाअंतीं माझे म्हणण्याची सत्यता सहज पटण्यासारखी आहे. जेव्हां वैदिक धर्माला केवळ पोकळ कर्मठपणाचें स्वरूप आलें, यज्ञयाग करणें कांहीं विशिष्ट वृत्तींच्या माणसांचा धंदा झाला व त्यांची एक जात अथवा जूट (Guild) बनूं लागली, तेव्हांच ह्या पोकळ कर्ममार्गाच्या उलट विरक्त ज्ञानमार्गाची उठावणी झाली. कर्ममार्गी ब्राह्मण आणि ज्ञानमार्गी क्षत्रिय अशा दोन जुटी किंवा जाती उपनिषद् काळीं आर्य लोकांमध्यें निर्माण झाल्या, आणि जे आर्य ह्या धर्मांच्या अगर परमार्थाच्या भानगडींत न पडतां आपली शेती, गुरेंढोरें, धंदा वगैरे ऐहिक व्यवहारातच तृप्त राहून दिवस काढीत, त्यांची गणना वैश्य अथवा आर्यांचा बहुजनसमाज ह्या नावाखालीं होऊं लागली. ह्या तीन जुटींचे तीन भिन्न वर्ण मानले जाऊन त्यांचें प्रथम त्रैवर्ण्य बनलें. पुढें बऱ्याच काळानें ज्या आर्येतरांनीं आर्यांच्या धार्मिक चालीरीति आणि आश्रय स्वीकारिला त्यांचा एक निराळा हीन वर्ण 'शूद्र' या नांवानें मानण्यांत आला. उपनिषद्काळांत चातुर्वर्ण्य नव्हतें, किंबहुना त्रैवर्ण्याचेंहि बंड पुढच्या काळांत उद्भवलें असावें. भगवद्गीतेंतील 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्' ह्या वाक्यावरून हें बंड त्या काळींच माजलें होतें असें दिसतें, म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय ह्या दोनच वर्णांचा शिरजोरपणा चालून शूद्रांना व आर्य वैश्यांनाच नव्हे तर ब्राह्मण क्षत्रियांच्या स्त्रियांना देखील धर्माच्या दृष्टीनें हीन लेखण्यांत येत होतें, असें दिसतें. एरव्हीं गीतेंतल्या सुधारक धर्मानें 'तेऽपि यान्ति परां गतिम्' अशी थोरवी गाइली नसती. तात्पर्य इतकेंच, आर्यांचें कर्मकांड आणि कांहीं अंशीं क्षत्रियांनीं उभें केलेलें ज्ञानकांडहि ब्राह्मण

म्हणविणाऱ्यांनीं आपलेंसें केल्यावर क्षत्रियांनी, विशेषतः मथुरेकडचे सात्वतपुत्र ऊर्फ कृष्णायन, कपिलवस्तूचे शाक्यपुत्र ऊर्फ बौद्ध, वैशालीचे नायपुत्र ऊर्फ जैन (लाट) ह्यांनीं आपला भक्तिमार्ग ऊर्फ भागवत धर्म वैदिक धर्माचें वंडाला तोड देण्याकरितां निरनिराळ्या ठिकाणीं आणि वेळीं संस्थापिला. ह्यांपैकीं सात्वत अथवा भागवत धर्म हा मुळांत श्वेताश्वतरोपनिषदाचे काळापर्यंत शैव आणि शाक्त मतवादी होता; तो पुढें गीतेच्या उत्तर काळीं वैष्णव संप्रदायी बनला. शैव-वैष्णव आणि बौद्ध-जैन व इतर लहानसान संप्रदाय पूर्वीसारखेच वेदबाह्य होते. निदान ते सर्व ब्राह्मणांना व कांहीं जुन्या मतांच्या क्षत्रियांना सारखेच तिरस्करणीय वाटत होते; कारण काय तर त्यांचा वेदांशीं संबंध नव्हता. ह्या सर्वांना भागवत हें सामान्य नांव होतें. गुरुपूजा आणि ह्या गुरूंची अथवा देवादिकांची मूर्ति, देवळें वगैरे पार्थिव साधनांच्या द्वारा भक्ति करण्याचा प्रघात शैवमतांत होता. त्यांच्या संसर्गानें प्रथम बौद्ध-जैनांमध्यें आणि नंतर त्यांच्या द्वारा वैष्णव संप्रदायांत हा प्रघात फारच बोकाळला. ही गुरुपूजा अथवा देवादिकांची पार्थिव पूजा आर्यांच्या अस्सल वैदिक धर्माला प्रथम मुळींच पसंत नव्हती. पण अस्सल आर्यवैदिक धर्म प्रथम बाहेरून आलेल्या मूठभर परकीयांचा होता. येथें भरतखंडांत असणाऱ्या सुसंस्कृत अथवा असंस्कृत आर्येतरांमध्यें यथावाईट तऱ्हेची ही गुरुभक्ति ऊर्फ श्रमणपूजा (Shramanism) पुरातन काळापासून चालत आलेली आहे. ह्या प्राकृत आर्येतरांच्या प्रागैतिहासिक धर्माची सुधारणा ज्या धर्मानें ऐतिहासिक काळात केली, त्यालाच मीं ह्या व्याख्यानांत '**भागवत**' हें नांव दिलें आहे. ह्या धर्माचा मूळ संस्थापक जरी वासुदेव कृष्ण होता असें अंधुक पुरावे सापडतात तरी खरे आणि उज्ज्वल संस्थापक भगवान् गौतम बुद्ध आणि महावीर वर्धमान जिन हेच होते, असा भरभक्कम ऐतिहासिक पुरावा आहे.

## मांत्रिकांची दुकानदारी

शैव-शाक्त-वैष्णव, बौद्ध-जैन, वगैरे कोणत्याहि नांवानें, ज्या सुसंस्कृत भागवत धर्माची उभारणी बौद्धकाळानंतर झाली, त्याला वैदिक ऊर्फ मांत्रिक धर्माचा आणि त्याच्या कर्मठपणाचा पूर्ण कंटाळा आला होता. हा मांत्रिक धर्म म्हणजे कांहीं ब्राह्मण-क्षत्रियांची केवळ दुकानदारीच झाली होती. अशा धंदेवाईक ब्राह्मणांनीं व त्यांच्या धार्मिक आश्रयाला राहिलेल्या ऊर्फ ब्राह्मणाळलेल्या त्रैवर्णिकांनीं ह्या निरनिराळ्या भागवत संप्रदायांना वेदबाह्य मानावें, ह्यांत आश्चर्य नाहीं. सात्वत, पाञ्चरात्र, पाशुपत, कापालिक, स्मार्त, भागवत, वगैरे संप्रदाय आणि त्यांनीं उभे केलेले विशिष्ट देव आणि गुरु, ह्यांना ह्या शिरजोर वैदिक ब्राह्मणांनीं सारखेच निषिद्ध ठरविलें. पण जेव्हां विस्तृत भरतखंडांत ह्या नवीन मतांचाच कल्पनेबाहेर फैलाव होऊं लागला, तेव्हां वरील वैदिक ब्राह्मणांनीं आपली

दुकानदारी नीट चालत नाही हे पाहून आपली पगडी आधीं फिरविली. त्यांनीं ह्या नवीन भागवतांपैकीं शैव–शाक्त–वैष्णवांच्या गुरुंचाच नव्हे तर त्यांच्या दैवताचा व त्यांच्या पार्थिव पूजेच्या साधनांचाहि स्वीकार सढळ हातानें करण्याचा डाव आरंभिला. ह्या डावालाच तंत्र हें धेडगुजरी नांव आहे. जें मंत्र नव्हे तेंच तंत्र, ह्यापेक्षां ह्या नवीन उपस्थित केलेल्या तंत्रबंडाची व्याख्या करणें तूर्त तरी फारसें जरूर नाही. मंत्र म्हणजे वैदिक जादु आणि तंत्र म्हणजे भागवत जादु ह्यापेक्षां ह्या नवीन तंत्रवादाची जास्त मीमांसा करण्यास तूर्त अवकाश नाहीं. ही भागवत तंत्रविद्या वैदिक मंत्रविद्येपेक्षांहि फार जुनाट आहे. हिलाच अथर्व अथवा आंगिरस अभिचार असेंहि नांव देतां येईल. वैदिक ब्राह्मण ह्या अनार्य विद्येच्या तांत्रिक भागवत धर्मांत शिरले. बंडानेंच बंड मारण्याची पूर्वापार युक्ति ब्राह्मणानीं लढविल्यामुळें जरी अस्सल वैदिक धर्मांचा जीर्णोद्धार होणें शक्य नव्हतें, तरी ब्राह्मणांच्या दुकानदारीचा जीर्णोद्धार पूर्णपणें होऊन श्रमणांच्या दुकानदारीला चांगलाच पायबंद बसूं लागला ह्यांत कांहीं शंका नाहीं !

## मूर्तिकार ब्राह्मणच !

विश्वकर्मा ऊर्फ विश्वब्राह्मण नांवाचा एक ब्राह्मणवर्ग पूर्वीपासूनच वैदिक काळात शिल्पकाराची वृत्ति संभाळून आपलें पोट भरीत होता. शांततेच्या काळीं यज्ञयागांत लागणारीं पात्रें व इतर उपकरणें करण्याचे कामांत व लढाईचे काळांत जादूचे रथ, विमानें, कळसूत्री घोडे आणि इतर स्वयंवाहनें (Motors व Automobiles) करण्यात ही शिल्पज्ञ जादुगार ब्राह्मण मंडळी फार पटाईत होती. ह्या शिल्पशास्त्राच्या उपदेशकांत पुढें वासुदेव आणि अनिरुद्ध ह्या क्षत्रियांचींहि नावें आढळतात! " भृगुरत्रिर्वसिष्ठश्च विश्वकर्मामयस्तथा। नारदो नग्नजिच्चैव विशालाक्षः पुरंदरः ॥ ब्रह्मा कुमारो नंदीशः शौनको गर्ग एव च। वासुदेवोऽनिरुद्धश्च तथा शुक्रबृहस्पतिः॥ अष्टादशैते विख्याताः शिल्पशास्त्रोपदेशकाः।" (मत्स्यपुराण सं. १ पृ. ५१). ह्या मूर्तिकार ब्राह्मणांनाच स्थपति आणि पांचाल अशीं नावें होतीं. इतर सामान्य शिल्पकारांनीं केलेल्या मूर्तींची पूजा करणें पाप समजलें जात असे. " तेषामेव स्थपत्याख्यो विश्वकर्मेति मन्त्रतः। गर्भविनादि कर्म कर्तुं न शक्यते ॥ तस्मादेते सदा पूज्या स्थपत्यादि च पञ्चकम्। एभिः स्थपत्यादिभिस्त्वलोके विना गृहीतु मुक्तं न शक्यते ॥" (शिल्प-मय मत अध्याय ५.) त्यातल्या त्यात ह्या पांचाल ब्राह्मणांनीं सोन्याच्या मूर्ति करण्याचें थोड्या श्रमाचें व अधिक फायद्याचें कसब आपल्याकडे ठेवून बाकी दगडविटा–पाषाणाचीं कामें इतरांना दिलीं ! अग्निपुराण अध्याय ८ आणि स्कंदपुराण काशीखंड अध्याय ८६ ह्यांत देवादिकांच्या मूर्ति करायाच्या त्या पांचाल ब्राह्मणांकडूनच केल्या असतां सात जन्माचीं पापें नाश पावतात, असें सांगितलें आहे. अशा धोरणांनीच भागवत धर्माचा प्रसार बहुजनसमाजांत करणें शक्य झालें. पण अखेरीस त्या धर्मांत हीनदर्जाचा प्रवेश झाला, हें निराळें सांगणें नकोच.

## तांत्रिक वाममार्ग

धर्माला पार्थिव रुप देऊनच ह्या भागवत तंत्राची मजल थांबली नाही. वेदमंत्रांप्रमाणेंच भागवतांचेहि कांहीं गूढ मंत्र होते. शैव-वैष्णवांप्रमाणें ते महायान बौद्ध पंथांतहि होते. सर्व भागवतांमध्यें मूर्तीप्रमाणें किंबहुना मूर्तीहूनहि जास्त गुरुपूजेचें मोठें बंड माजलें. हे गुरु पुढें अज्ञाणी, आळशी आणि शिरजोर झाल्यामुळें त्यांनाच त्यांच्या मंत्रांचा अर्थ कळेनासा झाला. म्हणून ह्या महायानाचें पर्यवसान मंत्रयानांत झालें. पुढें मंत्रयानाचें पर्यवसान बीभत्स वज्रयानांत झालें. अशा अधोगतीमुळें बौद्धांतच नव्हे तर पुढें शैवांत शाक्तमार्गी आणि वैष्णवांत राधावल्लभमार्गी अनेक अनिर्वचनीय कुनीतींचा प्रचार माजला. स्थलाभावामुळें त्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं, व तें इष्टहि नाहीं. खेदाची गोष्ट ही की, अशा अनेक अष्टाकाराच्या आचार्यपणाचा मक्ता निरनिराळ्या प्रांतीं व काळीं, अगदीं आतांपर्यंत, वरून संभावितपणाची शाल पांघरणाऱ्या ब्राह्मणांनीं आपल्याकडेच ठेविला आहे !

## वेदोक्त आणि पुराणोक्त

वेदोक्त पूजेचा अधिकार पूर्वी आर्यत्रैवर्णिकांनाच होता. परंतु अशोक सम्राटानें वेदोक्ताच्या अधिकाराचें मूळच उखडून टाकणाऱ्या बौद्ध जैनांना आश्रय दिला, म्हणून त्याच्यावर ब्राह्मण आणि त्याच्या ओंजळीनें पाणी पिणारे बरेच क्षत्रियहि चवताळले, आणि त्यांच्या रागाचें पर्यवसान 'नंदान्तं क्षत्रियकुलम्' म्हणजे कलियुगांत नंद घराण्याच्या मागून जगांत क्षत्रिय उरले नाहीत, ह्या धाडांतात झालें, हें मागें वर्णिलें आहेच. पुढेंपुढें वेदोक्ताचा अधिकार केवळ ब्राह्मणासच आहे आणि ब्राह्मणाशिवाय इतर सर्व हिंदु शूद्रच' हा समज दृढ होऊं लागला. सर्वसाधारण ब्राह्मणवर्गालाहि संस्कृत समजेनासें झालें, मग वेदाची जुनी भाषा पंडितांनाहि समजेना, यांत काय नवल ? इकडे बौद्ध-जैनादि वेदबाह्यांनीं तर आपला प्रचंड ग्रंथसमूह, पाली आणि प्राकृत भाषेंत पसरल्यामुळें बहुजन-समुदायांत त्यांचेंच प्रस्थ वाढलें. क्षत्रिय किंवा इतर राज्यकर्त्यावर्गांना आपसांतील तंटे मिटविण्याला, आणि परकीयांच्या स्वाऱ्या हटविण्यालाच वेळ मिळेना, मग धर्मासारख्या परमार्थाला कोण विचारतो. कुशान, शक, यवन, गुर्जर, पल्लव, अहिर, हूण इ. अनेक परकीय वंशांचे राज्यकर्त्यांनीं तर भरतवर्षांत उत्तरेकडे व दक्षिणेकडे कायमचेंच ठाणें दिलें. चेर, चोल, पाड्य, आंध्र, गोरख (गुरखे), नायर इत्यादि अनेक एतद्देशीय आर्येतर क्षत्रियांनीं उचल खाऊन एकामागून एकांनीं आपापलीं लहानमोठीं साम्राज्येंहि स्थापिलीं. अशा राज्यक्रांतीमुळें वरचेवर धर्मक्रांत्या होऊन आज बौद्ध तर उद्यां शैव, परवां जैन तर तेरवां वैष्णव, अशा धर्मक्रांतींचे हेलकावे भागवत धर्महि खाऊं लागला.

बौद्धांनीं व जैनांनीं रचलेल्या धर्मशास्त्रांना, स्मृत्यांना, मंत्रप्रकरणांना आणि पुराणांना तोंड देण्यासाठीं ब्राह्मणांनीं हल्लींच्या पुराणांचें अठरा धान्याचें कडबोळें रचिलें. तें विशेषतः संस्कृत भाषेंतच रचण्यांत त्यांनीं फारच दूरदृष्टि दाखविली. ह्या संस्कृताचा जीर्णोद्धार पुष्यमित्र शुंगाच्या काळापासून तों तहत् स्थानेश्वरच्या हर्षवर्धनाच्या किंबहुना धारच्या भोज परमाराच्या काळापर्यंत सारखा चालला होता. त्यामुळें बौद्ध आणि जैन धर्म चीत झाले, इतकेंच नव्हे तर पाली व प्राकृत भाषाहि मृतप्राय होऊन संस्कृतला मात्र नवें नकली तारुण्य प्राप्त झालें.

## पुराणांचा विपर्यास

पुराणांचा काल खरें पाहतांना वेदांच्याहि पूर्वींचा आहे. अव्वल पुराणग्रंथांतून अति प्राचीन काळच्या दंतकथा एकत्र केलेल्या असाव्यात. वेदांप्रमाणेंच द्वैपायनव्यासांनीं पुराणांचीहि संहिता जमविली असे प्रसिद्ध आहे. पण हीं मूळ पुराणें हल्लीं उपलब्ध नाहींत व पुढें होण्याचीं आशाहि नाही. हीं पुराणें क्षत्रियांनीं आपली देवादिकांचीं आणि सर्व जगताची पूर्व-पीठिका ठरविण्यासाठीं रचिली होती. ह्या प्रकरणीं कलकत्त्याचे माजी हायकोर्ट जज्ज पार्जिटर ह्यांनीं ' Ancient Indian Historical Tradition ' नांवाचा जो ग्रंथ अलीकडेच प्रसिद्ध केला आहे तो विनमोल आहे! जेव्हां क्षत्रिय दुर्बल आणि ब्राह्मण सबळ झाले अशा काळीं बौद्ध आणि जैन संप्रदायांना हाणून पाडण्यासाठीं शैव-शाक्त वैष्णव मतवादी ब्राह्मणांनीं वरील मूळ क्षत्रियकृत पुराणाच्या आपल्या दृष्टीनें सुधारून व छाटाछाट करून विस्तारपूर्वक नवीन आवृत्त्या काढण्यास सुरुवात केली. मुख्य पुराणें अठराहून जास्त आणि उपपुराणें तर असंख्यच आहेत व अद्यापि नवीन निर्माण होत आहेत. हरतालिका आणि सत्यनारायणाची पोथी अशा अगदीं अलीकडच्या उप-पुराणांना तर हल्लीं चातुर्मास्यात दरसाल वेदान्तसूत्रें आणि भगवद्गीता यांच्यापेक्षाहि अधिक भाव येत असतो.

जीं हीं पुराणें प्राचीन युगांत जगताच्या उत्पत्तिशास्त्रासाठीं रचलीं व गायलीं जात असत, तीं ह्या मध्ययुगात सांप्रदायिकांनीं परस्परांच्या उलट उखाळ्यापाखाळ्या काढण्याचीं लौकिक साधनें केलीं. हल्लीं मोहरमांत जसे कलगीवाले व तुरेवाले शाहीर आपल्या कवनाच्याद्वारें लढत खेळतात, तसे हे पुराणकर्ते एकमेकांच्या देवांना व गुरुंना उघड उघड शिव्या देऊन आपला संप्रदाय वाढवूं लागले. हल्लींच्या २०२५ वर्षांच्या गणपति-उत्सवांतील मेळ्यांचीं पदें जर कोणी चतुर संपादकानें एकत्र करून प्रसिद्ध केलीं तर तें एक सुंदर (!) गणपतिपुराणच होईल. असो. हीं मध्ययुगीन पुराणें लवकरच इतकीं लोकप्रिय झालीं कीं, घंटाळवाणी आणि किळसवाणी वेदोक्तपूजा मागें पडून ह्या पुराणांत सांगितलेल्या बहुरंगी तांत्रिक पूजाच सर्वमान्य झाल्या. केवळ

युद्धासाठीं आणि लौकिक देवाच्या वडेजावासाठीं रचलेल्या जाळ्यांत शूद्रांप्रमाणेंच ब्राह्मणांचेहि गळे गुरफटले. कांहीं थोड्या नैमित्तिक गृह्यसंस्कारादिवाय वेदमंत्रांची आठवण ब्राह्मणांनाहि होईना, मग इतरांची गोष्ट दूरच राहिली. पापमूलक जादूचा डाव मरणाराला सोडून मारणारावरच उलटतो. त्या न्यायानें ह्या पुराणरूपी विषारी पेयांत हिंदु सांप्रदायिकच गडप झाले आहेत; बौद्ध हिंदुस्थानाबाहेर आणि जैन हिंदुस्थानातच ह्या पेयापासून दूर सुरक्षित आहेत! वेदोक्ताचा आणि पुराणिकांचा खरा ऐतिहासिक अर्थ आणि सांप्रदायिक पेच न कळल्यामुळें कांहीं ब्राह्मणेतर मात्र ह्या शुष्क वादाचें भूस अलीकडे विनाकारण कांडीत बसले आहेत!

## पुराणिक आणि हरिदास

हीं पुराणें संस्कृतांत असल्यामुळे, हीं वाचून दाखविण्यासाठीं राजवाड्यांतून, झोपड्यांतून आणि रस्त्याच्या चव्हाट्यावर धंदेवाईक ब्राह्मणांची अद्यापि जरुरी आहे. ज्या पाटावर बसून हे पुराणिक पुराण सांगतात, त्याला व्यासपीठ म्हणतात. काशीप्रयागाकडे रस्तोरस्तीं अशा सार्वजनिक व्यासपीठांचे खुंट कायमचे उभे आहेत. त्यावर जे ब्राह्मण आल्या-गेलेल्या श्रोत्यांची वाट पाहात बसलेले असतात, त्यांना व्यास अशी बहुमानाची संज्ञा अद्यापि आहे. पूर्वी राजवाड्यांतून जे पुराणिक असत, ते वसिष्ठाप्रमाणें तपस्वी आणि चाणक्याप्रमाणें क्रांतिकारक मुत्सद्दीहि असत. ज्ञानसंबंदर ह्यानें मदुरेच्या पांड्य राजास बौद्ध धर्मांतून शैव धर्मांत आणि रामानुजाचार्यांनी म्हैसूरच्या विट्टीवर्धनाला जैन धर्मांतून वैष्णव धर्मांत आणि अशाच एका पुराणिकानें विजयनगरच्या राजाला शैव धर्मांतून वैष्णव धर्मांत नेलें. ‘ राजा बोले आणि दळ हाले ’ अशा न्यायानें ह्या धर्मक्रांत्या केवळ वैयक्तिक आणि सोयीच्या पायावर घडलेल्या नसून राजाच्या

स्थानांत कालक्षेपक अशीं नावें आहेत. त्रावणकोर आणि मलबारांत ह्यांना अंपलवासी अशी संज्ञा आहे. कदाचित् ही संस्था याच नैर्ऋत्य कोपऱ्यांत उदय पावून पुढें सर्व हिंदुस्थानभर पसरली असावी. याशिवाय दशावतारी दास, पोतदार व इतर असेच फिरते तमासगीरहि रामलीला, कृष्णलीला, शिवलीला, मरीआई वगैरे लाकडी चित्रांचे खेळ दाखवून अगदी खालच्या जातींतून धर्मांच्या कल्पना पसरून आपलीं पोटें भरीत.

## विचित्र मायपोट !

हिंदुस्थान आणि हिंदु धर्म म्हणजे एक विचित्र मायपोट आहे. जें हिंदुस्थानांत नाहीं तें जगांत इतरत्र कोठेंच नाहीं असें म्हटल्यास अतिशयोक्ति फारशी होईल असें वाटत नाहीं. हिंदुस्थानांत ज्या वेळोंवेळीं राज्यक्रांत्या झाल्या आहेत, त्या केवळ खड्या सैन्याच्या जोरावर झाल्या आहेत, असे मुळींच नाहीं. अशा सैन्यापेक्षां पेंढारावरच येथील राजांची व सम्राटांची विशेष मदार असे. असें राजकारण, तसेंच धर्माचरण, तसेंच समाजकारण आणि तशाच थाटाचा सर्व सार्वजनिक व्यवहार ! एखाद्या पुरातन क्षेत्रांतल्या जीर्ण देवालयाचीं सर्व लक्षणें सूक्ष्म निरखून पाहिल्यास, तें स्थान एखाद्या पुरातन अनार्य वर्ण गुरुंचा मठ असावा, कीं राजाचा किल्ला असावा कीं व्यापाऱ्यांची अथवा पाचालांची उतारपेठ असावी कीं कांहींच नसून केवळ पेंढाऱ्यांचें संकेत-स्थान असावें या आणखी कांहीं तरी असेंच गोडबंगाल असावें हें कांहींच कळेनासें होतें. धर्म हा एक समाजशास्त्राचा भाग आहे. परकीय पंडित हिंदुस्थानांतील धर्मासंबंधीं नाना तर्कवितर्क चालवून हा विषय कुरतडीत बसतात ! पण हिंदुधर्माची मीमांसा 'जेथल्या बोरीं तेथल्याच बाभळी' ह्या न्यायानेंच झाल्यास अंशतः कांहीं तरी कार्यभाग होईल, परन्तु ग्रंथ-विस्तारच पाहून घ्यावा !

## ओढिया जगन्नाथ

वरील विचित्र क्षेत्राचा दाखला देऊन हें विवेचन आटपूं. ह्या स्थलाची मूळ पीठिका म्हणजे इतिहास-संशोधकांचा गर्व हरण करणारें एक अजब कोडेंच आहे. कोणी म्हणतात हें पूर्वींचें एक बौद्ध क्षेत्र आहे. कोणी म्हणतात प्रागैतिहासिक शाक्त तान्त्रिकांचें मूळस्थान आहे. कोणी म्हणतात प्राचीन पल्लिय राष्ट्राचें हें कारस्थान आहे. हल्लीं तर ही पुरीच्या राजाची चिमुकली राजधानी आहे. ४००/५०० वर्षांपूर्वी येथूनच श्रीचैतन्यदेवांनीं शुद्ध वैष्णवधर्माची उठावणी करून सर्व बंगाल देशाचा उद्धार केला, पण येथील हल्लींचें ओंगळ स्वरूप पाहून भागवत धर्माची अवनति किती होणें शक्य आहे, ह्याची

ओझरती तरी कल्पना प्रत्यक्ष आल्याशिवाय राहात नाहीं. अशा अवनतीचा हें क्षेत्र एक बिनतोड वस्तुपाठ आहे. रोज लागणारा मणभर भाताचा भोग, त्रिकाल पूजा, मासिक उत्सव, वार्षिक रथोत्सव, बारा वर्षांचा महोत्सव, क्षेत्राचा मालक राजा, चालक पंड्ये, त्यांनीं देशोदेशीं हिंडणारे एजंट, देवळाचा विस्तीर्ण वेढा व बीभत्स देखावा, विचित्र इतिहास आणि अज्ञेय मूळ, एक का दोन चमत्कार, जें डोळ्याला दिसेल तें मनाला वेडच लावतें! नेपाळची तंत्रविद्या, काशीची वेदविद्या, हरिद्वारचें वैराग्य, सोमनाथाची श्रीमंती, पंढरीचा भोळा भाव, मल्लारचा लवंडाव, तामिळदेशाची देवदासी – थोडक्यांत आटोपावयाचें म्हणजे पुरी येथें कोठलें काय आढळत नाहीं! मला वाटतें चोहीकडील ह्या गोष्टी येथूनच बाहेर कदाचित् गेल्या असाव्यात. येथें पाहूं गेल्यास ह्या विचित्र लक्षणांचा केवळ कडेलोट आहे! सोरटी सोमनाथ गिझनीच्या महमुदानें फोडला, काशी विश्वनाथ औरंगजेबानें टाकून टाकिला, तामीळ देशांतील भव्य देवळें इंग्रजी विद्येनें निस्तेज केलीं, शंकर, रामानुज वगैरे आचार्यांचा वेदान्त त्यांच्याबरोबरच गेला, महावीर जिन देशांतच दडला, गौतम बुद्ध पूर्वेकडे हद्दपार झाला, आणि वेदविद्या केवळ *पाश्चात्यांच्या ज्ञानकोशात निजली आणि आमच्या वांट्याला अद्यापि ओढिया जगन्नाथ* मात्र भागवत धर्माच्या अवनतीची साक्ष देत पूर्व समुद्रावर उभा आहे! त्याला आमचा दुरूनच नमस्कार! ह्या अवनतींतूनहि भागवत धर्माचें पुनरुज्जीवन करण्याचे प्रयत्न चालू राजशकाच्या आरंभापासून कसकसे करण्यांत आले, हें आपण पुढें पाहूं.

## नामदेव तुकाराम

*भागवत धर्माचा प्रसार होतां होतां त्याची अवनति किती आणि* कशी झाली, हे मागें सांगितलें आहेच. अंधभक्तिभावाचा बहुजनसमाजांत प्रसार म्हणजे भामटेगिरीला मुक्तद्वारच! भक्त आणि भामटा ह्यांचें साहचर्य म्हणजे फूल आणि भुंगा ह्याच्या साहचर्याप्रमाणेंच आहे. भागवत धर्माची जशी पारमार्थिक दृष्टि आहे तशीच मानवी दृष्टिहि आहे. भक्ताचें *लक्ष त्याच्या देवावरून उडते न उडते तोंच भामट्यांनीं त्याला घेरलेंच समजावें. ह्यामुळें* जगांत सर्वत्र सर्वकाळीं भागवत धर्माला देव आणि भामटे यांचे हेलपावे खावे हे लागणारच?

## भागवत पुराण

भरतखंडांत भागवत धर्माला पूर्ण स्वरूप प्रश्न लागलें असता '*श्रीमद्भागवतपुराण*' हा एक प्रासादिक ग्रंथ निर्माण झाला. हें सुंदर पुराण गरुडांत आहे. ह्याचा कालनिर्णय अद्यापि झाल्य

नाहीं. कोणी म्हणतात, देवगिरीच्या रामदेवराव जाधव राजाच्या पदरीं बोपदेव नांवाचा एक वैय्याकरणी पंडित होता, त्यानें हें केलें. हे पण खरें नसावें. कारण ज्या अर्थी त्याच्यापूर्वी वीर वैष्णव मध्वाचार्य होऊन गेले आणि त्यांनी "भागवतसार" नांवाचा लहानसा ग्रंथ ह्या पुराणाचें सार म्हणून केला, त्या अर्थी 'श्रीमद्भागवत' हा ग्रंथ मध्वाच्या पूर्वीच प्रसिद्ध असला पाहिजे. प्रसिद्ध मुसलमान इतिहासकार आल्बेरूनी ह्यानें आपला इतिहास इ. स. १०३० चे पूर्वी संपविला. विष्णुपुराणात ज्या १८ पुराणांची यादी आहे, त्यांत श्रीमद्भागवताची गणना आहे, असे आल्बेरूनी ह्यांनी लिहिलें आहे, ह्यावरून 'श्रीमद्भागवत' पुराण निदान इ. स. ९०० अगर फार तर १००० वर्षांच्या सुमारास झालें असावें, असा डॉ. फारकुहार ह्यांचा अदमास आहे. (Religious Literature of India, p. 232). ह्या पुराणाच्या ११ व्या स्कंधाच्या ५ व्या अध्यायातील खालील श्लोक प्रसिद्ध आहेत. "कृतादिषु प्रजा राजन् कलौ इच्छन्ति संभवम् । कलौ खलु भविष्यन्ति नारायणपरायणः ॥ ३८ ॥ क्वचित् क्वचित् महाराज द्रविडेषु च भूरिशः । ताम्रपर्णी नदी यत्र कृतमाला पयस्विनी ॥ ३९ ॥ कावेरी च महापुण्या प्रतीचीच महानदी । ये पिबन्ति जलं तासां मनुजा मनुजेश्वर । प्रायो भक्ता भगवति वासुदेवेऽमलाशयः ॥ ४० ॥" ह्या श्लोकात ताम्रपर्णी, कृतमाला, कावेरी, प्रतीची आणि महानदी इतक्या नद्यांचा उल्लेख आहे; आणि ह्या नद्यांचें पाणी पिणाऱ्या द्राविडांमध्यें कलियुगात नारायणपरायण महाभागवत भूरिश: म्हणजे पुष्कळ होतील, असे भविष्यवजा सांगितलें आहे. ह्यावरून त्या काळीं ओरिसापासून खालीं दक्षिणेकडील सर्व देश द्राविड अशाच नावानें ओळखिला जात असावा व ह्याच देशात हें पुराणहि झालें असावें. अलीकडचा भक्तिमार्गहि ह्याच द्राविड देशांत प्रथम उदयास आला, असा ह्या श्लोकाचा भावार्थ आहे. "भागवतमाहात्म्य" म्हणून एक नंतर झालेला लहानसा संस्कृत ग्रंथ भागवताला पुरवणीवजा जोडला आहे. त्यांत 'भक्ति' हा नांवाची एक तरुण स्त्री नारदाला भेटली, 'ज्ञान' व 'वैराग्य' ही तिची दोन्ही मुलें होतीं; कलियुगांत त्यांचे हाल झाल्यामुळे अतिशय दुःखी झालीं होतीं; वगैरे कथा आहे. येणेप्रमाणें हा ग्रंथ म्हणजे एक लहानसें गोड रूपक आहे. हें रूपक पद्म-पुराणाच्या उत्तरखंडातील एक भाग आहे, असें म्हटलें आहे त्याचें तात्पर्य हेंच कीं, ज्ञानवैराग्ययुक्त भक्ति हें भागवत पुराण वाचल्यानेच प्राप्त होते. अशी ही उत्कट भक्ति, जी वेदकाळीं नव्हती, गीताकाळीं नव्हती, किंबहुना भागवत पुराण निर्माण होण्यापूर्वी केव्हांहि नव्हती, त्या भक्तीने ह्या रूपक प्रथात आपली पूर्वपीठिका आणि विकास याचा इतिहास पुढील मार्मिक शब्दांत सांगितला आहे. "उत्पन्ना द्राविडा साऽहं वृद्धिं कर्णाटके गता । क्वचित् क्वचित् महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता" ॥ ४८ ॥ अध्याय १ ला. अर्थ:—मी (भक्ति) द्राविड देशात जन्मलें, कर्नाटक व महाराष्ट्राच्या काहीं भागांत वाढलें, आणि गुजराथेंत म्हातारी झालें. हें रूपक अगदीं यथार्थ आहे. मेलेल्या भागवत धर्माला पुनर्जन्म देणारा आधुनिक भक्तिमार्ग हा द्राविडांतच प्रथम तामिळ

देशांत उदयास आला. तेथून कर्नाटकातून त्वकरच महाराष्ट्रांतील पंढरपुरांत आला. हें म्हणणें इतिहासाला अगदीं धरून आहे.

## तामीळ भक्त

ज्यांच्या प्रभावामुळें भागवतकाराला भागवत लिहिण्याची प्रेरणा झाली, ते तामिळ देशांतील शैव आणि वैष्णवभक्तवृंद *भागवताच्याहि पूर्वीं सुमारें २ शतकें, म्हणजे खिस्ती शकाच्या* ७ व्या किंवा ८ व्या शतकांत कांची, चिदंबर, मदुरा, श्रीरंग (त्रिचनापल्ली) ह्या टापूंत होऊन गेले. शिवभक्तांना अड्यार आणि विष्णुभक्तांना आळ्वार अशी संज्ञा आहे. *शैव संत ६३ आणि वैष्णव संत १२ अशी ह्यांची गणना निश्चित आणि प्रसिद्ध आहे.* दक्षिणेंतील प्रसिद्ध शैव आणि वैष्णव देवळांतील चौफेर ओवऱ्यांतून ह्या संतांच्या मूर्तीची अनुक्रमें पूजेसाठीं प्रतिष्ठा झालेली अद्यापि आढळते. ज्यांचीं यांचीं गीतें *हृदयंगम आहेत, तशींच ह्यांचीं चरित्रेंहि उज्ज्वल अशीं वर्णन करण्यांत येतात.* हे संत ब्राह्मणापासून तों अस्पृश्य अतिशूद्रांपर्यंत सर्व जातींचे होते. शिव आणि विष्णु असा उपास्यांचा भेद हे मानीत नसत. इतकेंच नव्हे तर जातिभेदहि आपसांत मानीत नसत. *सर्वांहि जातींच्या हिंदूंना ते हल्लींहि परमपूज्य आहेत. असा हा आधुनिक भागवत* धर्म प्रथम कावेरीच्या कांठीं जन्मून नंतर तुंगेच्या, भिवरेच्या, कृष्णेच्या, गोदेच्या कांठाकांठानें पसरत पुढें उत्तर, पूर्व आणि वायव्य हिंदुस्थानांत पसरला. नाथमुनी, *रामानुज, विष्णुस्वामी, निंबार्क, मध्व, इत्यादि ब्राह्मण धर्माचार्यांना पुढें ह्यांच्यामुळेंच* आपापल्या सांप्रदायिक धर्मप्रसाराची प्रेरणा झाली. ह्यांच्या उत्कट प्रेमामुळें आणि उज्ज्वल वैराग्यामुळेंच जैन आणि बौद्ध धर्मांची बहुजनसमाजांतून पिछेहाट झाली. पुढें ह्यांच्या मागून आलेल्या ब्राह्मण आचार्यांनीं राजाश्रय मिळविल्यामुळें त्यांच्या चिथावणीनें जोरजुलमानें वरील बौद्ध जैनांच्या धर्मांचा नायनाट करण्यांत आला.

## महाराष्ट्र भागवत धर्म

*वरील तामिळ भगवद्भक्तांच्या प्रेरणेनें भागवतपुराण आणि* रामानुजाचें श्रीभाष्य असे दोन काव्यमय आणि तत्त्वज्ञानमय ग्रंथ निर्माण झाले. त्यांचा परिणाम भरतखंडांतील विद्वानांवर आणि बहुजनसमाजावरहि पुढील पिढींत जितका झाला तितका इतर कशानेंहि झाला नाहीं. रामानुजानें ही तामिळ देशांतील लाट कर्नाटक देशाची तत्कालीन राजधानी जी हाळेबीड (म्हैसूर) येथें नेली. हाळेबीड ऊर्फ द्वारसमुद्र येथील पराक्रमी होयसळ घराण्याचा राजा विट्टीवर्धन पूर्वी जैनधर्मी होता. त्याला रामानुजानें वैष्णव केलें. तामिळ देशांतील

चोळ राजे शैव धर्माचे अभिमानी होते. त्यांच्या भीतीनें रामानुजाला बिट्टी (विष्णु) वर्धनाचा [ इ. स. १०३९-१०५९ ] आश्रय घ्यावा लागला. विष्णुवर्धनानें स्वतः आपणच वैष्णवधर्म स्वीकारून स्वस्थ न राहतां आपल्या प्रजेमध्यें जुलमानें वैष्णव धर्माचा प्रसार करण्याचा सपाटा चालविला. ज्ञानसंबंधर नांवाच्या शैव पुराणिकानें ह्याच-प्रमाणें दोन शतकांपूर्वी पांड्य राजाला जैन धर्मांतून शैव धर्मांत घेतलें होतें. त्यामुळें पूर्वेकडे तामिळ देशांतील चोळ आणि पांड्य राजवटींतून शैव भागवत आणि पश्चिमेकडे कर्नाटकांतील होयसळ राजवटींत वैष्णव भागवत फार प्रबळ झाले. ह्या दोन्ही भागवतांचा उत्तरेकडे महाराष्ट्राच्या यादव राजवटींतील धर्मावर जोराचा परिणाम झाला असावा. रामदेवराव जाधवाचे आश्रयाखालीं ज्ञानेश्वर महाराजांनीं आपली प्रसिद्ध ज्ञानेश्वरी इ. स. १२९० सालीं पूर्ण केली. ज्ञानेश्वर इ. स. १२७१ सालीं जन्मले. त्यापूर्वी एक वर्ष म्हणजे १२७० सालीं श्रीनामदेव महाराज कऱ्हाडजवळील नरसीब्राह्मणी ह्या खेड्यांत जन्मले. नामदेव आणि ज्ञानेश्वर ह्या जोडीनें या नवीन भागवतधर्माची प्रतिष्ठा आणि घटना महाराष्ट्रांत जोरानें केली. ती कशी केली, ह्यासंबंधाचे असावे तसे ऐतिहासिक पुरावे तूर्त उपलब्ध नाहींत, तरी धार्मिक वाङ्मयांतून जे अस्पष्ट पुरावे मिळतात, त्यां-वरून अवलंबून ह्या दोघां थोर पुरुषांनीं ह्या कामाचा कसा पाया घातला व त्यावर पुढें एकनाथमहाराजांनीं व इतर सर्व जातींच्या संतांनीं कशी इमारत बांधली आणि शेवटीं तुकाराममहाराजांनीं कसा कळस चढविला, हें अतिसंक्षिप्त रीतीनें आतां पाहणें आहे.

## संस्थापक कोण?

महाराष्ट्र भागवत धर्माचा खरा संस्थापक कोण? ह्या प्रश्नाचा निर्णय करण्याइतके निश्चित पुरावे हल्लीं उपलब्ध नाहींत. नामदेवानें किंवा ज्ञानदेवानें, किंवा दोघांनीं मिळूनच हें कार्य केलें असावें. पुराव्यांच्या अभावीं शेवटचेंच अनुमान तूर्त आम्हांला स्वीकारावें लागतें. " ज्ञानदेवें घातला पाया तुका झाला कळस " ही भाविक उक्ति वारकऱ्यांमध्यें प्रसिद्ध आहे. तरी पण महीपतिबावांनीं आपल्या भक्तिविजय ग्रंथांत १० व्या अध्यायांत, हा पाया कोणीं घातला, याविषयीं चांगला खुलासा केला आहे. ज्ञानदेव हे तीर्थयात्रेस निघण्यापूर्वी पंढरपुरास येऊन देवाजवळ नामदेवास आपल्याबरोबर पाठविण्यास विनवीत आहेत. पण नामदेवाला आपल्याजवळून दूर पाठविण्यास देव नाखुष आहेत. अर्थात् देवाला ज्ञानदेवापेक्षां नामदेव अधिक प्रिय दिसतात. चुकविण्यासाठीं देव ज्ञानदेवाला विचारतात कीं, त्यांच्यासारख्या ज्ञान्याला तीर्थयात्रेची काय जरुरी? देव विचारतातः—" तरी ज्ञानदेवा तुजकारणें । कासया पाहिजे तीर्थाटन । वायां विचार करूनिया मनें । व्यर्थ कासया हिंडसी ॥ ६८ ॥ येरू [ ज्ञानदेव ] म्हणे जी सत्यमत्य । तुम्ही सांगतां यथार्थ । परी नामया ऐसा प्रेमळ भक्त । घडनी सगन मज

याची ॥ ३९ ॥ याने मराठीचें घेऊन मुरा । देहाचें करावें सार्थक । ऐसें म्हणोनि चरणीं मस्तक । ठेविला देवा निश्चयीनि ॥ ४० ॥" एकुण संप्रदायांची घटना जरी ज्ञानदेवांनी काढली हें खरें धरिलें तरी नामदेवाशिवाय त्या घटनेचें कार्य ज्ञानदेवाकडून होणें दुरापास्त होतें. ज्ञानदेव पंडित होता, भक्त नव्हता. शिवाय संन्याशाचा मुलगा असल्यानें ब्राह्मणांवरहि त्याचें वजन नव्हतें, तर बहुजनसमाजावर कोठलें येईल? ज्ञानेश्वरी जरी गीतेवर टीका होती तरी मूळ संस्कृतापेक्षाहि ही मराठी टीका अधिकच दुर्बोध झाली होती. पुढें तिचा एकनाथानें जीर्णोद्धार करीतोपर्यंत ती अप्रसिद्धच होती. शिवाय ती टीका अद्वैतपर होती; म्हणून त्यागाला त्याप्रमाणें वेद आणि पुराणें संपादन करून जडत्व आल्यामुळें भागवत निवृत्तिच भक्तिमार्गानें आपले मनाची शांति करावी लागली, तद्वतच ज्ञानदेवाच्याहि नामदेवाच्या भक्तिमार्गानेंच आपल्या 'देहाचें सार्थक' शोधावें लागलें, असें महीपति म्हणतो. नामदेव हा भक्त आणि कीर्तनकारहि होता. त्याला मराठी, हिंदी आणि कांहींसें कानडीहि येत होतें. पण पंडित नव्हता, तरी ज्ञानदेवापेक्षां कर्ता पुरुष होता. कारण पूर्वाश्रमीं तो प्रसिद्ध आणि यशस्वी लुटारू होता, असा एक अभंगरूपानें, त्याचाच कबुलीजबाब आहे. त्या वेळच्या राजानें (रामदेवराव यादव) त्याच्यावर पाठविलेल्या ८४ स्वारांची त्यानें कत्तल केली होती, हे त्याचेंच म्हणणें खरें असेल तर तो पूर्वाश्रमीं एक यशस्वी पुंड पाळेगार होता. ज्ञानदेव आणि नामदेव हे दोघेहि धर्मानें गोरखनाथपंथी शैव होते. पण महाराष्ट्रांत शैव–वैष्णवांचा कधींहि फारसा विरोध नव्हता. भागवत धर्माची घटना ह्या दोघांना जाणूनबुजून करावयाची होती, म्हणून त्यांनीं पंढरीचा वारकरीपंथ स्थापन केला असावा; आणि ह्या कामीं कदाचित् त्यांना देवगिरीच्या राजसत्तेचा आश्रय असावा, अशी जबर शंका येते. कारण ज्ञानदेव आणि नामदेव ह्यांनीं ह्या नवीन पंथाच्या घटनेसाठीं हिंदुस्थानभर जी यात्रा केली त्या सुप्रसिद्ध यात्रेंत परसा भागवत, चोखामेळा, सावता माळी आणि विसोबा खेचर वगैरे मत पुरुष होते (भावेकृत महाराष्ट्र सारस्वत, पान १६८). ही यात्रा प्रथम काशीला न जाता दिल्ली येथील बादशहाकडे जाते, तेथें त्याचा छळ होतो, नंतर पंजाबमध्यें प्रचार करून मावी शीख धर्माच्या उदयाला ही यात्रा कारण होते; मग पुढें काशीला जाते आणि तसाच पल्ला मारून पुढें औंढिया नागनाथाच्या शैव देवळांत बळेंच वैष्णव धर्माचें संकीर्तन करितें; वगैरे ह्या दोघांची कांहीं गूढ कारवाई त्या वेळच्या संदिग्ध काळांतून अस्पष्ट दिसून येत आहे. ह्या कारवाईचा उलगडा वरील कोणत्या तरी राजाच्या आश्रयाशिवाय होणें सोपें नाहीं. ही यात्रा परत आल्यावर पंढरीच्या देवाला आनंद होतो, आणि त्या आनंदाच्या भरात देव, नामदेव शिंपी आणि बहिष्कृत ज्ञानदेव आणि वरील यात्रेंत सामील झालेल्या इतर हीन जातींच्या भक्तांबरोबर एकाच पंक्तीस जेवून स्वतःची आणि पंढरीच्या ब्रह्मवृंदाची जात बाटवितो. ह्या 'भ्रष्टाकाराचें' इंगित काय? पंढरीचें ठाणें पूर्वी बौद्ध धर्माचें आणि नंतर शैव धर्माचें होतें. पांडुरंग हें नांव विष्णूचें नसून पूर्वी शिवाचें

होतें. अजून पंढरीस एक जुनें शिवालय आहे. प्रथम त्यांतील महादेवाचें दर्शन घेऊनच मग विठोबाच्या दर्शनाला जाण्याचा वारकऱ्यांचा परिपाठ आहे ( सर डॉ. भांडारकर : V. & S. पान ८८ ). हा जो वारकरी पंथाचा दिग्विजय नामदेवाच्या प्रभावानें करण्यात आला तो महाराष्ट्रांतील शैव धर्मावर किंवा बौद्ध धर्मावर ? राष्ट्रकूट घराणें कांही काळ बौद्ध आणि नंतर शैव होतें; आणि चालुक्यांचा विशेष कल शैव धर्माकडे आणि केव्हां केव्हां वैष्णवांकडेहि होता. आतां पंढरीस ठाणें दिलेल्या श्रीनामदेवाच्या आश्रयाखालीं आणि देवगिरीच्या यादवांच्या आश्रयाखालीं हा वैष्णवांचा उठाव करण्यांत आला असावा.

## दोन ज्ञानदेव व तीन नामदेव

ज्ञानदेव दोन होते आणि नामदेव तीन होते, असा प्रसिद्ध वाद सुमारें ३० वर्षांपूर्वी नगरच्या परलोकवासी भारद्वाज यांनीं 'सुधारक' पत्रांत उपस्थित केला होता. त्याचा परिणाम डॉ. सर त्यांच्यावरहि होऊन त्यांनींदेखील नामदेवाला सुमारें १०० वर्षें अलीकडे ओढिलें आहे. ह्या वादाचा मुख्य मुद्दा हा आहे कीं, नामदेवाच्या अभंगांची भाषा ज्ञानेश्वरीच्या भाषेसारखी जुनी नाहीं ! जणू काय अभंगांसारख्या नित्यपाठात असलेल्या गीतांची भाषा कायम राहणें शक्यच आहे ! अलीकडे १९४० पर्यंत आम्हीं प्रार्थनासमाजियनांनीच अशा अभंगांचे स्वरूप जुन्या लोकांच्या मतांची पर्वा न बाळगतां कितीतरी बदलून टाकलें आहे. असें असता हा भाषेच्या मुद्याचा बाऊ निदान आम्हांला तरी वाटूं नये. तुकारामाची अस्सल गाथा रा. भावे यांनीं अलीकडे मूळ मार्फत प्रसिद्ध केली आहे. तिच्यांत आज जो फरक झालेला आहे, तो पाहता, नामदेवाच्या आजच्या गाथेहून मूळ गाथा फार भिन्न असावी, हें उघड आहे. सर भांडारकरांचा निर्वाणीचा मुद्दा असा आहे कीं, तुर्कांनीं मूर्ति फोडल्याचा उल्लेख नामदेवानीं केला आहे, म्हणून तो १४ व्या शतकांतच असला पाहिजे. महमूद गिझनीनें सोमनाथाची प्रसिद्ध मूर्ति इ. स. १०१४ सालीं फोडून तें उदाहरण घालून दिलें, तें त्याच्या मागच्या मुसलमानांनीं सतत दोन शतकें गिरविलें. इ. स. १२७० पासून १३५० पर्यंत उलटलेल्या आणि गाजल्या भरतखंडभर फिरणाऱ्या नामदेवासारख्या जागरूक आणि शूर क्षत्रिय स्वभावाच्या मुसलमानांचा हा आततायीपणा कळल्याशिवाय राहणें शक्यच नाहीं. असो, भारत इतिहास मंडळाच्या गेल्या वार्षिक संमेलनांत आळंदीचे पंडित पांडुरंग शर्मा यांनीं ह्या वादाला चोखलें सविस्तर उत्तर दिलें. सदर मंडळाच्या अहवालांत आतां प्रसिद्ध झालें आहे. त्यांनीं नामदेव व ज्ञानदेव समकालीन असून त्यांचा काळ इ. स. १३५० पूर्वीच होता, असें सिद्ध केलें आहे.

## वारकरी पंथाची लोकसत्तात्मकता

पंढरीचा वारकरी पंथ उभारण्यात ज्ञानेश्वरांपेक्षां नामदेवाच्या गायेचीच मदत अधिक झाली आहे. नामदेवाचें नांव उत्तर हिंदुस्थान आणि विशेषतः पंजाबांत प्रसिद्ध होऊन त्याचीं जोमदार हिंदी पदें शीख लोकांच्या ग्रंथसाहेबांत कायमचें ठाणें देऊन बसलीं आहेत. इतकेंच नव्हे तर नामदेवाच्या समाधीवर पंजाबांत गुरुदासपूर जिल्ह्यांत घुमण नांवाच्या गांवांत शीख लोकांनीं बांधलेलें एक सुंदर जुनें मंदिर अद्यापि आहे. ह्यावरून नामदेव महाराज हे *अखिल भारतीय भागवतपदावर आरूढ होऊन चुकले आहेत, ह्यांत आतां शंका घेण्याचें कारण उरलें नाहीं.* नामदेव–ज्ञानदेवांचे काळींच ह्या पंथाचें धुरीणत्व सर्व जातींच्या संतांनीं घेतलें. ह्या पंथांत केवळ कोणत्याहि एकाच व्यक्तीचें प्राधान्य नसून भागवतधर्माचें विशेष तत्त्व जें लोकसत्तात्मकत्व, तें तर सर्व हिंदुस्थानांतील त्या वेळच्या पंथांमधून दिसून येत होतें, पण ह्या नवीन तत्त्वांचा पूर्ण विकास जसा आणि जितका महाराष्ट्रांत झाला आहे तितका पंजाब सोडून इतर कोणत्याहि प्रांतांत झालेला आढळणार नाहीं. पंढरपूरच्या देवळांतील बडवेपण म्हणजे पोट भरण्याचा धंदा जरी आतां ब्राह्मणांनीं आपलासा केला आहे, *तरी प्रत्यक्ष देव आणि त्याच्या भजनाचा प्रसार आमूलाग्र सामान्य जनतेच्या ताब्यांतच अद्यापि आहे.* कीर्तनाच्या संप्रदायात तर महार चोखामेळ्याने प्रवीणत्वच मिळविलें आहे. वारकऱ्यांचे मुख्य दोन फड १ देहूकर आणि २ वासकर. हे दोन्ही निर्भेळ ब्राह्मणेतरांच्या स्वाधीनच आहेत. ठरलेल्या संतमालिकेंत तर ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा वाद माजविणें हे वारकरी वर्गांत मोठें पाप समजलें जातें. ह्या मालिकेंत बहुसंख्या ब्राह्मणेतरांचीच आहे. त्यांत महार, चांभार आणि वेश्याहि आहेत! *ज्याच्या गळ्यांत वीणा त्याची जात न पाहतां ब्राह्मणहि श्रद्धेनें त्याच्या पायांवर डोकें टेकतात आणि आनंदानें गोपाळकाल्याचा भाग परस्परांच्या तोंडांत घालून सेवन करितात!* एकनाथासारख्या संतांनें महाराचा भोजनव्यवहारांतहि विटाळ मानला नाहीं, मग इतर ब्राह्मणांच्या भेदभावाचा शिरकाव होणें दूरच राहिलें तसेंच शिव आणि विष्णु हाहि भेद नाहीं. एकनाथ व इतर महाराष्ट्र भागवतांची बहुसंख्या नाथपंथी शैवच होती. इतर कांहीं तर शाक्त, लिंगायत आणि मुसलमानहि होते. ह्या पंथात मूर्तिपूजा, सोवळेंओवळें, *व्रतवैकल्यें, तीर्थविधि, मंत्रतंत्र, यज्ञयाग, दान, तप वगैरे कशाचेंहि मुळींच थोतांड खपत नाहीं.* ज्याने जावें त्यानें एकदम धुळीच्या पायानिशीं देवाला प्रत्यक्ष आलिंगन द्यावें! मग तो पुरुष असो, स्त्री असो, राजा असो, रंक, विधवा अथवा वेश्या असो. अठरापगड जातींच्या निरनिराळ्या वारकऱ्यांचे सर्व हक्क समान आहेत. विशेष हा कीं, महाराष्ट्र वारकरी पंथांत राधाभक्तीचें खूळ तर मुळींच खपत नाहीं. तें बंड केवळ बंगाल्यांतून *आलेलें आहे व त्याचा गप केवळ तिकडेच आहे.* आणखी एक विशेष हा कीं, ह्या पंथाला राजकारणाची विषबाधा अद्याप झालेली नाहीं. मूळ संस्थापनेच्या वेळीं काय

लें असेल तेंहि असो. तें अगदीं अनिश्चितच आहे. पण जर एखादा धर्म केवळ
जनतेच्या आश्रयानें व बळावरच चालला असेल, आणि त्याला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य
या त्रैवर्णिकांच्या कुटिल नीतीचा विटाळ झाला नसेल, तर तो हाच एक पंथ अद्यापि
जळमाट्यानें वावरत आहे!

## तुकाराम

भागवत धर्माचा कळस तुकाराम. ह्यांना तर प्रसिद्ध श्रीशिवरायाच्या राजाश्रयाचाहि विटाळ सहन झाला नाहीं! रामदासांनीं तो आश्रय संपादन केला, म्हणूनच उलट त्याला संतमालिकेंत स्थान मिळणें अशक्य झालें!! राजेलोकांनीं दिलेल्या देणग्या वडवे घेतात, पण यांचा वारकऱ्यांच्या धर्माशीं कांहींच संबंध नाहीं. वारकऱ्यांची हल्लींची घटना विशेष करून तुकाराममहाराजांच्या चौदा शिष्यांनीं त्यांतल्या त्यांत महाराजांच्या निधनानंतर शिष्य झालेल्या निळोबांनीं केलेली दिसते. तुकाराम ह्यांना नामदेवांचा अवतार समजण्यांत येतें. नामदेवांचा शतकोटी अभंगांचा पण तुकारामांनीं पूर्ण केला. त्यामुळें त्यांच्यानंतरच 'ज्ञानदेव पाया व तुकाराम कळस' अशी म्हण प्रचारांत आली आहे. पण ज्ञानदेवाचें चरित्रलेखन, त्याचें धार्मिक शिक्षण व त्याची कार्यसिद्धि सर्वस्वी नामदेवावरच अवलंबून होती. त्यांच्या बुद्धिवैभवाची साक्ष पुढें एकनाथांनीं उजळ राखिली नसती तर ज्ञानदेवाची आठवणहि पार विसरून महाराष्ट्र आज कृतघ्न ठरला असता. ज्ञानदेव, नामदेव, एका, तुका, हीं जीं चार नांवें महाराष्ट्राच्या हृत्पटावर अक्षय्य कोरलीं आहेत, त्यांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद मुळींच नाहीं. येणेंप्रमाणें नामदेवानें स्थापिलेला भक्तिमार्ग प्रत्यक्ष महाराष्ट्राच्या व अप्रत्यक्षपणें पंजाबाच्या उद्धारला आणि ह्या दोन स्वराज्यसंपन्न राष्ट्रांच्या द्वारां अखिल भारताच्या उद्धाराला एके काळीं कारण झाला. त्या नामदेवाची पुण्यतिथि पाळणें महाराष्ट्राचें आद्य कर्तव्य आहे, ह्यांत शंका नाहीं.

## लिंगायत धर्म

वर श्रीनामदेवमहाराजांची पुण्यतिथि कां करणें अवश्य आहे या संबंधांत 'महाराष्ट्रांतील भागवत धर्माचा संस्थापक कोण?' ह्या विषयावर विचार करून त्या धर्माचें संक्षिप्त वर्णन केलें. आणखी दोन पंथांचा उल्लेख केल्याशिवाय महाराष्ट्रांतील चालू भागवत धर्माचा विषय पूर्ण झाला असें म्हणतां येणार नाहीं.

खिस्ती शकाच्या पहिल्या सहस्रकांत महाराष्ट्रांत विशेषतः बौद्ध आणि जैन ह्या दोनच धर्मांचा जोर होता. बौद्ध व जैन धर्माला जसजशी उतरती कळा लागली,

तसतसा शैव धर्माचा प्रसार वाढूं लागला; बहुजनसमाजांत–विशेषतः मराठ्यांत–गोरखनाथ पंथाची वाढ होऊं लागली. मच्छिंद्रनाथानें हा पंथ प्रथम काढला. त्याचा पराक्रमी शिष्य गोरखनाथ हा पूर्वी बौद्ध होता. त्याच्यानंतरचा नाथपंथ म्हणजे बौद्ध आणि शैव धर्मांचें मिश्रण होय. हा पंथ खाली मलबारपर्यंत पसरला होता. अद्यापि सह्याद्रीच्या अनेक उंच शिखरांवरून ह्या नाथपंथाचीं ठाणीं जागजागीं आढळतात.

आर्यांचे जसे वेद, तसे द्रविडांचे आगम नांवाचे पुरातन ग्रंथ आहेत. ह्या ग्रंथानुसारें शैव धर्मानें बाराव्या शतकामध्यें एक नवीन उचल केली. *कल्याणी येथें कलचुरी वंशाचा बिज्जल नावाचा जैन राजा राज्य करीत असतां* ( इ. स. ११५७–११६७ ) बसव नांवाचा ब्राह्मण त्याचा प्रधान होता. तो मूळ विजापूर जिल्ह्यांतील बागेवाडी गांवचा होता. ह्यानेंच लिंगायत धर्माची स्थापना केली. कोणी म्हणतात—एकोराम, पंडिताराध्य, रेवण, मरुळ, विश्वाराध्य, ह्या पांच आराध्य जातीच्या ब्राह्मणांनी हा पंथ काढिला. त्याला बसवानें राजाश्रय दिला. हा आश्रय बिज्जल राजाचा विचार न घेतांच दिल्यामुळें त्या राजानें बसवावर स्वारी केली. ह्या कटकटींत बसवानें राजाचा खून केला. पुढें बसवाचाहि अंत झाला. हा सुधारक धर्म असल्यामुळें बौद्ध धर्माचीं कांहीं लक्षणें ह्यांत उतरलीं आहेत. ह्यांत जातिभेद, मूर्तिपूजा, मंदिरांतील आराधना, तीर्थयात्रा, वगैरेंचें फारसें बंड प्रथम नव्हतें. बायकांना समान हक्क असून, त्याहि लिंगधारणा करितात. विधवांना विवाहाचा मुळींच प्रतिबंध नाहीं. कोणत्याहि जातीच्या माणसाला दीक्षा देऊन लिंगायत करतां येतें. ह्यांत देवळांपेक्षां मठांचेच विशेष प्राधान्य आहे, व गुरूंचेंच महत्त्व विशेष असून, गुरु म्हणजे जंगम, (हलतेंचालतें) लिंग म्हणजे ईश्वराचें चिन्ह असें समजण्यांत येतें. ह्या धर्माचा ब्राह्मणी धर्माशीं कडकडीत विरोध असल्यामुळें ह्याची एकंदर घटना सामान्य हिंदुधर्मांहून अगदीं अलग झाली आहे.

## महानुभाव पंथ

बाराव्या शतकाच्या सुमारास गुजराथेंत विमलदेव नांवाचा राजा होता. त्याच्या पोटीं पुत्र नसल्यानें त्यानें आपलें राज्य विशालदेव नांवाच्या ब्राह्मण प्रधानाला दिलें. श्रीदत्तात्रेयाच्या प्रसादानें विशालदेवाला पुत्र झाला. त्याचें नांव हरपाळ. तरुणपणीं जुगाराचा नाद लागून ह्यानें राज्य घालविलें, आणि देशोधडीस लागला. फिरता फिरतां वऱ्हाडांत ऋद्धिपूर येथें इ. स. ११८५ साली गोविंद प्रभु नांवाच्या एका विद्वान् आणि विरक्त ब्राह्मणाचा अनुग्रह मिळाला. त्यानें त्याचें नांव हरपाळ बदलून श्रीचक्रधर असें नवीन नाव ठेविलें. त्यापुढें *ह्यानें दोनदा विवाह करून पुनः विरक्त होऊन तीर्थयात्रा करीत भटकूं लागला; अखेरीस* इ. स. १२६३ सालीं ह्यानें संन्यास घेतला. शिष्यशाखा स्थापन केली, तिचाच पुढें महानुभाव पंथांत विस्तार झाला. वि. ल. भावे ह्यांनीं आपल्या “महाराष्ट्र सारस्वत”

ह्या ग्रंथांत ह्या पंथाचें सहानुभूतिपूर्वक वर्णन केले आहे. मराठी भाषेची आद्य ग्रंथ-रचना ह्याच पंथानें करून मराठीच्या जनकत्वाचें श्रेय संपादिलें आहे. ह्यांचा प्रचंड ग्रंथसमूह प्रसिद्ध होईल, तेव्हां ह्याचा आश्चर्यकारक इतिहासच नव्हे, तर मराठी भाषेची पूर्वपीठिकाहि उजेडांत येईल.

महानुभाव ग्रंथांत केवळ कृष्णाचीच उपासना आहे. पण मूर्तिपूजा नाहीं. जातिभेद मुळींच नाहीं. गुरूचें महत्त्व विशेष आहे. येणेंप्रमाणें लिंगायत पंथाशीं ह्याचें विशेष साम्य आहे. बौद्धांच्या मागोमाग निर्माण झालेल्या ह्या दोन धर्मांतून जीं ही प्रगतीचीं आणि समतेचीं लक्षणें प्रथम प्रथम रूढ होतीं तीं पुढें ब्राह्मणी धर्माच्या सहवासानें आणि छळानें शिथिल पडलीं. महानुभाव पंथाविषयीं इतर हिंदूंत मोठी तेढ आणि कठोर द्वेषभाव असण्याचें कारण फार गूढ आहे. हा पंथ जातिभेद न मानतां महार-मांगांमध्येंहि आपला प्रसार करितो, हें एक ह्या तेढीचें कारण असावें. तरी पण ह्यांच्या धर्मांत हिंदूंना चीड किंवा किळस येण्यासारखें कांहीं नाहीं. हे दुसऱ्या कोणत्याहि धर्माची निंदा करीत नाहींत, किंवा त्यांच्या वाटेला मुळींच जात नाहींत. तरी हे अद्यापि फार अप्रिय आहेत आणि ह्यांनीं सर्वांत अगोदर केलेली धर्मसुधारणेची आणि विशेषतः मराठी भाषेच्या उत्पत्तीची असामान्य कामगिरी अद्यापि कोणाच्याहि गणनेंतच नाहीं, ही मोठी खेदाची आणि आश्चर्याची गोष्ट आहे.

## रामानंद

दक्षिणेंत श्रीरामानुजाचार्यांनीं श्रीवैष्णव पंथाची स्थापना केल्यावर त्याच्या शाखा त्यांनीं सर्व हिंदुस्थानभर पसरल्या. तो स्वतः सर्व देशभर तीर्थयात्रा करून आला. म्हैसूरचा जैन राजा विष्णुवर्धन याला वैष्णव धर्माची दीक्षा दिल्यावर त्याच्या आश्रयानें त्याच्या राज्यांत मलेकोट येथें एक प्रसिद्ध वैष्णव देऊळ व मठ स्थापिला. ह्याच ठिकाणीं रामानंद ह्या गौड ब्राह्मणाचा जन्म झाला, असें मॅकालिफ म्हणतो. सर भांडारकर म्हणतात, हा प्रयाग येथें इ. स. १३०० च्या सुमारास जन्मला. ह्यानें स्थापिलेल्या पंथाचें मुख्य उपास्यदैवत कृष्ण नसून राम आहे, हा एक विशेष आहे. ह्यानें केलेल्या तीर्थाटनांत ह्याचा मुसलमानांशीं व बौद्धांशीं संबंध आला असावा असें दिसतें. ह्यामुळें त्याच्या पंथांत जाति-भेदाला मुळींच महत्त्व नाहीं. शिवाय ह्याचीं सर्व शिकवण हिंदी भाषेंत झाल्यामुळें बहुजनसमाजांत ह्याचा प्रसार फार झाला. ह्याच्या प्रसिद्ध तेरा शिष्यांपैकीं पीपा राजपूत, कबीर मोमीन, सेना न्हावी, धना जाट, रोहिदास चांभार आणि पद्मावती ही एक बाई होती. हा इ. स. १४११ सालीं १११ वर्षांचा होऊन वारला. ह्याच्या शिष्यांपैकीं कित्येकांनीं पुढें आपापले नवीन वैष्णव पंथ सर्व उत्तर हिंदुस्थानभर काढले. ह्यांनीं कामें हिंदी भाषेतच चालल्यानें देशी भाषेचा प्रसार झाला.

## कबीर

रामानंदाचा शिष्य कबीर ह्यांचा जन्म काशी येथें इ. स. १३९८ सालीं झाला. हा एका ब्राह्मण विधवेच्या पोटीं जन्मला, म्हणून लाज राखण्यासाठीं तिनें त्याला एका तळयाच्या कांठीं ठेवून दिलें. त्या मुलाची जोपासना एका मुसलमान मोमिनानें केली. हा पुढें मोठा निस्पृह एकेश्वरवादी निघाला. त्यानें हिंदु आणि मुसलमान ह्या दोन्ही धर्मांच्या खोट्या कल्पनांचा जोरानें निषेध चालविला. त्यामुळें दोही समाजांतून त्याला विशेषतः खालच्या जातींतून पुष्कळ शिष्य मिळाले. ह्याचा दोहोंकडून विशेषतः मुसलमानांकडून छळहि फार झाला. शेख तार्की नांवाचा एक मुसलमान पीर शिकंदर लोदीचा गुरु होता. त्या पिराच्या टीकेविणीविरुद्ध कबिरानें फार कडक टीका केली म्हणून तार्कीनें आपला शिष्य बादशहा याच्याकडून कबिराचा फार छळ मांडिला; पण त्या सर्व दिव्यांतून कबीर निभावला. त्याच्या रामैनी, साक्या व दोहरे प्रसिद्ध आहेत. विशेषतः फटके तर सर्व हिंदुस्थानभर हरिदासांच्या तोंडून ऐकण्यांत येतात. कबीर हा हिंदी वाङ्मयाचा जनक म्हटलें तरी चालेल. मुसल्मानापेक्षां हिंदु धर्माकडेच ह्याचा ओढा जास्त होता त्याचे शिष्यहि आतां हिंदुच आहेत. पण पुष्कळ दिवस कबिराची कडक शिकवण म्हणजे केवळ अरण्यरुदनच होतें. तरी पण कोणी ऐकोंत न ऐकोत, कबिराचा संदेश चढत्या सुरात सारखा पसरतच होता. त्याचा उपदेश रोखठोक, सडेतोड आणि अक्षरशःकूलाहि सहज पटणारा होता. पुढें त्याला शिष्यसमुदाय पुष्कळ मिळाला; तरी त्यानें कोणत्याहि प्रकारचा ढग काढून त्यांना भुलविण्याचा व आपल्या स्वतःचे देव्हारे माजविण्याचा प्रयत्न केल्या नाहीं, ही विशेष ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट आहे. तो मेल्यावर हिंदु आणि मुसल्मान ह्या दोघांनाहि तो आपलासा वाटला. हल्लीं जरी ह्याचें नांव आणि उपदेश सर्व दर्जाच्या लोकामध्यें प्रिय आहे, तरी ह्याच्या प्रत्यक्ष पंथाचा प्रसार खालच्या वर्गांतच चालू आहे.

## चैतन्य पंथाची भूमिका

द्राविड देशांत उत्पन्न झालेला नवीन भक्तिरसाचा लोट बंगाल देशांत पोचावयास अवकाश लागला. कारण त्याला मध्यंतरींचे कर्नाटक, तेलगण व महाराष्ट्र हे देश भिजवावयाचे होते. रामानंद आणि कबिरानें वायव्येकडचे हिंदुस्थानी प्रदेशहि भिजले. चहुकडची जमीन अशा धार्मिक द्रवानें द्रवली असतां, आत्याच मेण्यासारखी मऊ आणि भुसभुशीत अशी बंगाल्ची जमीन आतां भिजल्याशिवाय कशी राहणार? बंगाल, बिहार, पंजाब, गुजराथ, महाराष्ट्र, कर्नाटक, तेलंगण, द्राविड इ. प्रांत हे केवळ भूगोलाचे निरनिराळे तुकडे नसून तीं

परस्पर भिन्न ऐतिहासिक तुकडे ऊर्फ राष्ट्रे आहेत. त्यांची मनोरचना, ऐतिहासिक विकास, हीं परस्परांहून इतकीं भिन्न आहेत कीं, तितकी भिन्नता हल्लीं एकमेकांच्या छातीवर असून एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्यास टपलेल्या इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी आणि रशिया या यूरोपीय राष्ट्रांमध्येहि नाहीं. विशेषतः बंगाल हें एक अगदीं भिन्न आणि ऐतिहासिक विकासाच्या दृष्टीनें पाहतां एकजात विशिष्ट संस्कृतीचें स्वतंत्र राष्ट्र आहे. बौद्ध धर्माच्या संस्कृतीखालीं येण्यापूर्वी बंगालची एक विशिष्ट संस्कृति होती. तिचा आर्यांच्या किंबहुना दक्षिणेच्या द्राविडांच्या संस्कृतीशीं फारच थोडा आनुवंशिक संबंध होता. बंगाल हें शाक्त धर्माचें व तज्जन्य संस्कृतीचें एक मोठें माहेरघर होतें. बंगालनें बौद्ध धर्म स्वीकारला, पण बुद्धानंतर पांचसातशें वर्षांनीं बौद्ध धर्माच्या महायान पंथाला बंगालनें पुनः आपलें शाक्त धर्माचें तांत्रिक स्वरूप दिलें. इतकेंच नव्हे तर हा सशक्त आणि भावनामय तांत्रिक स्वरूपाचाच हल्लींच्या अखिल भारतवर्षावर अल्पसंख्याक आर्यांच्या बुद्धिमय पण दुबळ्या मांत्रिक स्वरूपापेक्षांहि कितीतरी पटीनें अधिक जास्त परिणाम झाला आहे! आर्यांचें मानसिक लक्षण म्हणजे तात्त्विक आणि तार्किक बुद्धिवैभव, द्रविडांचें हिशेबी आणि व्यावहारिक बुद्धिवैभव, मोंगलांचें उज्ज्वल भावनावैभव, अशीं हीं आनुवंशिक राष्ट्रीय लक्षणें ढोबळ मानानें सहज दिसून येण्यासारखीं आहेत. दक्षिणेंतून आलेल्या भक्तीची ठिणगी बंगालच्या भावनामय सुरुंगावर पडल्याबरोबर जो एक सर्व बंगालला हादरून टाकणारा स्फोट उडाला, त्याचेंच नाव श्रीचैतन्यदेव! हा सुरुंग कोणीं कसा उडवला होता?

बंगाल, बिहार, ओरिसा, आसाम वगैरे ईशान्येकडील मानववंश हे सर्व मोंगली संस्कृतीचे आहेत. प्रत्यक्ष गौतमबुद्ध आणि महावीर वर्धमान हेहि थेटविट्टल ह्याच संस्कृतीचे होते. गौतम बुद्धानें टाकलेल्या ठिणगीनें ह्या प्रांतीं २५०० वर्षांपूर्वी जो स्फोट झाला त्यानें सर्व जग हादरलें आणि सर्व जगभर भागवत धर्माचा ओघ लाव्हासारखा पसरू लागला. तो थंड होण्याला १०००।१५०० वर्षे लागलीं. चैतन्यदेवाच्या उदयाचे पूर्वी हा लाव्हाचा (तसरस) ओघ अगदीं थंड होऊन जमिनीखालूनच वाहात होता. मुसलमानांच्या कापाकापीनें बौद्ध भिक्षु संघाची वाताहात झाली. मागे मात्र त्यांचे केवळ अत्यंत हीन परिणाम तांत्रिक वामाचाराच्या रूपानें समाजाच्या सर्व वर्णांमधून रोमरोमांत भिनून गेले होते. बंगालची स्थिति कमालीची केविलवाणी झाली होती. बुद्धि पूर्ण स्वार्थी झाली होती. एके काळीं पराक्रम गाजविलेल्या सेन घराण्याचा जरठ राजा लक्ष्मणसेन राज्य करीत असता अवघ्या ५०० मुसलमानांच्या एका दरोडेखोर टोळीनें छापा घातला. तेव्हां त्याला तोंड न देता लक्ष्मणसेन मागील दारानें परागंदा झाला, आणि त्याच्या मागोमाग स्वातंत्र्य आणि स्वराज्यहि पळालें, तें अद्यापि पूर्वस्थळाला आलें नाहीं. आतां परिस्थिति बदलत आहे. आजकालच्या हिंदुस्थानाला जें भावनाचें भातुकें मिळत आहे, तें बंगाल्यांतूनच येत आहे. राममोहन राय हा आजच्या भारताचा धार्मिक बाप असेल, तर श्रीचैतन्य हा आजा होय.

## चैतन्यचरित्र

चैतन्याचें पूर्वाश्रमाचें नांव विश्वंभर. लाडकें नांव निमै. हा नवद्विप ( नदिया ) येथें इ. स. १४८६ सालीं वैष्णव ब्राह्मण आईबापांच्या पोटीं जन्मला. याचा आजा मूळ ओरिसा प्रांतांतला राहणारा. संन्यास घेतल्यावर निमै आपल्या जीवनाचें कार्य करण्याला आरंभापासून अखेरपर्यंत ओरिसामधील जगन्नाथपुरी येथें येऊन राहिला, ह्यांत वावगें कांहींच झालें नाहीं. आड्याचें पाणी वळणाकडेच उतरावयाचें ! निमै लहानपणीं उनाड होता. टरलेलीच गोष्ट. आरत्याला धरावयास आलेल्या नौक्यांशी इत्यादिक शिपायांनीं दंडेलगेर नाव्यानें ( नामदेवमहाराजांनीं ) कत्तल केली. निमै बंगाली असल्यानें अशलीं कृत्यें त्याचेकडून होणें शक्य नव्हतें. तरी तो महा धर्मात्मा होण्यापूर्वीच, गंगेवर स्नानासाठीं ब्राह्मण आले असतां त्यांचीं धोतरें लपवून ठेव; पाणी भरण्यासाठीं मुली आल्या तर त्यांच्याशीं माकडचेष्टा कर, असे अनेक चाळे करूं लागला होता. आईबापांनीं असें करूं नको, म्हणून सांगितलें, तर ह्याशिवाय मला ज्ञानाचा अनुभव कसा येईल, असा साळसूद जबाब देई. शिकण्यासाठीं शाळेंत जा म्हटलें तर माझें शिक्षण सर्वत्र चाललें आहे, असें म्हणे. " सर्वत्र असार ( माझें ) एक अद्वितीय स्थान " हें वेदान्तांतील वाक्य सांगून त्याचा विद्वान् बाप जगन्नाथ मिश्र आणि साध्वी शचीदेवी आई ह्या दोघांचीहि तोंडें बंद करी. निमै अति गोरा व अति सुंदर बालक होता. त्याच्या ह्या चाळ्यांनीं तर तो सर्वांचा अधिकच लाडका झाला होता. नवद्वीप हा गांव त्या वेळीं पश्चिम बंगाल्यांत संस्कृत विद्येचें मोठें नामांकित आगर होतें. त्यांत लवकरच आपल्या कुशाग्र बुद्धीनें संस्कृत व्याकरणांत त्यानें चांगली प्रगति संपादन केली. मुरारी गुप्त नांवाच्या वैद्य जातीच्या एका संस्कृतज्ञांना त्यानें व्याकरणाचे प्रश्न विचारून कुंठित केलें.

संस्कृत व्याकरण हें कांहीं खोकल्यावर किंवा अजीर्णावर औषधाच्या पुड्या देण्याइतकें सोपें काम नाहीं, असा टोमणा मारला. गदाधर नांवाच्या एका नैय्यायिक ब्राह्मणालाहि तर्कशास्त्रांत हलवून थक्क केलें. तरुणपणीं त्यानें संस्कृत शिकविण्याची स्वतःची एक स्वतंत्र पाठशाळा उघडली, आणि पांडित्यांत नांव मिळविलें पण ह्या कोवळ्या वयांत त्याच्या भक्तीचा अंकुर मात्र अगदीं दडून राहिल्यामुळें दिसून आला नाहीं. धार्मिक लोकांचीहि तो इतर कोरड्या शास्त्री-पंडिताप्रमाणेंच प्रसंगीं चेष्टा करी; पण भक्तिरसाचा ज्वालामुखी त्याच्या पोटांत धुमसत असलेला फार दिवस असा गुप्त राहणें शक्य नव्हतें. खऱ्या भक्तीच्या पोटीं ज्ञान आणि वैराग्य हीं जुळीं व्हावयाचींच, हें आम्हीं गेल्या व्याख्यानांत आणलेंच आहे.

निमैमध्यें ज्ञान तर होतेंच; पण तारुण्याच्या ऐन ज्वानींत त्याच्यामध्यें वैराग्यहि डोकावूं लागलें. तो गयेस आपल्या वडिलांच्या श्राद्धानिमित्त निघाला असतां, वाटेंत कुमार हट्टा येथें ईश्वरपुरी नांवाच्या म्हाताऱ्या साध्या सात्त्विक ब्राह्मणास भेटला;

त्याच्या निर्व्याज शुद्ध भक्तीच्या साक्षात्कारामुळें निमैच्या भक्तीचा जो एकदा स्फोट झाला तो पुढें त्याला स्वतःला देखील कांहीं आवरेना. गया क्षेत्रांत त्याला भक्तीचा आणखी साक्षात्कार घडून एकदा तर तो मूर्च्छित पडला. त्यानें यात्रेहून परत गेल्यावर संन्यास घेतला. कारण हिंदु धर्माचीं खुळचट जातिभेदाचीं बंधनें त्याला फार दुःसह होऊं लागलीं. म्हणून अगदीं तरुणपणीं कोणाचें कांहीं न ऐकता, संन्यास घेऊन पुरी येथील जगन्नाथाच्या देवळांत जाऊन राहिला. तेथील देवळाच्या आवारांत त्याच्या भक्तिभावनांना पूर्ण अवसर मिळून शिवाय जातीचें कसलेंहि बंधन पाळावें लागत नसे. तेथें त्याला पुष्कळ शिष्यसमुदाय मिळाला. कांहीं शिष्यांसमावेत त्यानें हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व क्षेत्रांची यात्रा आटोपली. इ.स. १५११ सालीं पुरी येथें तो परत आला. वृंदावनांत सहा वर्षें राहिल्यावर त्याच्या भक्तीची परमावधि झाली. इ. स. १५१६ चे सुमारास पुरीस परत आल्यावर तेथून १८ वर्षें आपले धर्मप्रसाराचें काम सतत केलें. सर्व बंगालभर त्याचे शिष्य व त्याच्या वैष्णव मताचा फैलाव झाला. पुरी येथें इ. स. १५३४ सालीं त्यानें देह ठेविला.

## पंथाचा प्रसार व अवनति

त्याच्या शिष्यांत सर्व जातींच्या विशेषतः खालच्या जातींच्या लोकांना भरणा जास्त होता. हरिदास नांवाच्या मुसलमानाला जवळ जवळ त्याच्या पट्टशिष्याचा मान होता. ब्राह्मणांच्या महादुराग्रहीपणाच्या चिथावणीमुळें मुसलमानांनीं बौद्ध विहारांचा जो भयंकर विध्वंस मांडिला, त्यामुळें नामांकित विद्वान् भिक्षु आणि भिक्षुणी आपले मठ आणि विश्वविद्यालयें टाकून नेपाळ, तिबेट, आसाम, ओरिसा वगैरे दूरदूरच्या प्रांतांत पळून गेले होते. त्यांच्या मागून वरिष्ठ वर्गाचे गृहस्थाश्रमी बौद्धांनींहि ' य: पलायति स जीवति ' हाच मार्ग स्वीकारला. मागें जे खालच्या जातींतले बौद्ध उरले त्या सर्वांना हिंदु धर्मांतील अस्पृश्य वर्गाचें मुकाट्यानें स्थान स्वीकारून नाइलाजानें जीव धरून गुजारा करावा लागला. अशा लोकांना चैतन्याच्या मन्त्रीशी शिष्यांनीं भराभर आपल्या कळपांत ओढून आपापल्या मोठमोठ्या आश्रमांचें पूर्व आणि पश्चिम भागांत सर्वत्र निर्माण जाळें पसरलें. प्रत्यक्ष चैतन्याचेंच शुद्ध चारित्र, उत्कट प्रेम, भक्तीचा गाढा भाव, मंत्र, वैराग्य, जातिभेदादि दुष्टांचा अभाव, त्यांच्या भक्तांची व्यवस्थेशीर घटना इ. अनेक कारणांमुळें चैतन्याच्या मागें हां हां म्हणतां त्याच्या पंथाचा विस्तार झाला; इतकेंच नव्हे, तर स्वतः चैतन्य म्हणजे विष्णूचाच अवतार, ही भावना पसरून त्याच्यात पूजेसाठीं मंदिरें उभीं राहूं लागलीं. जी स्थिति बौद्ध महायान पंथाची, तीच चैतन्य पंथाची होऊन, दोन तीन शतकांनंतर या पंथाच्या अवनतीलाहि सुरुवात झाली. एकाद्या थोर पुरुषामध्ये अतिशयित भक्ति, त्यामध्येंच अवतारवाद, त्याची मूर्तिपूजा, नंतर त्याच्या वंशानें

मंदिराचा उठाव, इतकें झाल्यावर त्याच्या नावानें पोटें जाळण्याचा धंदा, ही परंपरा हिंदुस्थानांतच नव्हे – तर सर्व जगांत सर्वत्र आढळतें. श्रीचैतन्याचा पंथहि ह्या दूषित परंपरेचेंच एक उद्वेगकारक उदाहरण झालें, असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं.

## इतर पंथ

भागवत धर्म हा पुरातन काळीं द्राविडांचा होता. पुढें शाक्यपुत्र गौतम बुद्धानें त्यांचा ऐतिहासिक काळीं उठाव केला. शैव, वैष्णव, जैन पंथांनीं अखिल भरतखंडांत आणि बौद्धांनीं तर सर्व आशियाभर त्यांचा प्रसार केला. पुढें महायान, मंत्रयान, वज्रयान इ. तांत्रिक अधोगतीच्या द्वारां बौद्धांचीच नव्हे तर शैव, वैष्णवादि हिंदु भागवतांचीहि अवनति कशी झाली, हें आम्हीं वर दाखविलें आहे. आतां येथें भागवत धर्माचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं पुनः द्राविडांनींच आधुनिक उत्कृष्ट भक्तीचा उठाव कसा केला, तो सर्व जातींच्या संतांनीं *अगोदर केल्यावर द्राविड ब्राह्मण आचार्यांनीं शास्त्र आणि काव्यग्रंथ लिहून त्या* धर्माला ग्रांथिक स्वरूप कसें दिलें; पुढें ह्या धर्माचा प्रसार प्रथम कर्नाटक, नंतर महाराष्ट्र, नंतर उत्तर हिंदुस्थान व बंगाल ह्या प्रांतांत कसा व कोणीं केला, हें वर सांगितलें. वल्लभाचार्यांनीं ह्याच धर्माचा उपदेश प्रथम काशी येथें करून तो पुढें गुजराथेंत केला. पण त्याच्या पंथांत लवकरच राधावल्लभी पुष्टिमार्गाचें बंड माजल्यानें व कांहीं अंशीं हाच वाममार्ग चैतन्याच्या वैष्णवमार्गांत झाल्यानें ह्या सर्वच पंथांची अवनति होणें क्रमप्राप्तच झालें. आतां भागवत धर्माची एक अत्यंत शुद्ध आणि उज्वल शाखा शीख धर्म ह्या नावानें हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. त्या धर्माचा विचार करून हा विषय आटोपूं.

## शीख धर्म

### मुसलमान संस्कृतीचा प्रवेश

खिस्ती शतकाच्या सहाव्या शतकांत इ. स. ५७० साली अरबस्थानांतील मक्का येथें मुसलमानी धर्माचा संस्थापक महमद पैगंबर हा जन्मला. ह्यानें स्थापलेला इस्लाम धर्म सेमेटिक् लोकांच्या धर्माची सुधारून वाढविलेली तिसरी आवृत्ति होय. एकदैवत्व, त्याची निराकार उपासना, मानवी समानता, स्वतंत्रता, बंधुता, वगैरे भागवत धर्माच्या मूळ तत्त्वाचा जोर जगांतील इतर धर्मांपेक्षांहि सेमेटिक् लोकांच्या धर्मांत मुळापासूनच कांहीं प्रमाणांत अधिक होता. पण इतर वैभवशाली मूर्तिपूजक राष्ट्रांच्या संसर्गानें मोजेसनें स्थापलेल्या इस्रायल धर्मांत पुढें पुढें मूर्तिपूजा, विधि, संस्कार, सोंवळेओवळें आणि जातिभेदाचें बंड वगैरे माजल्यानें,

येशु खिस्तानें ह्या धर्मांत सुधारणा केली. पण खिस्ती धर्माचा प्रसार विशेषेंकरून युरोपांत पश्चिमेकडे झाल्यानें, पश्चिम आशियांत आणि विशेषेंकरून अरबस्थानांत महमदाचे काळापर्यंत धर्मांचा गाढ अंधकार माजला होता. महमदाच्या आत्मिक पराक्रमानें सेमेटिक् धर्माला पूर्वींचें शुद्ध स्वरूप अरबस्थानांत प्राप्त झालें. इतकेंच नव्हे तर आत्मिक आणि राजकीय सत्ता ह्या दोन्ही महमुदामध्येंच केंद्रीभूत झाल्यामुळे त्याच्या प्रयत्नाला त्याच्या हयातींतच राजकीय स्वरूप प्राप्त होऊन, त्याच्या धर्माचा प्रसार अरबस्थानभर व थोडासा बाहेर झाला. त्याच्या मागे तर जवळ जवळ सर्व दक्षिण युरोपांत आणि पश्चिम आशियांत हिंदुस्थानाच्या सीमेपर्यंत हा धर्म लवकरच पसरला. बौद्ध धर्माची प्रेरणा गौतमानें केली व प्रसार अशोक राजानें केला; खिस्ती धर्माची प्रेरणा येशूनें केली व प्रसार कॉन्स्टंटाईन बादशहानें केला; इस्लामी धर्माची प्रेरणा आणि प्रसार दोन्हीहि महमुदानेंच केली म्हणून त्याच्या धर्मांत आत्म्याची प्रीति आणि तलवारीची शक्ति ह्या दोन्ही तत्त्वाला मान्यता आहे. हें शीख धर्माचा विचार करतांना ध्यानांत ठेवावें लागेल. इ.स. ६६४ सालीं महलव नांवाचा एक मुसलमान सरदार मुल्तानपर्यंत येऊन परत गेला. पुढें बगदादचे खलिफानें महमद कासीम नांवाच्या सरदाराला सिंध प्रांतावर पाठविलें. त्यानें दाहीर नांवाच्या राजपूत राजाला ठार मारून हा प्रांत काबीज केला. कासीमवर खलिफाची इतराजी होऊन तो मारला गेल्यानें आपसातल्या तंट्यामुळे मुसलमानांना पुढें ३०० वर्षें हिंदुस्थानाकडे येण्यास अवसर मिळाला नाहीं.

## पंजाब प्रांत

हिंदुस्थान हा एक देश नसून तो एक देशसमूह—निदान राष्ट्रसमूह—आहे, ह्यांत संशय नाहीं. गेल्या चार हजार वर्षांच्या इतिहासांत ह्या खंडप्राय देशाच्या सीमा पश्चिमेस इराणपासून पूर्वेस ब्रह्मदेश, सयाम, मलाया द्वीपकल्प, जावा सुमात्रा या बेटांपर्यंत आणि उत्तरेस बल्क, तिबेटापासून तों दक्षिणेस सिंहलद्वीपापलीकडील समुद्रापर्यंत वेळोवेळीं मागेंपुढें सरकल्या आहेत. धर्म व संस्कृतीच्या दृष्टीनें पाहतां आणि बौद्ध धर्माच्या प्रसारामुळे, ह्या देशांतील धर्म, भाषा चालरीति सर्व आशियाभर पसरलेल्या दिसतील व्यापाराचे दळणवळणाच्या दृष्टीनें पूर्वेस पासिफिक महासागरापासून तो पश्चिमेस अतलांतिकापर्यंत ह्या देशाच्या मौतिक संस्कृतीचा ममर्ग पोंचत आहे. ह्या विशाल दृष्टीनें पाहूं गेल्यास पंजाब प्रांत हा भरतवर्षांची हद्द नसून जवळ जवळ मध्यबिंदु म्हटला तरी चालेल. आर्यांच्या विशिष्ट संस्कृतीच्या दृष्टीनें पाहिलें तरी पंजाबच भारताचा मध्यबिंदु हें ठाम ठरतें. सिंध आणि पंजाब येथें आज जरी मुसलमानांची बहुसंख्या आहे, अफगाणिस्थान, बलुचिस्थान येथें तर निव्वळ मुसलमानांचीच वस्ती दिसत आहे, तरी गेल्या सहस्रकांत ह्या सर्व भागांतून बौद्ध अथवा शैव धर्माचा प्रसार असून, हा भाग भरतखंडांतील एक प्रांत म्हणून मोडत

होता आणि वंशाने व भाषेने बलुचिस्थानचे लोक द्राविड आणि अफगाणिस्थान व पंजाबचे लोक तुर्की–आर्य आहेत, हेंहि तज्ज्ञांना माहीत आहेच. शीख धर्माचें ऐतिहासिक विवेचन करण्यापूर्वी ह्या वरील भौगोलिक व संस्कृतिक गोष्टी निश्चितपणानें ध्यानांत बाळगल्याशिवाय शीख धर्माचें वैशिष्ट्य आणि स्वारस्य मनांत नीट भरणें कठीण पडणार आहे.

शीख धर्म हा अस्सल हिंदु धर्म आणि जगांतील एक सर्वात अत्यंत शुद्ध भागवत धर्म आहे, ही गोष्ट निरपेक्ष इतिहासज्ञांशिवाय इतरांस किंबहुना पुष्कळशा शिखांनादेखील असावी तशी अवगत आहे कीं नाहीं ह्याची शंकाच आहे. कारण अशी सुसंस्कृत जाणीव असण्याला तौलनिक धर्माचें यथार्थ ज्ञान असावें लागते. महमद कासीमची सिंधवर स्वारी झाल्यावर पुढें तीनशें वर्षांनीं गिझनीचा पहिला सुल्तान महमद ह्यानें इ. स. १००१ पासून १०२४ पर्यंत हिंदुस्थानावर १७ स्वाऱ्या केल्या. *ह्या स्वाऱ्यांत त्याचा धर्मप्रसाराचा बहाणा होता.* ह्यानंतर चारपांचशें वर्षे मुसलमानांचा धर्म आणि राजसत्ता हिंदुस्थानांत सारखी वाढूं लागली. त्यांच्या संस्कारानें भाजून निघालेले व शुद्ध झालेलें हिंदु धर्माचें स्वरूप म्हणजेच शीख धर्म होय.

## नानक चरित्र

शीख धर्माचा संस्थापक गुरु नानक हा लाहोर जिल्ह्यात तळवंडी ह्या गांवीं इ. स. १४६९ सालीं वैशाख शुद्ध तृतीयेला जन्मला. त्याच्या बापाचें नांव काल्‌ू आणि आईचें नाव तिप्ता. काल्‌ूचें कुल क्षत्रिय असून धंदा तलवंडीच्या कुळकर्णीपणाचा होता. नानक सात वर्षांचा झाल्यावर त्याला शाळेत पाठविण्यांत आलें. पण आपणांस शिकविण्याची योग्यता शिक्षकांत आहे काय, असें त्यानें विचारलें; कारण त्याला ईश्वरी ज्ञान शिकावयाचें होतें. नानकानें स्वभावेप्रमाणें पार्शी भाषेचाहि चांगला अभ्यास केला. त्या भाषेंतील इस्लामी धर्माच्या ज्ञानामुळें त्याच्या भावी धार्मिक मनावर परिणाम झाला असावा. तो नऊ वर्षांचा झाल्यावर मुंज करून जानवें घालण्याचा विधि झाला. तेव्हां त्यानें एक कविता केली कीं, दया हा कापूस, समाधान हा दोरा, संयमन ही गाठ आणि सत्य हा पीळ, असें जानवें मळत नाहीं कीं तुटत नाहीं. एरव्हीं मनुष्य मेला कीं इतर सुताचें जानवें गळून पडतें आणि आत्मा जानव्याशिवायच जातो. मग अशा सुताच्या जानव्याचा काय उपयोग ? पुढें नानकाचें लक्ष कांहीं केल्या संसाराकडे लागेना म्हणून त्याच्या आईबापाला फार काळजी पडली. कोणी म्हणूं लागले, नानकाला खूळ लागलें ! कोणी त्याला आजारी समजून गावच्या वैद्याला बोलावून आणिलें. नानक हसून म्हणाला, 'आजार माझ्या मनांत आहे, तर तो माझ्या हाताची नाडी पाहून कसा कळेल ?' पंजाबचा सुभेदार दौलतखान नांवें मुसल्मान होता. त्याचा एक कारभारी जयराम नांवाचा हिंदु सुल्तानपूर येथें राहात होता. तो नानकाचा

मेहुणा होता. त्याच्या वशिल्यानें शेवटीं नानकास कोठी कामगार नेमण्यांत आलें. कांहीं दिवस काम चांगलें केल्यावर नानकानें पूर्वीप्रमाणेंच टाळाटाळी चालविली. रानांत जाऊन तो तीन तीन दिवस बसे, "कोणी हिंदु नाहीं व कोणी मुसलमानहि नाही" असें तो वरचेवर म्हणे. मुसलमानाच्या काजीला राग येऊन त्यानें नानकास सुभेदारापुढे उभें केलें. नानक गाऊं लागला, "दया ही मशीद, प्रामाणिकपणा हेंच आसन, न्याय आणि कायदा हेंच कुराण, विनय हीच सुन्ता, सभ्यता हाच उपवास व असानेंच मनुष्य मुसलमान होतो" असें नानकानें आपल्या म्हणण्याचें तात्पर्य सांगितलें. इतक्यात नमाजाची वेळ झाली म्हणून काजी मशिदींत गेला. नानकहि त्याचे मागोमाग गेला. काजी प्रार्थना करूं लागला, तर नानक हसूं लागला! काजीनें कारण विचारतां नानक म्हणाला, 'काजीचें लक्ष प्रार्थनेकडे नसून त्याचें शिंगरूं सुटून आडांत पडेल, ह्या विचाराकडे त्याचें सारें लक्ष लागलें आहे!' काजी खजील झाला!!

नानकाचा मर्दाना नांवाचा डोम जातीचा एक स्वामिनिष्ठ शिष्य होता. त्याला घेऊन नानक यात्रेला निघाला. कामरूप (आसाम) नंतर जगन्नाथपुरी येथे जाऊन आणि सर्व पूर्व हिंदुस्थानभर फिरून परत पंजाबात आला. नंतर दोघे पाकपट्टण येथें शेख फरीद हे मुसलमानी क्षेत्र पाहावयास गेले. तेथील साधु शेख इब्राहिम हा नानकाचा अनुयायी झाला. पुढें नानक सय्यदपुरास गेला असतां, त्या गांवावर लवकरच बाबरानें हल्ला केला; आणि बहुतेक सर्व लोकांची कत्तल केली. ह्याचा हृदयद्रावक उल्लेख नानकानें आपल्या कवनांत केला आहे. त्या वेळीं बाबरचा सरदार मीरखान ह्यानें नानक आणि मर्दाना ह्यांना कैद करून कामाला लावलें. नानकाच्या डोक्यावर जें ओझें दिलें होतें तें एका हाताच्या अंतरावर अंतराळांतच राहिलें असलेला चमत्कार मीरखानानें पाहिला. बाबरहि नानकाला पाहावयाला तुरुंगांत आला. असा साधु ह्या गांवांत आहे, असें कळलें असतें, तर ही कत्तल मीं केली नसती, असें तो म्हणाला. मग नानकाच्या त्यानें मोठा सत्कार करून त्याच्या सांगण्यावरून सर्व बंदीवानांना मुक्त केलें. ह्यानंतर एका पंजाबी व्यापाऱ्यानें शीख धर्माची दीक्षा घेऊन तो व्यापारानिमित्त सिलोन येथे गेला. त्याच्यामार्फत सिलोनचा राजा शिवनाम ह्याचें लक्ष शीख धर्माकडे वळलें. पुढें नानक दोघा शिष्यांना घेऊन दक्षिणेंत मद्रासकडे यात्रेस गेला. तेथें कांहीं जैन सन्याशांना त्यानें शीख केलें. पुढें पूर्व समुद्रांतील कांहीं बेटात (लखदीव, मालदीव) त्यानें आपल्या धर्माचा प्रचार करून मग सिंहलद्वीपांत गेला व तेथील राजाला शीख धर्माचा उपदेश केला. याच ठिकाणीं त्यानें आपलें प्राणसंगली नांवाचें स्तोत्र रचिलें.

सिंहलद्वीपाहून परत आपल्या देशीं गेल्यावर नानकानें कित्येक हिंदु पंडित, योगी, गोसावी, फकीर वगैरेंना शीख धर्माची दीक्षा दिली. नंतर तो काश्मिरांतून हिमालयांत गेला. तेथून पुढें वायव्येकडे पेशावर, कंदाहार, वगैरे मुसलमानी क्षेत्रांची यात्रा त्यानें केली. त्यानंतर तो मक्केच्या यात्रेला निघाला, त्या वेळीं त्यानें मुसलमान फकिराचा वेष घेतला होता. बरोबर मर्दाना होताच. मक्केस जाईपर्यंत तो पारच थकला.

तेथें गेल्यावर मक्केच्या मशिदींतील काब्याकडेच पाय करून निजला. एका मुसल्मानानें त्याला रागानें उठविलें. त्याचे पाय जातील तिकडे सर्व मशीद फिरूं लागली, तेव्हां त्याच्या भोंवतीं तेथील सर्व मुल्ला जमले. ते विचारूं लागले कीं, हिंदु धर्म श्रेष्ठ कीं मुसल्मानी धर्म श्रेष्ठ ? नानकानें उत्तर केलें, 'सत्कृत्याशिवाय दोन्ही धर्म व्यर्थ आहेत. ज्याअर्थी दोन्ही धर्म एकमेकांचा द्वेष करतात, त्याअर्थी ते दोन्हीहि खोटेच आहेत.' हें ऐकून सर्व मुल्लांनीं व मुख्य गुरूनेंहि त्याचा सत्कार केला. ह्यानंतर नानकानें मर्दाना, बगदाद, वगैरे ठिकाणीं जाऊन आपल्या सार्वत्रिक धर्माचा संदेश गाजविला. स्वदेशीं परत आल्यावर लवकरच त्याचा एकनिष्ठ शिष्य मर्दाना वारला. ह्या वेळीं नानकाच्या भोंवतीं शिष्यसमुदाय पुष्कळ जमला होता. पण त्यांपैकीं थोडेच खरे होते. त्यांची परीक्षा केली असतां लहिना नांवाचा एक शिष्य खरा ठरला. नानकाला दोन मुलगे, श्रीचंद आणि लक्ष्मीदास नांवाचे होते; पण दोघेहि त्याच्या गुरुपणाचा वारसा चालविण्याला नालायक होते, म्हणून त्यानें आपल्या मागें अंगदाला आपल्या जागेवर नेमलें. इ. स. १५३८ साली आश्विन शुद्ध दशमीचे दिवशीं नानकानें समाधि घेतली. मुसल्मानांनीं त्याच्या नांवानें रावी नदीचे कांठीं मशीद बांधली, आणि हिंदूंनीं देऊळ बांधिलें. पण हीं दोन्हीहि पुढें पुरानें वाहून गेलीं व भांडणाचें मूळच गेलें.

## पंथभेद

*गुरु नानक वारल्यावर त्याच्या पंथांत फूट पडूं लागली. अंगदाला गुरु नेमलेले त्याच्या मुलांना आवडलें नाहीं. त्याच्या कांहीं शिष्यांनीं श्रीचंद नांवाच्या त्याच्या वडील मुलाला आपला गुरु* करून, निराळा पंथ काढिला. त्याला उदासी असें म्हणतात. त्यांतील आनंदघन नांवाच्या एकानें श्रीचंद हा देवाचा अवतार बनवून त्यासच खरा वारस ठरविलें. ह्यानंतर मिना नांवाचा दुसरा एक पंथ निराळा झाला. नानकानंतर शीख धर्माचे दहा गुरु झाले. त्यांतील चौथा गुरु रामदास ह्याला पृथ्वीचंद, महादेव आणि अर्जुन हे तिघे मुलगे होते, पैकीं तिसरा अर्जुन हा आज्ञाधारक होता, म्हणून त्यालाच गुरु करण्यांत आलें. पृथ्वीचंदानें रागावून आपला निराळा पंथ काढिला, त्याला मिना (ढोंगी) हें नांव पडलें. तिसरा गुरु अमरदास ह्यानें दयाल नांवाच्या एका ब्राह्मण शीख धर्माची दीक्षा दिली होती. त्यानें पुढें तिसरा पंथ काढिला. त्याचें नांव दंदाली असें पडलें. त्याचाच पुढें निरंकारी असें नांव पडलें. शिखांच्या मंदिरांतून कोणत्याहि मूर्तींची पूजा होत नसते. ग्रंथसाहेब म्हणून त्यांचा धर्मग्रंथ आहे, तोच पूज्यस्थानीं ठेविलेला असतो. ह्या पुस्तकांत गुरु नानक, अंगद, अमरदास, रामदास, अर्जुन, तेजबहादूर आणि गुरु गोविंद ह्यांच्या गुरूंचीं वचनें संग्रहित केलेलीं आहेत. शिवाय ह्या गुरूंचे बरोबर जे भक्त होते त्यांनीं केलेलीं स्तुतिपर वचनेंहि ह्यांत आहेत. त्याशिवाय नामदेव, जयदेव,

रामानंद, कबीर, मिराबाई, ' रोहिदास, सेना, पीपा वगैरे एकवीस निरनिराळ्या वैष्णव साधूंच्या वचनांचाहि त्यांत समावेश करण्यांत आला आहे.

## गुरु गोविंदसिंग

मुसल्मानांची पूर्वपीठिका सांगतांना त्या धर्मामध्यें तलवारीच्या शक्तीचा समावेश महमुदाच्या काळापासूनच कसा झाला होता, हें वर सांगितलेंच आहे. हा समावेश मुसल्मानी धर्माचें वैशिष्ट्य आहे. मुसल्मान आपला धर्म केवळ तलवारीच्या जोरावरच पसरून तृप्त न राहता तलवारीच्या जोरावर आपला पशूपणाहि जेव्हां व्यक्त करूं लागले, तेव्हां शीख गुरूंना हें तलवारीचें तत्त्व केवळ स्वसंरक्षणार्थ स्वीकारावें लागलें, व ही तेजस्वी कामगिरी गुरु गोविंदानें बजावली.

पांचवा गुरु अर्जुन ह्याचा सेलीम बादशहानें फार क्रूरपणानें वध केला. नववा गुरु तेजबहादूर ह्याला औरंगजेबानें दिल्ली येथें ठार मारलें; आणि त्याच्या शरीराचे चार तुकडे करून चारी बाजूंच्या वेशीवर टांगले. ह्या भयंकर कृत्याचा परिणाम तेज-बहादूराचा तेजस्वी मुलगा गोविंदराय ह्याच्या मनावर कायमचा झाला. त्यानें शीख लोकांचें स्वसंरक्षणाला समर्थ असें एक पथक—लढाऊ राष्ट्र—तयार करण्याचा घोर पण केला व तो पूर्णपणें सिद्धीस नेला. गुरु गोविंद हा शिखांचा दहावा आणि शेवटला गुरु होय. हा लहानपणापासून धनुर्विद्येंत फारच निष्णात होता. ह्या वेळी पंजाबांत जरी मोंगली सत्ता स्थापन झाली होती, तरी निरनिराळ्या डोंगरी मुलखांतून लहान लहान रजपूत राजे आपापल्या किल्ल्यांतून आपली शिबंदी फौज ठेवून आपला स्थानिक अम्मल चालवीत होते. अशांपैकीं भीमचंद नांवाच्या एका रजपूत राजाशीं गुरु गोविंद ह्याच्या वेळोवेळीं झटापटी होत. ह्या झटापटींच्या द्वारें शिखांना *लष्करी* वळण लागलें! गुरु गोविंदानें ह्याप्रकारें आपल्या धार्मिक कामाशिवाय राजकीय तयारीची चळवळ चालविली, हें त्याच्या सामान्य पंगू शिष्यवर्गाला बरें वाटत नसे. त्यांनी त्याच्या वृद्ध आईच्या-मार्फत पुष्कळ रदबदली करून पाहिली. पण गोविंदानें आपला बाणेदार निश्चय रतिभर ढळूं दिला नाहीं. त्याच्या मसनदांपैकीं ( एजंट ) बरेच जुल्मी व बडखोर झाले होते. अशा अपराध्यांना योग्य शिक्षा देऊन सर्वांना त्यानें आपल्या हुकमतीखालीं आणिलें. *गोविंद नुसता मिणमिणीत गुरु नसून झणझणीत बादशहाहि होता,* असें त्या वेळच्या उद्दाम बादशाहीला भासूं लागलें.

एकदा कांहीं शिखांनीं येऊन गुरु गोविंदाजवळ फिर्याद दिली कीं, तुर्कांचा छळ फार झाल्यामुळें गुरुच्या दर्शनाला येणेंहि पुष्कळांना शक्य होत नाहीं. तुर्कांचा अर्थात् गुरूलाहि त्रेप आलाच होता. म्हणून त्या गनिमांच्या कायमच्या बंदोबस्तासाठीं व शीख राष्ट्राच्या संरक्षणासाठीं त्यानें पुढील बेत केला. वैशाखी पौर्णिमेच्या दिवशीं

आपल्या सर्व शिखांचा एक दरबार आनंदपूर येथील आपल्या राजधानींत भरविला. वैशाख शुद्ध पौर्णिमा हा हिंदुस्थानांतील सर्व द्राविड क्षत्रियांचा मोठा राष्ट्रीय सण फार पुरातन काळापासूनचा आहे. बुद्धाचा जन्म आणि निर्वाणप्राप्ति ह्याच दिवशीं मानण्यांत येते. सर्वजण जमल्यावर गुरु गोविंदानें आपली तलवार म्यानांतून उपसली आणि गुरुसाठीं कोण निष्ठावान् शिष्य आपल्या प्राणांची आहुति देण्यास तयार आहे? असें खडसून विचारलें! सर्वजण घाबरून गेले. एकदा, दोनदा व तीनदा गुरूनें हा भयंकर सवाल केल्यावर दयाराम नांवाचा लाहोरचा एक शीख पुढें येऊन त्यानें आपली मान पुढें केली. गुरूनें त्यास पडद्याआड नेलें. रक्ताचा ओघ पडद्याबाहेर दिसूं लागला. रक्तानें भरलेली तलवार घेऊन बाहेर येऊन गुरूनें आणखी कोण शिष्य मजसाठीं आपलें शिर अर्पण करण्यासाठीं तयार आहे, असें दरडावून विचारलें. दिल्लीचा दुसरा धर्मदास नांवाचा पुढें आला. एकामागून एक असे द्वारकेचा मुहकमचंद, बेदरचा साहिबचंद, जगन्नाथचा हिंमत पुढें आले असतां अशा पांचहि शिखांना पडद्याआड करीतोपर्यंत दरबारांतून बरेचसे ऐतखाऊ शीख नाहींसे झाले होते. पण उरले ते करारी व निधड्या छातीचेच राहिले होते. मग गुरु गोविंदानें मोठ्या आवेशानें पडदा एकीकडे सारून ते पांचहि कट्टे शिष्य एका रांगेनें बसलेले जमलेल्या मंडळींना दाखविले. त्याच्याऐवजीं पडद्याआड प्रत्येक वेळीं त्यानें एकेक बकरा कापून त्याचें रक्त दाखविलें होतें. तो सर्वांना उद्देशून मोठ्यानें ओरडून म्हणाला, "शिष्यांनो, बाब गुरु बाबा नानकाचे वेळीं अंगद हा एकच शिष्य मिळाला! आतां मला पाच शिष्य मिळाले आहेत!! ह्या पाचांनीं आज नव्या शीख राष्ट्राचा पाया आपलें रक्त अर्पण करून घातला आहे." सर्वांनीं विस्मित होऊन त्या पंचांना धन्यवाद देऊन साष्टांग प्रणिपात केला. गुरु पुढें म्हणाला, "बाबा नानकाच्या वेळेपासून गुरूनें चरणतीर्थ देण्याची वहिवाट चालत आली आहे. त्यापुढें शिखांचा खालसा (संस्थान) तलवारीच्या आणि शौर्याच्या बळावरच चालणें शक्य आहे. म्हणून मी आतांपासून तलवारीनें हालविलेलें पाणी पाजून शीख दीक्षा देण्याची चाल पाडतो. आतांपर्यंत जे *शीख होते म्हणजे शिष्य होते, ते ह्यापुढें सिंग (सिन्ह) म्हणजे राजे होतील!* ह्यापुढें सर्वांनीं एकच धर्म स्वीकारावा. चारी जाती अत:पर नष्ट झाल्या. सर्व आम्ही आतापासून भाऊ झालों. कोणी वरिष्ठ नाहीं, कोणी कनिष्ठ नाहीं; गंगा अगर दुसरें *कोणतेंहि तीर्थ कोणी मानूं नये. राम, कृष्ण, ब्रह्मा, दुर्गा इ. देवतांचा त्याग करून* केवळ नानक आणि शीख गुरूवरच निष्ठा ठेवावी. ह्या वेळीं सुमारें वीस हजार माणसांनीं उभे राहून ह्या नवीन जहाल धर्माची दीक्षा घेतली. त्यात कित्येक वैश्य, क्षत्रिय व इतर शून्य मनांचे हिंदूहि होते. बाकी केवळ तमासगीरच होते.

गुरु गोविंदानें ह्यानंतर त्या पाच शिष्यांना श्रीमत् अकालच्या नांवानें खड्गधारेनें हालविलेल्या पाण्याची अभिषेक दीक्षा दिली. त्यानंतर त्याच्यापुढें स्वत: आपण उभा राहून त्या पांचांनीं आपणांस अकाली धर्माची दीक्षा देण्यास नम्रपणानें विनंती केली.

सर्वांस आश्चर्य वाटलें ! ! त्यांना सर्वांना गुरु गोविंदानें समजावून सांगितलें. अतःपर गुरूंची परंपरा बंद करण्यात आली आहे ! खालसा हाच गुरु आणि गुरु हाच खालसा ! ! ! म्हणून मलाहि तुम्हीच आतां खालशांत सामील करून घेणें इष्ट आहे ! त्या पांचांना "पंचिप्यारा" पांच लाडके असें नांव पडलें. केस, कंगवा, कृपाण, कच्छ (आंखूड चोळणा) आणि कडे हीं शिखांचीं पाच लक्षणें प्रत्येक शिखानें धारण करणें, तेव्हांपासून अवश्य झालें आहे. ही गोष्ट इ. स. १६९९ सालीं घडली. हे पांचहि लाडके अगदीं हलक्या जातींतले व कुळांतलेच होते. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ह्या त्रैवर्णिकांपैकीं कोणीहि हरीचा लाल नव्हता, ही ध्यानांत ठेवण्यासारखी मर्मी गोष्ट आहे. इतकेंच नव्हे तर स्वराज्य अथवा ऐहिक स्वातंत्र्य मिळवायचें आणि टिकवावयाचें असल्यास तलवारीचें बळ आपल्या मनगटानें चालविणेंच अवश्य आहे हा गुरु गोविंदाचा धडा महात्मा गांधीनेंहि शिकण्यासारखा आहे !

ह्यानंतर गुरु गोविंदसिंगास औरंगजेबाच्या प्रचंड सत्तेशीं अविश्रांत आणि आमरण झुंजावें लागलें. त्यांत त्यानें आपल्या सर्वस्वाची आहुति कशी दिली, हें कथानक अखिल मानव जातीच्या इतिहासांत अत्यंत हृदयविदारक आणि स्फूर्तिकारक आहे. आपली राजधानी टाकून आपल्या कुटुंबाला घेऊन तो देशोधडीला लागला. बायकामुलांची ताटातूट झाली. त्याचे दोन तरुण मुलगे लढाईंत पडले. वृद्ध आई व पत्नी हाय हाय करून मेल्या. त्याचे दोन लहान नातू एका ब्राह्मणाच्या घरीं दडून होते. पण क्षुल्लक बक्षिसाच्या आशेनें त्या नीच ब्राह्मणानें, सरहिंदचा सुभेदार वझिरखान ह्याच्या हवालीं त्याना केलें. मुसलमान होत असल्यास जिवंत ठेवूं, नाहीं तर त्या दोन्ही अर्भकांस ठार मारण्यांत येईल, असें वझिरखानानें फर्माविलें. पण त्या शूर अर्भकांनीं आनंदानें मरण पत्करलें ! ! ! तरी पण अखेरपर्यंत गुरु गोविंद औरंगजेबाच्या हातीं लागला नाहीं. इ. स. १७०७ सालीं औरंगजेब वारल्यावर त्याचा मुलगा बहादूरशहा तख्तावर बसला. त्यानें गुरु गोविंदसिंगाशीं सलोखा केला, व त्याची मदत मागितली. पुढें गुरु गोविंदसिंग दक्षिणेंत निजामशाहींत नांदेड गावीं एक शीख मंदिर आहे, तेथें जाऊन आपल्या अंतकाळची वाट पाहात राहिला. नांदेडचें मूळचें नांव 'नऊ नंद डेरा' असें होतें. तेथें एके दिवशीं गुरु एका जमातीला उपदेश करीत असता एका अफगाण मांपफिरल्या तो न आवडून त्यानें एकदम गुरूच्या अंगावर वार केला. त्यामुळे गुरु कांहीं दिवस अत्यवस्थ आजारी होता. बहादूरशहानें आपल्या दरबारी वैद्यास जखम बरी करण्यास दिल्लीहून पाठविलें. ती बरी होत आली होती; पण एके दिवशीं अंगांत शक्ति नसतांहि एक धनुष्य खेंचण्याचा अवेळ प्रयत्न केल्यामुळे त्याच्या जखमेचे टाके तुटले. पुढें दुसरें अमाध्य होऊन हा हिंद देवीचा अत्यंत तेजस्वी सत्पुत्र इ. स. १७०८ सालीं कार्तिक शुद्ध पंचमीचे दिवशीं निजधामास गेला.

आमची भागवत धर्माच्या विकासाची गोष्टहि येथेंच संपली. पुढें रणजितसिंगानें शिखांचें स्वतंत्र राज्य स्थापिलें. इतकेंच नव्हे तर आजकालच्या अमाली [illegible]

# २

## मराठ्यांची पूर्वपीठिका

अथवा

## रष्ट्रवंशोत्पत्तीविषयीं शास्त्रीय विचार

हा प्रयत्न निर्णायक मुळींच नाहीं. केवळ दिग्दर्शक आहे. असल्या प्राचीन विषयाचा निर्णय लावूं पाहणें केव्हां केव्हा हास्यास्पद होतें. हें जाणून त्याची जवळ जवळ दिशा जरी दाखवितां आली, तरी मी स्वतःस कृतार्थ समजेन. शिवाय माझा दुसरा एक हेतु आहे. तो तरुण विद्यार्थ्यांना अनुलक्षून आहे. ह्याच विषयाचा विचार मागें एकदा मी भारतीय इतिहास संशोधक मंडळापुढें केला होता. त्या वेळीं माझा हेतु आर्य आणि अनार्य ह्या शब्दांचा प्रचार आणि तज्जन्य कांहीं दृढमूल झालेल्या तीव्र भावना विद्वान् म्हणविणाऱ्यांमध्येंहि असलेल्या पाहून, त्या कशा अनैतिहासिक आहेत हें दाखविण्याचा होता. कॉलेजांत उच्च शिक्षण घेणाऱ्या तरुणांना अशा भरमसाट भावनांचा वेळींच उतारा मिळून, त्यांना विशाल विचारांची संवय लागेल, ह्या आशेनें मी त्यांचेपुढें हा विषय ठेवीत आहें.

आजचा विषय, मराठे हे क्षत्रिय आहेत कीं नाहींत, किंवा ते अतिशूद्राहून वाईट आहेत कीं ब्राह्मणाहून चांगले आहेत वगैरे, असल्या भावनांचें विवेचन करण्याचा नाहीं. ते मूळ दक्षिणेंतील, किंबहुना हिंदुस्थानांतील आहेत काय? नसल्यास बाहेरील कोणत्या मुख्य मानववंशांतील ते असावेत, हें पाहण्याचा आहे. मानववंशशास्त्र हा विषय अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. पाश्चात्य विद्वानांत तौलनिक भाषाशास्त्राचा उदय झाला. नित्य नवीन शोधामुळें ह्या दोन्ही शास्त्रांची घडी अद्यापि नीट बसलेली नाहीं. नदीच्या मुळाहून माणसांचें कूळ शोधणें अत्यंत कठीण आहे. तरी तें सर्वाचें हित

शोधण्याप्रमाणें अशक्य आणि मूर्खपणाचें नाहीं. निदान त्यांत कांहीं घोर पाप तरी खास नाहीं. मात्र शोधकानें निर्भीड असलें पाहिजे. शक व द्राविड म्हणजे कोणी तरी नीच आणि हीन जात, आणि आर्य व मोंगल म्हणजे कोणी तरी निर्मळ उच्च जात अशा भावना ज्यांच्या मनाच्या तळाशीं तळ देऊन बसलेल्या असतात अशांना इतिहासशास्त्रांत गतीच नाहीं. शक द्राविडांप्रमाणें आर्य म्हणून कधींकाळीं एखादा विशिष्ट मानववंश होता कीं नव्हता ह्याबद्दल आज विद्वानांत मोठा वाद माजून राहिला आहे. 'ज्ञानकोश'कारांच्या परिश्रमामुळें तर नास्तिपक्षांत मोठीच भर पडली आहे. आर्य म्हणून एखादा वंश अगर वंशसंघ असला तरी भरतवर्षांत प्राचीनकाळीं त्याची जी निर्मळ श्रेष्ठता गाजत होती, ती त्यांची केवळ स्वयंमन्य कल्पित होती हें खरें.

आजच्या विषयाला तीन प्रकारच्या पुराव्यांची मदत घेण्यात आली आहे : [१] *लिखाणाचा आणि लिखित इतिहासाचा*, [२] *नांवांचा व भाषाशास्त्राचा*, [३] *चालीरीति आणि समाजशास्त्राचा*. पैकीं पहिला फारच दुर्लभ, त्रोटक आणि अपुरा आहे. अप्रत्यक्ष रीतीनें ज्याचा संबंध लावतां येईल असा मला जो कांहीं पुरावा मिळाला, त्याचा उल्लेख मीं शेवटीं केला आहे. प्रथम आपण दुसरा म्हणजे नावाचाच घेऊं. कारण हा जितका विपुल मिळतो, तितकेच त्याचे धागेदोरेहि पुरातनकाळांत मागें फार दूरवर जाऊन पोंचतात, ही मोठी विशेष गोष्ट आहे. दोनचार पुरातन शब्दांचा ह्या लोकांच्या 'मराठे' ह्या जातीय ऊर्फ राष्ट्रीय नांवांत इतका बेमालूम लय झाला आहे कीं, त्यामुळें ह्या लोकसमूहाला एक एक वैशिष्ट्य प्राप्त झालें आहे. त्यामुळें हा समूह विशिष्ट संघटना पावलेला एक स्वतंत्र मानववंश असावा असें समजण्यास कारणें दिसत आहेत. हें म्हणणें हिंदुस्थानांतील सन १९०१–१० सालांच्या सेन्सस रिपोर्टांतून वेंचून घेतलेल्या खालील आकड्यांवरून ध्यानांत येईल.

| रट्टवंश | | रजवंश | |
|---|---|---|---|
| राठी, पंजाब | ९७७९८ | राजपूत | ९४३००८५ |
| मराठे | ५०८७४३६ | रावत | १५५०७५ |
| कुणबी | ४५१२७३७ | रावुनिया | १७५९७ |
| | .......... | राव | १२८९५ |
| | ९६००१७३ | रावळ (राजपुताना) | ४८१५ |
| रट्टी | | रावकिया (बडोदें) | ७८१८९ |
| मुंबई | ५०५१५ | राजू (मद्रास) | १०३१२३ |
| मद्रास | २५७६४४८ | राचेवार (म्हैसूर) | ५९८२ |
| | ...... ..... | | ............ |
| | एकूण १२३२४५३४ | | एकूण ९८०७७७२ |

ज्यांच्या जातीय नावामध्यें रट्ट आणि राज ह्या दोन शब्दांचे पर्याय समाविष्ट झाले आहेत, अशा दोन लोकसमूहाचा वर पृथक् पण समांतर निर्देश केला आहे. ह्या-

वरून वंशदृष्ट्या हे दोन्ही भिन्न आहेत असें दर्शविण्याचा माझा उद्देश नाहीं किंवा तसें माझें मतहि नाहीं. उलट हे दोन्ही संघ आज हिंदुस्थानांत अलग राहात असूनहि एक-मेकांशीं नांवानें कसे संबद्ध आहेत हें खालील आंकड्यांवरून दिसून येतें.

| | |
|---|---|
| राठोड ( मारवाड, बिकानेर, किशनगर. ) | १,२२,१६० |
| चव्हाण ( बुंदी, कोटा, शिरोही. ) | ८६,४६० |
| यदु ( करोळी, जसलमीर. ) | ७४,६६० |
| परमार ( उज्जनी......... ) | ४३,४३५ |
| सोळंकी | १८,९४४ |

ह्या आंकड्यांत राठोडच नव्हे तर परमार ( पवार ), सोळंकी ( सालुखे, चाळके, शेळके ), यदु (यादव, जाधव), चव्हाण हीं अस्सल मराठ्यांची नांवें प्रामुख्यानें आहेत व आणखीहि पुष्कळ मराठ्यांचीं नांवें उत्तरेकडील अस्सल राजपुतांत सहज सापडण्या-सारखीं आहेत; पण नांवांपलीकडे ह्या उत्तरेकडील राजपुतांत व दक्षिणमधल्या मराठ्यांत आतां शरीरसंबंध फारच थोडा उरला आहे, किंबहुना नाहींच म्हणण्यासारखा आहे. तसाच पंजाबांतील राठी, महाराष्ट्रांतील मराठे व दक्षिणेंतील रड्डी यांच्यांतहि पण संबंध राहिलेला नाहीं. तरी तेवढ्यावरून ह्यांच्यांत मूळचा जातीय संबंध नव्हता, असें मुळींच म्हणता येणार नाहीं. मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें पाहता वरील रट्टवंश आणि राजवंश ह्यांच्यांतच नव्हे तर राठी, मराठे, रड्डी ह्यांच्यांतहि चालीरीतींची परंपरा, धर्म, पेहराव, प्रकृतिस्वभाव, राज्यपद्धति, भरतखंडाबाहेरील संबंध, भरतखंडांतील फैलाव, शरीरसंबंध, शारीरिक साम्य, ऐतिहासिक कामगिरी व धंद्यांची परंपरा अशा अनेक दृष्टींनीं ऐक्य दिसत आहे. त्यांतल्या त्यांत रट्ट व राजपूत हे वंशानें एक आहेत हे सिद्ध करणें जितकें सोपें आहे, त्याहून ते भिन्न आहेत हे सिद्ध करणें फारच अधिक कठीण आहे.

पन्नास लाख मराठ्यांमध्यें पंचेचाळीस लाख कुणब्यांची भर पडली आहे; तशी राजपुतांत नाहीं. ही शंकाहि राजपुतांहून मराठ्यांना भिन्न समजण्याला फारशी उपयोगी पडत नाहीं. कारण एक तर मराठा कोण व कुणबी कोण हे नक्की वेगळे करणें अगदीं दुरापास्त झालें आहे. पुणें-सातान्याकडे मराठ्यांपेक्षा कुणबी किंचित् कमी समजले जातात, तर वऱ्हाड-नागपुराकडे कुणबी मराठ्यांहून आपणास जास्त समजतात. शिवाय हा कमीजास्तपणा केवळ दर्जाचा आहे जातीचा अगर वंशाचा आहेच असें सहसा सांगतां येत नाहीं. जमिनीचा मालक म्हणजे मराठा आणि वाहक म्हणजे कुणबी असा अर्थ महाराष्ट्रापुरताच आहे. वऱ्हाडकडे तसा मुळींच नसून, कुणबी म्हणजे तेथील वतनदार रहिवासी आणि मराठा म्हणजे उपऱ्या असें समजण्यांत येतें. शरीरसंबंधानं हा भेद दोन्ही देशांत पाळण्यांत येत नाहीं, त्याअर्थीं हा भेद सेन्सस रिपोर्टांत आता उगाच दाखविण्यांत येत आहे, अशीहि तक्रार आहे, व ती बऱ्याच अंशीं खरी आहे.

कुणबी म्हणून जो वर्ग आहे तो मुळांत एतद्देशीय द्राविड असावा व तो कालवशानें मराठ्यांत आतां एकजीव झाला असावा, हें म्हणणें आम्हांस संमतनीय आहे. पण याचा विचार आपण चालीरीतींचा पुरावा पाहतांना पुढें अधिक करूं. राजपुतान अशी भिन्न उत्तरेकडे आहे, पण, जाट या भिन्न जातींशीं शाखा आहे व त्या जाती आता पुष्कळ ठिकाणीं राजपुतांत येनासह वावरतात; त्याचाहि विचार पुढेंच करणें बरें. नावाच्या पुरत्यांत येथें मराठे व राजपुत येणानें एकच आहेत असें धरून चालण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

"रठी", "मराठे" (*महारट्ट*) आणि "रट्टी" यांतील रट्ट हा शब्द आणि 'राजपूत' यांतील राज हा शब्द या दोहींत राज् हा धातु आहे असें आपण गृहीत धरून चालूं. वैदिक ऊर्फ छांदस् (*मूळ संस्कृत*) भाषेंत राज् धातूचा मूळ अर्थ अंमल करणें असा आहे. प्रकाशणें असा अर्थ ही भाषा अभिव्यक्त होऊन संस्कृत हें नाव पावली त्या काळचा असावा असा तर्क प्रि० राजवाडे यांचा आहे. अति प्राचीन छांदस् वाङ्मयांत हा अर्थ फारसा आढळत नाहीं. **महो अज्मस्य राजति** = (सूर्य) मोठ्या रस्त्यावर राज्य करितो.—ऋग् ४, ५३, ४; **गायत्रं च त्रैष्टुभं च अनुराजति** = गायत्री व त्रैष्टुभ् या दोन्ही वृत्तांवर (पद्यांवर) सत्ता आहे.—ऋग् २, ४३, १; **य एको वस्वो वरुणो राजान**—ऋग् १, ४३, ४ इ० ठिकाणीं अंमल करणें हाच अर्थ लागतो; प्रकाशणें लागत नाहीं. यावरून रट्ट आणि राजपूत या दोघांचा प्रभुत्व आणि राजकारण यांशीं पुरातन संबंध आहे.

रट्ट शब्दाचा राजपुतांहूनहि अधिक संबंध दुसऱ्या एका राजकारणी शब्दाशीं आहे तो असा. तो शब्द पाली वाङ्मयांत फार आढळतो. तो राष्ट्र ऊर्फ जात, वंश, टोळी या अर्थानेंच आढळतो, ही विशेष ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट आहे. रट्ट म्हणजे राज्य या अर्थानें पालींत प्रचार आहे. शिवाय राज्य हा अर्थ रज्ज अशा रूपानेंहि पालींत वरचेवर प्रचारला जातो. सिविरट्ट = शिबींचे राष्ट्र; सोवीररट्ट = सौवीरांचें राष्ट्र; कोसलरट्ट = कौसलाचें राज्य; मगधरट्ट, मल्लरट्ट, असे प्रकार असंख्य आढळतात.

"अतीते मल्लरट्टे कुसावती राजधानियं ओक्काको नाम राजा धम्मेन रज्जं कारेसि। सोळसान इत्थि सहस्सानं जेट्ठिका सीलवतीनाम अग्गमहेसी अहोसि। सा न एव न सीतर पुत्तं लभेत्तीति। नागरा च रट्ट वासिनो च राजं निवेसनद्वारे सन्निपातेत्वा 'रट्टं' *नस्सिस्सति विनस्सिस्सतीति उपक्कोसिंसु" अर्थ—मल्ल राष्ट्रांत इक्ष्वाकु नांवाचा राजा होता.* त्याच्या सोळा हजार बायकांपैकीं पट्टराणीला सिवा इतरांना पुत्र होईना, म्हणून त्याचे नागरिक व इतर राष्ट्रवासी येशी जवळ त्याजकडे येऊन 'राष्ट्र अथवा राज्य नाश पावेल, विनाश होईल' असें ओरडूं लागले. या उताऱ्यात रज्ज आणि रट्ट हे दोन्ही शब्द राज्य आणि राष्ट्र या दोन्ही अर्थी प्रचारलेले आढळतात, हें विशेष आहे.

रट्ट शब्दाचा राज्य आणि राष्ट्र या शब्दाप्रमाणेंच आणखी एका ज्या छांदस् शब्दाशीं निकट संबंध आहे तो रथ हा होय. भाजें, बेडसा आणि कार्ले येथील प्राचीन *गुहांतील शिलालेखांतून 'महारथी' व 'महारथिनी', मराठा व मराठीण या जाती व*

वंशदर्शक अर्थाने देणगी देणाऱ्या पुरुष आणि स्त्रियांना उद्देशून योजलेले शब्द आढळतात. महारथी म्हणजे रथांतून युद्ध करणारा मोठा योद्धा; असा एखादा पदवीधर असा अर्थ होईल. पण **महारथिनी** म्हणजे युद्ध करणारी अशी पदवी धारण करणारी बाई असा नसून अशा योद्धयाच्या जातींतील एक बाई असाच अर्थ करणें योग्य आहे, असे जें डॉ॰ रामकृष्ण गोपाळ भांडारकरांनी आग्रहपूर्वक म्हटलें आहे तेंच ग्राह्य दिसतें. म्हणजे खिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांतल्या ह्या शिलालेखांच्या काळात, ज्याचें **महारथी** असें विशेषनाम बनलें होतें असा एक खानदानी वंश दक्षिणेकडे होता आणि ह्या वंशाचा शरीरसंबंध **महाभोज** नांवाच्या दुसऱ्या एका खानदानी वंशाशीं होता हे शिलालेखांवरून सिद्ध होतें. ( Early History of the Dekkan, *Bhandarkar* पान १० ) डॉ॰ भांडारकरांनीं ह्याच पानाखालील टिपणांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, रट्ट हें एका ( Tribe ) जातीचें विशेषनाम होतें आणि हल्लींचें 'मराठा' हें जातिवाचक नांव तेंच आहे. ह्या अधिकृत पंडितांनीं भाषाशास्त्राच्या दृष्टीनें थोडा अधिक विचार येथेच केला असता तर कितीतरी काम झालें असतें. परंतु मराठे हे क्षत्रिय आहेत इतकेंच नव्हे तर आर्य आहेत एवढ्या परंपरागत कल्पनेंतच हे गुरुवर्यहि त्या काळीं तृप्त होते म्हणून त्यांनीं ह्या भाषाशास्त्रावर कधीं फारसा अट्टाहास केला नाहीं. असो.

रट्ट ह्या वंशनांवाचे धागेदोरे शोधीत आम्ही बरेच मागें गेलों आहों. ह्याचा भाषाशास्त्रीय संबंध एका बाजूस रथश्रमणी व दुसऱ्या बाजूस राज व तज्जन्य राष्ट्र शब्दाशीं दृढ आहे. रथ शब्द वेदांतच नव्हे तर अवेस्ता ह्या पारश्यांच्या प्राचीन ग्रंथांतहि प्रमुखपणें आढळतो. रथेष्टा = क्षत्रियवर्ग असा अर्थ अवेस्तांत आहे. तसाच वेदांत इंद्रालाहि रथेष्टा = क्षत्रिय म्हटलें आहे. हिंदी आर्यांची वर्णव्यवस्था माणसांपुरती नव्हे तर वरती देवादिकांना व खालतीं पशूंना व निर्जीवानाहि लागू होती हें श्रौत, स्मार्त व पौराणिक वाङ्मयावरून भरपूर आढळतें.

**जुजोपदिंद्रो दस्मवर्चा नासत्येव सुगम्यो रथेष्ठाः**

अतिशय शक्तिमान् नासत्याप्रमाणें सहजगम्य रथामध्यें बसणारा (क्षत्रिय) असा जो इंद्र तो आमचा हवी सेवन करो. ह्या ऋचा प्रि॰ राजवाड्यांनी दिल्या. त्यांचें मत असें आहे कीं, वेदाच्या प्राचीनतम ऋचांतून रथ हा शब्द रथीं ह्या विशेषणार्थी योजला आहे. रथो हिषः = तो इंद्र रथी ( राजा ) आहे. ह्या रथ शब्दाची व्युत्पत्ति रहू = गति पावणें, रम् = रमणें, थांबणें, विराम पावणें वगैरे आहे. पण रथ शब्दाचा राज धातूशीं संबंध कोठेहि लावण्यांत आलेला नाहीं. अर्थात् अंमल करणें ह्या अर्थानें मानवी समाजाची उत्क्रान्ति होण्यापूर्वीच रथाचा म्हणजे चक्रमय वाहनाचा शोध लागला नसल्यास रथाची व्युत्पत्ति राज् धातूंत शोधणें अशक्य नाहीं. तें कसेंहि असलें तरी रथ ह्या विशेषणार्थी शब्दाला द्राविडी अपभ्रंश ऊर्फ विकास रट्ट असा होणें द्राविड भाषांच्या नियमाला धरून आहे. तामीळ भाषेंत मुळांत ह हा महाप्राण नाहीं. जेथें थ तेथें ट्ट जेथे ध तेथें

ड्डु अगर ड्ड असा अपभ्रंश म्हणा अगर विकास म्हणा तो होणें साहजिक आहे. ह्यावरून रथ शब्द जरी स्वतः वैदिक भाषेंतला असला तरी तो रट्ट ह्या स्वरूपांत द्राविडांनी आपल्या प्रचारांत घेतला असणें असंभवनीय मुळींच नाहीं हें दिसतें.

येथवरील भाषेच्या सशोधनावरून पुढील अत्यंत मनोरंजक समस्या ( Problem ) आपल्यापुढें स्पष्ट होत आहे. रट्ट हा वंशवाचक हल्लींचा शब्द मूळ रथ धातू-पासून किंवा राजन् ह्याची प्रथमा राट्पासून अथवा राष्ट्र ह्याचा अपभ्रंश रट्टपासून आला असावा, किंवा रट्ट हा *मूळ शब्दच अतिप्राचीन एखाद्या द्राविड उर्फ तुराणी (तुराणी) भाषेंतील असावा.* पुढील द्वित्त अक्षराचा कर्कशपणा काढून कोमलपणा आणतांना मागील उपांत्य ऱ्हस्व स्वर दीर्घ होतो, हा भाषाविकासाचा नियम भाषापंडितांना माहीत आहेच. ह्या न्यायानें : [१] रट्ट ह्या मूळ तुराणी धातूचा विकास राट् ह्या रूपानें इराणी (आर्य) भाषेंत झाला; [२] किंवा उलट दिशेनें राष्ट्र ह्या आर्य शब्दाचा अपभ्रंश पाली-तील रट्ट शब्दांत झाला; [३] किंवा पुन्हा मूळ रट्ट ह्याच तुराणी शब्दाचें राष्ट्र असें अभि-जात संस्कृतांत संस्कृतीकरण झालें. ह्याचा निर्णय लावण्यास तूर्त तरी कांहींच साधन दिसत नाहीं. इतकें मात्र शंका घेण्याला स्थान दिसत आहे कीं, राज् हा शब्द छांदस भाषेंत जितका पुरातन आहे तितका त्यापासून साधलेला राष्ट्र हा शब्द पुरातन नसावा. तेव्हां रट्ट हा शब्द 'राष्ट्र'चा अपभ्रंश असावा, किंवा 'रथ'चा अपभ्रंश *असावा किंवा हे सर्वच शब्द मूळ रट्ट ह्याच परकीय धातूपासून असावेत, हा मोठा प्रश्न* येथें असाच सोडणें बरें. 'रट्ट' ह्याच स्वरूपांत हा शब्द जुन्या छांदस भाषेंत नाहीं व तामीळ भाषेंत तरी आहे कीं नाहीं हें माहीत नाहीं. त्या अर्थी हा वाद येथेंच सोडणें *भाग पडत आहे. मात्र राट्टि = वाहु, हाल असा शब्द शुद्ध कानडींत आहे; पण त्याचा* संबंध येथें रट्ट अथवा राष्ट्री ह्या जातिवाचक शब्दांशीं लागत नाहीं.

वरील्या ह्या अनिश्चित स्वरूपांत एवढीही गोष्ट सिद्ध होऊं शकेना कीं, रट्टवंश *उत्तरेकडून दक्षिणेकडे आला किंवा दक्षिणेंतून उत्तरेकडे गेला? राठी नावाची जवळ* जवळ एक लाख लोकसंख्या पंजाबांत आहे. ती दक्षिणेकडून उत्तरेकडे गेली असल्या-पेक्षां दक्षिणेंतील तामीळ मुलुखापर्यंत पसरलेल्या सव्वीस लाखावरील रड्डी लोकसंख्या सर्व *उत्तरेकडून दक्षिणेंत उतरली असणें अधिक संभवनीय आहे काय? असें मानण्यास* निदान भाषाशास्त्राचा पुरावा काय आहे? चालीरीतीविषयक समाजशास्त्राचे जे पुरावे आहेत ते पुढें पाहता येतील; पण 'रट्ट' शब्द द्राविडी भाषेंतला असण्याची जी शंका येते तिच्यापेक्षां भाषाशास्त्राचा अधिक पुरावा कोणी मिळतो कीं काय ते आतां पाहूं.

येथवर मजल आल्यावर आणखी एक मोठी विक्षिप्त मनश्चटना आदळते: ती राठोड ही. हें काय प्रकरण आहे! राष्ट्रकूट ह्या संस्कृत सामासिक शब्दाचा राठोड हा अपभ्रंश आहे असें मानून येळ मारून नेण्याचा प्रयत्न होतो, तो साहजिक आहे. पण त्यानें कोणाचें समाधान होईल त्याचें होवो. मला तर राष्ट्रकूट हें 'राठोड'चें संस्कृती-करण असावें. राठोड हा 'राष्ट्रकूट'चा अपभ्रंश नसावा असें वाटतें. राष्ट्रकूट असा

शब्दप्रयोग शिलालेखांत आढळतो असें कर्नाटक राजवंशाचा संशोधक जे. एफ. फ्लीट म्हणतो. पण ते सर्व लेख दक्षिणेंतले आणि राठोडवंशानें दक्षिणेंत दिग्विजय करून प्रसिद्ध झाल्यानंतरचे आहेत. ह्या राठोडवंशांतील कित्येक राजांची नांवें आर्य भाषेशीं न जमण्याइतकीं कर्कश आणि कानाला द्राविडीप्रमाणें वेगळीं लागणारीं आहेत. इतकेंच नव्हे तर ह्या राजांनीं संस्कृत नांवें घेण्याची हौस दाखविली आहे; त्यावरून राठोड हेंच मूळ नांव आणि राष्ट्रकूट हें संस्कृतीकरण हा तर्क बळावतो. बद्दिग ( अमोघवर्ष ३ रा ), खोट्टिक कक्कल ( अमोघवर्ष ४ था ) शके ८९४, हीं राष्ट्रकूटांचीं नांवें; पुलकेशी, अय्यन व नुर्मडी हीं चालुक्यांचीं नांवें, धाडियप्पा, भिल्लम, राजगी, वेसुगी, जैतुगी, वाडुगी, परम्मा, मल्लुगी, बल्लाळ, सिंघण हीं यादवांचीं नांवें काय दाखवितात ? ह्या नांवांची गोष्ट बाजूस ठेवून, प्रत्यक्ष राठोड ही शब्दघटनाच भाषेचा काय पुरावा सांगते हें पाहूं. राठोड = राठ+कूड ( कूड ) असा समास आहे. दोन भिन्न भाषेंतील शब्दांचा समास होत नाहीं असा व्याकरणाचा एक नियम आहे. राठ हा शब्द इराणी ( आर्य ) असो अथवा तुराणी ( द्राविडी ) असो, कुड हा शब्द तर खास तामीळ आहे. कुड = जमविणें असा तामीळ धातु आहे. कूट असा संस्कृत अपभ्रंश होऊन हाच शब्द आतां संस्कृत कोशांतून उजळमाथ्यानें वावरूं लागला आहे; तरी राठोड ही शब्दघटना संस्कृतापेक्षां द्राविड असण्याचा अधिक संभव आहे. राठोड म्हणजे राठी लोकांचा एखादा प्राचीन संघ असावा असा तर्क होतो, पण हें जर एका संघाचें नांव होतें तर त्यांत राठीच्या अथवा मराठ्यांच्या कोणकोणत्या कुळांचा समावेश होतो याचा इतिहासांत कोठेंच पुरावा कां मिळत नाहीं ? उलट जे. एफ. फ्लीटनें राष्ट्रकूट शब्दाची एक नवीन व्युत्पत्ति दर्शविली आहे, ती मात्र मोठी चिंतनीय दिसत आहे. तो म्हणतो : " डॉ० बर्नेल राष्ट्रकूटांची व्युत्पत्ति द्राविड समजतो, आणि 'राष्ट्रकूट' हा शब्द म्हणजे द्राविड रट्ट ह्या नावाचें राष्ट्र ह्या संस्कृतीकरणावरून झाला असावा असा तर्क करतो. राष्ट्रकूटवंश हा उत्तरेकडील आर्यवंश आहे किंवा दक्षिणेकडील द्राविड राजवंश आर्यांत समाविष्ट केलेला आहे, हें ज्या डॉ० भूलरनें राष्ट्रकूटाच्या वंशावळीची प्रथम चिकित्सा केली त्याला ठरविता आलें नाहीं. तरी अगदीं अगोदरच्या शिलालेखावरून हा वंश उत्तरेकडून खालीं आला असावा असें दिसतें. त्याचें मूळ कसेंहि असो राष्ट्रकूट हा शब्द इतर घराण्याच्या शिलालेखांतून राष्ट्रपति म्हणजे एका देशाचा पाटील अगर प्रांताचा देशमुख ह्या अर्थानें पुष्कळदा योजण्यांत आला आहे. ह्यावरून मला असें दिसतें कीं, स्वतंत्र राजसत्ता अथवा सम्राटपदाला पोंचण्यापूर्वी ह्या घराण्यांतील लोक दुसऱ्या कोणाच्यातरी राज्यांत लहानसान देशमुख्या करीत असावेत. " ( Dynasties of the Kanarese Distict–पान ३२. ) ह्यावरून कुड अगर कूट हा शब्द सध्या ह्या अर्थी नगर ( भारा ) वसूल करणारा पाटील किंवा शिबंदी भरती करणारा देशमुख असा अर्थी होता असें दिसतें. कांहीं असो. हा शब्दप्रयोग द्राविड आहे हें सिद्ध होतें.

एकेकाळीं—तो अतिप्राचीन काळ असावा, द्राविड राष्ट्र व भाषा सर्व हिंदुस्थान भर आसेतुहिमाचल पसरली होती; इतकेंच नव्हे तर आर्यांप्रमाणेंच द्राविडहि वायव्येकडूनच आले असावे, असें आधुनिक विद्वानांचें मत होऊं लागलें आहे. द्राविडी भाषा सर्व हिंदुस्थानभर होती व तिची एक शाखा ब्राहुई ही अद्यापि बलुचिस्तानांत आहे, ह्यावरूनहि द्राविडांची पूर्वपीठिका बाहेरची आहे, असेंच दिसतें. मग राष्ट्रकूट आणि मराठ्यांची इतरहि घराणीं उत्तरेकडून दक्षिणेकडील देशांत आलीं काय किंवा आर्यांच्याहि पूर्वी दक्षिणेतच असतीं काय तीं आर्यच असतील असा कांहींच मेळ बसा लागत नाहीं हेंच उघड होतें.

*नांवांच्या पुराव्याचा हा भाग संपविण्यापूर्वी आणखी दोन प्रसिद्ध नावांचा विचार संक्षेपानें का होईना, पण करणें येथें अवश्य आहे.* दक्षिणदेशांत मराठ्यांना 'आरे' आणि 'बर्गे' असीं दोन जातिवाचक नावें आहेत. पहिलें कानडी प्रांतांत आणि दुसरें तेलगू प्रांतांत आणि बंगाल्यांत प्रचारात आहे. 'आरे' म्हणजे आर्य हा अर्थ उघड आहे. पण '*बर्गे*' *ह्याची व्युत्पत्ति विद्वानांनीं दोन प्रकारें केलेली आढळते.* एन्थोव्हेननें "Tribes & Castes of Western-India" ह्या आपल्या संशोधनात्मक पुस्तकांत बर्गे म्हणजे वडूगर किंवा बर्गी अशी दोन प्रकारें व्युत्पत्ति लावण्याचा प्रयत्न केला आहे. 'वडूक' म्हणजे उत्तरेकडचा असा तामील शब्द आहे; आणि 'बर्गी' म्हणजे घोडेस्वार असा फारशी शब्द आहे. *वडुक हा मूळ तामीळ शब्द संस्कृत भाषेंत उदीचि* अशा रूपानें गेला किंवा उदीचि हा मूळ वैदिक शब्द वड्डक ह्या अपभ्रंशानें तामीळमध्यें गेला हें ठरविणें कठीण आहे. उदीचि ह्याचें मूळ उत् म्हणजे वर आणि अंच म्हणजे जाणें असा वैदिक धातूंनी मिळविणें असाध्य नाहीं. प्राची (पूर्वदिशा) ह्या शब्दाची *व्युत्पत्ति अशीच लागू शकते.* कांहीं असो, वडुक म्हणजे उत्तरेकडचा हा तामीळ अर्थ बरोबर आहे व बर्गी हा फारशी शब्दहि उत्तर दिशा दाखवितो. ह्या दोन्ही व्युत्पत्तींवरून मराठ्यांचा मूळ वंश जरी निर्णीत होत नाहीं तरी त्याची मूळ दिशा ध्वनित होते. आरे म्हणजे आर्य हा अर्थ स्पष्ट आहे. कर्नाटकी भाषेंत आरे नांव मराठ्यांनाच लागतें. ब्राह्मणाना लागत नाहीं. ब्राह्मणाना कानडींत 'हारु' हें नांव आहे. त्यावरून प्रथम मराठ्यांनीं कर्नाटकांत वसती केली व त्यांनीं जसे इतर बारा बलुते आपल्या ग्रामसंघटनेंत वसाहत करण्यासाठीं आणिले तसे ब्राह्मणानाहि बरोबर आणिलें म्हणून मुख्य राज्यकर्ते, जमिनीचे मालक व वसाहतीचे चालक ह्यानाच 'आर्य' ऊर्फ 'आरे' हें नांव पडून, त्यांच्या इतर आर्य आश्रितांना तें नाव पडलें नसल्यास वावगें नव्हे नाहीं. पण येवढ्यावरूनच मराठ्यांचा वंश आर्य असावा, शक ऊर्फ सिथियन पार्थ, अगर दुसरा कोणता नसावा, असें निर्विवाद सिद्ध होत नाहीं. ज्यानीं त्यांना आर्य हें नांव दिलें, त्याना आर्य आणि शक अथवा इतर उत्तरेकडील राजन्यांनी जाती ह्यांत भेद विशेष नसावा, किंवा नुसता श्रेष्ठ ह्या विशेषणार्थी त्यांनीं प्रथम आर्य हा शब्द योजून पुढें त्याच्या प्रचाराचा विस्तार सर्वच मराठा समूहाच्या जातिवाचक अर्थानेंच झाला असावा.

ह्यानंतर वंशावळी आणि कुळी ह्यांच्या तपासाकडे वळणें योग्य आहे. मराठा समाजांत ह्या दोन्ही गोष्टींचें जितके प्रस्थ आहे तितकें महाराष्ट्रांतील दुसऱ्या कोणत्याहि जातींत आतां उरलें नाहीं व पूर्वी कधींहि नव्हतें. मुख्य वंश तीनच; सूर्य, चंद्र आणि नाग. यदु आणि अग्नि असे दुसरे दोन वंश मानण्यांत येतात; पण ते निराळे नाहींत. यदूंचा चंद्रवंशांत समावेश होतो. अग्निवंश केवळ काल्पनिक आहे असें संशोधक चिं. वि. वैद्य ह्यांनी चांगलें दाखविलें आहे. बाकी उरले तीन वंश; तेहि केवळ काल्पनिक आहेत; खरोखरीच कोणी सूर्यावरून खालीं उतरले किंवा शेषापासून उत्पन्न झाले असे नव्हे. सूर्य, चंद्र आणि नाग हीं ह्यांचीं मूळ उपास्य देवकें असलीं पाहिजेत एरवीं त्यांच्यांत ऐतिहासिक असा कांहीच अर्थ नाहीं सर्व मनुष्यजाती प्राथमिक युगांत कोणत्या ना कोणत्या तरी भूतपदार्थांची पूजा करीत असलेल्या आढळतात. मग त्या आर्य, शक, मोंगल, द्राविड, सेमेटिक अगर इतर कोणत्याहि वंशांच्या असोत. Totemism म्हणजे देवकपूजा ही मनुष्यमात्राच्या पाचवीला अगदीं पुजलेलीच आहे. आर्य म्हणून कोणी ऐतिहासिक अथवा केवळ काल्पनिक वंश असो वा नसो, 'आर्य' ह्या नांवाखालीं जे लोक हल्लीं अथवा पूर्वी मोडत होते, त्यांच्यात सूर्य आणि चंद्र हीं देवकें प्रसिद्ध होतीं. मात्र हीं देवकें फार प्रतिष्ठित असल्यामुळें क्षत्रिय अथवा राजवंशाशींच ह्यांचा संबंध प्राचीन पुराणांतून दाखविण्यात येत होता, तसा ब्राह्मणांशींहि दाखविण्यांत येत नव्हता; पण आर्यांशिवाय आर्येतरांचाहि संबंध ह्या देवकांशीं आहे, हें मानववंशशास्त्रज्ञाना सांगावयास नकोच. जपानी लोक मोंगल असून आपल्यास सूर्यवंशी समजतात, तसेच तुर्की ऊर्फ तुराणी आणि ईजिप्त ऊर्फ मिश्र देशांतील लोकहि स्वतःस सूर्यवंशी समजत होते. अद्यापि इराणच्या राष्ट्रीय निशाणावर सूर्याचें चिन्ह आहे, चांद नाहीं. उलटपक्षीं आरबी लोक चंद्रचिन्हांकित आहेत, म्हणून ते चंद्रवंशी आर्य असे म्हणणे शोभणार नाही. एफ्. ई. पार्जिटर–कलकत्ता हायकोर्टचे माजी जज–एक प्रसिद्ध संशोधक होते. त्यांनीं 'Ancient Indian Historical Tradition' ह्या आपल्या चहुमोल ग्रंथात भारतवर्षीय अतिप्राचीन पुराणांचें अवगाहन करून शेवटीं असा सिद्धान्त रचिला आहे कीं, प्राचीन भारतांतील सूर्यवंशी क्षत्रिय आणि त्यांचे आश्रित असलेले ब्राह्मणहि वंशानें द्राविड होते; आणि ऐल किंवा चंद्रवंशी जे क्षत्रिय मागाहून भारतांत आले तेच तेवढे वंशानें आर्य होते. ऐल हे विशेषण इला = इरा ह्या शब्दापासून साधित झाल्यानें इराण अथवा आर्यान् अशी व्युत्पत्ति भाषाशास्त्रानेंहि सिद्ध होते; पार्जिटरानीं आपला सिद्धान्त भाषांच्या पुराव्यावर रचलेला नसून पौराणिक वाङ्मयांतील वंशावळी आणि इतर विधानें ह्यांच्यावर रचलेला आहे म्हणून त्यांचे सिद्धान्त अधिकच विचारार्ह आहेत.

सूर्य आणि चंद्रवंशांसंबंधीं विचार झाला; पण नागवंशाचा आर्यांशीं कांहींच संबंध नाहीं. नाग हा एक मानववंश 'आर्य' म्हणविणारे लोक भारतवर्षांत येण्यापूर्वीच चहूंकडे पसरला होता. पूर्वेस मणिपूर आसामाकडे, पश्चिमेस सिंधनदीचें व दक्षिणेकडे

कोंकणपट्टी आणि खालीं कन्याकुमारीपर्यंत मलबारांत नागपूजा आणि नागलोकांचे इतर सामाजिक अवशेष आढळतात. हा नागवंश मराठ्यांत मोठ्या मान्यतेला चढलेला पूर्वीपासून म्हणजे शककर्त्या शालिवाहनापासून तरी अलीकडे आढळत आहे. इत्यादि विवेचनावरुन सूर्य, चंद्र आणि नाग त्या तीन वंशांच्या मिश्रानें द्राविड, आर्य आणि नाग त्या तीन जातींच्या लोकांचा समावेश हल्लींच्या मराठा समाजांत झाला असणें मुळींच असंभवनीय दिसत नाहीं.

वंशावळीनंतर मराठ्यांतील ' शाण्णव कुळी 'चा थोडक्यांत विचार करूं. शार्कांचे पुरावे कसेहि असोत, मराठ्यांच्या शेंकडों कुळ्या आज पुरातन काळापासून चालत आल्या आहेत, त्यावरून मराठा हा एक राष्ट्रवजा वश अगर वंशसंघ आहे, असा एक जादा पुरावा वंशशास्त्रज्ञांपुढें आहे. राजपुतांत पूर्वी त्या कुळ्या ३६ होत्या, नंतर ५४ झाल्या, त्या आतां मराठ्यांत ९६ आणि वस्तुतः त्याहूनहि जास्त आढळतात. ह्यावरून मराठा हा उत्तरोत्तर वाढत जाणारा वंशसमूह किंबहुना अमेरिकेंतील वसाहतीप्रमाणें दर शतकाला वाढत जाणाऱ्या राष्ट्राचें हें एक मायपोट असावें असें दिसतें; परंतु दुर्दैवानें ह्या ' शाण्णव ' कुळींच्या ज्या निरनिराळ्या प्रती हल्लीं उपलब्ध आहेत, त्यांत परस्पर मेळ काहींच दिसत नाहीं. पाटणकरकृत एक ' शाण्णव कुळी ' मला एन्थोव्हीनला मिळाल्याचें तो सांगतो. श्री. नरोत्तमानंद सरस्वतींची एक प्रत, मुंबईच्या जगदीश्वर प्रेसमध्यें **V. V. Pathak** ह्यानीं छापलेली दुसरी, आणि राजापूरचे राव साळुंके ह्यानीं आपल्या ' क्षत्रिय मराठ्यांचा इतिहास ' ह्या पुस्तकाला जोडून प्रसिद्ध केलेली ' प्राचीन अस्सल वंशावळी ' तिसरी, इतक्या माझ्या पाहण्यांत आहेत. पण ह्यापैकीं एकीची तिघानें दुसरीशीं न जुळल्यामुळें संशोधकाची मोठी निराशा होते. ह्यामुळेंच कंटाळून एन्थोव्हीनसारख्या परकीय संशोधकाला ह्या साऱ्याच वंशावळ्या बनावट असाव्यात आणि मराठे मोठ्या पदावर चढल्यावर आपल्या पूर्वपीठिकेला गौरव करण्याच्या हेतूनें त्यांनीं हें काहींतरी भारूड रचिलें असावें असें त्यानें म्हटलें आहे ! पण संशोधकानें एकाएकीं असें वर्डळीला येऊन चालत नाहीं. कुळींची मूळ गादी, बीजमंत्र, देवक, घोड्याचा व *आवदागिरीचा रंग, गोत्र वगैरेंचें वाड बनावट असलें, तरी तेवढ्यावरून ह्या कुळ्याच* स्वतः बनावट असणें शक्य नाहीं. त्यांची परंपरा इतिहासात शिलालेखाच्या काळाच्यादि मागे लवकर पोंचते. मराठ्यांचीं जीं आज शेंकडों आडनांवें आहेत, त्यांतून गांवावरून, धंद्यावरून व इतर नैमित्तिक कारणावरून पडलेलीं पडनावें वगळलीं तर कांहीं अस्सल कुळांची यादी शिल्लक उरते. स्वतः एन्थोव्हीननेंच ५४ नांवांची यादी अस्सल मराठ्यांची म्हणून स्वीकारली आहे. त्यांतून ज्यांच्या राजवस्या महाराष्ट्राच्या व हिंदुस्थानाच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत, अशा कांहीं घराण्यांच्या नावांचा तपशील पुढें कोष्टकांत दिला आहे, त्यावरून बराच बोध होतो.

## मराठ्यांतील प्रसिद्ध राजघराणीं

| कुळीचें नांव | अपभ्रंश | वंश | देवक | राजधानी |
|---|---|---|---|---|
| शातवाहन, शालिवाहन | सातव, साळवी | नाग | ... | पैठण |
| चोळ | चोर | द्राविड | ... | कांची, सेलम |
| गंग | गोरु, कंरु, निकम | सूर्य, मंगल | .. | म्हैसूर, कोल्हापूर |
| चालुक्य | चाळके, साळुंके | सूर्य | सूर्यकमळ, साळुंकीचें पीस | वातापि, ( बदामी, जि. विजापूर ) धनकटक (जि. गुंटूर) |
| राष्ट्रकूट | राठोड | सूर्य | मर्यादवेल, शंख | मालखेड (निजामचे राज्य) |
| पल्लव | पल्लव–व | ,, | कळंब | कांची |
| यदु | यादव, जाधव | चंद्र | ,, | देवगिरी, म्हैसूर |
| भोज | भोसले, होयसळ पोयसळ | सूर्य | शंख, रुई | सातारा, कोल्हापूर मुधोळ, म्हैसूर. |
| कळभ्र, कलचुरी, कळभूर्य | काळभोर | ... | ... ... | जबलपूर, कल्याण |
| सेंद्रक | सिंधु, शिंदे | नाग | कळंब, रुई | छिंदवाडा, कलादगी |
| शिलाहार | शेलार | चंद्र | कमळ | कोल्हापूर, ठाणें |
| सात्वत, सात्वत पुत्र | सातव, सावंत, सातपुते | ,, | ,, | सावंतवाडी |
| प्रमार | पवार | सूर्य | कळंब | फलटण, धार |
| कदंब | कदम | ,, | हळद | गोवे, बनवासी. हानगल |
| मौर्य | मोरे | चंद्र | मोराचें पीस | जावळी |
| नल | नलवडे | सूर्य | ... | कतलपूर |
| रट्ट | रड्डी | ... | ... | सौंदत्ती, बेळगाम |
| अभीर | अहीरराव | ... | ... | खानदेश |

वरील नांवांची प्रतिष्ठित राजघराणीं महाराष्ट्रांत व सारी दक्षिण हिंदुस्थानात गेल्या दोन हजार वर्षांत लहानमोठी राजसत्ता गाजवून गेली आहेत. त्यांच्यात परस्पर शरीरसंबंध झालेले शिलालेखी पुरावे आहेत. ही सर्व नांवें आजच्या मराठ्यांत राजरोस आढळतात. तरी वंशदृष्ट्या ते परस्परांपासून निरनिराळे भिन्न आहेत. सातव, साळवी, शिंदे हे नागवंशी, तर साळुंके, राठोड, पवार हे सूर्यवंशी; जाधव, शेलार, मोरे हे सोमवंशी; शेलार, शेळके हे धनगराहि आणि अहीर हे गवळीहि आहेत. चोळ हे द्राविड, तर गंग

हे मोगल असावेत. गँग–डोकें, शिरोभाग असा तिचेटी आणि म्ही शब्द आहे. गंगा हें नदीचें नांव ह्याच शब्दापासून असावें. चोळ शिवायकरून बाकी सर्व उत्तरेकडून त्यालीं दक्षिणेंत आले असावेत असा अंदाज आहे. चारशिवाय सर्व राजधान्या गोदावरीच्या दक्षिणेस दंडकारण्यांत व त्याच्याहि खाली आहेत. ह्या बहुतेकांच्या भाषा कानडी, तेलुगू किंवा तामीळ ह्या द्राविडी आणि सर्व चालीरीति तशाच होत्या. कारण मराठीचा उत्कर्ष होण्यापूर्वीच राजकीयदृष्ट्या ह्यांचा अपकर्ष होऊन चुकला होता. कांचीचे पल्लव (पल्लवे) हे पार्थ (Parthians)=पेहेल्लव असावेत असा आजमास आहे. कुंतल देशांतील कुरुंब (कुरुब) म्हणजे धनगर राजघराण्याशी व धनकटक (गुंटूर जिल्हा) येथील चालुक्य सम्राटांशीं पल्लव घराण्याचे शरीरसंबंध होत असत असा पुरावा डॉ. भांडारकरांनी दिला आहे. ह्या सर्व गुंतागुंतीवरून मराठ्यांची पूर्वपीठिका अचूक ठरविणें जवळजवळ अशक्यच असा भास झाल्यास नवल काय ?

वर जो सूर्य, चंद्र इत्यादि वंशाचा उल्लेख आला आहे, त्या त्या वंशाचा संबंध सांगूनच हें प्रकरण संपत नाहीं. ह्या सर्व भौतिक वस्तूंचा अथवा देवकांचा प्रवेश मराठ्यांच्या आडनांवात झालेला अद्यापि आढळत आहे. मराठ्यांत सुर्वे, सोमवे, नागवे अशीं उपनावें आहेत. तीं सूर्यवंशे, सोमवंशे, नागवंशे ह्या शब्दांचे अपभ्रंश असावेत, किंवा सूर्यवाहन, सोमवाहन, नागवाहन शब्दांचे अपभ्रंश असावेत, किंवा सुरवसे, सोमवसे अशीं जीं दुसरीं नावें आहेत तीं सूर्यवंशी, सोमवंशी (सुरवसे, सोमासे) इत्यादींचे अपभ्रंश असून सुर्वे, सोमवे, नागवे, हे सूर्यवाहन इत्यादींचे अपभ्रंश असणें अधिक संभवनीय आहे. शालिवाहन, सातवाहन ह्यांचे अपभ्रंश साळवे, सातव, असे आढळतात, त्यावरून ही दुसरी व्युत्पत्ति अधिक संभवनीय दिसते. सुर्वा, सातवा, साळवा ह्या एकवचनांचीं सुर्वे इत्यादि अनेकवचनी रूपें आतां प्रचारांत आहेत हें उघड आहे. *देवकांचें चिन्ह अथवा चित्र निशाणावर असणें हें आतां आणि पूर्वीहि प्रसिद्ध आहे. प्राचीन चालुक्यांच्या निशाणावर वराह, तर आतांच्या इंदूरच्या होळकरांच्या निशाणावर बैल, आणि ग्वाल्हेरच्या शिंद्यांच्या ध्वजस्तंभावर सर्प आढळतो. इतकेंच नव्हे तर* इंग्लंड, जर्मनी आणि रशिया ह्यांच्या ध्वजावर अनुक्रमें सिंह, गरुड आणि अस्वल हीं दिसतात; आणि जपानची बादशाही सूर्यवाहन ऊर्फ सुर्वे आहे !

**राठोड** ह्याची व्युत्पत्ति राष्ट्र + कूट = राठ + उड = राठोड असें वर सांगितलें; आणि असा एक राष्ट्रांचा संघ असावा असें अनुमान निघतें असे आम्ही वर म्हणालों. त्याचप्रमाणें नायकोडे, नायगोडे, गायकवाड अशींहि आडनावें प्रसिद्ध आहेत. नायगोडे हा मूळ नाग + वाड = नागोड, किंवा नाक + कूड = नाकोड असा प्रयोग झालेला असावा. वाड हा शब्द राजपुतान्यांत मारवाड = मरु+वाड, मेवाड = मध्यवाड, ह्या देशवाचक आणि मेरवाड ह्या जातिवाचक नावांत आढळतो. कर्नल टॉडनें आपल्या **राजस्थानची बखर** *ह्या ग्रंथाच्या भाग १ ला, पान १२५ वर रजपूत वंशांच्या ज्या ८८ जातींची यादी दिली आहे त्यांपैकीं ३५ जातींच्या नांवाचा शेवटचा भाग वाळ असा आहे. जसें, ओस्वाळ,*

भागेरवाळ, दिसवाळ, पुष्करवाळ, रोहिलवाळ इत्यादि. हा वाळ शब्द आणि वरील वाड शब्द हे दोन्ही मुळांत एकच आहेत. ह्यावरून नलवडे, नायकोडे हे देशी मराठ्यांचे संघ असावेत असें दिसतें. नायक हा शब्द मूळ नाग किंवा नाक असा असून त्याचें पुढें नायक असें संस्कृतीकरण झालें आहे. नल लोकांचें राष्ट्र हल्लींच्या कर्नूल जिल्ह्याच्या आसपास कृष्णा व तुंगा ह्या नद्यांच्या संगमाजवळ प्राचीन काळीं होतें. नळ ह्या नांवाचा डोंगर आतां तेथे आहे. त्याचें नांव ह्या लोकांच्या नांवावरूनच पडलेलें दिसतें. रामायणांत नळ, नीळ, जांबुवंत ह्या वानरांच्या जाती होत्या असा उल्लेख आहे. आतां नळगिरी, नीळगिरी अशीं नुसतीं डोंगराचीं नांवें उरलीं आहेत. ह्यावरून हीं प्राचीन आर्येतर राजकुलें किंवा राजकारणी राष्ट्रें असावींत; ह्यांनीं आर्यांच्या दक्षिणेकडील वसाहतीचे बाबतींत मोठी मदत केलेली असावी. रट्टवाड किंवा रट्टकूड ह्यांच्याप्रमाणेंच नलवडे आणि नायकोडे ह्यांचे निराळे संघ असावेत. रड्डी हें जातिवाचक नांव मद्रासकडे आडनावाच्या रूपानेंहि आढळतें. सर्वांत मोठा चमत्कार हा कीं, रट्टी हें आडनांव इटालियन लोकांतहि आढळतें. रोमचा पोप ११ वा पायस ह्याचें पूर्वाश्रमींचें नांव अँबेरो अकिली रट्टी असें होतें! असा हा नांवांचा गोतवळा दीर्घसूत्री आहे!!

## समाजशास्त्रीय विचार

आतांपर्यंत मराठ्यांच्या पूर्वपीठिकेचा केवळ भाषाशास्त्राच्या आधारें विचार झाला. आतां तो समाजशास्त्राच्या दृष्टीनें कर्तव्य आहे.

भाषाशास्त्राच्या दृष्टीनें निरनिराळीं नावें आणि निरनिराळे धातु यांच्या संबंधांवरून 'मराठा' या नावांत निरनिराळे वंश कसे मिसळले आहेत हे दाखविण्यांत आलें. आता रीतिरिवाज, खाणेंपिणें, पेहराव, विवाह, धर्म आणि धंद्याच्या परंपरा यांचा विचार करूं. ह्या दृष्टीनें पाहतां **मराठा** आणि **कुणबी** हे दोन शब्द अतिशय चिंतनीय आहेत. ह्या दोन शब्दांनीं गणले जाणारे जे दोन मनुष्यसमूह आजकाल 'मराठा' ह्या नांवाच्या जातींत जितके एकजीव झालेले दिसत आहेत तितके ते दोन हजार वर्षांपूर्वी खास नव्हते. भाजे येथील शिलालेखांत जे महारथी अथवा महारथिनी हें जातिवाचक विशेषनाम आढळतें ते त्या वेळच्या कुणब्यांना खास लावलें जात नसावें. महारथींचा धंदा इतमामानें लढण्याचा व कुणब्याचा धंदा स्वतःची अगर दुसऱ्याची जमीन इतमामानें वाहण्याचा. दोन्ही धंदे तेव्हां प्रतिष्ठित खानदानीचे होते. केवळ पोटार्थी मजुरी करण्याचे नव्हते.

**कुणबी** ह्या शब्दाची व्युत्पत्ति आणि व्याप्तिहि मनोरंजक आहे. कुणबी हा शब्द कुळ ह्या शब्दापासून झाला आहे. यांत कुड = एकत्र होणें, राहणें हा तामीळ धातु आहे. कुड् असा अपभ्रंश संस्कृत मानून झालेला आहे. कूली = मजूर हा शब्द

नामीळ भाषेत प्रसिद्ध आहे. त्याचा अर्थ शेतावरचा मजूर असा कानडी भाषेत प्रसिद्ध आहे. कुणबी हा मराठी शब्द कुटुंबी असा संस्कृतांत, कणबी असा गुजराथेंत, कुडमी अथवा कुरमी असा संयुक्तप्रांत आणि विहारांत प्रचलित आहे. ह्या नांवाचेच नव्हे तर अर्थाचे व वृत्तींचे अफाट समाज महाराष्ट्राबाहेर, गुजराथ विहारपासून खाली दक्षिणेंत पसरलेले आहेत; परंतु ह्या नावाचे समाज महाराष्ट्राबाहेरील इतर सन्मान्य समाजांत न मिसळतां स्वतंत्रपणें आहेत. ते महाराष्ट्रांतील मराठ्यांत मात्र एकजीव झाले आहेत; तथापि हा मराठ्यांचाच विशेष आहे असें नाहीं. गुजराथेंत पाटीदार म्हणून जो एक वर्ग आहे तो कुणबी क्षत्रियांचा आहे; आणि उत्तरेकडील राजपुतांत जाटांचा समावेश तंतोतंत मराठ्यांतील कुणब्याच्याप्रमाणेंच झाला आहे.

जाट पाटीदार आणि विहारमधील कुर्मि क्षत्रिय हे वंशानें कोण आहेत हें दर्शविणें *आमच्या विषयाबाहेरचें आहे. महाराष्ट्रांतले कुणबी मात्र अस्सल द्राविड आणि* मराठ्यांचे दक्षिणेतील आगमनापूर्वी येथें आलेल्या किंवा येथेंच मूळचे असलेल्या कोणा इतर वंशाचे असतील, असें त्यांच्या चालीरीतींवरून दिसतें. ह्या चालीरीति मराठ्यांनी यांच्याशीं शरीरसंबंध ठेवल्यामुळें मराठ्यांतहि आतां दृढमूल झाल्या आहेत. मराठ्यांचे मुख्य धंदे दोन. लढाईच्या काळीं मुलुखगिरी, किंबहुना प्रतिष्ठित लढ आणि एरवीं जमीनदारी. कुणब्यांची वृत्ति एकच आणि ती अधिक सात्त्विक. ती म्हणजे जमीनदारी व जमिनीची मशागत. इंग्रजीत **Peasant Proprietor** म्हणून जो शब्दप्रयोग आहे तो कुणबी शब्दाचा मोळा आणि अर्थवाहक आहे. रा. त्रि. ना. अत्रे यांनी आपल्या **गांवगाडा** या नमुनेदार पुस्तकांत या अर्थाचें यथार्थ वर्णन केलें आहे. महाराष्ट्राच्या वमाहतींचें मराठ्यापेक्षांहि कुणब्याकडे अधिक श्रेय जातें हें या वाक्मोव पुन्हसावरून उघड होतें.

हिंदुस्थानात किंबहुना दक्षिणेंत येण्यापूर्वी मराठे हे फिरत्या अवस्थेत होते. त्या प्राचीन काळीं याचा विनास शेतकीत झालेला नसावा. ते पशूंचे पालक आणि लुटारू *होते. ते रथी आणि अश्वी होते, ह्याचें कारण ते फिरते होते. हींच नांवें त्यांच्या* जातीला पडलीं. अशी ह्या नांवाची शकाची जी एक प्रतिष्ठित शाखा होती, तिचेमुळेंच असिरिया, सीरिया, आर्यिया वगैरे देशवाचक आणि संस्थावाचक नांवें प्रचारांत आलीं असावीं. मराठे हे फिरते आणि मुलुखगिरीच्या ऊर्फ लुटालूट करणारे असल्यामुळे, खाण्यापिण्याचा व शरीरसंबंधाचा सोवळेपणा त्यांच्यात शक्य नव्हता; आणि तो अद्यापि शक्य नाहीं. " राजे लोकांना जात नाहीं " ही म्हण ह्या वृत्तीवरूनच पडली आहे. परधर्मी आणि अस्पृश्य ह्यांना शिवायकरून मराठ्यांची रोटीबेटी आजहि राजरोस सर्व हिंदु जातींशी चालू आहे. हजार वर्षांपूर्वी मिश्र बेटीव्यवहार निदान अनुलोमानें तरी ( **Hypergamy** ) चालू होता ही गोष्ट आतां स्पष्ट झाली आहे. *संशोधनामुळें ती दिवसेंदिवस अधिक उजेडात येईल. जातिभेद मानणें व मार्जविणे हें* धनलोलुप नेमल्या भाटवर्गशाहीचें हीन लक्षण आहे. बुद्ध, महावीरादि सुधारकांनाहि

न जुमानतां हे आजचे भेद वैश्यांच्या वृत्तिसंघांनीं ( Trade Guilds ) मधल्या पौरुषविहीन अडाणी युगांत माजविले गेले आहेत; आणि उपऱ्या ब्राह्मणांनीं व क्षत्रियांनीं त्यांना हातभार लावला असला तर तोहि त्यांच्या वेदशास्त्र विनियुडाच्या मतलबामुळेंच आहे. ब्राह्मण, क्षत्रिय ह्या जाती नव्हत, वृत्ति होत; आणि त्याचा पाया जन्मावर नसून गुणकर्मावर आहे. ह्या विधानाला एका गीतेचाच नव्हे, तर सान्या इतिहासाचा पाठिंबा आहे. असो. ह्यामुळें मराठे व कुणबी हे भिन्न वंश वृत्तिसाम्यानें सहज एक झाले, असें मानण्यास आम्ही मोठेंसें धाडस करितों असें नाहीं.

**धर्म**—धर्म म्हणजे उपास्यांची परंपरा व जन्म, विवाह, मृत्यु इ. गृह्यसंस्कारांची रूढि असा अर्थ घेतल्यास, शक, मराठे आणि त्यांचे पूर्वी दक्षिणेंत आलेले द्रावीड कुणबी ह्यांच्यांत बरेंच वैषम्य असलें पाहिजे. पण समान वृत्ति आणि चिरसहवास ह्यांमुळें हें वैषम्य कमी कमी होत जाऊन हे दोन्ही आज एकजीव दिसत आहेत. तथापि त्यांच्यांत शारीरिक सादृश्य नव्हतें, हें शरीर, मस्तक, रंग, केंस वगैरे गोष्टींवरून वंश ठरविण्याचें जे एक शास्त्र किंवा तंत्र आहे, त्यावरून दिसतें. उत्तरेकडील राजपुतांत जाटांची भेसळ झाली असली, तरी ते दोन्ही शक वंशाच्याच पोटशाखा असल्यामुळें शरीरतः त्यांची भिन्नता दिसत नाहीं; पण कुणबी भिन्न वंशाचा असल्यामुळें त्यांच्यांत मिसळलेल्या मराठ्यांचें रूपरंग विविध असणें साहजिक आहे. मराठ्यांची मूळ उपास्यें सूर्यचंद्रनागादि देवकें, त्यानंतर अधिक विकसित काळांत शिव आणि भूदेवी ही दैवतें, नंतर बुद्ध जैनांची सुधारणा, त्यानंतर पुन्हा लिंगायताची छाप, अशी अलीकडची लाट म्हणजे वारकरी वैष्णव पंथ, असा ह्यांच्या धर्माचा विकास होत आला आहे. " महाजनो येन गतः स पंथा " ह्या न्यायानें मराठ्याच्या गाड्याबरोबर कुणब्याच्या मात्र नळ्याची यात्रा चालली आहे. हाडाचा मराठा शैव आणि शाक्त आहे. कुणब्याचे मात्र नागनरसोबा अनंत आहेत. मराठा काय, कुणबी काय, ह्यांच्या धर्माची पृच्छा फार न केलेलीच बरी. ब्राह्मण पुराणिकासंबंधानें तुकाराम म्हणतात, "पुढिला सांग आपण न करी ". सामान्य ब्राह्मणाचा धर्म जसा सांगण्यापुरताच, तसाच मराठ्याचाहि ऐकण्यापुरताच ! हे देवळ्या देवाला दंडवत घालतील, वेळ पडली तर मुसलमानांहि होतील; पण ह्यांच्या देव्हाऱ्यांवर केव्हांहि टाक म्हणजे ह्यांच्या पूर्वजांच्या मूर्तिच दिसतील. टाक=तक् नांवाची शक वंशाची एक प्रतिष्ठित शाखा होती. तिचेवरून ही टाकांची परंपरा आली असावी. तिचें नांव तक्षक, हे पांडवांचे मोठे शत्रु. जनमेजयानें ह्यांना निःपात केला असें महाभारतांत रसभरित वर्णन आहे. ह्या तक्षक नामक नागवंशांत पूर्वजपूजा विशेष होती असें वर्णन Story of Parthian Nation या पुस्तकांत आहे. प्रागैतिहासिक काळांतील ही देवकें मराठ्यांत म्हणा अगर कुणब्यांत म्हणा आता केवळ लग्नसराईतच आठवतात. येर्वी आजकाल ह्यांचे दैवत भूदेवी उर्फ मायबाप. हें प्रकर्णहि आजकालचें नव्हे. सर्व उपास्यांत कालानुक्रमें ह्याचा नंबर पहिला आहे. हे प्रकरण मी माझ्या **भागवतधर्माचा विकास** ह्या भागांत सांगोपांग व्यक्त केलें आहे. उत्तरे

कडे राजपूत व राठी आणि दक्षिणेंतील रड्डी हे प्रसिद्ध शैव आणि शाक्त होत. तैलंगणांत हिंडत असतां मला रड्डी घराणीं मरीआई, शीतळादेवी वगैरे ग्रामदेवतांचे वतनदार पुजारी व मालक दिसले. रड्डी जसे पुढें पुढें व्यापारांत शिरले, तसे ते शाकाहारी आणि वैष्णव बनले. इकडेहि दुकानदार मराठे व कुणबी तुकारामाच्या *काळापासून वारकरी होऊं लागले. तरी पण त्यांच्या देवता जाखाईजोखाई; आणि* त्यांना नैवेद्य रक्तामसाचा ! ह्याशिवाय त्यांच्या शेतातला डावरा म्हणा किंवा राजधानींतला अश्वमेध म्हणा कसा सिद्ध होणार? " धंदा तसाच देव " हेंच खरें.

शक, हूण इ० नांवाच्या मानवी टोळ्या वायव्येकडून पुरातन काळापासून, किंबहुना आर्य म्हण वणाऱ्यांच्याहि पूर्वींपासून तों इ. सनाच्या ४।५ व्या शतकापर्यंत हिंदुस्थानांत *आल्या आहेत. दक्षिणेंतहि इ. स. पूर्वी ५।७ शतकांपासून त्यांचें अगमन वेळोवेळीं* झालें असावें. तक्षक ह्या नावावरून वर दर्शविल्याप्रमाणें हे लोक जसे नागवंशी असावेत असा तर्क वाहतो, तसेंच तौलनिक भाषाशास्त्राच्या अंतर्गत व्याकरण आणि शब्दकोशाच्या पुराव्यावरून शकाच्या, पल्लवांच्या, यवनांच्या (ग्रीकांच्या) टोळ्या आर्य, द्राविड इत्यादि वंशाच्याहि असाव्यात असा तर्क होतो. ह्या जाती फार फिरल्या आणि मुलुख*गिरी करणाऱ्या असल्यानें यांनी आपल्या पेहरावाप्रमाणें आणि भाषेप्रमाणें धर्महि* वेळोवेळीं बदलला असल्यास मुळींच नवल नाहीं. उलट नसल्यासच महदाश्चर्य ! अगदीं *अलीकडे म्हणजे शालिवाहन शककाच्या आरंभीं दक्षिणेंत नहपान क्षत्रप नांवाच्या एका* शक राजानें व त्याच्या घराण्यानें दोनतीन शतकें बऱ्याच वैभवानें राज्य केलें आहे. या राजांनीं बौद्धधर्म स्वीकारून ब्राह्मणांनाहि फार खुष राखिलें होतें. नाशिक जिल्ह्यांतील चार शिलालेखाचा डॉ. सर भांडारकरांनी आपल्या पुस्तकांतील पान १३ वर जो तपशीलवार उल्लेख केला आहे, त्यांत नहपानाचा जांवई उषवदात यानें तीन लक्ष गाई *दान केल्या, वारणासा या नदीला घाट बांधला,* देवब्राह्मणांना सोळा गांवांचा अग्रहार दिला, ब्राह्मणांची लक्षभोजनें घातलीं, इतकेंच नव्हे; तर अस्सल ब्राह्मणी धर्माच्या *रिवाजाप्रमाणें प्रभासक्षेत्रांत आठ ब्राह्मणांचीं लग्नें स्वखर्चानें करून दिलीं. इ.* माहिती आहे. १८२७ सालच्या बंडानंतर ५।७ वर्षांनीं ग्वाल्हेरच्या शिंदेमहाराजांनीं पुण्यास येऊन बरेच दिवस तळ दिला होता, तेव्हां त्यांनींहि ब्राह्मणसंतर्पणाचीं अशींच शतकृत्यें केलीं होतीं. एकुण राजांचा धर्म लवचीक असणं साहजिक आहे.

**धंदा**—मराठ्यांचे धंदे दोन, शेतकी व शिपाईगिरी, आणि कुणब्यांचा शेतकी एकच, असें आम्हीं वर म्हणालों. ह्यावरून मराठे हे क्रमाक्रमानें राहणारे आणि कुणबी गावखेड्यांत राहणारे हें सिद्ध होतें; पण ह्या दोघांचा इतका एकजीव झाला आहे कीं, धंद्यांच्या दृष्टीनें त्यांच्यांत भिन्नता कल्पिणें केवळ अशक्य झालें आहे. शंभर वर्षांत म्हणजे तिसऱ्याच पिढींत मराठ्याचा कुणबी आणि कुणब्याचा मराठा, म्हणजे शेत*कऱ्याचा राजा आणि राजाचा शेतकरी अशी उलटापालट निदान महाराष्ट्रांत तरी गेल्या* दोन हजार वर्षांत बेमालूम चालू आहे. कोल्हापूरच्या श्रीशाहू राजांनीं मला स्वतः

सांगितलें कीं, राणीपैकीं कोणी बाळंतीण झाली कीं, पहिल्या रात्रीं मुलाला वाळलेल्या गवतावर निजवावें, अशी चाल महाराजांच्या घराण्यांत होती. ह्या चालीचा अर्थहि स्वतः महाराजांनीच सांगितला कीं, आम्ही राजे लोक शेतकरी आहों, हें केव्हांहि विसरूं नये म्हणून ही चाल आहे. कुणबी हा बळी राजा कसा आहे, तो गाय व सर्व गांवठाण त्याचें वांसरूं कसें वगैरे गोष्टी रा. अत्रे ह्यांनीं आपल्या गावगाड्यांत तपशील-वार वर्णिल्या आहेत. खेड्याचा राजा पाटील. गावडा (ग्रामटा) ह्यालाच कानडींत गौडा (पाटील) म्हणतात. ब्राह्मणापासून तों महारमांगापर्यंत सर्व जातींचे बलुतेंअलुतें ऊर्फ कारूनारू ह्यांचीं वासरें. ही गांवगाड्याची घटना व ही सर्व परिभाषा फारच पुरातन आहे. समाजशास्त्राच्या दृष्टीनें ही अपूर्व घटना मराठ्यांच्याहि आगमनापूर्वींची असावी, असा माझा ह्या परिभाषेवरून तर्क होतो. शेतकीचीं उपकरणें, आउतें, चालीरीति, फार काय बलुतंअलुतं हे शब्दहि अस्सल देशी, म्हणजे कानडींतले आहेत. एक हजार वर्षांपूर्वी गोदावरीच्या दक्षिणेकडील सर्व देश, आणि ठाण्याच्या दक्षिणेकडील सर्व कोंकण थेट कावेरीच्या किनाऱ्यापर्यंत राजरोस कर्नाटकांत मोडत असे. **वगळ** म्हणजे कुटुंबाचा पसारा अथवा **वल** म्हणजे उजवी बाजू,ह्या दोन शब्दापासून **बलुतें** या शब्दाची व्युत्पत्ति असावी. वळग + कूड अथवा बल + कूड (उड–ट–त) बलोत असा हा मूळ कानडी शब्द आहे. त्याचें कारूं (कार, कृ धातूपासून) हें आर्यन रूप होय. तसेंच अलोते याचें नारु असें आर्यन भाषांतर होय. बलोतें अथवा कारूं म्हणजे हातानें (उजव्या हातानें) श्रम करणाऱ्याला जें अव्वल दर्जाचें वेतन मिळतें तें; आणि नारु अथवा अलोतें म्हणजे देवाच्या अगर धर्माच्या नांवावर दुय्यम आणि गौण दर्जाची भिक्षा जी मिळते तो हक्क. नारु = नारायण असा देववाचक आर्य भाषेतला अर्थ आहे. एल म्हणजे देव. ह्या अर्थाचा शब्द सेमेटिक आणि सुमेरियन भाषेतला आहे. तो कानडींत किंवा कर्नाटकांत सिंध प्रांतांतून आला असावा. एल्लप्पा (यल्लाप्पा), एल्लापूर, एल्लूर व यलम्मा वगैरे माणसांचीं, गावांचीं, दैवतांचीं नावें शक मराठ्यांनीं दक्षिणेंत आणलीं किंवा द्राविड कुणब्यांनीं त्यांच्या पूर्वीच तेथें नेलीं ते सांगता येत नाहीं तीं आज मराठा आणि कानडी कुणब्यांशीं एकजीव झाली आहेत. बलुतं म्हणजे उजवी-कडचा संघ असा अर्थ असल्यास त्याला जुळणारा एलुतें म्हणजे एर = दुय्यम अथवा एड = डावीकडचा संघ असाहि अर्थ लागतो. बल = उजवा, एड = डावा असे कानडी शब्द आहेत. व्युत्पत्ति कशीहि असो, हीं नावें आणि ज्यांचीं हीं नावें आहेत त्या संस्था मराठ्यांशीं आणि विशेषतः कुणब्यांशीं एकजीव आहेत; पण चमत्कार हा कीं, स्वतः मराठा किंवा कुणबी हा बलुतेदार नसतो. अलुतेदार तर कधींच नसावयाचा. बलुते-अलुत्यांचा तो दाता अगर धनी असतो. म्हणजे कारूंचा धंदा किंवा नारूची भिक्षा मराठा अगर कुणबी कधीं स्वतः करणार नाहीं कीं मागणार नाहीं. असा हा परिपाठ पुरातन आहे.

महोदय कै. राजवाडे ह्यांनीं "**राधामाधवविलासचंपू**"च्या प्रस्तावनेंत

लिहितांना मराठ्यांचे दोन भेद कल्पून पुष्कळ टीका केली आहे. तिचें खंडण मीं मागें 'विजयी मराठ्यां'त एक लेखमाला लिहून केलेंच आहे. उत्तरेकडच्या मराठ्यांना राजपुतांचे वंशज व आर्य असें कल्पून आणि दक्षिणेकडचे मराठ्यांना नाग असें कल्पून एकाची स्तुति व दुसऱ्याची निंदा राजवाड्यांनीं केली आहे. वंशवाचक पुरावा देतांना दक्षिणेकडच्या मराठ्यांचें विराठे ऊर्फ बेरड हें निंद्राप्रचुर एक नसतें नांव कल्पून अतिप्रसंग केला आहे. बेरट = बेडर ह्या नांवाची जी एक हीन मानलेली जात कर्नाटकांत आहे तिच्या नांवाची राजवाड्यांनीं केलेली विराठे ही व्युत्पत्ति म्हणजे एक अक्षम्य चुकी आहे. बेड हें कानडी व तेलुगू जातिवाचक नांव आहे. हिचें मूळ व्याध हा संस्कृत शब्द आणि त्याचेंहि मूळ बेट = शिकार हा अस्सल कानडी व तेलुगू शब्द आहे. मराठे ही शिकारी जात आहे; पण तेवढ्यावरून त्यांना बेडरांप्रमाणें कधीं कोणीं हीन मानलें आहे, असें राजवाड्यांशिवाय कोणी म्हणूं शकणार नाहीं. बेड या एकवचनाचें कानडी व्याकरणांत बेडर हें अनेकवचन आहे. कानडींत व तेलुगूंत जातिवाचकच नव्हे तर समाहारवाचक सर्व शब्द अनेकवचनांत असतात. जसें कुरुब = धनगर एकवचन. कुरुबर अनेकवचन = धनगर जात. जोगा = जोगळा एक जोगळ्याचा कण. जोगुलु = जोंधळे (तेलुगू). विराठ = बेडर ही व्युत्पत्ति कशीहि असो. मराठे हे मृगयाप्रिय असले तरी बेडर, हरिणशिकारी, कटबु, शिकलगार ह्याप्रमाणें हीन अशी एक गुन्हेगार जात त्यास नव्हत.

ह्याचसंबंधीं राजवाड्यांनीं मराठ्यांचा राजकीय व सामाजिक दर्जा ठरवितांना त्यांना गणराज पद्धतीचें (म्हणजे जिला इंग्रजींत Feudal = सरंजामी म्हणतात त्या पद्धतीचे) ठरविलें आहे. हा ठराव मराठ्यांना व कुणब्यांनाहि लागू आहे, हें खरें. उत्तरेकडचे राजपूत आणि युरोपातले जर्मन-रशियनांतहि ही पद्धत मागें व आतांहि आढळते. ही सरंजामी पद्धत आणि रा० अत्रे ह्यांनीं वर्णिलेली गावगाड्याची अति पुरातन पद्धत ह्या दोन्ही एकच नव्हत. सरंजाम ही मराठ्यांची लष्करी घटना आहे, आणि गावगाडा ही कुणब्याची मुलकी घटना आहे. मराठे हे धंद्यानें राजकारणी असल्यानें त्यांच्या परंपरेनच नव्हे तर वैयक्तिक स्वभावानेंहि अशा अनेक सामाजिक गप्पांचे अवशेष दृष्टी मारून यशलेंच संशोधकाला आढळतील.

**विवाह**—मराठा ओळखण्यात त्यांची पुरातन विवाहपद्धति एक मुख्य साधन आहे. वर म्हटलेंच आहे कीं, मराठा जात आणि धर्म यापेक्षा कुळ अधिक मानणारा आहे. तो वाटेल त्याच्याशीं जेवील, वाटेल त्या देवाला नवस करील, वाटेल त्याचें नांव आपल्या मुलाला देईल; पण धडा करतांना आपली तरवार व नागर हींच स्मरेल व त्यांची पूजा करील, आणि लग्न करतांना—विशेषतः मुलगी देतांना, (घेतांना तितकें नाहीं) प्रतिपक्षाच्या कुळाचा फार शोधीत बसेल. लष्करी जात असल्यानें बहुतनीक घराणां माहित वाढत गेला. त्यामुळें घेणाचीहि मुलगी उचलून आणली तरी चालेल; पण आपल्या पोटच्या गोळा दुसऱ्याला देतांना मात्र त्याला कुळीचा फार शोधावा

लागतो. द्राविडी भाषेत कुळीलाच जातकुळी अशी संज्ञा आहे. आर्यवर्णाश्रमधर्म आर्येतरांमध्यें तंतोतंत नसणारच; पण आपल्या कुळाचा अभिमान सर्व मानवमात्रामध्यें आहे. मग स्वतःला राजे म्हणविणाऱ्या मराठ्यांत व कुणब्यांत तो अधिकच असणार. येवढ्याबरून मराठ्यांमध्यें आर्य म्हणविणारे वंश नाहींतच असें म्हणणें नाहीं. परंतु विवाहाच्या दृष्टीनें पाहूं जातां त्यांच्या खानदानींत अनेक आर्येतरांच्या रूढि अद्यापि प्रमुखपणानें झळकत आहेत त्या खालीं दिल्या आहेत.

देवक : ब्राह्मणांच्या विवाहांत अग्नीचें प्राधान्य आहे. तसें मराठ्यांत किंबहुना राजपुतांतहि नाहीं. सप्तगामुळें होम, सप्तपदी, कन्यादान, जांवयाची पायपूजा वगैरे ब्राह्मविवाहाच्या रूढि जशा मराठ्यांनीं उचलल्या; तशाच हळदी, देवकार्य, राजभेटी, रासन्हाणी, गडगनेर, वरावत वगैरे धार्मिक व केवळ सामाजिक रूढि मराठ्यांच्या ब्राह्मणांनींहि उचलल्या. या रीति कांहीं अंशीं हौसेनें व कांहीं अंशीं प्रतिष्ठा वाढविण्या-साठीं एकमेकांपासून उचललेल्या असणें साहजिक आहे. हल्लींचीं क्षुद्र देवकें हीं पूर्वींचीं आद्य उपास्यें. तीं मराठ्यांना लग्नांतच तेवढीं आठवतात. देवकें हीं गोत्राचीं द्योतकें होत. देवक जमलें कीं, गोत्र अथवा कुळ जमलें असें समजून, ब्राह्मणांत जसा सगोत्र विवाह त्याज्य तसाच मराठ्यांत सदेवक विवाह त्याज्य समजतात. देवक जसें मराठ्यांत आहे तसेंच दक्षिणेंतील रड्डीमध्येंच नव्हे, तर इतर आर्येतरामध्येंहि आहेत. त्याला कानडींत बळि असें नांव आहे. याची व्युत्पत्ति बड्डी = मुळी किंवा बळ्ळी = वेल अशी असावी. कोणत्या तरी झाडाची मुळी अगर वेल हीच पूर्वींचीं विशेष देवकें होतीं. सूर्य, चंद्र, नाग, मच्छ, कच्छ, वराह हीं प्रतिष्ठित चिन्हें राजकीय निशाणांवरून पुढें मराठा वाघ्याचा पाग्या झाल्यावर त्यांच्यात झळकूं लागलीं. फार तर काय; कवडी, केरसुणी व फाटकी वहाण हीहि देवकें आहेत; पण कोणी क्षत्रियकुलावतंस असल्या देवकाचें देवकार्य आपल्या राजवाड्यांत आजकाल करील हें संभवत नाहीं. उलट होम, सप्तपदी आणि ऐरणीदान या आर्यपरंपरा अनार्य राजवाड्यात वेदमंत्र म्हणूनहि जर कोणी करूं म्हटल्यास, मराठ्यांच्याच काय; पण इतरांच्या मिश्रविवाहांतहि पौरोहित्य करण्यास प्रत्यक्ष शंकराचार्य म्हणविणारे आजकाल प्रसिद्धपणें पुढें येत आहेत ! येथें प्रश्न वंशाचा नसून दक्षिणेचा असतो हें उघड आहे.

एंथोव्हन आपल्या Tribes of Bombay Presidency या पुस्तकात ऐशीं देवकें आणि ब्यायशीं बळींचा उल्लेख करून म्हणतो कीं, " या सर्वांचीं इंग्रजी नावें देणें शक्य नाहीं. तीं सर्व कर्नाटक व म्हैसूर प्रांतातील झाडें व वेली आहेत. " मग या देवकाचें देवकार्य करणारे मराठे व रड्डी यांना या वेली उत्तरेकडून येताना बरोबर आणून त्यांची कर्नाटकांत लागवड केली कीं हें सर्व मूळ कर्नाटकांतलेच वंश ? हे कोंडे मराठे हे शक आणि कुणबी हे द्राविड असें मानल्याशिवाय सुटण्याचा संभव दिसत नाहीं. खालील पदार्थ देवकात आहेत व बळींतहि आहेत. या एकाच माळेत प्राणी, वनस्पति व निर्जीव पदार्थांचीहि गणना झालेली आहे.

| | | |
|---|---|---|
| १ केतकी | ५ वेत | ९ हरीण |
| २ जांभूळ | ६ कांसव | १० कुऱ्हाड |
| ३ वड | ७ नाग-साप | ११ सोनें |
| ४ नागचांफा | ८ डुकर | १२ हळद इ० |

प्राचीन मानवी वंशांत कांहीं वंश मातृप्रधान, तर कांहीं पितृप्रधान होत. म्हणजे कांहींची कौटुंबिक आणि वारशाची पद्धति आईकडून व इतरांची बापाकडून चालत आलेली आहे. उदा० मलबार आणि ब्रह्मदेशांत स्त्रियांचें प्रत्व अद्यापि अबाधित असलेलें मीं स्वतः शोधून पाहिलें. स्त्री म्हणजे कस्पटाप्रमाणें मानणारे वंश सेमेटिक, तुर्क, शक आणि आर्यहि होते व अद्यापि आहेत. पण ब्रह्मदेशांत पुरुषच कस्पटाप्रमाणें बायकोच्या नजरेखालीं नांदतो! कुराणांत चार बायका कराव्या असें सांगून महमदानें स्वतः नऊ केल्या! पण श्रीकृष्णाला तर सोळा हजार बायकांचे स्वामी हा एक जणू किताबच अर्पण केलेला आढळतो. शक, पल्लव इत्यादि वंश बहुपत्नीक होते; पण मराठ्यांप्रमाणें कुणबी हे पितृप्रधानच (Patriarchs) होते असें म्हणवत नाहीं. त्यांच्यामध्यें मामेबहिणींशीं प्रत्यक्ष भाचीशींहि (बहिणीची मुलगी) लग्नें घडतात. ही अस्सल द्राविडी चाल आहे. लग्नांत काकाचें किंबहुना बापाचें कांहींच प्रयोजन नसून मावळ्याचें मात्र महत्त्व फार आहे. 'आई मरून मावळा असावा' अशी कानडींत म्हण आहे. लग्नांत वधूवरांच्या मागें, विशेषतः वराच्या मागें त्याचा मावळा नंगी तलवार उगारून सर्व पाणिग्रहणाचा विधि उरकेपर्यंत उभा राहावा लागतो. ही गोष्ट मातृप्राधान्य दाखविते. मलबारांत जरी वारसा आईकडून चालतो तरी मावळा तिचा कारणवान् म्हणजे वहिवाटदार असल्यामुळें वारसा त्याच्या मुलीस उतरतो!

**पडदा :** मराठ्यांमध्यें पडदा आहे; तर कुणब्यांत तो मुळींच नाहीं. उलट कुणब्यांत पुनर्विवाह आहे, तर मराठ्यांना तो मान्य नाहीं. पण हा सोंवळेपणा मराठे हिंदुस्थानांत आल्यावर ब्राह्मणांच्या ससर्गानें त्यांच्यांत आलेला दिसतो. ह्या गोष्टीवरून मिश्रवंशीय कुणब्यां-मराठ्यांचा व्याहीपणा मराठे हे दक्षिणेंत आल्यापासून घडल्याचें व्यक्त होत आहे. राजपूत व जाट ह्यांचाहि परस्पर संबंध अगदीं मराठ्यां कुणब्यांसारखाच उत्तरेकडे चालू आहे. जाट हे बाहेरून राजपुतांबरोबरच आलेले कुणबी होत. दक्षिणेंतील कुणबी कदाचित् मराठ्याच्या पूर्वींच इकडे अतिप्राचीन काळीं आले असतील; पण ते जाटां-पेक्षाहि मराठ्यांशीं अधिक एकजीव झाले आहेत. पडदा हिंदुस्थानांत मुसलमानांनीं प्रथम आणिला ही गोष्ट निव्वळ खोटी आहे. राजपुतांनीं आणि मराठ्यांनीं तरी तो मुसलमानांपासून घेतला नसून, तो ते हिंदुस्थानांत येण्यापूर्वींच पाळीत होते. हिंदुस्थानाबाहेरील शकस्तवांमध्यें तो पूर्वीं होता हें आपणांस पुढें लिहिन इतिहासाच्या पुराव्यावरून दिसेलच. राजपुतांची व मराठ्यांची वरात घोड्यावरूनच निघाली पाहिजे. इतकेंच नव्हे तर ह्या जातीं जोरावर असल्यामुळें, इतर जातींची वरात घोड्यावरून काढण्यास ह्यांची हरकत होऊं लागली. सिंध देशाचा दाहिरनामा ह्या नांवाचा एक जुना

इतिहास आहे. त्यांत राजपुतांनीं जाटांना हीन समजून त्यांचा अनन्वित छळ केल्याचें वर्णन आहे. तितका छळ मराठ्यांनीं महारांचाहि केलेला आढळत नाहीं. तरी महारांनीं घोड्यावरून वरात काढण्यास मराठे पाटील परवानगी देण्यास धजणार नाहींत; महारानी वरात बैलावरून नियेल; आणि महारहि मांगांना आपली वरात रेड्यावरूनच काढण्याचा आग्रह चालवतील. ह्यावरून काय सूचित होतें ? घोडा हा प्राणी सबंध हिंदुस्थानांत फार फार प्राचीन काळीं मुळींच नव्हता. हें जनावर मूळ मध्य आशियांतलें. अथी = असी, ही शकवंशाची एक मुख्य शाखा, जिचें नाव सबंध आशिया खंडाला पडलें, त्या जातीचें हें मुख्य वाहन. पह्लव ऊर्फ पार्थ म्हणून जें एक राष्ट्र मध्य आशियांत होतें, त्यांतील योद्धे घोड्याच्या पाठीवर झोपहि घेत असें वर्णन Story of Parthian Nation ह्या पुस्तकांत आढळतें. अस्सल घोडा जसा जमिनीला पोट टेकत नाहीं तसा अस्सल मराठा स्वार घोड्यावरून न उतरतां त्याच्या पाठीवरूनच दिवस आणि रात्रहि काढील असा अलीकडच्या इंग्रज सेनापतींचाहि भरंवसा आहे, तसाच राजपुतांविषयीं मोगल बादशहांना होता. बैल हा प्राणी सिंध व उत्तर हिंदुस्थानांत पूर्वी जितका होता तितका दक्षिणेंत नव्हता. तंजावरकडील एका अत्यंत प्राचीन कबरस्थानांतील मडक्यांत नुसत्या म्हशी, रेडे, डुकरांचींच छायाचित्रें आढळलीं. ह्यावरून बैलवाल्या कुणब्यांचें मूळ स्थान दक्षिणेंतलें नमावें आणि घोडेवाल्या मराठ्यांचें मूळ स्थान तर मध्य-आशियांतलें असावें, असें अनुमान करण्यास काय हरकत आहे ?

**वीर :** मराठ्यांच्या लग्नांत कर्नाटकांत वीर निघत असतो. हा एक वरातीप्रमाणेंच छबीना असतो. एका मनुष्याचें अंगाला हळद माखून त्यावर पुष्कळसे दागिने घालितात. तो हातांत नागवी तलवार घेऊन वाद्याच्या तालावर ती परजीत छबिन्यापुढें चालतो. त्याला वीर म्हणतात. पण ही चाल आता रड्डी आणि लिंगायतामध्येंच विशेष आहे. कोल्हापुराकडील कुणब्यांच्या लग्नांत वीर निघतो; पण खानदानी मराठ्यांत अलीकडे ही लग्नांतील चाल कोठें फारशी आढळत नाहीं हा चमत्कार आहे. मराठे सारे वीर म्हणून त्यांच्यात ही चाल नसावी. ज्या कुणबी घराण्यांत मागें एकदा वीर पुरुष रणात मारला गेला, त्यांतच अशी चाल असेल असें वाटतें. कुणबी पूर्वी जैन, लिंगायत वगैरे होते. धर्म बदलला तरी लग्नांतल्या रूढि बदलत नाहींत, ह्याचें हें उदाहरण आहे. एकंदरींत ही चाल कुणब्यांतीच दिसते.

**खाणेंपिणें :** ह्या बाबतींत कुणब्यांत आणि मराठ्यांत कालपरत्वें आणि देशपरत्वें भेद आढळतो, तो मुख्यतः मांसाहार आणि मद्यपान ह्या बाबतींतच होय. साधारणतः देशावरील शेतकीच्या प्रदेशांतील खेड्यात राहणारे कुणबी मांसाहार फार बेतावेतानें करितात व दारू तर पीतच नाहींत. अलीकडे इंग्रजी अंमलांत व त्यांचेंच अबकारी धोरण संस्थानांनीं उत्पन्नाच्या लोभानें स्वीकारल्यामुळें, खेड्यांतील कुणब्यांची फार शीलहानि होऊं लागली आहे ! साधारणतः मद्यपान हें उत्तरेकडचें व्यसन असून

दक्षिणेकडील द्रावीड उष्णकटिबंधांत हें व्यसन पूर्वी नव्हतें असा अदमास आहे; परंतु पूर्वीपासून शहरांत राहणाऱ्या लष्करी पेशाच्या मराठ्यांनीं दारू पिणें हें साहजिकच नव्हे तर भूषणावहहि मानिलें आहे. खानदानी पेशाच्या मराठ्यांना शिकारीचा नाद असल्यानें तें स्वतः मारून आणलेल्या जनावरांचेंच मांस खाण्याचा संप्रदाय पाळणारे अशाहि पुष्कळ आढळतात. अशा जनावरांत डुकराची शिकार प्रतिष्ठित मानण्यांत येते. मारल्यानें डुकर मारणें व त्याचें मांस आपल्या इष्टमित्रांस वांटणें ही मराठ्यांची मोठी मिजास. खेड्यांत राहणारे कुणबी पिढ्यानुपिढ्या कृषीकर्माचा सात्त्विक धंदा केल्यानें म्हणा, किंवा बुधदुमत्याची व्यापूर्ती असल्यामुळें, किंवा गरिबीमुळें म्हणा, अगर जैन, लिंगायत, वैष्णव धर्मांच्या संस्कारामुळें म्हणा, बहुतेक शाकाहारीच असतात. महानुभाव पंथाच्या मःनित्यानें वऱ्हाड-नागपूरकडचे कुणबीच नव्हत, तर श्रीमंत नागरिक, देशमुख, पाटीलदेखील फसल्याहि मांसाला कधींहि शिवत नाहींत. मद्यपानाची तर गोष्टच दूर. पुरुषांपेक्षां कुणब्यांच्या बायका अधिकच निरामिष राहतात. ह्या भेदामुळें क्वचित् प्रसंगीं रोटीबेटीच्या व्यवहारावरहि परिणाम होत असलेला आढळतो.

मराठे हे भोजनव्यवहारांत अस्पृश्यांशिवाय इतर हिंदूंशीं अटक पाळीत नाहीत असे म्हटलें; पण केव्हां केव्हां ह्या सोवळेपणाहि पाळल्याचीं चमत्कारिक उदाहरणें घडतात, तीं धर्माच्या दृष्टीनें नसलीं तरी इतिहाससंशोधनाच्या दृष्टीनें चिन्तनीय वाटतात. कोल्हापुराकडे गडकरी आणि कोटकरी म्हणजे लष्करी पेशाचे मराठे मराठी स्वराज्याचे पुरातन वतनदार आहेत. यांना वेतन आणि वतनाशिवाय प्रसंगविशेषीं शिधा मिळतो. तो ते कधींहि शिजलेला न घेता कोरडाच घेत असतात. फार काय, ही पुरातन नोकरमंडळी प्रत्यक्ष छत्रपति महाराजाच्या पंक्तीला बसून जेवण्यालाहि तयार नसत, असा पूर्वीचा रिवाज मला एका सन्मान्य मित्रानें सांगितला. मरहूम ग्वाल्हेरचे महाराज माधवराव शिंदे यांचे सासरे रत्नागिरीचे राणे त्यांच्या पंक्तीला जेवण्याचें नाकारीत असेहि मी ऐकले आहे. हा भेद शेतकरी पेशा अगर खेड्यांतील वस्तीमुळें पडणें संभवनीय नाहीं. कोल्हापूर आणि कोंकण प्रांतांत एक वेळ जैन धर्माचाच व्याप फार होता. त्यानंतर लिंगायत धर्माची छाप बसली. या धार्मिक कारणावरूनहि जर या भेदाची मीमांसा होत नसल्यास राजघराणीं हीं नेहमीं उपऱ्या मराठ्यांचीं असल्यामुळें त्यांच्याशीं स्थानिक मूळ कुणबी राजरोस बेटीव्यवहार करूनहि रोटीव्यवहार नाकारणें शक्य आहे. दिल्लीच्या मोगलांना राजपुतांनीं बेटी दिली; पण रोटी घेतली नाहीं. तोच प्रकार खालीं, मलबारांत नम्बुद्री ब्राह्मण नायर जातींच्या बेटी घेतात; पण रोटी घेत नाहींत, या रिवाजांतहि दिसतो. वऱ्हाड-नागपूरकडचे जुने मराठे कुणबी चांगले सुसंपन्न आणि देशमुखी-पाटिलक्यांचे सरंजामदार आहेत. ते प्रत्यक्ष नागपूरचे भोसले घराणें उपरें समजतात. कारण, भोसल्यांचें घराणें त्या प्रांतात अलीकडे गेलें. हे कुणबी मद्यमांसाला शिवत नाहींत. माझे एक देशमुखी मित्र आहेत, त्यांना तर मांस किंवा रक्त पाहिल्याबरोबर घेरीच येते! असले लोक बेटी देऊनहि पंक्तीला बसत नसल्यास आश्चर्य तें काय?

महार मेलेल्या पशूचें मांस खातात; पण डुकराचें मांस मुसलमानाप्रमाणेंच त्याज्य समजतात. मराठे तर जंगली डुकराचें मांस आवडीनें खातात. महारांचें डुकर हें कदाचित् प्राचीन देवक असावें. मराठ्यांतहि ज्यांच्या घरीं ढोलाई देवी आहे. ते शेळीचें किंवा बोकडाचें मांस वर्ज्य समजतात. धिम्मेपणानें माग काढीत मागें गेल्यास मराठ्यांत आणि कुणब्यांत आज ज्या अनेक तत्सम जातींचा समावेश झालेला आढळतो त्यांची परस्पर वंशभिन्नताहि अधिक स्पष्ट आढळून येईल.

बेटीव्यवहार, रोटीव्यवहार आणि भेटीव्यवहार इत्यादि हिंदुस्थानांत जे जातिभेदाचे नियम पाळण्यांत येतात ते केवळ भरतखंडांतच आहेत व ते आर्योंनीच येथें आणिले असा जो सर्वत्र समज आहे तो चुकीचा आहे. ते भरतखंडाबाहेर आणि निरनिराळ्या मानववंशांनी मानवी इतिहासात निरनिराळ्या काळीं पाळले आहेत, हें मानववंशशास्त्रज्ञांना नीट अवगत आहे. विगोत्रविवाह ( Exogamy ), अनुलोम उद्विवाह ( Hypergamy ), एकत्र खानपानाचा प्रतिबंध ( Non-Commensality ), अस्पृश्यता ( Untouchability or Polution ) इत्यादि जातिभेदाचे नियम हिंदुस्थानाच्या दूरदूरच्या निरनिराळ्या भागांतच नव्हे, तर अखिल जगाच्या निरनिराळ्या दूरदूरच्या भागांत निरनिराळ्या काळीं पाळण्यांत आलेले आहेत, ते असे:—इस्रायल देशात प्राचीन काळीं तेथील पुरोहितवर्ग इतराच्या हातचें खात नसत. इंग्लंडांत अद्यापि सामान्य वर्ग आपल्यापेक्षा उच्च दर्जाच्या सरदार लोकांत आपल्या मुली देण्याला उत्सुक असतात आणि हे वर्ग सुसंपन्न व सुसंस्कृत असल्यास तेथील सरदारहि अशा मुली घेण्यास फारशी हरकत घेत नाहीत. जपानांत एटा व हीना या जाती अद्यापि अस्पृश्य आहेतच. ब्रह्मदेशांत तुग्रा याजा, पयाचून, सडाला, केया, तुताँसा, पके, लेयाढाँ, थंजॉ वगैरे तद्देशीय वर्ग आमच्यातल्या महार, मांग, भंगी लोकांप्रमाणेंच अगदीं अस्पृश्य आहेत हे मीं स्वतः पाहिले. त्याचें तपशीलवार वर्णन मीं माझ्या "ब्रह्मदेशांतील बहिष्कृत वर्ग" या लेखमालेंतून "नवा काळ" वगैरे वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केलें आहे. हे सर्व येथे सागण्याचें कारण हे की, बृहन्महाराष्ट्रांतील मराठा म्हणून राष्ट्रवजा जो एक मोठा जनसमूह आहे तो वर्ग आणि कुणबी व तत्सम जातीं यांच्या दरम्यान अस्पृश्यता शिवायकरून वगैरे सर्व नियम नेहमीं नसले तरी प्रसंगविशेषीं पाळण्यांत आलेले वरील परिच्छेदात सांगितलेल्या खाण्यापिण्यातल्या सोवळेपणावरून लक्षांत येण्यासारखें आहे. प्रत्यक्ष मराठे हे स्वतः कधीच खाण्यापिण्याचे बाबतीत सोवळेपणा पाळीत नाहीत, तरी काहीं कुणबी केव्हां केव्हां हा सोवळेपणा दाखवितात. हा सोवळेपणा दक्षिण देशांतील द्राविडांत आणि महाराष्ट्रांतील लिंगायतात फार आहे. फार तर काय, खाण्यापिण्यात हे द्राविड लोक दृष्टीचाहि विटाळ मानतात, मग भेटीची गोष्ट तर दूरच राहिली! यावरून कुणबी हे द्राविड आणि मराठे हे आर्य, शक, पल्हव, हूण, अभीर इत्यादि मध्य एशियातील मागाहून वेळोवेळीं आलेल्या अनेक वंशांचें एक जाळें असावें हे सुचविण्याचा माझा उद्देश

आहे. इंग्लंडांतील सरदार वर्गाप्रमाणें अस्सल मराठेहि श्रीमंत कुणब्यांच्या मुली घेतात, इतकेंच नव्हे, तर वेळ पडल्यास गरीब मराठे श्रीमंत कुणब्यांस मुली देतातहि. याला मीं अनुलोम उद्विवाह (Hypergamy) असें नांव दिलें आहे. आपल्यापेक्षा उच्च मानलेल्यांना आपल्या मुली देणें (Hypergamy) हाच प्रकार राजपूत आणि जाट यांमध्यें उत्तर हिंदुस्थानांत आहे आणि खालीं मलबारांत नायर व त्यांच्या खालच्या वर्गांतहि आहे. नंबुद्री ब्राह्मण आणि नायर राजवंश यांचे दरम्यान हा उद्विवाह हल्लीं चालू आहेच.

**अंत्येष्टि :** मराठ्यांत प्रेतें जाळण्याची चाल आहे; पण दक्षिण हिंदुस्थानांतील कांहीं मराठ्यांत प्रेतें पुरण्याचीहि चाल आढळते. हे मराठे श्रीशिवोत्तरकालीं जर दक्षिणेंत गेले असतील तर त्यांच्यांत ही पुरण्याची चाल कशी पडली याचें आश्चर्य वाटतें. दोनचार शतकांत अंत्येष्टीसारख्या गंभीर विधींत फरक होणें संभवनीय नाहीं. यावरून हे दक्षिणेंतील मराठे एक तर द्राविड असावेत किंवा तसें नसल्यास त्यांनीं केव्हां तरी लिंगायत धर्माचा स्वीकार करून त्यांनीं पुन्हा अलीकडे ब्राह्मणी धर्माचा स्वीकार केला असावा; पण प्रेतें पुरण्याची चाल तशी राहून गेली असावी.

**श्राद्ध :** खरें पाहतां ब्राह्मणी पद्धतीचा श्राद्धविधि मराठ्यांत नाहीं. जेथें हा रिवाज आढळतो तेथें तो ब्राह्मणांच्या सहवासाचा परिणाम असावा. राजे लोक व इतर प्रतिष्ठित मराठा समाज यांवर असा परिणाम होणें केवळ साहजिक आहे. मराठ्यांनीं हिंदुस्थानांत आल्यावर बौद्ध व जैन धर्मांचा स्वीकार केला, तसाच ब्राह्मणी धर्माचाहि केला. पण सामान्य दर्जाचे मराठे आणि कुणबी यांच्यांत श्राद्ध नसून नुसती महाळ घालण्याचीच चाल आहे. सर्व मराठे जर आर्य असते तर त्यांच्यांतील गृह्यसंस्कारांत वेदोक्त पुराणोक्ताचा तंटा किंवा वेदबाह्य ग्राम्य चालीचा शिरकाव झाला नसता. कोणी विचारतील कीं, काहीं ब्राह्मणांत वेदबाह्य ग्राम्य चाली आणि उपास्यें आढळतात आणि त्यावरून त्यानाहि व्रात्यस्तोम करावा लागतो, तेवढ्यावरून ते अनार्य ठरतात काय ! पण त्याला उलट प्रश्न असा कीं, तेवढ्यावरूनच ते अनार्य ठरले नाहींत तरी आजचे सारेच ब्राह्मण प्राचीन काळींहि आर्यांत गणले जात होते याला तरी पुरावा काय ! असो. प्रस्तुत विचार मराठ्यांपुरताच असल्यानें अशा अवांतर वादाम एथें अवकाशच न देणें बरें. मनुस्मृतींत ज्या क्षत्रियासाठीं व्रात्यस्तोम विधि सांगितला आहे अशा क्षत्रियांत शक, पल्लव, यवन, ग्रीक, अंगवगादि आहेत, तर हे मराठे नसतील काय !

**पेहराव :** हिंदुस्थानचा बराच भाग उष्ण कटिबंधांतला असल्यामुळें दक्षिण हिंदुस्थानांत तरी पेहरावास प्राधान्य नाहीं. निदान शिरोवस्त्र तरी उत्तरेकडून आलेलें दिसतें यांत शंका नाहीं. डोईवरचा रुमाल, फेटा, बांधलेली पगडी, टोपी या सर्व गोष्टी हिंदुस्थानाबाहेरच्या, विशेषतः मध्यआशियातल्या आहेत हें खिस्ती शकाच्या पूर्वीच्या व नंतरच्या दोनचार शतकांतील नाण्यावरून आढळणारे ठसे व इतर चित्रें यावरून दिसून येतें. अद्यापि मद्रासी व बंगाली राष्ट्रें हीं बोडकींच आहेत. ब्रह्मी व आसपासचीं

मोगली राष्ट्र डोईला एक व्हानसा हातरुमाल गुंडाळतात. दक्षिणेंत आज जें शिरोवस्त्र दिसतें तें मराठ्यांनीं प्राचीन काळीं मध्यआशियांतून आणिलेलें असावें. जेथून पूर्वी मराठे आले, तेथूनच मोगल बादशहाहि आले व मुसल्मानी धर्माचा उदय होण्यापूर्वी त्यांचा पेहराव मध्य-आशियातलाच असणार. मग बुबकेदार अथवा पिळाचें पागोटें, ढिली पेहरण, तंग वासकूट, पायघोळ विजार अथवा तंग मांडचोळणा इत्यादि पेहरावांच्या तपशिलाचे बाबतींत हल्लींच्या मराठ्यांचें इतर वरिष्ठ वर्गाच्या हिंदूंपेक्षां मुसल्मानांशीं–मोगल वंशाशीं अधिक साम्य असावें. यात काय आश्चर्य ? " जसा राजा तशी प्रजा " या न्यायानें हा दरबारी पोशाख पुढें ब्राह्मण-वैश्यांनीहि स्वीकारणें साहजिक आहे. धोतराचा कासोटा ही विजारीची सस्ती नक्कल आहे आणि ती विजारीपेक्षां अधिक सोईची आहे; पण अगदीं दक्षिणेकडील द्राविडांनी ती अद्यापि उचललेली नाही. ते विनकासोट्याचें एक फडकें कंबरेभोंवतीं पायघोळ गुंडाळतात; तरी पण तंजावरकडील मराठे अद्यापि धोतराचा घट्ट काचा घालतात. राजपूत, मारवाडी वगैरे धोतराचा, दोन्ही टांगांवरुन काचा घालतात व दक्षिणेकडील लष्करी व पोलीस मराठे तेवढेच अशी दुटांगी कास घालतात. इतर डाव्या टांगेवरुन एक कास घालतात पण मोकळें फडकें कोणीहि मराठा कितीहि गरीब असला तरी वापरीत नाहीं. पादत्राणांचाहि विशेष ध्यानात घेण्यासारखा आहे. मद्रासकडे श्रीमंत आणि सभ्य द्राविडहि रस्त्यातून अनवाणी हिंडतो; पण गरीब मराठा फाटका जोडा अगर तुटकी वहाण तरी घालून खडत चाललेला आढळेल. अस्सल मराठ्याच्या बायका लुगड्याचा कासोटा घालीत नाहीत. घोट्यांवरील पायाचा कोणताहि भाग दाखविणें गरीब मराठणीला लपगार नाहीं. हें पायघोळ लुगडें लहंग्याचें रूपांतर होय. खानदानी मराठणींचीं नखें व टांचहि कोणास दिसणार नाहींत. गरिबाच्या लग्नांहि वधूच नव्हे, तर विहिणी आणि करोल्या लुगड्यावरुन शुभ्र पासोड्याचा सर्व अंग आणि चेहराहि झाकणारा बुरखा वापरतात. आणखीहि इतर बारीकसारीक भेद आहेत, त्यांवरून मराठ्याचा वंश व मूलस्थानाचे दिग्दर्शन होतें. तें मूलस्थान मध्यआशिया असावें, असें सागण्याचा उद्देश आहे.

## लिखित इतिहासाचे पुरावे

वर विशेषतः भाषाशास्त्राचे आणि समाज-शास्त्राचे पुरावे याचा विचार केला. आतां लिखाणाचे अथवा लिखित इतिहासाचे पुरावे या लेखांत देऊन हा विषय पुरा करावयाचा आहे. परंतु अस्सल ऐतिहासिक पुरावे अशा विषयांत निदान हिंदुस्थानात तरी दुर्मिळच असणार हें प्रथमदर्शनींच कबूल केले पाहिजे. आमचीं पुराणें हल्लीं ज्या स्थितींत आढळतात ती इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत विकृत स्थिति आहे. पुराणांचें मूळ स्वरूप अथवा त्यांत

वर्णिलेली वस्तुस्थिति वेदकालापूर्वीहि प्राचीन आहे, अशी आधुनिक संशोधकांची समजूत होत चालली आहे. F. E. Pargiter, M. A. यांचा Ancient Indian Historical Tradition हा अत्यंत परिश्रमानें तयार केलेला ग्रंथ या समजुतीचें प्रमुख उदाहरण आहे. पुराणांचें हें प्राचीन स्वरूप आतां जरी उपलब्ध नाहीं आणि उपलब्ध होण्याची मुळीं आशाहि नाहीं, तरी हल्लींच्या महाभारत व पालीगाथा या ग्रंथांतून या पुराणांतील अव्वल कथाभागाचें अंधुक स्वरूप दिसून येतें.

महाभारतांत निरनिराळ्या प्राचीन वंशांचीं व देशांचीं अनेक ठिकाणीं वर्णनें आलीं आहेत; पण त्यांत रट्ट वंशाचा वंश या अर्थानें कोठेंच उल्लेख नाहीं. रट्ट हा शब्दच मुळीं पाली भाषेतला, कदाचित् द्राविड भाषेतला, असल्यामुळें भारतासारख्या संस्कृत ग्रंथांत हा न आढळणेंच साहजिक आहे. पण पाली ग्रंथांतहि हा शब्द एक विशिष्ट वंश या अर्थानें नसून, राष्ट्र अथवा देश या सामान्य अर्थानें विशेष आढळतो. यावरून निरनिराळ्या वेळीं हिंदुस्थानांत शक, पल्लव, हूण, जाट, अश्व वगैरे शूर आणि ल्ढाऊ राज्यकर्ते वंश हल्ला करण्यासाठीं येऊन येथेंच ठाणें देऊन राहिले, त्यांनाच उत्तर हिंदुस्थानांत राजपूत आणि दक्षिणेंत मराठे हें सामान्य नांव अर्वाचीन काळीं मिळालें हें सिद्ध होतें. यांपैकीं शक, पल्लव, अश्व हे शब्द अथवा नांवें महाभारतांत आढळतात. तीं मात्र प्राचीन आहेत खास. अश्व अथवा असी हा मानव वंश मध्य-*आशियांत प्रमुख असून त्यावरूनच असीरियाच नव्हे तर आशिया हें नाव सिद्ध झालें* आहे. हा शक वंशच होय अश्व म्हणजे घोडा. शकांचें व घोडा या जनावराचें मोठें अभेद्य साहचर्य आहे. या वंशावरून घोड्याला हें नाव पडलें किंवा घोड्याच्या अश्व नांवावरून या वंशाला हें नांव पडलें, हा समाजशास्त्रांतला एक रजक प्रश्न आहे असो. महाभारतांतील अनेक प्रख्यात राजांच्या नांवांत किंवा आडनांवांत अश्व हा शब्द मोठ्या प्रामुख्यानें झळकत आहे, हें खालील मटमांवरून दिसतें. अश्वग्रीम, अश्वचक्र, अश्वपति, अश्वशङ्कु, अश्वशिराः हीं नांवें आदिपर्वाच्या ६६ व्या अध्यायांत वरचेवर आलीं आहेत. मागधाचा पुत्र अश्वकेतु याला अभिमन्यूनें मारलें असा द्रोणपर्व (४८–७) यांत उल्लेख आहे. प्रत्यक्ष शक या नांवाचाहि उल्लेख सभापर्व ७८–९१ आणि भीष्मपर्व ९–४५ यापेक्षा जास्त ठिकाणीं फारसा आढळत नाहीं. तक्षक (तख्शक) कद्रुपुत्र नाग याची कथा आस्तिक पर्वांत प्रामुख्यानें आली आहे. हें नांव एका प्रमुख शक वंशाचेंच आहे. त्याचें आणि पुरुवंशाचें महायुद्ध जन्मेजयाचे वेळीं आलेलें जनमेजयानें केलेल्या सर्पयज्ञाच्या कथेवरून दिसून येतें. एकंदरींत बुद्धपूर्व काळीं जे शक, पल्ल्व, जाट इत्यादि रट्टवंश हिंदुस्थानांत आले त्यांचे महाभारतांत असे तुरळकच उल्लेख आढळतात.

अश्व दनुपुत्रः असुरः अशा अर्थाचा उल्लेख ( आदिपर्व, अ. ६६, श्लोक २४) आहे. म्हणजे अश्ववंश देव अथवा मानव नसून दानव किंवा असुर असा किंचित् पूर्वेकडील भारतीय आर्यांकडून तिरस्कार दाखविणारा अर्थ वरील महाभारताच्या

उल्लेखावरून दिसतो. आर्य म्हणजे भारतांत सिंधु नदीच्या पूर्वेकडे राहणारे तेवढेच, असा आकुंचित अर्थ मागाहून झाला. येरवीं शक, पल्लव, जाट, काठ, भाट, वगैरे मध्य-आशियांतील फिरत्या जातींहि सारख्याच आर्य असणें अधिक संभवनीय आहे. प्रत्यक्ष पारश्यांना भारतीय आर्य असुर म्हणूं लागले, आणि त्याचप्रमाणें पारशीहि सिंधु नदीच्या पूर्वेकडील सर्वच आर्यांना इंद्रपूजक म्हणजे पिशाचपूजक हीनजातीय म्हणूं लागले. त्याच न्यायानें शक, पल्लव, हूण, जाट वगैरेंची मनुस्मृतीच्या नतरच्या कालांत व्रात्य-क्षत्रियांत गणना होऊं लागली. तें कसेंहि असो, त्यांची क्षत्रियांतच मात्र गणना केव्हांहि होत होती, हाच मुद्दा येथें विशेष ध्यानात घेण्यासारखा आहे. पुढें ऐतिहासिक कालांत शक-पल्लवादि प्राचीन नांवेंहि मागे पडून क्षत्रियत्वबोधक राजपूत, मराठे, रेड्डी, वगैरे ज्यांत राज् धातु प्रधान आहे, हींच नांवें रूढ झालीं. नांव कोणतेंहि असो, ह्या सर्व जाती हिंदुस्थानांत बाहेरूनच आल्या आहेत एवढाच प्रतिपाद्य विषय आहे.

मध्यआशियांतून अगर पूर्व युरोपांतून प्राचीन आर्य जाती बाहेर गेल्या, त्यांपैकीं स्कॉटलड, आयर्लंड वगैरे ठिकाणीं हल्लीं आढळणाऱ्या केल्ट्स, गॉल्स या जाती युरोपांत प्रथम गेल्या व नंतर जर्मनी–हंगेरी वगैरे देशांत हल्लीं आढळणाऱ्या गॉथ्स-व्हॅंडॉल्स्, सॅक्सन (शक् सेन), हूण या जाती किंचित् मागाहून गेल्या. पण त्या त्याप्रमाणें सर्व सारख्याच आर्य होत्या यांत शंका नाहीं, त्याप्रमाणें यदु, पुरु, इक्ष्वाकु इत्यादि जाती प्रथम हिंदुस्थानांत आल्या आणि नतर शक, पल्लव, हूण, जाट, भाट, इ० आले आहेत हें सिद्ध आहे. परंतु सर्व सारखेच आर्य होते हें मत राजस्थान या महत्त्वाच्या ग्रंथाचे कर्ते कर्नल जेम्स टॉड यानीं फार परिश्रमानें प्रतिपादिलें आहे. टॉडनें आपला राजपुतांचा मोठ्या सहानुभूतीनें लिहिलेला इतिहास शंभर वर्षांपूर्वी (१० मार्च १८३२ रोजीं) प्रसिद्ध केला. त्याच धर्तीवर ग्रांट डफनें मराठ्यांचा इतिहासहि गेल्या शतकांतच प्रसिद्ध केला आहे. पण टॉडची सहानुभूति आणि अविश्रांत शोधक बुद्धि या हुंडेलहृप्पी ग्रांट डफमध्यें मुळींच नव्हती. त्यामुळें मराठ्यांसबधीं फार कोते विचार त्यानें प्रसिद्ध केले आहेत. टॉडच्या सहानुभूतीचा पोट वाजवीपेक्षा जास्त झाला असें वाटल्यावरून त्याच्या मागाहून उदयास आलेल्या ग्रांट डफचे कान कोणीतरी तत्कालीन पर्चिलशिशानें फुंकले असल्यास न कळे! तें कसेंहि असो, मराठ्यांच्या पूर्वपीठिकेविषयीं शोधीत असतां राजपुताच्या पूर्वपीठिकेविषयीं ज्यांनीं ज्यांनीं लिहिलें आहे त्यांचा आधार घेणें भाग पडतें; आणि यात वावगें असे काहींच नाहीं. शक-पल्लवादि वंश टॉडच्या म्हणण्याप्रमाणें आर्य असोत किंवा नसोत, ते सर्व मध्यआशियांतून हिंदुस्थानांत आले येवढें तरी टॉडच्या प्रयत्नांवरून उघड दिसते.

टॉडनें निरनिराळ्या पाच मूळ अस्सल पुराव्यांच्या आधारावर अस्सल राजपुतांच्या मूळ ३६ कुळांची एक यादी आपल्या पुस्तक १ लें भाग ७, पान ८६–१२५ यांत सविस्तर वर्णिली आहे, ती फार महत्त्वाची आहे. या ३६ कुळांचाच विस्तार मागाहून मराठ्यांच्या प्रथम ५६ व नतर ९६ कुळांत झाला आहे. मराठ्यांच्या या

कुळांची माहिती मी एन्थोव्हेनकृत Castes and Tribes of Western India, ह्या अर्वाचीन ग्रंथांतून घेतलेली आहे. ह्यांतील कोष्टकांत दाखविलेल्या नामसादृश्या-वरून राजपूत असोत किंवा मराठे असोत त्यांचीं मूळ कुळें ३६ हून कमी असोत, किंवा ९६ हूनहि जास्त असोत; त्या सर्वांचें मूळ मध्यआशियांतील शक–द्वीप (शकस्थान) नांवाच्या विस्तीर्ण भागांत संचार करीत असलेल्या शक, पल्हव, पृथू, अश्व ऊर्फ असीर, मसागेटी–महाजाठ, हूण, तार्तार, इ० शूर, लढाऊ, राज्यकर्त्या वंशांतच आढळतें, आणि त्यांनाच पुढें कालांतरानें उत्तर हिंदुस्थानांत राजपूत, पश्चिम हिंदुस्थानांत मराठे आणि दक्षिण हिंदुस्थानांत रड्डी हीं गुणवाचक नांवें पडलीं असें आमचें शोधाअंतीं मत बनूं लागलें आहे.

## अस्सल राजपुतांचीं मूळ ३६ कुळें

| राजपुतांचीं नांवें | मराठ्यांचीं नांवें | राजपुतांचीं नांवें | मराठ्यांचीं नांवें |
|---|---|---|---|
| सूर्य | सुर्वसे | गोहिल | गोहेले |
| चंद्र | सोमवसे | सर्प्य अथवा सरिस्प | सुर्वे |
| ग्रहिलोट | | शिलार | शेलार |
| यदु | जाधव, यादव | दाबी | |
| तुवार | तुवार ( शिर्के ) | गोर | गोरे, गोळे |
| राठोड | राठोड | डोर, डोड | ढोर, दुडे |
| कुशवाह | | घेरवाल | |
| प्रमार | पवार | वीर गुर्जर | गुजर |
| चाहुमान | चव्हाण | सेंगर | |
| चालुक्य | साळुंके | सिकरवाल | |
| प्रतिहार | परिहार | बैसे | भिसे |
| चौतुआरा | चौरे, चवरे | दहिया | |
| तक अथवा तक्षक | | जोय्या | |
| जित् जाठ | | मोहिल | मोहिते ? |
| हूण | | निकुंभ | निकम |
| कट्टी | काटे | राजपाली | |
| बल्ल | बाळ | जाहिर्य | धायबर |
| झाल, मकवान् | मंगाने ? | दहिमा | |
| जेत्व अथवा कामरी | जेधे ? | | |

वरील ३७ राजपूत नांवांपैकीं दक्षिणेंतील मराठ्यामध्यें हल्लीं वर दाखविल्याप्रमाणें २४ नांवें तरी आढळतात. याचप्रमाणें मराठ्यांतल्या ९६ नांवांपैकीं राजपुतांत कितीतरी आढळतीलच. टॉडनें दाखविल्याप्रमाणें शकद्वीपांतून अर्धवट सुधारलेल्या किती तरी शकवंशांतले पोटभेद पश्चिमेकडे सॅक्सन, गेटी अथवा गॉथ्स, हूण इ० जर्मनींत, ऑस्ट्रियांत, हंगेरींत पसरले; तसेंच शक, जाठ, हूण या नांवानें इराण, अफगाणिस्तान आणि नंतर उत्तर-पश्चिम हिंदुस्थानांत आणि शेवटीं दक्षिण हिंदुस्थानातहि पसरले. तेच आजचे राजपूत, मराठे, रड्डी इ० होत.

शक आणि अश्ववंशाचा विचार वर झाला. आता पल्लवांविषयीं कांहीं लिखाण मिळाल्यास पाहूं. पल्लव हे नांव पार्थवाचें रूपांतर आहे. इंग्रजींत यांनाच पार्थियन्स (Parthians) असें म्हणतात. यात मूळ पृथु हा शब्द आहे. हे नांव इक्ष्वाकूपासून पांचव्या पिढीला अयोध्येच्या सूर्यवंशातील पृथु या प्रसिद्ध राजाचें आढळतें. हा अनेनस नांवाच्या राजामागून गादीवर आला. पण हा वेन नांवाच्या एका दुष्ट राजाचा मुलगा होता असें महाभारत, शांतिपर्व, अध्याय ५९ आणि मनुस्मृति, अध्याय ७, श्लोक ४१ यांत उल्लेख आहेत. याशिवाय या वेनाचा कोठे उल्लेख नाहीं. पृथु हा मोठा बलाढ्य सुनीत आणि पृथ्वीवर मोठी सामाजिक, आर्थिक व राजकीय उन्नति करणारा असा युगप्रवर्तक राजा झाला अशी पुराणांत ख्याति आहे. किंबहुना याच्याच नावावरून पृथ्वी हे नांवहि प्रचारात आलें; कारण यानें पृथ्वीवरील खांचखळगे बुजवून शेतकीला आरंभ केला असेंहि वर्णन आहे. पार्थव अथवा Parthians कुळालाहि याच राजापासून नांव मिळालें असावें. शूरसेन यादवापासून कुंतिभोज राजानें दत्तक घेतलेली कन्या कुंती ही पांडवांची आई आदिपर्व, अ. ६३, श्लोक ५९ तिचेपासून झालेला पार्थ (अर्जुन) हाहि पार्थवच दिसतो. पृथाश्व नांवाचा एक राजर्षि झाला. सभापर्व, अ. ८–१४ यावरून सूर्य, चंद्र, पृथु, अश्व, इ. वंशांत परस्पर विवाह आणि दत्तकविधि होत असत असें समजतें. आणखी असे पौराणिक उल्लेख धुंडीत बसल्यास लेखविस्तार फार होईल. आतां या Parthians ऊर्फ पार्थव अथवा पल्लवांचा ऐतिहासिक काळात मराठ्यांशीं व राजपुतांशीं कांहीं मेळ जमण्यासारखें कांहीं लिखाण मिळतें कीं काय तें पाहू.

रॉलिन्सन नावाच्या एका विद्वान् आणि शोधक इतिहासकारानें Story of the Nations या पुस्तकमालेंत History of the Parthians (पार्थवाचा इतिहास) नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. त्यात पार्थिवाच्या जातीय स्वभावाचीं आणि चालीरीतींचीं विशिष्ट लक्षणें म्हणून खालील पधरा मुद्दे आपल्या ग्रंथांत प्रसिद्ध केले आहेत. ते उत्तरेच्या राजपुतांशीं व विशेषेंकरून दक्षिणेंतील मराठ्यांशीं इतके जुळतात कीं, ते येथें उद्धृत करणें अगदीं अवश्य वाटतें. हा इतिहासकार हिंदुस्थानांत आला असेल असें वाटत नाहीं. निदान त्याला येथील मराठ्याची तरी माहिती असण्याचा संभव नाहीं. असें असूनहि त्यानें सहजासहजीं दिलेल्या पार्थवांचीं जातलक्षणें मराठ्यांशीं इतकीं तंतोतंत जुळावीत हें मोठें आश्चर्यकारक व अर्थपूर्ण आहे. त्याचा उल्लेख केल्याविना या निबंधाची

परिपूर्ति होणार नाहीं. म्हणून तो कम्न आम्ही ह्या लांबलेल्या लेख आटपतों. या पार्थवांनें साम्राज्य हिंदुस्थानाच्या वायव्य सरहद्दीवर ख्रिस्ती शकाच्यापूर्वी थोड्या शतकापर्यंत मोठ्या वैभवानें चालू असल्याचें रॉलिन्सननें सविस्तर वर्णन केलें आहे. त्यानें वर्णिलेल्या १५ मुद्द्यांचें मराठ्यांच्या स्वभावाशीं इतकें साम्य आहे कीं, तें त्याच्यान शब्दांत शक्य तितकें देणें भाग आहे. पण विस्तारभयास्तव तसें न करतां त्यांचा थोडक्यांतच मराठी गोषवारा दिला आहे. जिज्ञासूंनीं तें सर्व वर्णन मुळांतूनच वाचावें हें बरें.

१. Feudal System : मराठ्यांची जहागीरदारी व सरंजामपद्धति पार्थवांमध्यें तशीच होती. पान ७५.

२. Sophi पंडित Magi पुरोहित : पार्थव बादशाहीच्या शेवटीं या भिक्षुकशाहीचा शहरांतून आणि खेड्यांतून डोईजडपणा फार झाला. भाग ५, पान ८०.

३. सत्यशोधक समाज : प्रथम प्रथम पार्थव, हे मार्गी ऊर्फ मग ब्राह्मणांच्या धार्मिक कह्याखालीं दडपून गेले होते. अग्निपूजा आणि प्रेतें उघड्यावर टाकण्याची चाल त्यांच्यात होती. पण पुढें त्यांची अमीवरील श्रद्धा उडाली. मघांचें वजन नाहींसें झालें. इतकेंच नव्हे, तर राज्यकारभारांतूनहि त्यांचा हात काढून टाकण्यांत आला. पान ३६४.

४. मृत राजांचीं देवळें अगर छत्र्या : राजे लोक मेल्याबरोबर त्यांच्या नावानें देवळें बांधून त्यांत त्यांच्या मूर्तींची पूजा होत असे. त्याचा संबंध सूर्य-चंद्राशीं भिडविण्यांत येई. (अशीं देवळें अद्यापि इंदूर आणि कोल्हापूर येथें पंचगंगेच्या काठीं बांधण्यांत येत आहेत.) भाग ५, पान ८५.

५. सूर्य-चंद्र पूजा : राजघराण्यांतून सूर्य आणि चंद्र यांचीं कुळदैवतें म्हणून पूजा होत असे. भाग २३, पान ३९४.

६. टांक पूजा : सामान्य लोकांच्या घरांतून—मग त्यांचा संबंध राजघराण्याशीं असला तरी, त्यांच्या देव्हाऱ्यावर पूर्वजांचे टांक (सोन्यारुप्याच्या पातळ पत्र्याच्या मूर्ति) ठेवण्यात येऊन त्यांची रोज पूजा होत असे. (*मराठ्यांत ही चाल अद्यापि* चालू आहे.) पान ३९५.

७. घोडदळ : पार्थवांमध्यें घोडदळाचे दोन भाग असत. [ १ ] शिलेदाराचें भारी पथक. [ २ ] बारगिरांचें हलकें पथक. चिलखत, माला, बिचवा, हीं त्यांचीं नेहमींचीच आयुधें असत. पान ३९७.

८. गनिमी कावा : "Pretending panic, beating a hasty retreat, and scattering in their flight, they endeavoured to induce their foe to pursue hurribly and in disorder, being themselves ready at any moment to turn and take advantage of the least appearance of *confusion.*" पान ४०३. (ग्रँट डफनें मराठ्यांच्या गनिमी काव्याचें यापेक्षा निराळें काय वर्णन केलें आहे ?)

९. शमला : "Previously the royal headdress had been a diadem, which was a band encircling the head, and terminating two long ribbons or ends that hung down behind the head on the back." पान ४५. (आतांच्या ग्वाल्हेर दरबारांतील श्रीमंत फाळके सरदारांच्या पाठीवर लोंबणाऱ्या जोड शमल्यांचें हें खासें वर्णन आहे!)

१०. बुरखा : बायकांमध्यें बुरखा जारी असे. त्यांच्या व्यभिचाराला कडक शासन असे. पुष्कळ बायका करण्याची चाल प्रतिष्ठित झाली होती. फारकत होत असे. पान ४१४. (मुसलमानांत या चाली मागाहून पडल्या. मराठ्यांतील पडदा मुसलमानांच्याहून फार जुना ठरतो!)

११. झनाना : "राणीवसा म्हणजे एक विस्तीर्ण झनाना असून, त्यांतील पट्टराणी लग्नाची व मुख्य मानाची असे. इतर पुष्कळ राण्या व शिवाय रखेल्या असत. सर्वजणी नेहमीं कडक पड्यांत कोंडलेल्या असत. त्यांना फक्त नातलगांशीं आणि फार तर खोजांशीं बोलण्याची परवानगी असे. एकदाच मात्र एका राणीनें मोठा हिय्या करून आपल्या नवऱ्याची राज्यसूत्रें आपल्या हातीं घेऊन आपल्या मुलाच्या साहाय्यानें तीं उत्तम रीतीनें चालविलीं." पान ४०५. (ही एक तत्कालीन ताराबाई किंवा अहल्याबाईच म्हणावयाची!)

१२. सोन्याची शय्या : सोन्याच्या पलंगावर निजण्याचा मान फक्त राजालाच असे. इतरांना सक्तमनाई असे. पान ४०५ (अद्यापि ही मनाई आहेच. श्री. सयाजीरावमहाराज गायकवाड यांनीं आपले पहिल्या नंबरचे सरदार घोरपडे यांना पायांत सोन्याचा तोडा घालण्याचा मान मोठी मेहेरबानी म्हणूनच बहाल केला आहे.)

१३. शिकार : युद्धानंतर सिंहाची व वाघाची शिकार मोठ्या हौसेनें करीत.

१४. नजराणा : भेट घेणाऱ्यांनीं प्रथम मल्या मोठ्या नजराण्याची तयारी करण्याची आवश्यकता असे.

१५. निशेबाजी : निरनिराळ्या कैफांचीं त्यांना व्यसनें असत. पार्थव हे एकंदरींत त्यांचे समकालीन ग्रीक आणि रोमन यांच्यापेक्षां कमी सुधारलेले होते. तथापि प्राचीन इतिहासकार दाखवितात इतका कांहीं हा सस्कृतीचा भेद फार मोठा नव्हता. भाग २३, पान ४१७.

पार्थव, पार्थियन्स, पह्लव, या सर्व नावाचा औत्पत्तिक संबंध, पेहलवी (भाषा), पेहलू (बाजू) या शब्दांशीं येतो असें प्रसिद्ध पारशी मशोधक शमसुलउल्मा जमशेटजी मोदी यांनीं मला एका समक्ष भेटीत सागितलें. संस्कृतांत पार्श्व म्हणजे बाजू या अर्थाचा शब्द आहे. संस्कृतांतील 'स'ची किंवा 'ह'ची अवेस्ता भाषेत 'त' अशी परस्पर अदलाबदल होते. उदाहरणार्थ-संस्कृत ऋत = अवेस्ता अश (सत्य) संस्कृत मर्त्य = अवेस्ता मश्य (माणूस) या न्यायानें पार्श्वचें पार्थ होणें स्वाभाविक आहे. यावरून पार्थव

म्हणजे आर्यांनीं व्यापलेल्या मध्यआशियांतील मोठ्या भागाच्या भानूशांनूनीं शिवेवर राहणारें एक राष्ट्र दिसतें. हिराडॉटस, स्ट्रॅबो, इ० ग्रीक आणि रोमन संस्कृतीचे गोडवे गाणारी प्राचीन इतिहासकार मंडळी यांनीं यमग्र शक राष्ट्रसमूहाला आर्यांचे नुसते सामंतचक बनविलें आहे. रॉलिन्सन, टॉडप्रभृति आधुनिक इतिहासकार त्याच शकांना इतिहासांत त्यांचें योग्य पद परत देऊं पाहात आहेत. हिंदुस्थानांतील राजपूत आणि मराठ्यांनीं तर तें पद स्वतःच्या आपल्या कर्तबगारीनें मिळविलें आहे.

३

# अस्पृश्यांचें राजकारण

## प्रस्तावना

सद्यस्थितींत या विषयावर मीं माझे विचार प्रकट करणें जरूर आहे असें समजून माझ्या कांहीं मित्रांनीं व सहकाऱ्यांनीं आग्रह धरला. इतक्यांत वसंत व्याख्यान मालेकडूनहि व्याख्यानाविषयीं विनंती करण्यांत आली, म्हणून मी माझे विचार व अनुभव सांगण्यास आज तयार झालों आहे. आजच्या व्याख्यानांत कोणत्याहि प्रकारचे सिद्धान्त ठरवावयाचे नाहींत अगर गाजवावयाचे नाहींत, म्हणून आज कोणी अध्यक्ष नको अशी मालाकाराजवळ विनंती केली, कारण माझें भाषण केवळ प्रवचन आहे. त्याला निर्णयाची जरूरी नाहीं. पण वहिवाटीच्या सबबीवर मालाकारांनीं माझी विनंती मान्य केली नाहीं. टीकाकारांनीं माझ्या भाषणावर वाटेल तशी टीका करावी, पण अध्यक्षांनीं निर्णय देण्याची तसदी घेऊं नये अशी माझी विनंती आहे. राजकारणांत कांहीं पक्षोपपक्ष असतात पण मी आतांपर्यंत राजकारणाच्या कोणत्याहि पक्षांत सामील झालेलों नाहीं. अस्पृश्यांतहि आज असे पक्ष जोरानें दंड थोपटून उभे आहेत. त्यांच्यांतहि मध्यस्थी करून राजकारणाचें जागतिक असें जें उच्च कार्य असतें तें करण्यास मी केव्हांही तयार आहें. श्रोत्यांनींहि असाच निर्विकार व उदात्त भावनेनें माझे चार अस्पष्ट बोल एकावेत. खवळलेल्या सद्यस्थितींत पक्षाच्या लाटावर पाहून जाण्याचा प्रयत्न मीहि करीन, आपणही सर्व कराल अशी आशा आहे.

अस्पृश्यांच्या राजकारणावर बोलण्यापूर्वी राजकारणाचाच अर्थ पाहूं. त्यामुळें प्रवचनाच्या अर्ध्याअधिक भागाचा खुलासा सहज होऊन या क्लिष्ट प्रश्नाचा मार्ग सोपा होईल. राजकारणाचा अर्थ अर्थकारक ( Economics ) म्हणजे अर्थाच्या आधारें समाजशास्त्राची धारणा एवढाच आहे. समाजाची धारणा व्हावी म्हणून अर्थशास्त्रासारखें शासनशास्त्राचेंहि तत्त्व राजकारणांत समाविष्ट होतें, पण हें दुसरें तत्त्व शक्य तोंवर गौण असावयास पाहिजे. प्राचीन काळीं जेव्हां जीवनकलह इतका तीव्र नव्हता तेव्हां राजकारणांत अर्थशास्त्राचेंच प्राधान्य होतें. पण पुढें जसजसें कनक आणि कांता या लोभनीय वस्तूंविषयीं मारामारी सुरू झाली तशी राजकारणांत अर्थशास्त्रापेक्षां शासनशास्त्राचें प्राबल्य वाढलें. पण अलीकडे इतर भावनामय अवांतर गोष्टींपेक्षां पोटापाण्याच्याच प्रश्नाला प्राधान्य येऊं लागल्यामुळें आजकालच्या राजकारणांत अर्थशास्त्रालाच पूर्ववत् प्राबल्य येऊं लागलें आहे. कनक हें मुख्य साध्य आणि त्यासाठीं शासनाची हांव हें केवळ साधन होऊन बसलें आहे.

सर्व राजकारणाची जर ही मीमांसा तर हिंदुस्थानांतील अस्पृश्यांच्या राजकारणाला पोटापाण्याचें महत्त्व यावें यांत काय नवल आहे ? ' अस्पृश्य ' हे अल्पसत्त्वाक हतवीर्य हतबल पददलित आहेत. त्याना दुसऱ्यावर शासन चालवण्याची हाव अद्यापि तरी नाहीं. कशी असणार ? मात्र दुसऱ्याची त्यांच्यावर मिरवण्याची हांव अद्यापि तिळमात्रहि कमी झाली नाहीं; मग ते क्षत्रिय असोत ब्राह्मण असोत, शूद्र असोत, स्वकीय असोत, कीं परकीय असोत, प्रागनिक असोत कीं स्थिनिनिविष्ट असोत, जोंपर्यंत हे डोईजड वर्ग ना आपल्या इज्जतीखातर अस्पृश्यांच्या योगक्षेमात आणि स्वयंनिर्णयांत टवळाटवळ करूं पाहतात तो ' अस्पृश्य ' आजकाल करूं देण्यास तयार नाहींत. एवढाच त्यांच्या राजकारणाचा अर्थ आतापर्यंत माझ्या अनुभवास आला आहे. पुढें काय होईल त्याविषयीं भविष्यवाद करण्याचें हें स्थळ नव्हे. अस्पृश्यांची आजची भूक एवढी थोडी असतांना त्यांच्या स्पृश्य शत्रुमित्रांना काय वाटतें तें पाहा. ' अस्पृश्य ' स्पृश्यांच्या दावांतून सुटल्यावर लवकरच ते सूड उगवण्याच्या मार्गाला लागतील आणि स्पृश्यांवर आज जे जुलूम करणारे परकीय आहेत त्यांच्याशीं एकजीव होतील ( जणू परकीय तसें होऊं देतीलच ) आणि परकीयाच्या साह्यानें स्पृश्यावर जुलूम करूं लागतील वगैरे वगैरे अनेक भीतीनें पाहूर आम्हा स्पृश्यामध्यें माजलें आहे. ह्या काहुराला नीतीचें आणि न्यायाचें किती पाठबळ आहे हें मला स्पष्ट सांगण्याची इच्छा नाहीं. ही सांगण्याची इच्छा ऐकणाऱ्याच्या तयारीवर अवलंबून राहणार.

अस्पृश्यांचें राजकारण अस्पृश्यतेइतकेंच प्राचीन आहे आणि तें सांगण्यासाठीं अस्पृश्यतेचा उदय कसा झाला हें सांगूं गेल्यास प्रवचनाचा व्याप मर्यादेपलीकडे वाढेल. पुढेंमागें हाच विषय निराळ्या प्रकारें प्रसिद्ध होत असल्यामुळें अत्यंत संक्षेपानें हा मुद्दा सांगणें जरूर आहे. मानववंशाचे पृथक् भाग प्राचीन काळीं परस्परांशीं लढत असत. परस्परांच्या संस्कृतीबद्दल अभिनिवेश उत्पन्न होऊन वंशद्वेष मनुष्य जातींत रूढ

झाला. यात्र वंशद्वेषाला जादुटोणा, मंत्र, विटाळचंडाळ, सोवळेंओवळें आणि रोवटीं रूढधर्म यांचेंहि पाठबळ मिळून कांहीं विशिष्ट वंश इतर मानववंशांनीं आपल्यापासून दूर ठेवले. याप्रकारें सामाजिक अस्पृश्यतेचा पाया घालण्यांत आला. एका वंशानें दुसऱ्या वंशास जिंकल्यावर जेत्यांनीं जिताला गुलामगिरींत ठेवल्याचीं अनेक उदाहरणें इतिहासांत आहेत. अशा गुलामांना 'अस्पृश्य' मानण्याचीं उदाहरणेंहि प्राचीन काळीं पश्चिम आशियांतील सेमेटिक, मध्य आशियांतील हिंदु आणि पूर्व आशियांतील ब्रह्मदेश, जपान इत्यादि राष्ट्रांत आढळतें. 'अस्पृश्य' मानलेले वंश सारे संस्कृतिहीनच होते असें मुळीच नाहीं. ब्रह्मदेशांत 'तुन्हायाजा' (अशुभ राजा), फयाचून वगैरे जे अस्पृश्य वंश आढळत आहेत, ते जिंकले जाण्यापूर्वी राजवंश होते. हेंच तर काय हल्लींच्या सुधारलेल्या काळींदेखील द. आफ्रिकेसारख्या ठिकाणीं हिंदूसारख्या काळ्या वर्णाला तेथील गोरे वसाहतकार अस्पृश्याप्रमाणेंच ग्रामबाह्य ठरवतात. यावरून अस्पृश्यतेला संस्कृति अथवा संस्कृतिचा अभाव हें कारण ठरत नाहीं. जेत्यांनीं जितांशीं चालविलेलें राजकारण हेंच ह्या जातिविशिष्ट अस्पृश्यतेचें हेतू होत हें सिद्ध होतें.

ह्याच वंशद्वेषाला पुढें पुढें रूढ धर्माचें पाठबळ मिळाल्यामुळें ह्या भरतखंडांत पूर्वी अल्प असलेल्या अस्पृश्यांची संख्या कालवशात् इतकी अवाढव्य झाली आहे. समाज सुसंपन्न आणि सुसंस्कृत स्थितींत असला तर १० वर्षांत त्याची दुप्पट वाढ होते असा एक सामान्य लोकसंख्याशास्त्राचा अजमास आहे. ह्या अजमासाप्रमाणे अस्पृश्यांची संख्या वाढलेली असणें शक्य नाहीं. कारण हे दुर्दैवी मानववर्ग एकदा अस्पृश्य आणि ग्रामबाह्य ठरल्यावर त्यांच्यात संपन्नता आणि संस्कृति कोठून उरणार? असें असूनहि त्यांची संख्या जी इतकी प्रचंड वाढलेली आहे त्याला कांहीं विपरीत कारणेंच असलीं पाहिजेत. तीं कारणें म्हणजे या प्रचंड खंडवजा देशांत धर्मांच्या आणि धर्मपंथांच्या नावावर ज्या क्रांत्या आणि जुलूम झालेले आहेत तेच होत. बौद्ध, शैव, वैष्णव, शाक्त इत्यादि पंथांच्या मारामाऱ्या दक्षिणेंत द्राविडांमध्यें व उत्तरेंत आर्यांमध्यें झाल्यामुळें पूर्वी स्पृश्य असलेले जातिसमूह अस्पृश्यांत टकलण्यांत आले. अशाविषयीं ऐतिहासिक दाखले कर्नल अल्कॉटसारखे परकीय धर्मप्रचारक आणि महामहोपाध्याय हरिप्रसादशास्त्री यांच्यासारखे पुराणमतवादी संशोधक यांच्या ग्रंथांत आढळतात.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अस्पृश्यता म्हणजे स्पृश्यांच्या दूषित राजकारणाचें एक दृढमूल झालेलें जाळें आहे. अस्पृश्यांमध्यें जो आतां हीनपणा आलेला आहे त्यामुळेंच अस्पृश्यता उदय पावली असें म्हणण्यानें कार्यकारणाचा विपर्यास हल्लींच्या काळींसुद्धां जाणत्या लोकांकडून होत आहे ही एक करमणुकीची गोष्ट. समाजशास्त्राचें निरपेक्ष अवलोकन केल्यावर जातीय अस्पृश्यता ही हीनतेचें कार्य नसून उलट ती दीनतेचें कारण आहे असें दिसून येते; आणि ब्रह्मदेशांतील अस्पृश्य लोकांचा इतिहास पाहिल्यास हा कार्यकारणभाव सिद्ध होतो. कांहीं असो, अस्पृश्यतेची व अस्पृश्यांसंबंधी

स्पृश्यांच्या राजकारणाची ही मीमांसा साधारण लोकांच्या गळीं सहज उतरेल अशी माझी तरी अपेक्षा नाहीं. तथापि प्रस्तुत विषय माझ्या अपेक्षा नसून अस्पृश्यांसंबंधीं माझें निरीक्षण, अध्ययन, संशोधन, अनुवाद हेंच होत.

अस्पृश्यांविषयीं पूर्ण आणि निष्काम सहानुभूति वाटल्यावरून भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळी या नावानें अखिल भारतांतील अस्पृश्यांच्या सेवेसाठीं आणि शुश्रूषेसाठीं एक विधायक धर्मकार्य उघड स्थापण्यांत आलें. पण त्यापूर्वीं बरींच वर्षें त्यांच्या स्थितीचें अध्ययन चाललेंच होतें. हें कार्य निघाल्याबरोबर अनुकूल व प्रतिकूल टीकांचा सहज उठाव, सहानुभूतीइतकाच विरोधाचा वर्षाव झाला, बाहेरील सहकार्यांइतकाच अंतःकलह माजला. या मंडळीच्या विधायक कार्यामुळें मंडळीच्या बाहेरहि विक्षोभक चळवळ प्रचंड माजली. राष्ट्रीय सभेच्या केवळ राजकारणाच्या रणांगणांत अस्पृश्यांच्या नांवावर रणशिंग वाजूं लागलें. पक्षान्तर राजकारणांत भाग न घेतां मंडळीनें उच्च आणि मूलभूत राजकारणांत अस्पृश्यांच्याहि वतीनें भाग घेण्यास माघार घेतली नाहीं. मात्र हें सर्व काम मंडळीनें गाजावाजा न करता केलें. त्याचा प्रयत्न विधायक असल्यामुळें तो अद्यापि चालू आहे. हा प्रयत्न चालू असतां मंडळीवर प्रतिकूल टीकास्त्राचा जो वर्षाव झाला त्यांतील कांहीं भागाल्याचा उल्लेख करणें विषयाला धरून आहे. हे उल्लेख मंडळीच्या समर्थनासाठीं नसून विषयाच्या परिपूर्णतेसाठीं आहेत.

या मंडळीचें हें कार्य अस्पृश्यांच्या उद्धारासाठीं नसून ब्राह्मणादि उच्च वर्गांना खालीं ओढण्यासाठीं आहे, अशीं नुसती सुर्रसुरी पिकवून न राहतां या जाड्या जाड्या विद्वानांनीं सुसंबद्ध व्याख्यानें दिलीं आहेत. तीं मला आज चांगलीं आठवतात. मंडळीच्या कार्याची घटना सर्व देशभर होऊन त्याचा परिणाम जाणवूं लागल्यावर १९२३ सालच्या जानेवारीच्या अंकांत अस्पृश्योद्धार या मथळ्याखालीं रा. रा. महादेव राजाराम बोडस या विद्वानानें चित्रमयजगतासारख्या सन्मान्य मासिकांत एक मननीय लेख लिहिलेला आहे. त्यांतील एक महत्त्वाचा मुद्दा व्यक्तिविषयकता बाजूस ठेवून आजच्या विषयासाठीं विचारांत घेणें जरूर आहे.

वरील लेखांत पान ८० वर खालील उतारा वरील मंडळीच्या कार्यासंबंधानेंच नव्हे तर साधारण हितासंबंधींहि महत्त्वाचा आहे —

"आपलीं सामाजिक व धार्मिक सुधारणांचीं तट्टें चोहोंकडे नाचविण्याकरतांच निराश्रितांचा कैवार घेणाऱ्यांचें हातून त्यांचा उद्धार कधींहि व्हावयाचा नाहीं. कारण त्यांच्या प्रामाणिकपणावर लोकांचा विश्वास बसत नाहीं. कोणतीहि चळवळ एकनिष्ठ असल्याशिवाय यशस्वी होत नाहीं. एका कामांत दुसरीं दहा लचांडें घुसडलीं कीं, सर्वच कामें बिघडतात. अस्पृश्यतेच्या प्रश्नाला रोटीबेटीव्यवहार आणि सनातन धर्माची टवाळी चिकटविल्यानें निराश्रित शिखंडींना पुढें करून सक्कोलकार करण्याचा या मंडळीचा बेत आहे. अशी साधारण लोकांची समजूत झाली व त्यामुळें कारण नसता

सर्व जातींचा या चळवळीला विरोध होऊं लागला. पण तेच सन १९१८ सालीं लो. टिळकांनीं सहानुभूति दाखविल्याबरोबर १९२० सालीं महात्मा गांधींनीं हा प्रश्न हातीं घेतला व १९२१ सालीं अहमदाबादच्या काँग्रेसमध्यें राजकीय व राष्ट्रीय करून टाकला. विठ्ठलराव शिंद्यांना १२ वर्षांत जें कार्य करता आलें नसतें तें गांधींनी दोन दिवसांत केलें, म्हणजे शिंद्यांच्या कामाचें महत्त्व कमी होतें असें नाहीं. उलट असेंहि म्हणता येईल कीं, शिंद्यांच्या १२ वर्षे जागरणीमुळें गांधींना बीजारोपण करता आलें. परंतु एकाच कार्याविषयीं उभयतांचा दृष्टिकोण आणि कार्यपद्धति यांतील भेद दाखविण्या-करतांच ही तुलना केली. रा. शिंदे निराश्रितांना व्यक्तिशः सुखी करण्याकरता झटत असल्यामुळें समाजाला, विशेष कळकळ वाटत नव्हती. समाजांत सुखी व दु:खी दोन्ही प्रकारचे लोक असल्यामुळें वैयक्तिक सुखाविषयीं लोकांना फारशी आस्था वाटत नाहीं. पण राष्ट्राच्या भवितव्यतेचा प्रश्न आला कीं, सर्व समाज खडबडून जागा होतो. पांचसहा कोटी निराश्रितांचा उद्धार करावयाचा तो त्यांनीं अधिक सुखांत व ऐषआरामांत राहावें म्हणून नव्हे तर तीस कोटी हिंदी राष्ट्र एकजीव होऊन स्वराज्य मिळवण्यास लायक व्हावें म्हणून. लो. टिळकांनीं निराश्रितांविषयीं नुसती शाब्दिक कळकळ दाखविली म्हणून त्यांची टवाळी करणाऱ्याच्या एक गोष्ट लक्षांत येत नाहीं कीं, ज्यांच्या हातांत निराश्रितांची चळवळ आहे त्यांची जास्त योग्यताच नाहीं. टिळक गांधींसारख्यांकडून जास्त मदत मिळवावयाची असेल तर त्यांच्याप्रमाणेंच राष्ट्रकार्याला कंबर बांधली पाहिजे. साहेब लोकांना खुष ठेवायचें, मिशनरींच्या मागें लागावयाचें, पैशाकरता श्रीमंत लोकांच्या दरोदार हिंडावयाचें; मग लो. टिळकांनींहि असल्या भिक्षेकऱ्यांना तुमच्या शब्दांची भीक घातली तर नवल काय? ' You cannot serve both God and mamom at the same time ' अशी एक इंग्रजीत म्हण आहे. निराश्रितांना केवळ ऐहिक सुखें देणें ज्यांचें ध्येय त्यांनीं सर्व ऐहिक सुखावर पाणी सोडलेल्या टिळक-गांधींसारख्यांकडून मदतीची अपेक्षा करूं नये हेंच उत्तम, कारण त्यांचें ध्येय निराळें, मार्ग निराळा व दृष्टिकोणहि निराळा. "

# ४

## महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा एकमेव मार्ग!

आपला हिंदुस्थान देश, आपला हिंदु समाज इतका अफाट व विस्कळित आहे कीं, त्याचें एकीकरण करून त्याला कार्यक्षम कसें बनवावें हाच प्रमुख राष्ट्रीय पुढाऱ्यांपुढें मोठा प्रश्न पडला आहे. सैन्य जितकें मोठें तितकें पराभवसमयीं पळतांना अडचण असें म्हणतात; असें सैन्य जीवरक्षणार्थ पळत असतां त्याच्या संख्यातिरेकानें त्याला मोठी गैरसोय होते. आमची स्थिति काहीं अंशीं अशीच झाली आहे. आमच्या समाजाचें संख्याबळ, बुद्धिबळ, संस्कृतिबळ व अन्यान्य अंगीं संपत्तिबळ हीं सर्वही मोठीं असतां त्याला अनेक वेळां संख्येनें पुष्कळ कमी पण संघटनेनें अधिक सामर्थ्यवान् अशा समाजापुढें हार खावी लागली आहे. कुंभकर्ण वजनदार खरा पण झोपेतून उठेल तेव्हां, अशी कांहींशी आमच्या हिंदु समाजाची आजची स्थिति आहे. आपल्या महाराष्ट्रापुरतें जरी बोलावयाचें म्हटलें तरी कोणाहि विचारी माणसाला आमचे जातिभेद, मतभेद हे आमचें अधिकच कमी असलेलें सामर्थ्य कसें कमी करीत आहेत तें दिसून येईल. एकाकाळीं संबंध हिंदुस्थानभर भगवा झेंडा फडकवि-णारा आमचा महाराष्ट्र समाज आज कसा सामर्थ्यहीन व भाग्यहीन झाल्यासारखा दिसत आहे! असें कां व्हावें? ज्या महाराष्ट्रीयांचें गुणवर्णन रानड्यांसारख्या स्वप्रांतीयांनीं, अरविंदांसारख्या परप्रांतीयांनीं, इतकें बहारीनें केलें आहे तेच महाराष्ट्रीय आम्ही ना? मग आम्हांस तें गुणवर्णन कां लागू पडूं नये? दोनशें वर्षांच्या अवधींत आमचे झाडून सारे गुण लुप्त झाले कीं काय? हे व इतर अनेक प्रश्न महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा आस्था-पूर्वक विचार करणाऱ्या लोकांच्या मनांत उभे राहतात. आम्हीं काय केलें असतांना हे गुण पुनः उदित होतील? आम्हीं काय करावें म्हणजे आमचें सामर्थ्य वाढेल? आम्ही

महाराष्ट्राचा उत्कर्ष कोणत्या उपायांनीं घडवून आणूं ? हा एकच प्रश्न आज आपल्या-पुढें आहे. या प्रश्नाचें जें उत्तर कर्मवीर श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं दिलें आहे त्याचा योग्य विचार आमच्या समाजांतील लहानथोर स्त्रीपुरुषांनीं केल्यास आमचा उत्कर्ष होण्यास फारसा विलंब लागणार नाहीं. महाराष्ट्रांत एकी नसणें हेंच महाराष्ट्राच्या सामर्थ्य-हीनतेचें मुख्य कारण आहे असा कर्मवीर श्री. शिंदे यांचा सिद्धान्त आहे. ज्या दिवशीं ही एकी प्रस्थापित होईल त्या दिवशीं महाराष्ट्राचा भाग्यरवि पूर्ववत् तळपावयास लागेल यात संशय नाहीं. महाराष्ट्रांतील केवळ हिंदु समाजाचा विचार करतां ब्राह्मण, ब्राह्मणे-तर व अस्पृश्य यांच्यामधील भांडणें ज्या दिवशीं मिटतील त्या दिवशीं महाराष्ट्रातील सर्व चळवळींस इतका जोर चढेल कीं, त्या जोरापुढें कोणाचाहि कसलाहि विरोध चाला-वयाचा नाहीं. हीं भांडणें इतकीं कां रंगतात, तीं मोडावयास काय केलें पाहिजे, यांत खरा दोष कोणाचा आहे, याचा शांतपणानें व दिलदारीनें विचार होऊन त्यांचा योग्य बंदोबस्त तावडतोब होणें ही राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अत्यावश्यक गोष्ट आहे.

या नाजूक प्रश्नाची चर्चा करतांना कर्मवीर श्री. अण्णासाहेब शिंदे यांनीं जी स्पष्ट पण प्रांजळ भाषा वापरली आहे, तीबद्दल सर्वांनीं त्यांचे आभार मानले पाहिजेत. 'हितं मनोहारि च दुर्लभं वचः ।' पृथ्थर व गोड भाषण करण्यापेक्षा पथ्यकरतेकडेच जास्त लक्ष देऊन अण्णासाहेबांनीं आपले विचार व्यक्त केले आहेत. अण्णासाहेबांचें म्हणणें असें आहे कीं, जरी थोड्याफार अंशानें आजच्या आपल्या या स्थितीबद्दल आपण सर्वच जबाबदार असलों तरी त्यांतून बाहेर पडतांना आपल्या समाजांतील पुढारलेल्या वर्गांनीं सर्वांत अधिक स्वार्थत्याग केला पाहिजे. आम्ही ब्राह्मण, आम्ही क्षत्रिय असा ज्या लोकांस अभिमान वाटतो, त्यांनीं प्रथम कमालीचा स्वार्थत्याग करून इतरांच्या तक्रारी मिटवाव्या व मग आपल्या जानिवंतपणाची व उच्चतेची घमेंड बाळगावी. एका तत्त्वज्ञानें म्हटलें आहे कीं, 'आपल्या हातानें आपल्याजवळची सत्ता देऊन टाकणें हें प्रत्येक सत्ताधाऱ्याचें आद्य कर्तव्य आहे.' ब्राह्मणांनी सर्व समाजाला, मराठ्यांनी इतर ब्राह्मणेतरांस व अस्पृश्यांस आपल्याजवळचे सर्व अधिकार देऊन त्यांच्या हितार्थ झटावें यांतच महाराष्ट्राचें कल्याण आहे. श्री. अण्णासाहेबांचा दर्जा व पुढाऱ्यांमधील त्यांचें प्रमुख स्थान हीं लक्षांत घेऊन या बहुमोल उपदेशाचें सर्वजण चीज करतील अशी आशा आहे. आपल्या कर्तृत्वानें व पराक्रमानें उदयाला आलेल्या गेल्या पिढीतील ब्राह्मणेतरांमधील कर्मवीर श्री. अण्णासाहेबांचें जें प्रमुख स्थान आहे तें लक्षांत घेतां त्यांनीं महाराष्ट्राच्या उत्कर्षाविषयीं जे कांहीं सिद्धान्त बांधले असतील त्यांचा वाचकांस परिचय करून द्यावा या उद्देशानें 'किर्लोस्कर' मासिकाच्या संपादकानें सन १९३५ सालीं त्यांची भेट घेतली व त्यांनींहि आपले विचार मोकळेपणानें सांगितले याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. शेतीची अभिवृद्धि तसेच व्यापाराची वाढ होण्यास व सार्वजनिक चळवळीस सामर्थ्य येण्यास महाराष्ट्रांतील पक्षोपपक्षांमध्यें एकी झाली पाहिजे व त्याकरितां पुढारलेल्या वर्गांनीं स्वार्थत्याग केला पाहिजे असा कर्मवीर श्री.

अण्णासाहेबांच्या मुलाखतीना मथितार्थ आहे. कर्मवीर श्री. अण्णासाहेबांनी गेली तीस-चाळीस वर्षे जी राष्ट्रसेवा केली आहे ती करतांना त्यांना ज्या अडचणी आल्या, जे अनुभव आले, त्या सर्वांचा निष्कर्ष खालील मुलाखतीत आहे असें म्हटलें म्हणजे या मुलाखतीचें निराळे वर्णन नको. कर्मवीर श्री. अण्णासाहेब शिंदे यांनी सर्व प्रकारच्या पुढाऱ्यांशीं सहकार केला आहे. न्यायमूर्ति चंदावरकर, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी यांच्यासारखे बड्याबड्या लोकांबरोबर त्यांनी सहकार्य केलें आहे. त्यांची उज्ज्वल कार्यनिष्ठा पाहूनच जणू जनतेनें त्यांस 'कर्मवीर' ही पदवी अर्पण केली आहे व ती सर्वस्वी सार्थ असीच आहे. त्यांची मुलाखत प्रश्नोत्तररूपानें पुढें दिली आहे.

प्रश्न :—महाराष्ट्राचा उत्कर्ष होण्यास मुख्य अडचण कोणती ?

उत्तर—महाराष्ट्रांतील मुख्य दोष म्हणजे आमच्यामध्यें एकी नाहीं. ब्राह्मण, मराठे, *अस्पृश्य असे तीन तट महाराष्ट्रात आहेत. या तिघांची दिलजमाई झाल्या*-शिवाय महाराष्ट्राचा उत्कर्ष होणार नाहीं. ही एकी अजून म्हणण्यासारखी न झाल्यानें महाराष्ट्राचें राजकारण, समाजकारण, धर्मकारण हीं सर्वच अडून राहिलीं आहेत. आपल्या महाराष्ट्राचीं सर्वच दृष्टीनें शकलें झालेलीं असल्यामुळें आमचा उत्कर्ष अगदीं अडून राहिला आहे असें म्हटलें तरी चालेल.

प्रश्न—तें कसें काय ?

उत्तर—खरा महाराष्ट्र ज्याला आपण बृहन्महाराष्ट्र म्हणतों त्यांतला कांहीं भाग कर्नाटकांत गेला आहे, कांहीं निजामाच्या राज्यांत आहे, कांहीं मुंबई इलाख्याखालीकडे मध्यप्रांतात व वऱ्हाडात आहे. भौगोलिकदृष्ट्या गुजराथ, बंगाल, पंजाबसारखा आपला प्रांत सलग नाहीं. नुसता मुंबई इलाख्यातला महाराष्ट्र घेतला तरी त्यामध्यें कोंकण व देश हे भेद आहेतच. मराठ्यांमध्यें कोंकणी मराठे व देशी मराठे हे एक होत नाहींत; ब्राह्मणांत कोंकणस्थ व देशस्थ यांचें सूत नाहीं. निदान ब्राह्मणेतर समजलेल्या लोकांत ऐक्य असेल असें म्हणावें तर तेंहि नाहीं. लिंगायत, मराठे, जैन, अशी ब्राह्मणेतरात खिचडी आहे. *या कारणानेच ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद हा राष्ट्रीय ऐक्यास बाधक आहे* हें माझें मत तो वाद निर्माण झाल्यापासूनचेंच आहे. इतर प्रांतातून हिंदुमुसलमान प्रश्न असेल पण निदान हिंदूंत तरी फूट नसेल. तशी आमची स्थिति नाहीं. मद्रासकडील ब्राह्मणेतर पक्ष एकमुखी आहे तसा आमचा मुळींच नाहीं. महाराष्ट्रात लिंगायतांचें कांहीं चालत नाहीं, कर्नाटकात मराठ्यांचें कांहीं चालत नाहीं, अशी स्थिति आहे. जेव्हा महाराष्ट्र प्रांत म्हणून एक वेगळाच प्रांत होईल तेव्हा बरें होईल, तोपर्यंत मात्र हा भेद कमी करण्यास [illegible] यात संशय नाहीं.

प्रश्न—[illegible]राष्ट्रीयांचें इतर प्रांतांत वजन कसें काय आहे ?

उत्तर : ज्या वेळीं मराठ्यांचें राज्य होतें त्या वेळीं महाराष्ट्रात दुफळी होती, तरी मराठ्यांचा दबदबा इतर प्रांतांवर होता. दुसऱ्या प्रांतावर दाब बसविण्यापुरतें त्या वेळीं ब्राह्मण व मराठे एक होत असत. त्या वेळेपासून महाराष्ट्रीयांविषयीं इतर प्रांतांत

जी आदरबुद्धि होती ती महाराष्ट्राच्या आजच्या पडत्या काळांतहि अंशतः आहे. आजहि महाराष्ट्रीयांची मद्राशावर किंवा बंगाल्यावर जशी छाप पडते तशी मद्राशाची किंवा बंगाल्याची महाराष्ट्रीयांवर पडत नाही. आमच्या डिप्रेस्ड क्लासेस मिशनचें काम करतांना आम्हाला हा अनुभव पदोपदीं येतो. बाहेर वचक पण घरांत दुही अशी आमची आजचीहि स्थिति आहे.

प्रश्न :—आपणांमधील ब्राह्मण, मराठे वगैरे भेद सार्वजनिक कार्यांमध्यें दिसून येतात असें आपण कशावरून म्हणतां ?

उत्तर :—आपल्या महाराष्ट्रामध्यें खाजगी संस्थांनीं चालविलेलीं इतकीं कॉलेजें आहेत, पण तीं जणू जातिभेदाच्या तत्त्वावर चालविलेलीं आढळतात. सार्वजनिक कार्यांच्या एवढ्या संस्था आहेत, पण त्यांतहि दृष्टि हीच. ब्राह्मणांची संस्था असेल तर मराठे वगैरेंना तेथें प्रवेश नाहीं ! एक वेळ ते दूरच्या मद्राशाला किंवा गुजराथ्याला आपणांत घेतील, पण जवळच्या मराठ्यास घेणार नाहींत ! अशी स्थिति कां असावी ? निदान वाङ्मय तरी जातिभेदातीत व पक्षभेदातीत असावें ना ? मराठी भाषा ब्राह्मणाची आहे ती मराठ्याची नाहीं असें तर नाहीं ना ? पण तेथेंहि असेंच होतें. साहित्यपरिषदेंत ब्राह्मण पाहिजेत तसेच मराठेहि पाहिजेत; पण हे बोलावीत नाहींत व ते जात नाहींत, असा अनुभव आहे. अशली ही परस्पराविषयींची साशंकता अन्यत्र कोठें नाहीं. मी बंगाल्यांत नेहमीं जातो, पण महाराष्ट्रांतल्यासारखा कटु अनुभव तिकडे येत नाहीं. आमच्याकडे कोणत्याहि कारणामध्यें गट पडतात. आमचें राजकारण, समाजकारण असें गटांनीं चाललें आहे. असें होऊं नये.

प्रश्न :—याला काय उपाय ?

उत्तर :—यावर ब्राह्मण लोकांनींच तोड काढली पाहिजे. ब्राह्मणांना वाटतें आपल्याविषयीं सर्वांची पूज्यबुद्धि असावी. कबूल. पण या दृष्टीनें ते मराठ्यांशीं वागतात काय ? ब्राह्मण म्हणणार मराठ्यामधील क्षत्रियत्व गेलें आहे; मग मराठे तरी म्हटल्याशिवाय सोडतील काय, कीं ब्राह्मणांतलेंसुद्धां ब्राह्मणत्व गेलेलें आहे ? मराठे लोकांमध्यें ब्राह्मणांविषयीं जो पूर्वीचा पूज्यभाव होता तो अलीकडे कमी व्हावयास लागला आहे खरा; पण तो अद्यापि सर्व गेला नाहीं. अद्यापिहि पुष्कळ मराठे पूजादि क्रियांसाठीं ब्राह्मणांस बोलावतातच कीं नाहीं ? ब्राह्मण लोक शिवाजी महाराजांना उत्सव करतात खरे. पण त्यांची शिवाजी महाराजांविषयीं जी बुद्धि आहे ती सर्व मराठ्याविषयीं आहे काय ? ब्राह्मणांनीं सत्कार्याकरितां हात पुढें केल्यास ब्राह्मण-ब्राह्मणेतरामध्यें दिलजमाई झाल्याशिवाय राहणार नाहीं. मीं जें म्हटलें तें सर्व जातिभेदाकडे पाहून म्हटलें. मी स्वतः जातिभेद मानीत नाहीं. सर्वांनीं आपापल्या जातींचा व वर्णांचा त्याग केल्यास तात्काळ एकी होईल असें माझें मत आहे. पण हल्लीं काय आहे ? हे जातिनिष्ठ लोक जात टाकीनात नाहींत व नीट राखीतहि नाहींत. वर्णभेद टाकले तरच उत्तम. वर्णभेदाची सुमती स्मृति जी राहिली आहे त्या स्मृतीनें घातापात मात्र होतो.

गुंम जळालें, पण पीळ जळत नाहीं अशी कांहीं अंशीं या बाबतींत आपली स्थिति आहे.

प्रश्न :—महाराष्ट्रांतल्या शेतीची काय स्थिति आहे ?

उत्तर :—एखाद्या लायब्ररीची व्यवस्था पाहण्याचें काम अक्षरशत्रु असलेल्या माणसाकडे गेलें तर तिची जी दुर्दशा होईल तीच दुर्दशा महाराष्ट्रांतल्या शेतीची आज होत आहे. आज आपण ज्यांना कुणबी म्हणतों ते एकेकाळीं जमीनदार होते. आज त्यांनी हलाखीची स्थिति होऊन आपल्या मालकीच्या जमिनीवर ते मजूर झाले आहेत. जैन, लिंगायत, ब्राह्मण, मराठे या शेती न वाहणाऱ्या लोकांकडे (सावकारांकडे) जमिनीची मालकी गेली असून तिचा खरा मालक जो कुणबी तो खंडकरी बनून गेला आहे. ज्याची जमीन तोच खंडकरी अशा स्थितींत तो किती खुषीनें खंड भरील याची कल्पना करा. वसूल नीट न होण्याचें हें एक कारण आहे. इकडे कुणब्याची ही स्थिति, पण नवीन मालक बनलेले जे ब्राह्मण त्यांनीं तरी शेती करावी; पण ते सगळेच बी. ए. होऊन नोकरीच्या पाठीमागें लागतात. नांगर स्वतः हातीं धरील तोच खरा शेतकरी. ब्राह्मण असो, मराठा असो, हातीं नांगर धरणार नाही हें बदलले पाहिजे. शेती घेतली तर जातीनें शेती तरी करा.

प्रश्न :—व्यापाराकडे आपणा महाराष्ट्रीयांचें कितपत लक्ष आहे ?

उत्तर :—ब्राह्मण असो मराठा असो, त्यांनीं कधीं यापूर्वी व्यापार केला नाहीं. त्या कारणामुळें आपणाकडे गुजर मारवाडी वगैरे परप्रांतीयांची भरती झाली आहे. इत-उत्तर ब्राह्मणांनी तसेच मराठ्यांनीं व्यापारांत लक्ष घातलें पाहिजे. भांडवल जमवणें, कारखाने काढणें, पेढ्या स्थापणें हीं कामें आपण केलीं पाहिजेत. ब्राह्मणांचें या गोष्टीकडे लक्ष लागत चालले आहे हें किर्लोस्कर, ओगले, ठिकेकर इत्यादिकांच्या उदाहरणावरून स्पष्ट होतें. याला लागणारी धाडसी वृत्ति त्यांच्या अंगी आहे, तिचा योग्य उपयोग झाला तर समाजाचें त्यांत कल्याण आहे. आपल्या लोकांचें सर्व लक्ष जें राजकारणाकडे गेलें आहे त्याचा कांहीं भाग जर अर्थकारणाकडे जाईल—मी राजकारणाच्या विरुद्ध आहे असें समजूं नका—तर आपला उत्कर्ष होण्यास वेळ लागणार नाहीं.

प्रश्न —व्यापारात आपल्या लोकांनीं कोणतें धोरण पुढें ठेवावें ?

उत्तर —ब्राह्मणामध्यें धाडस आहे. तें गुजराथ्याइतकें नसले तरी मराठ्यापेक्षा अधिक आहे. तें त्यांनी वाढवलें पाहिजे. हें धारिष्ट्य वाढवितांना त्यांनी जी साधनें हातीं घेतां येतील तीं घेतलीं पाहिजेत. त्यात जातिनिष्ठा काय कामाची ? मराठ्यांचें सहाय्य घेऊन आडत्याकडे न जाता जो माल पिकतो तो तेथेच विकल्यास त्यांत अधिक नफा होईल. आज अशी स्थिति आहे कीं, जो माल उत्पन्न करतो तो बाजारात गेला कीं, अडत्याच्या बळी पडतो. ती अडतेपणा कमी केला पाहिजे. जो माल उत्पन्न करतो, मग तो ब्राह्मण असो की मराठा असो, त्याच्या पदरांत किफायतीचा बराच भाग गेला पाहिजे. हिशेबीपणा हा गुण मराठ्यांत नाहीं, ब्राह्मणांत आहे. तेव्हा दोघांनीं सहकार केल्यास फार छान होईल. कापूस, धान्य, मॅंगनीज वगैरे अर्थोत्पादक द्रव्यें आमच्याकडे पुष्कळ

आहेत. पण त्याचा पुरेपूर फायदा आम्हास घेता येत नाही. ब्राह्मणांनी जर टक्के थोडे लक्ष घातले तर ते राजकारणातसुद्धा चांगला हात मारतील. आज स्थिति अशी आहे की, आम्हास शब्दांखेरीज हात मारविता येत नाही. पण अशा रीतीनें सहकार्य झाल्यास महाराष्ट्रीयांच्या म्हणण्यास राजकारणात जास्त मान मिळेल. जे आरडाओरडा करून किंवा तुरुंगात जाऊन होणार नाही ते या ऐक्याच्या जोरावर होईल व सरकार आमचे महाराष्ट्रीयांचे ऐकू लागेल.

## मराठे हिशेबी नाहीत

प्रश्न—ब्राह्मण व मराठे यांच्या अंगात गुणदोष कोणते आहेत?

उत्तर—मराठ्यांत हिशेबीपणा नाही; ब्राह्मणांत तो गुण आहे. ब्राह्मणांत काटकसर आहे, मराठ्यांत ती नाही. तुम्ही पाहा, मराठा कुटुंबामध्ये दोन पिढ्यांपेक्षा श्रीमंती राहू शकत नाही. ब्राह्मणांत शिस्त आहे, मराठ्यांत ती नाही. कर्मठपणा हा गुण ब्राह्मणांत आहे तसेच ते प्रगतिप्रिय आहेत. आजपर्यंतच्या सर्व सामाजिक सुधारणा ब्राह्मणांनीच केल्या. पण त्याच ब्राह्मणामध्ये दिलदारपणा कमी आहे. विद्यापीठामध्ये परीक्षा पास होण्यास लागणारी बुद्धि त्यांच्यामध्ये असेल, पण खरी पल्लेदार बुद्धि, दूरदृष्टि त्यांच्यात नाही. मी ही टीका केल्याबद्दल ब्राह्मणांनी मजवर रागवू नये. मला मराठे लोकांतहि दोष दिसतात. ब्राह्मणांच्या मानाने एकंदरीत मराठे पुष्कळच मागासलेले आहेत. खानदानी मराठ्यांमध्ये शंभरदीडशे वर्षांपूर्वी दिलदारपणा फार होता. पण आज तो कोठे राहिला आहे? पूर्वी जो जातिवंतपणा होता तो आता राहिला नाही. स्वतंत्रवृत्तीचा बाणा होता तो गेला. ब्राह्मणांच्याविषयी म्हणावयाचे तर आताच सांगितलेले सर्व गुण त्यांच्या अंगी आहेत खरे, पण त्याचा फायदा दुसऱ्यास देण्याची बुद्धि त्यांच्यामध्ये नाही. तसेच त्यांच्यामध्ये एक प्रकारचा अहंकार असल्यामुळे बाकीचे लोक त्यांच्याकडे मत्सरबुद्धीने पहातात. हा अहंकार त्यांच्यामध्ये नाही असे सर्वांच्या प्रत्ययास आले पाहिजे.

प्रश्न—एकंदरीत ब्राह्मणांच्या अंगी वसत असलेली अहंकारवृत्ति ब्राह्मण—ब्राह्मणेतरामधील ऐक्याच्या आड येते म्हणावयाची?

उत्तर—ब्राह्मणांचे गुण मी मनमोकळेपणाने सांगितले तसा त्यांच्या दोषाविषयी थोडे बोललो त्याबद्दल ते गैरसमज करून घेणार नाहीत अशी आशा वाटते. ब्राह्मणांच्या ठायीं जसे मला काही दोष दिसतात तसे ते मला मराठ्यांच्या अंगीहि दिसतात. मराठे निर्बुद्ध निस्सत्व होऊन बसले आहेत असे मला वाटते. ब्राह्मणाजवळ बुद्धि आहे, पण ती पल्लेदार नाही. हिशेब आहे पण केवळ स्वतःपुरता आहे. संकुचित मनोवृत्ति व स्वार्थपरायणता हेहि ब्राह्मणांच्या अंगचे महत्त्वाचे दोष आहेत असे मला वाटते. पण मराठ्यांत जो एक गुण नाही तो ब्राह्मणांत आहे असे वाटते. संघटनेचे सामर्थ्य

मराठ्यांहून फार पुढें गेले आहेत. ब्राह्मण अद्यापि संघटनाकुशल आहेत. हा ब्राह्मणांचे दृष्टीनें फार महत्त्वाचा मुद्दा आहे. महार-मांगांमध्ये आज जी जागृति जी संघटना आहे तितकीसुद्धा मराठ्यांत नाहीं. मराठ्यांत संघटना होईना व ब्राह्मणांची संघटना त्यांच्या मनाःस्पर्शीहि करीना. तेव्हां सांगा पाहूं महाराष्ट्राचा उत्कर्ष व्हावा कसा? ब्राह्मणांनीं मराठ्यांना उदाहरण घालून द्यावें व दोघांनीं मिळून व्यापार व नोकरी, जातिनिष्ठा विसरून करावी यातच उभयतांचें कल्याण आहे.

प्रश्नः—सनातनी पक्षाविषयीं आपणांस काय वाटतें?

उत्तरः—सनातनी म्हणजे ब्राह्मण. सनातन्यांमध्यें ब्राह्मण, मराठे हे दोघेहि आहेत खरे; पण त्यांचे नेते ब्राह्मण व अनुयायी मराठे आहेत. सनातनी ब्राह्मणेतर सनातनी ब्राह्मणांच्या सैन्यांतील केवळ प्यादेबुणगे आहेत. म्हणून या वादाची सारी जबाबदारी ब्राह्मणांवर आहे. सनातन्यांना जो जोर चढला त्याची सर्व जबाबदारी ब्राह्मणांवर आहे. ब्राह्मणेतर तर कोठून चालत निर्बुद्ध. सनातनी म्हणून जी आजकाल मिरवणूक आहे ती निव्वळ ब्राह्मणांची. हे ब्राह्मण म्हणजे निव्वळ भिक्षुक नसून त्यांत गृहस्थी बाण्याचे लोकसुद्धा आहेत. त्या सर्वांस माझें नम्रपणें एवढेंच सांगणें कीं, 'बाबांनो, भारताचें भवितव्य काय तें लक्षांत आणाल कीं नाहीं? या दृष्टीनें विचार कराल कीं नाहीं!'

प्रश्नः—आपण मराठ्यांमध्यें घटना नाहीं म्हणतां. पण एवढीं एकापेक्षां एक प्रबळ मराठी संस्थानें मराठ्यांचा पाठपुरावा करावयास असतांना मराठ्यांत घटना नाहीं हें समजावें तरी कसें?

उत्तरः—अहो, तेंच तर मोठें अरिष्ट आहे. ही संस्थानें आमची उन्नति कधींहि घडवून आणणार नाहींत. तीं सदैव आमच्या उत्कर्षाच्या आडच असावयाचीं. एका काळी परिषदेंत ते लोकसुद्धां असेंच म्हणाले कीं, मराठे लोकांस मदत करणारीं संस्थानें किती तें पाहा! तशीं आमच्यांत कोठें आहेत? मीं त्यांस उत्तर दिलें कीं, म्हणून तर तुम्ही तुमच्या पायावर उभे आहांत. मराठे लोकांचीं संस्थानें असल्यानें मराठे परावलंबी होऊन बसलेले आहेत. मराठ्यांमध्यें संघटना नाहीं. तेव्हां एखादा चांगला संस्थानिक झाला तरी त्याच्या औदार्याचा नीट फायदा संघटनेच्या अभावीं मराठ्यांना मिळूं शकत नाहीं.

प्रश्न:—मराठे लोकांचा सरकारी नोकऱ्यांमधून मोठ्या प्रमाणावर भरणा केला जातो ही गोष्ट मराठे लोकांच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें आपणास कितपत साह्यभूत वाटते?

उत्तर:—सरकारी नोकऱ्यांमधून मराठ्यांना ज्या सवलती मिळतात त्यापासून मराठ्यांचा फायदा होईल असें मला तरी वाटत नाहीं. सरकारी नोकरी म्हणजे हुजरजाबी-पणा. नोकरपेशामध्यें स्वतंत्रपणाला वाव नाहीं. नोकऱ्यांनीं परवशता वाढते. नोकरपेशे ब्राह्मण होवोत किंवा मराठे होवोत, ते गुलाम झाले, त्यांची स्वतंत्र वृत्ति मावळली असें समजावें. नोकरपेशाच्या दृष्टीनें गुलामगिरी हा शब्दसुद्धा नरम वाटू लागतो. नोकरी म्हणजे वेश्यावृत्ति, तीपासून कोणत्याहि जातीचा फायदा होणें शक्य नाहीं. ह! सरकारी

नोकऱ्यांच्या द्वारें जनहित करण्याची सोय असती तर गोष्ट वेगळी होती. मग नोकऱ्यां-पासून त्या मिळणाऱ्या जातींचें हित झालें असतें. पण जेथें धडधडीत वरिष्ठांचें ऐकून समाजाचा गळा कापण्याचा धंदा चालतो तेथें नोकऱ्यांनी कोणाचेंहि खरें हित साधणें शक्य नाही. अशा नोकऱ्यांमधून जातवारी असावी असें म्हणणें म्हणजे एखाद्या जनान-खान्यात आमच्याहि मुली ठेवा असें म्हणण्यासारखें आहे.

प्रश्न :—अस्पृश्यतेच्या प्रश्नाला हल्लीं जें तीव्र स्वरूप आलें आहे, त्याविषयी आपणांस काय वाटतें ?

उत्तर :—माझें असें मत आहे कीं, सर्वांनी मिळून हा अस्पृश्यतेचा प्रश्न सोडवावा. नाहीं तर तो एक कायमचा काटा होऊन बसेल. आपण जर स्वखुषीनें अस्पृश्यास स्वतंत्र केलें नाहीं तर त्यास आपल्या उलट जावयास तयार केल्यासारखें होईल व ते तसे तयार झाले व आम्हांला विरोध करून पुढें येऊं शकले तर त्यांस नांव ठेवण्यास आपणास कांहींहि हक्क नाहीं. म्हणून आपण उदार दृष्टीनें अस्पृश्यास आपणांत अगदीं मिळवून घेतलें पाहिजे; इतकें कीं, त्यांचा वेगळा नामनिर्देशसुद्धां करावा लागूं नये. असें जर आपण केलें नाहीं तर अस्पृश्यांचा मुसलमानांसारखा सवतासुभा होईल व तो झाल्यास अखेरपर्यंत जाचक होऊन बसेल. तेव्हां आपण आत्म-हिताच्या दृष्टीनें विचार केला तरी अस्पृश्यास वर आणणें आपलें कर्तव्य ठरतें. राजकारणामध्यें ब्राह्मणे-तर, मुसलमान हे जसे सवतेसुभे आतापर्यंत झाले आहेत तशीच अस्पृश्यांची ही तिसरी सेल तयार होत आहे याचा सर्वांनी, विशेषतः ब्राह्मणांनी, विचार करावा. सनातन्यांचा बोजा ब्राह्मणांवर आहे. त्याची सर्व जबाबदारी ब्राह्मणांवर आहे, तेव्हा त्यांनी आपलें कर्तव्य नीट रीतीनें पार पाडावें.

प्रश्न :—तरुण महाराष्ट्रीयांस संदेश म्हणून कांहीं सांगाल काय ?

उत्तर :—आतांपर्यंत झालें तें सर्व लक्षांत घेऊन तरुण पिढीनें आपण केवळ हिंदी आहोंत एवढें ध्यानात ठेवावें. एकी करावयाची नीतसुद्धां महाराष्ट्रापुरती न करता प्रांतिक भेद व मात्सर्य यांना आपणामध्यें येऊं देऊं नये. महात्मा गांधी तर विश्वकुटुंबीच आहेत. तरुणांनी आपला दिलदारपणा विश्वकुटुंबियत्वाला शोभेल असाच ठेविला पाहिजे. भवितव्य जर एवढें विशाल आहे तर तरुणांनी मी ब्राह्मण, मी ब्राह्मणेतर असे सटरफटर भेद लक्षांत कां आणावे ? हा सटरफटरपणा टाकला पाहिजे. हिंदुस्थाननें आपला धडा घालून दिला आहे असें एका तोंडानें म्हणावयाचें आणि आतल्यातच संकुचितपणा ठेवायचा हा म्हाताऱ्यांचा दुटप्पीपणा आहे, त्यापासून तरुणांनी सावध राहावें. जुन्याचा सर्वच त्याग करावा असें कोणींहि म्हणत नाहीं. पण तें नव्याच्या कसाला लावावें. ते म्हाताऱ्यांकडून होत नाहीं. या दिव्यांतून तरुण पार पडले म्हणजे म्हातारे त्यांस आशीर्वाद देण्यास पुढें येतील. तेव्हां तरुणांनी विनय न टाकतां शिस्तीनें व श्रद्धेनें सुधारणेच्या कामाला पुढें यावें हा माझा त्यास तरुणांना संदेश आहे.

## ५

# तत्वज्ञान आणि समाजशास्त्र

### १ तत्त्वज्ञान : भाष्य–भारुड

ह्या दोन विषयांचा या साहित्य संमेलनाच्या चालकांनीं हा जो एक विभाग कल्पिला आहे त्या दोन्ही विषयावर मराठींत स्वतंत्र वाङ्मय फारच थोडें, किंबहुना गणनेंत घेण्याइतकें नाहीं म्हटलें तरी चालेल इतकें अल्प आहे. समाजशास्त्रावर अगदीं अलीकडे जें थोडें वाङ्मय होऊं लागलें आहे, ते अद्यापि बाल्यावस्थेंतच आहे. तत्त्वज्ञानांत आमच्या देशाचा दर्जा फारच उच्च, जवळजवळ पहिला म्हटला तरी चालेल. पण तो काल मागचा. चालू कोणत्याहि प्राकृत भाषांतून त्या मूळ तात्विक ग्रंथांवर नुसतीं भाष्यें व रूपांतरें झालीं आहेत. अद्यापि तोच प्रकार चालू आहे. स्वतंत्र भरती नाहीं. ह्या भाष्याची प्रथा प्रत्यक्ष तत्त्वसिद्धान्तांचे मेरुमणि श्रीमदाद्यशंकराचार्य ह्यांनींच घालून दिली, ही त्यातल्या त्यात मोठी आश्चर्याची गोष्ट ! स्वामी रामतीर्थ ह्या आधुनिक द्रष्ट्यानें ह्या प्रथेबद्दल श्रीमदाद्यशंकराचार्यांचा निषेध सौम्य भाषेत का होईना पण धैर्यानें केला आहे. पहिल्या आचार्यांनीच असें केल्यामुळें त्यानंतरच्या संस्कृत आचार्यांना व चालू भाषेत ग्रंथ लिहिणाऱ्या ज्ञानेश्वर, एकनाथ इत्यादि तत्त्ववेत्त्यांना आपल्या लिखाणांतून हाच गौण मार्ग पत्करावा लागला आहे. पुढें पुढें तर एका गीतेच्या भाष्याभोंवतीं मराठींतील समग्र तात्विक विचारचक्र फिरूं लागलें ! ज्ञानेश्वराची भावार्थ गीता ह्या भाष्यांत केवळ भक्तीचें स्तोम माजविलें आहे, गीतेची खरी अर्थसिद्धि झाली

नाहीं, असा जोराचा आक्षेप घेणाऱ्या वामनपंडितानें तरी आपल्या यथार्थ-दीपिकेंत अव्यभिचरित कृष्णभक्तीच्या बाहेर फारसा स्वतंत्र ज्ञानमार्ग शोधला काय ? त्यानंतर लोकमान्यांनीं कर्मयोग चोखाळला. पण तोहि गीतेतच गुरफटून. मूळ गीताच आर्धी एक स्वतंत्र दृष्टि नसून, तो एक सुंदर दर्शन समन्वय आहे; आणि तिचा अर्थ सरळ व सोपा असताहि मागून झालेल्या पंडितांनी व आचार्यांनी अर्थवादाचें भारूड मात्र माजविलें नव्हे काय ? ह्या भारुडाचें महत्त्व फार आहे हें मी आदरपूर्वक कबूल करतो. पण तें वाङ्मयदृष्टीनें आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें स्वतंत्र विचारनिर्मिति फार थोडी आहे असेंच म्हणावें लागेल. अमृतानुभवासारखे कांहीं ग्रंथ आहेत, पण तें प्रत्यक्ष भाष्य नसले तरी जुन्या दृष्टीचे अनुवादच ठरतात.

## साक्षात्कारी वाङ्मय

येथवर थोडक्यात विचार झाला मराठींतील स्वतंत्र विचाराचा, किंवा मूळ ग्रंथनिर्मितीचा. यावरून जवळजवळ एक हजार वर्षांच्या मराठी वाङ्मयानें अगर महाराष्ट्रीय प्रासादिक वाग्भक्तांनीं महाराष्ट्राच्या मानसिक भांडवलात कांहीं भरीव शिल्लक टाकली नाहीं, असें म्हणण्याला मात्र मी तयार नाहीं. पण या मुद्द्यावर अधिक चर्चा करण्यापूर्वी मानसिक भांडवल किंबहुना तत्त्वज्ञान म्हणजेच काय ह्याचें किंचित् स्पष्टीकरण करणें अवश्य आहे.

द्वे विद्ये वेदितव्ये
इतिह स्म
यद्ब्रह्मविदो वदन्ति
परा चैवापरा च ॥ ४ ॥
तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः
सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्प
व्याकरणं निरुक्तं
छन्दो ज्योतिषमिति ॥
अथ परा यया
तदक्षरमधिगम्य ते ॥ ५ ॥

मुंडकोपनिषद्–१ मुंडक १ खंड.

वरील उताऱ्यावरून अस्सल तत्त्वज्ञानाची गणना श्रौत वाङ्मयात देखील होत नसे, असें दिसतें. पराविद्या ऊर्फ तत्त्वज्ञान हें अनिर्वाच्य असतें हेंच खरें.

"यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह" असें प्रत्यक्ष ब्रह्मतत्त्वाचें लक्षण प्रसिद्धच आहे. त्या तत्त्वाचें ज्ञानहि अनिर्वाच्य आहे असें मुंडकोपनिषद् म्हणतें. पण तें ज्ञान अनिमनम् आहे, असें मुंडक म्हणत नाहीं. तें शब्दज्ञानाचें पलीकडे असलें

तरी मानवी हृदय आणि संकल्प यांच्या पलीकडे नाहीं. म्हणून तें ज्ञान साक्षात्कारगम्य आहे नाम.

" मनोवाचागोत तुझें हें स्वरूप ॥
म्हणोनिया माप भक्ति केलीं ॥ १ ॥
भक्तिचियें मापें मोजिलों अनंता ॥
इतरानें तत्त्वतां न मोजावे ॥ २ ॥

ह्या उद्गारांत तुकारामानें भक्ति ही अनिमनस् आहे असें सहज म्हटलें ती त्याची केवळ नजरचूक आहे. तें कसेंहि असो. टाळ कुटणारे म्हणून त्या वारकऱ्यांची पावलोंपावलीं निंदा होते—आणि अशा निंदकांमध्येंच वामन पंडितासारख्या घेंटाचीहि भर पडत आली आहे! त्या साक्षात्कारी काहीं टाळकुट्यांनीं महाराष्ट्राच्या मानसिक भांडवलांतच नव्हे तर इतर पुरुषार्थांमध्येंहि जी भर टाकली आहे, ती पंडितमन्य शाब्दिकांच्याहि हातून झाली नाहीं. ह्या भाविकांच्या अमूल्य कारागिरीची गणना तत्त्वज्ञानासंबंधीं गद्य वाङ्मयांत करण्याऐवजीं काव्य वाङ्मयांतच केली असता हा विषय अधिक निर्विवाद होईल.

## आधुनिक रूपान्तरें

इतकें सांगितल्यावर मागील कलमांत निर्दिष्ट केलेल्या महाराष्ट्रीय आधुनिक मानसिक भांडवलाचा आपण थोडक्यांत टाव घेऊं या.

प्रत्येक वेळीं प्रत्येक देशीं स्वतंत्रच विचार चालू असतात—किंबहुना असावयास पाहिजेत असें नाहीं. पृथ्वीचे पाठीवर केव्हां ना केव्हां कोठें ना कोठें तरी स्वतंत्र विचार, स्वतंत्र काव्य, आणि स्वतंत्र कृति चालू असतेच. वाहतूक आणि दळणवळणाचीं साधनें असतील त्या मानानें, ह्या स्वतंत्र पैदाशीचें स्थलांतर आणि कालांतर भाषांतराचें व रूपांतराचें द्वारें होणारच. ह्या न्यायानें पाहतां मध्ययुगीन इस्लामी संस्कृतीच्या सक्षर्णानें महाराष्ट्राच्या आचारविचारावर जो परिणाम झाला, त्याच्या शतपट परिणाम प्रस्तुत पाश्चात्त्य संस्कृतीचा झाला आहे, व ह्याहून पुढें अधिकच होणार. पाश्चात्त्य देशांत भौतिक शोध आणि आधुनिक विज्ञानाच्या प्रगतीमुळें प्रत्यक्ष धर्माच्या निष्ठास्थानावर हल्ले चढून त्याची शिखरें आणि गाभारें डळमळूं लागली. तो चिरकंप सर्व सुसंस्कृत जगाला अद्यापि भोंवतो आहे. ह्यांतून प्रागतिक महाराष्ट्र तेवढा कसा अलग राहणार? मुंबई विश्वविद्यालय सुरू होऊन एक पिढी उलटते न उलटते तोंच डार्विनसारखे शोधक आणि स्पेन्सरसारखे तार्किक ह्यांच्या विचारांनीं तत्कालीन महाराष्ट्रीय लेखकांना व वाचकांना भारून टाकलें. आम्ही कॉलेजांत जाण्यापूर्वीच मराठी वाङ्मयावर ह्या नूतन पाश्चात्त्य विचाराची भाषांतराच्या आणि रूपांतराच्या द्वारें इतकी छाप बसलेली दिसली कीं, तितकी छाप ब्रह्मसूत्र, शांकरभाष्य किंबहुना गीता–भागवत ह्या संस्कृत

ग्रंथांचीहि महाराष्ट्रांतील वाचकवर्गावर निदान श्रीएकनाथांचे काळीं तरी वसली नव्हती. असती तर श्रीएकनाथांना अवघ्या अडीचशें वर्षांपूर्वीची ज्ञानेश्वरी धुंडाळून शुद्ध करून नवी कां नटवावी लागली असती ? आणि श्रीनामदेवांनी अमुक एक अभंग लिहीन म्हणून केलेली प्रतिज्ञा पूर्ण करावयाला पुनः त्यांच्यामागून तीनशें वर्षांनी श्रीतुकारामांना कां ह्या मर्त्य लोकाची यात्रा करावी लागली असती ! असो, मराठी वाङ्मयाचें स्वदेशी प्राकृतांत कालांतर होण्याला जो काळ लागला, त्याच्या शतांशानेंहि काळ पाश्चात्त्य विचाराचें महाराष्ट्रांत स्थलांतर व्हावयाला लागला नाहीं: कारण संस्कृतीच्या प्रवास, तो वरा असो वा कसाहि असो, गणितश्रेढीनें नव्हे तर ह्यापुढें भूमितीहून अधिक वेगानें होणार आहे.

आमचा देश सुनें तरी विचारा विचारसंपत्तीची नुसती उतारपेट होऊन राहिला आहे; पण हल्लीं जेथें पिकतें तेथेंच विचाराची कशी क्रांतीची धुनी पेटली आहे पाहा ! पृथ्वीवरील सृष्टीच्या इतिहासाचें अवलोकन करून विशेषतः प्राणिशास्त्राच्या व भूगर्भशास्त्राच्या अभ्यासाच्या जोरावर पाश्चात्त्य तार्किक उत्क्रांतिवादासारखे अतिव्याप्त सिद्धान्त काढू लागले होते. पण सर्व शास्त्रांत अधिक निश्चित शास्त्र जें गणित त्यातच आतां युगांतर करणारे शोध होऊ लागले आहेत. त्यामुळें न्यूटनला शिळे ठरविणारे वैज्ञानिक आइनस्टाइनसारखे निर्माण होऊ लागले आहेत. आइन्स्टाइननें विज्ञान जगांत जी एक अपूर्व क्रांति चालविली आहे, तिचा एक ढोबळ परिणाम जागतिक विचारावर किंबहुना वाङ्मयावरहि कदाचित होईल असें वाटतें, तो हा कीं, यापुढें निवळ तार्किक अथवा काल्पनिक ( Deductive or Apriori ) विचारपद्धतीला आळा बसून तदनुसार गंभीर वाङ्मय, ललित नव्हे अधिकाधिक आनुभविक आणि निश्चित पद्धतींचा ( Inductive or Aposteriori ) अवलंब करील. प्रस्तुत सारें जगच वैज्ञानिक क्रांतीमुळें आणि त्याहूनहि अधिक तीव्र त्या राजकीय, सामाजिक व आर्थिक क्रांतींनी हादरूं लागलें आहे त्यामुळें ह्यापुढें नुसत्या तार्किक अर्थवादाचा व्याप कमी होईल. मग त्याची निवर्जाहि कमीच झाली, तर कोणाला फारसें वाईट वाटण्याचें कारण नाहीं. ह्या दृष्टीनें पाहतां समक्याचें तत्त्वज्ञान किंवा समक्याच्या तत्त्वज्ञानाचा इतिहास वगैरे आकाशाला गवसणी घालण्याचा आव आणणारीं पुस्तकें मराठींत न झालीं तरी चालेल. त्यात काही नावीन्य असत गांभीर्य नसणार. ह्यापेक्षां जास्त स्वतंत्र आणि सुटसुटीत ग्रंथ तयार करावयाचे नसल्यास आमच्यातील काहीं कॉलेजांतल्या प्रोफेसरांप्रमाणें आधुनिक विद्याविशारदांनी लघुकथा, भावगीतें, फार तर विनोदी नाटकाच्या लिहिलेल्या बऱ्या. त्याहि जमत नसल्या, तर परीक्षेचें वाचाट नपासण्यात अधिक किफायत मिळेल तर पहावी. मग उगाच वाचकाचा वेळ घेणारीं तत्त्वज्ञानें कशाला ? ह्या बाबतीत जबलपूर कॉलेजचे प्रोफेसर श्री. द. गो. मटंग, M. Sc. यांनी नुकतेंच लिहिलेल्या " अपेक्षावाद " ह्या चोपड्याची मला स्वाभिमान आठवण होत आहे. ह्या चोपड्याचा आकार त्याच्या वेडार तरुण वर्गाच्या कविनामसंग्रहाहूनहि लहान आहे, आणि त्याचा विषय पाहावा तर " जगत् त्यापून दशांगुळें उरला. " सापेक्षता

थाट सिद्ध असो या नसो, बाड्या विद्वानाला बारके पुस्तक लिहितां येणें शक्य आहे, ही अपूर्व गोष्ट ह्या प्रोफेसरांनीं सिद्ध केली, म्हणून मी त्यांचें अभिनंदन करतों. अशीं क्षुद्र पुस्तकें आमच्या पुण्यांत कोणी प्रसिद्ध करीत नाहींत. तें आपण काम केलें म्हणून बडोदावासियांचेंहि अभिनंदन करतों. आमचे पुण्यांतले मीमांसक आणि वेदान्ती प्रत्यक्ष आईनस्टाईनचीच थट्टा करतील. ते म्हणतील ह्या जर्मनानें आमच्या आद्य शंकराचार्यांचा मायावाद चोरला. तें कसेंहि असो. आमच्याकडील प्रोफेसरांनी नवीन शोध लावले नाहीं तरी, परकीयांच्या नव्या शोधांचीं साध्या भाषेंत रूपांतरें करून आम्हां अडाणी मराठ्यांना त्यांची ओळख करून दिली तरी पुरे. नागपूरच्या नवभारत-ग्रंथमालाकारांनीं ह्याच आकर्षक विषयावर " सापेक्षता दर्शन " नावाच्या एका होऊं घातलेल्या ग्रंथाची जाहिरात प्रसिद्ध केली आहे. दुर्बोध विषयाचें सुबोध विवरण होणार अशी जाहिरात आहे, ती लवकर खरी ठरो ! असो. तत्त्वज्ञानावर झालें तेच चऱ्हाट माझ्या इच्छेपलीकडे लांबलें. आता अधिक लोकप्रिय नसले तरी खात्रीनें लोकोपयोगी अशा समाजशास्त्राकडे वळूं या.

## २. समाजशास्त्र

तत्त्वज्ञान म्हणजे, व्यक्तीला जे चारहे व्यवहाराचे अनुभव आले असतात त्यांना तिच्या अध्यात्मिक भावना म्हणजे श्रद्धा, सहानुभूति, प्रेम, इत्यादिकांचें माप लावून केलेला हिशेब अथवा अनुमान. समाजशास्त्र म्हणजे समाजाला जे संकलित अनुभव येतात त्यांच्या जोरावर समाजाच्या वेळोवेळीं अधिकाधिक मिश्र आणि व्यापक ज्या घटना होतात, त्या ज्या नियमानें होतात त्याचें सम्यग्ज्ञान. ह्या व्याख्येंत ध्यानांत ठेवण्यासारखा विशेष हा कीं, समाज म्हणजे केवळ व्यक्तींचा समुदाय नव्हे. तर त्या समुदायाचें कांहीं विशिष्ट हेतूनें बनलेले सावयव संघ किंवा गट. हे गट ज्या व्यक्तींचे बनत असतात ते फार थोड्या अंशानें त्या व्यक्तींना कळून बनतात व त्यांनून फारच थोड्या अंशानें त्यांनीं आणूनबुजून बनविले असतात. बहुतांशीं ज्या व्यक्तींचे हे गट बनतात त्यांना न कळतच ते बनत असतात. कुटुंब, जाती, खेडीं, शहरें, देश, किंबहुना धर्माचे पंथ आणि व्यापाऱ्याच्या पेठादेखील बहुतांशी व्यक्तींना न कळतच बनत असतात. इतकेंच नव्हे तर त्यांचा ऱ्हास आणि पुनर्घटनाहि अशींच नकळत होत असतात. ही बनावट व्यक्तींना न कळत होते. म्हणून ती कोणत्याहि कारणाशिवाय अगर नियमाशिवाय होते असें मुळींच नव्हे. हीं गूढ कारणें व नियम नीट शोधून काढणें व त्यांचा परस्परसंबंध लावणें हाच समाजशास्त्राचा हेतु आहे. तत्त्वज्ञान कितीहि निरपेक्ष असलें तरी त्यांत उच्च आत्मिक भावनाच्या व्यापाराला जागा आहे. पण समाजशास्त्राच्या अध्ययनांत अशा कोणत्याच उचनीच भावनांना जागा नसते व नसावी. समाजशास्त्रांनीं आधीं भावनामुक्त झालें पाहिजे.

समाजशास्त्राचें अध्ययन वाटतें तितकें नवें किंवा आधुनिक नाहीं. प्राचीन काळीं ज्यांना समाजाचें शासन अथवा नियंत्रण करावयाचें होतें, तेच अपवादक थोर द्रष्टे पुरुष ह्या शास्त्राच्या अध्ययनाची खटपट करीत असत. म्हणजे विवेचनाचें व निर्णयाचें ( Legislative ) काम आणि शासनाचें व नियंत्रणाचें ( Executive ) काम हीं दोन्हीं खातीं एकाच व्यक्तीच्या अगर समितीच्या हातांत असत. जसजसा कार्याचा व्याप आणि अनुभव वाढला, तसतशी ह्या दोन्ही खात्यांची फारकत होत आली आहे. आतां पाश्चात्त्य जगांत समाजशास्त्र हें केवळ संशोधक आणि विवेचक जगांत म्हणजे केवळ शुद्ध विद्याभ्यासंगातच मर्यादित झालें आहे. राज्यकारभार मग तो कायदे करण्याचा, न्याय देण्याचा किंवा अंमलबजावणीचा असो त्याच्या संसर्गापासून समाजशास्त्र हे आतां अगदीं दूर आणि अस्पृष्ट ठेवण्यात येत आहे. ह्या मर्यादेमुळें समाजशास्त्राच्या अध्ययनाला स्वतंत्रता आणि मोकळेपणा मिळून, त्याला आधुनिक स्वरूप प्राप्त झाले आहे.

आमचे प्राचीन स्मृतिकार आणि नीतिकार हे समाजशास्त्रज्ञ होते. फार काय, आमचें सारें धर्मशास्त्र, वेदान्त अगर षड्दर्शनें नव्हत. हें जुनें समाजशास्त्रच होतें, म्हटलें तरी चालेल. आमचा हल्लींचा स्वदेशी राज्यकारभार ऊर्फ स्वराज्य, हें ज्याप्रमाणें जुन्या रामराज्याच्या नावावरच अजून विकतें, त्याचप्रमाणें आतांच्या परकीय ब्रिटिशसत्तेची आणि आमच्या संस्थानांची न्यायदानाची चक्रेंदेखील जुन्या स्मृति आणि त्यांची जुनी भाष्यें याच्या वाऱ्यावरच अजून हालत आहेत. अशा पुराणप्रिय स्थितिस्थापक परिस्थितींत आमच्या वाङ्मयात ह्या नवीन समाजशास्त्राच्या अध्ययनाला वाव मिळत नाहीं त्यात नवल काय ? आतांचे वतनी शंकराचार्य आणि फुकट धर्ममार्तंड, ह्यांचा जरी चालू राजवटीशी प्रत्यक्ष देवघेव संबंध तुटला आहे तरी दोरी तुटलेल्या पतंगाप्रमाणें, त्यांच्या परिषदा, आज्ञापत्रे, ठराव आणि प्रायश्चित्तें, सामाजिक वातावरणांत अद्यापि तरंगत आहेतच, नाहींत काय ? त्याना तोंड देऊन आमच्यांतील आधुनिक सुधारक मंडळी समाजाला नवें वळण देण्याचे प्रयत्न गेल्या तीन पिढ्या करून राहिली आहेत. पण हे दोन्हीं विरोधी पक्ष सुधारक आणि सनातनी जें कार्य करीत आहेत ते आधुनिक समाजशास्त्राचें कार्य म्हणता येत नाहीं. कारण त्या दोघांचेंहि कार्य शुद्ध आणि निरपेक्ष संशोधनाचें आणि विवेचनाचें नसून रच्यावाईट कार्यकारित्वाचा त्याला विटाळ होत आहे. उलटपक्षीं आधुनिक समाजशास्त्री हा आपल्या केवळ विवेचनासाठीं ऐतिहासिक व चालू सामाजिक अनुभवाची व प्रयोगाची सामग्री गोळा करण्यांत गुंतला आहे. तो आपल्या विवेचनाला नुसतें निर्णायक स्वरूप देण्यालाहि धजत नाहीं. तर मग तो समाजाचें नियंत्रण व शासन करण्याच्या मोहाला कसा बळी पडेल ?

येथवर ह्या नव्या दृष्टीचें सामान्य संक्षिप्त अवलोकन झालें. आतां आमच्या मराठी वाङ्मयांत ह्या दृष्टीनें गेल्या शतकांत काय घडामोडी झाल्या व आतां काय

प्रकार चालू आहे, तें पाहूं. महाराष्ट्रांत मुंबईचें विद्यापीठ इ. स. १८५६ सालच्या सुमारास सुरू झालें. परंतु सामाजिक बंडाचीं अभ्रें महाराष्ट्राच्या आकाशांत त्यापूर्वी जवळ जवळ वीस वर्षें दिसूं लागलीं होतीं. "परंतु निमरा जो वर्ग जास्त व्यवस्थित रीतीनें शिक्षणाचा लाभ झालेला होता, तो जागृत होऊं लागला होता. आपली घडी बिघडली आहे, ह्याविषयीं त्यांतील लोकांत जाणीव उत्पन्न झाली होती. आपल्या समाजांतील अनेक दुष्ट चाली, अन्यायमूलक रीतिरिवाज ह्यांनी आपल्या समाजाचें कितीं नुकसान होत आहे, हें दिसूं लागलें होतें. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर कलकत्त्याच्या महर्षि देवेंद्रनाथांच्या तत्त्वबोधिनी सभेचे सभासद होते. (मुंबईच्या) परमहंस मंडळींत त्यांचें त्या वेळीं ब्राह्मसमाजासंबंधीं संभाषण झालें असावें. शेवटीं कलकत्त्याप्रमाणें चळवळ सुरू न करतां अल्पप्रमाणावर येथेंच चळवळ सुरू करण्याचा निश्चय होऊन इ. स. १८४० च्या सुमारास परमहंस मंडळीची स्थापना झाली." (द्वा. गो. वैद्यकृत प्रार्थनासमाजाचा इतिहास पान ८ ते ९) इतर बंडखोरांप्रमाणें अर्थात् ही मंडळी गुप्तच राहिली. तिचें कार्य वीस वर्षें गुप्तच चाललें. ह्या मंडळीचे मुख्य संस्थापक दादोबा पांडुरंग ह्यांनीं "पारमहंसिक ब्राह्मधर्म" हा पहिला सुधारकी ग्रंथ ह्या मंडळीचा धर्मग्रंथ रचला. पण तो गुप्तच ठेविला. इ. स. १८६० सालीं ही परमहंस मंडळी बंद पडून पुढें १८६७ सालीं मुंबईचा प्रार्थनासमाज ह्या रूपानें तो पुन्हा अवतरली; पुढचें सुधारणेचें कार्य उघड चाललेलें प्रसिद्ध आहे. ह्या सामाजिक कार्याचा पाया धर्मसुधारणेचा होता. तो न पटल्यामुळें लोकहितवादी देशमुख आणि रा. रामशास्त्री भागवत, कृष्णशास्त्री चिपळूणकर वगैरे तत्कालीन सुशिक्षित पांढरपेशांचे पुढारी मंडळींनीं धर्माचा व श्रद्धेचा भाग वगळून शुद्ध सामाजिक धाटीरानि सुधारण्याची वाङ्मयीन चळवळ चालविली. हें सर्व ब्राह्मिक सत्र खुशालचेंद्र नागरिकांकरिताच चाललेलें न स्पून महात्मा ज्योतिबा फुले ह्या माळी गृहस्थानें बहुजनसमाजाच्या जागृतीसाठीं प्राकृत भाषेत आणि व्यावहारिक पद्धतीनें स्वतंत्र प्रयत्न चालविले. शेवटीं त्यांनींहि इ. स. १८७३ सालीं आपल्या कार्याला धार्मिक स्वरूप देऊन, सत्यशोधक समाजाची स्थापना केली. इतक्या अवधीत पुण्यासारख्या शिक्षणाच्या केंद्रस्थानीं इंग्रजी दुय्यम व उच्च शिक्षणाच्या संस्थांचा व लोकजागृतीसाठीं वर्तमानपत्रांचा उदय झाला. आगरकर, टिळक, आपटे, नामजोशी प्रभृति स्फूर्तिमान पांढरपेशांचा पुढाकार या कार्याला लाभला.

येणेंप्रमाणें सतत ४० वर्षें एकाच दिशेनें चळवळ झाल्यावर तिच्या उलट प्रतिक्रियेची वेळ येऊन ठेपली; जीर्णमताची घटना होणें क्रमप्राप्तच झालें. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे ह्या विरोधी घटनेचे वाङ्मयीन अध्वर्यु झाले. नवमताचा एक मोठा प्रतिभावान् मोहरा टिळक हा जीर्ण पक्षाला फितूर होऊन त्या सर्वच घटनेचा विष्णुशास्त्र्यांच्या मागें आपण आचार्य झाला. पुढील चाळीस वर्षांत ह्या जीर्णोद्धारक पक्षाचें कार्य अव्याहत कलेकलेनें वाढतच आहे.

ह्या दोन नितांत विरोधी पक्षांचा जो मीं उल्लेख केला आहे तो ते दोनें शिवा

त्यांतून एक तरी समाजशास्त्राच्या अध्ययनाचें किंवा प्रतिष्ठेचें कार्य करीत आहे अशा समजुतीनें नव्हे. ह्या पक्षकारांचे हेतु आणि कार्ये त्या अध्ययनाचे विषय होऊं शकतील. पण ह्यापेक्षां प्रत्यक्ष अध्ययनाशीं ह्या दोन्ही पक्षाचा संबंध नाहीं व तो कोणीहि अभ्यासु तसा वळेंच आणूं पाहील तर तो स्वतःच अभ्यासक्षेत्रांतून भ्रष्ट झाला असेच समजावें. ह्या दोन्ही पक्षांतील कांहीं वीराना भावी इतिहासांत कदाचित अग्रपूजेने स्थान मिळेल. पण त्यांना केवळ ह्या जंगबहादुरीमुळें, समाजशास्त्राच्या अभ्यासकांमध्यें जागा मिळेल अशी ज्या कोणाला अद्यापि आशा वाटत असेल तर त्यांना ह्या नूतन दृष्टीची निरपेक्षताच कळली नाहीं असें म्हणावें लागेल. फार तर ह्या रणसंग्रामाची शस्त्रास्त्रें शोधून गोळा करण्यासाठीं दोन्हीकडचे योद्धे आणि मुत्सद्दी या नवीन शास्त्राचा आश्रय अलीकडे करूं लागले आहेत व पुढें करतील; पण ते त्या शास्त्राचे केवळ वरवाईट योजक म्हणजे फायदा घेणारे होत; अध्यापक किंवा आचार्य मुळींच नव्हत ! असे कांहीं धाडशी योजक विशेषत: जीर्णोद्धार पक्षाची प्रसिद्ध किंवा प्रच्छन्न बाजू उचलून इतिहास-संशोधनाचे निर्विकार आणि तटस्थ मुखवटे घालून मुलुखगिऱ्या करूं लागले आहेत. अशा शिलेदारांत मरहूम संशोधक राजवाडे ह्यांनी बरेंच काम आणि कीर्ति संपादन केली आहे. प्रस्तुत काळीं या सामाजिक वाङ्मयीन युद्धाला राजकीय स्वरूप येऊं लागल्यामुळें तर ह्या शिलेदारी संप्रदायाला ऊत येऊं लागला आहे. ह्या धाडसाचा कळस म्हणून एक अगदीं ताजें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास गेल्या जुलै महिन्यांत प्रसिद्ध झालेला श्री. गो. म. जोशीकृत 'हिंदुसमाजरचनाशास्त्र' हा सांप्रदायिक ग्रंथ होय. ह्या शिलेदारानें प्रत्यक्ष समाजशास्त्राच्या अंगणांत शिरून लूट मारामारी चालविली आहे. ती पाहून आद्यप्रवर्तक चिपळूणकर आणि मध्यमेत राजवाडे ह्यांनाहि आश्चर्याचा धक्का बसला असता ! हा राजकारणाचा महिमा आणि समाजशास्त्राची विडंबना !

हा वरील कळस ही एक प्रतिक्रियाच होय. सुधारक राजारामशास्त्री भागवत हे इतिहाससंशोधकाच्या क्षेत्राभोंवतीं घिरट्या घालूं लागले तर मग सनातनी राजवाड्यांनी त्या क्षेत्रावरच आपला जबरदस्त पंजा का ठेवूं नये ? सक्रिय सुधारक प्रो. गो. चि. भाटे, ह्यांनीं 'समाजशास्त्र' ह्या नावासाठीं एक निर्धवजा ग्रंथ लिहून प्रत्यक्ष निशाणालाच हात घातल्यावर सनातनी पक्ष इतकीं वर्षें स्वस्थ राहिला हेंच आश्चर्य. उशिरा का होईना श्री. गो. म. जोशी ह्यांनीं आपला प्रतिध्वनि गाजविला ह्यांत काय आश्चर्य ! पण ह्या सर्व झटापटींत सनातनी पक्ष केवळ प्रतिक्रियेची वाट पाहात आहे असें कां ? आणि तीहि हिंदूंची प्राचीन वर्णव्यवस्था आणि सांप्रत जातिभेद ह्यांत एका किल्ल्यांत बसून मैदानांत कां उतरूं नये ?

महात्मा गांधींनीं गेल्या वर्षी अस्पृश्यतानिवारणाची विशेषतः मंदिरप्रवेशाची चावटळ उठविली तींत हिंदु मंदिर जणू जमीनदोस्त होतील अशी दहशत घेऊन सनातन्यांची एक अपूर्व प्रतिक्रिया सुरू झाली. तिचें 'हिंदुसमाजरचनाशास्त्र' हें एक प्रत्यक्ष फळ आहे. ह्या हल्ल्यांत सुधारक पक्षाला उभे राहावयाला मुद्द्यांच्या अभा-

एकदांहि जागा ठेवलेली नाहीं. बालविवाह, विधवाविवाह, प्रौढविवाह, स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण वगैरे प्रश्नांवर तर कठोर मारा चालविला आहे. इतकेंच नव्हे तर मुरळ्या सोडण्याच्या चालीला कायद्याचा प्रतिबंध असणें, शिवाय हिंदुसमाजानें परदेशांत वसती करणें, अगर म्लेंच्छांनीं सनातनवृत्तीवर आळा घालणें, हेंहि मुद्दे केवळ अशास्त्रीय आणि घातुक ठरविले आहेत. फार तर काय क्षत्रियकुलावतंस श्रीशिवाजी महाराजांचें आणि पेशवे भट घराण्याचाहि निःपात झाला, पण इतर मराठ्यांचीं व लोमश्यांचीं घराणीं अद्यापि सुखांत नांदत आहेत, असें सांगत धारपुरि अशी शिवारी आणि आत्मघातकी आहे हें श्रीयुत जोशी ह्यांनीं निर्विवाद सिद्ध केलें आहे. "राज्यांति नरक" हा भाव हिंदु समाजरचनाशास्त्राचा दुसऱ्या बाजीरावाच्या नव्हे तर पहिल्या शिवाजीपासून कायमचा आधणच म्हणावयाचा (पान १६१). "कोणी कितीहि हाराकिरी केली तरी ब्राह्मण सोंवळ्याचारांनें पाहिलें तर इतर वर्णांपेक्षां आत्मघातक प्रश्न उत्पन्न करितो, ह्यांत कांहीं शंका नाहीं" असें श्री. जोशी यांनीं बिनचूक विधान करून पुढें डीन, इंग गॉल्टन, हॅवलॉक एलिस, वगैरे पाश्चात्य विद्वानांचे उतारे देऊन स्पष्ट सिद्ध केलें आहे कीं, "ब्राह्मणांनीं प्रथमतः घराण्यांची निवड चांगली करून घेतली, पुढें ते वंश विभक्त करून घेतले, सुप्रजननशास्त्राचे दृष्टीनें उत्तम परंतु अर्थशास्त्राचे दृष्टीनें हीन असे धंदे त्यांना लावून दिले, सर्वनाशाला आद्य कारणें जें द्रव्य आणि सत्ता ह्या दोन्हींची झळ त्यांना लावू दिली नाहीं; म्हणूनच हे वंश निदान ४००० वर्षे तरी पिढ्यान्पिढ्या सृष्टीच्या धडामोडींत टिकून धरून राहिले आहेत. नाहीं तर ते केव्हांच नाहींसे होऊन गेले असते." (पान २४५–४६).

सनातनवाल्यांनीं पुण्यांत एक परवा वाङ्मय-परिषद भरविली. तीत ह्या साहित्य-संमेलनाच्या निषेधाचा एक ठरावहि पास करून घेतला. कां तर ह्या संमेलनानें अश्लील वाङ्मयाचा निषेध केला नाहीं म्हणून! पण ज्या सनातन्यांना ललित वाङ्मयांतील अश्लीलता सहन नाहीं त्यांना स्वतःच्या समाजशास्त्रासारख्या गंभीर विषयावरील ग्रंथांत शिमग्याचे जे सोहाळे माजवून ठेवले आहेत ते कसे रुचतात बरें? श्री. जोशी ह्यांना बीभत्सरसास्वादनाचा कोणीच हात धरूं शकणार नाहीं, हें त्यांतील एकाच उताऱ्यावरून सिद्ध होत आहे. "स्त्रोतस्वर पाहिलें तर कुत्रा ही जात अत्यंत सुधारलेली आहे. आणि आमचे सुधारक बघु मागें--त्यांच्या फारच मागें आहेत: कुत्रा जातींत स्त्रियांना समान हक्क आहेत; स्त्रीला नारदस्मृतींत सांगितल्याप्रमाणें पुनर्विवाहाचा हक्क आहे. स्त्रियांना डॉ. हरिसिंग ह्यांनीं कायदेमंडळांत बिल आणण्याचे पूर्वीच घटस्फोटाचा हक्क मिळाला आहे. ह्या जातीवरूनच सुधारलेल्या अमेरिकनांनीं अनिर्बंध संभोगाचें (Free Love) तत्त्व उचललें असे त्यांतील कांहीं कुत्र्यांचें म्हणणें आहे. ह्या समाजामध्यें भांडवलवाला वर्ग नाहीं. कार्ल मार्क्स आपलें अर्थशास्त्र देवशुनी जी सरमा तिच्या पुत्राजवळ शिकला असा प्रवाद ऐकिवांत आहे. सर्वदृष्ट्या इतकी सुधारलेली जात असून देखील ह्या जातींत सतीत्वरक्षणाचा भार स्त्रीजातीवर पडतो म्हणून त्यांनीं महिला परिषदेंत सतति-

नियमनाचा ठराव नुकताच पास झाल्याचें ऐकिलें आहे. ह्या जातींत प्रियाराधन असल्या-मुळे प्रीतिविवाह सर्रहा चालू आहेत. एकंदरींत पाहिलें तर कुत्रा ही जात अत्यंत सुधारलेली आहे असे म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं, असे आम्हांस वाटते." (पान ११७).

महाराष्ट्रांत सामाजिक सुधारणेचा जेव्हां प्रभातकाळ होता तेव्हा लोकहितवादी राजारामशास्त्री व आगरकर ह्या प्रागतिकांच्या वाङ्मयाला तोंड द्यावयाला चिपळूणकरांची निबंधमाला, गोळे ह्यांचे "ब्राह्मण आणि त्यांची विद्या", "हिंदुधर्म आणि सुधारणा" हे ग्रंथ निर्माण झाले. ह्या प्रभातकालच्या वाग्युद्धांत प्रातःकालची तरतरी आणि जोर होता. पण आतांच्या ह्या मध्यान्हकाळच्या युद्धांत जडता, बेजबाबदारी आणि अश्लीलता हीं हिमू लागलीं आहेत. कोणतेंहि युद्ध लांबत गेल्यास लढाऊ शक्ति जरी कमी कमी होत गेली तरी रुग्ण मनोविकार अधिकाधिक बळावत जाणें क्रमप्राप्तच होतें, हें साहजिकच आहे. असो.

मराठी सामाजिक वाङ्मयामध्यें वरील रणसंग्रमानें अगदीं बाजवीपेक्षां जास्त जागा अडविली आहे, हें दाखविण्यासाठींच केवळ मी ह्या पक्षात्मक वादाचा उल्लेख केला आहे. ह्या अध्यक्षीय स्थानावर बसून कोणत्या तरी एका पक्षाला भाळून समाजशास्त्राची माळ त्याच्या गळ्यात घालण्याचा अधिकार मला नाहीं, हें मी जाणून आहे; मीं तर वर सांगितल्याप्रमाणें ह्या दोन्ही पक्षांमधून खऱ्या समाजशास्त्राची किल्ली अजून फार दूर आहे असेंच म्हणत असतों. परंतु अगदीं अलीकडे गेल्या दोन चार वर्षांत ह्या विषयावर अगदीं तटस्थ आणि अभ्यासू वाङ्मय थोडें थोडें निर्माण होऊं लागलें आहे, हें एक सुचिन्ह आहे. नागपूर येथील नवभारत ग्रंथमालेंतल्यासारखे निरक्षेप, सुटसुटीत, ल्हान ल्हान ग्रंथ अधिकाधिक प्रमाणावर प्रसिद्ध होतील, तरच वरील वाक्संग्रामांतून उडालेली धूळ खरीच खाली बसेल. प्रस्तुत संमेलनाचे मुख्य अध्यक्ष श्री ना. गो. चापेकर ह्यांनी गेल्याच वर्षी **बदलापूर** (आमचा गाव) हें पुस्तक प्रसिद्ध करून एक नवीनच उप-क्रम मराठींत सुरु केला हें केवळ अभिनंदनीय आहे. ह्यांत प्रत्यक्ष समाजशास्त्र नाहीं तरी त्याची विश्वसनीय सामग्री अत्यंत श्रमानें आणि निःपक्षपातानें गोळा केली आहे. इ. स. १९३२ सालीं त्यांनीं आपला 'समाजनियंत्रण' हा निबंध प्रसिद्ध केला. पण त्यांनीहि पक्षात्मक वादापासून आपल्याला किती सुरक्षित ठेवलें आहे हें ध्यानात घेण्यासारखें आहे. अर्वाचीन तटस्थ आणि अभ्यासू वृत्ति इतरांनीं राखिली तर मराठी वाङ्मयभूमीत ह्या समाजशास्त्राला अद्याप मूळ धरिता येईना त्याच्या अध्ययनाला पुढें वाव मिळेल, एरवीं नाहीं.

परंतु मराठी लेखक वर्गांत वरील तटस्थवृत्ति उदय पावते न पावते तोंच मला एक धोक्याची सूचना ध्यान देण्याचा देणें अवश्य झालें आहे. सुधारक, सनातनी यांच्या कटकटीनें आमचे कान किटले आहेत. त्यांच्या युद्धाला अद्यापि टनार लागला नाहीं तोंच, तेंच युद्ध आतां आपलें (Theatre of war) बदलत असल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. इ. स. १८४० पासून ९० वर्षें महाराष्ट्रांत जो

एवढीहि जागा ठेवलेली नाहीं. बालविवाह, विधवाविवाह, प्रीतिविवाह, स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण वगैरे मोर्चावर तर कठोर मारा चालविला आहे. इतकेंच नव्हे तर मुलांच्या सोडण्याच्या चालीला कायद्याचा प्रतिबंध असणें, किंबहुना हिंदुसमाजानें परदेशांत वस्ती करणें, अगर स्वदेशांतील संतानवृद्धीवर आळा घालणें, हेहि मुद्दे केवळ अशास्त्रीय आणि घातुक ठरविले आहेत. फार तर काय क्षत्रियकुलावतंस श्रीशिवाजी महाराजांचें आणि पेशवे भट घराण्याचाहि निःपात झाला, पण इतर भटांचीं व सोमल्यांचीं घराणें अद्यापि सुखांत नांदत आहेत, असें सांगत क्षात्रवृत्ति अशी विषारी आणि आत्मघातकी आहे हें श्रीयुत जोशी ह्यांनीं निर्विवाद सिद्ध केलें आहे. "राज्यांतिं नरक" हा शाप हिंदु समाजरचनाशास्त्राचा दुसऱ्या बाजीरावाच नव्हे तर पहिल्या शिवाजीलाहि कायमचा बाधलाच म्हणावयाचा (पान १६१). "कोणी कितीहि हाकाटी केली तरी ब्राह्मण शेंकडोंवारांनें पाहिलें तर इतर वर्णांपेक्षां आत्मलायक प्रजा उत्पन्न करितो, ह्यांत कांहीं शंका नाहीं" असें श्री. जोशी यांनीं बिनचूक विधान करून पुढें डीन, इंग गॉल्टन, हॅव्हलॉक एलिस, वगैरे पाश्चात्य विद्वानांचे उतारे देऊन स्पष्ट सिद्ध केलें आहे कीं, "ब्राह्मणांनीं प्रथमतः घराण्यांची निवड चांगली करून घेतली, पुढें ते वंश विभक्त करून घेतले, सुप्रजाजननशास्त्राचे दृष्टीनें उत्तम परंतु अर्थशास्त्राचे दृष्टीनें हीन असे धंदे त्यांना वाटून दिले, सर्वनाशाचीं आद्य कारणें जीं द्रव्य आणि सत्ता ह्या दोन्हींची झळ त्यांना लागू दिली नाहीं; म्हणूनच हे वंश निदान ४००० वर्षें तरी पिढ्यान्‌पिढ्या सृष्टीच्या धडामोडींत टिकाव धरून राहिले आहेत. नाहीं तर ते केव्हांच नाहींसे होऊन गेले असते." (पान २४५–४६).

सनातनकांनीं पुण्यांत एक परवा वाङ्मय-परिषद् भरविली. तींत ह्या साहित्य-संमेलनाच्या निषेधाचा एक ठरावहि पास करून घेतला. कां तर ह्या संमेलनानें अश्लील वाङ्मयाचा निषेध केला नाहीं म्हणून! पण ह्या सनातन्यांना ललित वाङ्मयांतील अश्लीलता खपत नाहीं त्यांना स्वतःच्या समाजशास्त्रासारख्या गंभीर विषयावरील ग्रंथांत शिरण्याचे जे मोहाळ माजले आहेत ते कसे रुचतात बरें? श्री. जोशी ह्यांचा बीभत्सरसास्वादनांत कोणीच हात धरू शकणार नाहीं, हें त्यांतील एकाच उताऱ्यावरून सिद्ध होत आहे, "खरोखर पाहिलें तर कुत्रा ही जाति अत्यंत सुधारली आहे. आणि आमचे सुधारक बहु मत- -त्यांच्या फारच मागें आहेत: कुत्रा जातींत स्त्रियांना समान हक्क आहेत. स्त्रीला नारदस्मृतींत सांगितल्याप्रमाणें पुनर्विवाहाचा हक्क आहे. स्त्रियांना डॉ. हरिसिंग ह्यांनी कायदेमंडळांत बिल आणण्याचे पूर्वीच घटस्फोटाचा हक्क मिळाला आहे. ह्या जातीवरूनच सुधारलेल्या अमेरिकनांनीं अनिर्बंध संभोगाचें (Free Love) तत्त्व उचललें असें त्यांतील कांहीं कुत्र्यांचें म्हणणें आहे. ह्या समागमस्थें भांडवलशाही वर्ग नाही. कार्ल मार्क्स आपलें अर्थशास्त्र देवशुनी जी सुरमा तिच्या पुनाञ्चल शिकला असा प्रवाद प्रसिद्ध आहे. सर्वदृष्ट्या इतकी सुधारलेली जात असून देखील ह्या जातींत सततिरक्षणाचा भार स्त्रीजातीवर पडतो म्हणून त्यांतील महिला परिषदेंत संतति-

## ३. उपसंहार

येथपर्यंत मराठी वाङ्मयाचा जुन्या नव्या काळांतील वरील दोन महत्त्वाच्या विषयासंबंधीं ग्रंथांचा आणि घडामोडींचा विचार झाला. आता पुढें काय करावयाला पाहिजे, ह्याविषयीं उपसंहाराबद्दल एक दोन मुद्द्यांसंबंधीं विचार करून हें भाषण पुरें करितों. तत्त्वज्ञानाचा जो साक्षात्कारी भाग आहे त्यासंबंधीं कोणी कोणाला सांगून शिकवून तो होण्यासारखा नाहीं. जो दुसरा तार्किक भाग आहे त्यात खरी भरीव ग्रंथनिर्मिति व्हावयाची तर तिच्या पूर्वी निरनिराळ्या विषयांवर प्रायोगिक व वैज्ञानिक अध्ययन पुरेसें झालें पाहिजे. पण ह्या बाबतींत आमची विद्वान् मंडळी आणखी किती काळ पाश्चात्यांच्या श्रमावर हात टेकून राहणार हें कळत नाहीं. बंगाल्यांतील सर जगदीशचंद्र बोस, डॉ. पी. सी. रॉय, मद्रासकडील डॉ. रामन् ह्यांचीं उदाहरणें महाराष्ट्रापुढें आहेतच. प्रत्यक्ष तत्त्वज्ञानांतच प्रो. राधाकृष्णन् यांनी स्वदेशीं व परदेशीं बरीच कीर्ति मिळविली आहे. पण तीसुद्धां पौरस्त्य तत्वज्ञानाचें नुसतें समर्थन ( Apologia ) म्हणूनच मिळविली आहे. अलीकडे मराठींतून त्यांच्या ग्रंथांचा अनुवाद होत आहे. 'Hindu View of Life' ह्या त्यांच्या चार सुंदर 'हिबर्ट लेक्चर्सचा' मराठींत अनुवाद श्रीयुत बाबूभाई मेहता ह्या गुजराथी गृहस्थानें नुकताच प्रसिद्ध केला आहे. श्री. नरसिंह चिंतामण केळकर ह्यांनी आपला 'भारतीय तत्त्वज्ञान' हा ग्रंथ ह्याच वर्षी प्रसिद्ध केला आहे. पण तो केवळ "संकलनात्मक आणि संक्षिप्तच झाला आहे". प्रसिद्ध षड्दर्शनांशिवाय आणखी सहा सातच दर्शनांचें दिग्दर्शन केळकरांनीं केलें आहे; पण पाली ब्रह्मजाल सूत्रांत श्रीगौतमबुद्धांनीं आपलें दर्शन सांगण्यापूर्वी त्या वेळीं भारतांत निदान ६४ तरी भिन्न भिन्न दर्शनें होतीं असें स्पष्ट म्हटलें आहे. तात्यासाहेबांनीं ह्या प्रदेशावर कांहीं प्रकाश पाडला असता तर त्यांच्या पुस्तकांत कांहीं नाविन्य आलें असतें. मराठींत स्वतंत्र दर्शनांचा योग केव्हां येईल तेव्हां येवो, तोंपर्यंत विश्वविद्यालयांतील विद्वानांनी भारतीय तत्त्वज्ञानाचें शास्त्रीय शोधन करून कालानुक्रम आणि विषयानुक्रम निर्विकार पणानें जुळवून तत्त्वज्ञानाचा एक नवीन इतिहास तरी लिहिणें फार अगत्याचें आहे. नवी दृष्टि नसली तरी पुढील अध्ययनाला एक नवीन दिशा दाखविण्याचें श्रेय ह्या प्रयत्नानें मिळेल. समाजशास्त्राच्या बाबतींत मुंबई विद्यापीठानें बरींच वर्षे एक संस्था रडतखडत चालविली आहे. पण तिचें दृश्य फळ काहींच दिसत नाहीं. निदान मराठी वाचकांना तरी कांहीं लाभ झालेला दिसत नाहीं. स्वतंत्रपणानें काम करणाऱ्यांपैकीं रा. सा. ना. गो. चापेकराच्या 'बदलापूर ग्रंथाचा' उल्लेख वर झालाच आहे. ते म्हणतात त्याप्रमाणें हें बदलापूर गॅझेटच तयार झालें आहे. त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करून मला आमच्यांतील तरुण विद्वानांना एक नम्र सूचना करावयाची आहे कीं, अशा प्रकारची अखिल भारतांतन विषयवार आणि आकडेवार कसोशीची माहिती ब्रिटिश

सामाजिक वाद चालला होता तो फुगता धर्मशास्त्राच्या भावनामय आंगणांत चालला होता. इ. स. १८३० पासून हा वाद अर्थशास्त्राच्या वेदनामय आंगणात सुरू झाला आहे. तो यापुढें किती वर्षे आणि कोणत्या थराला जाईल, हें तूर्त कोणींच सांगवत नाहीं. एका बाजूला नूतन समाजवाद ( Socialism ), व्यक्ति-स्वातंत्र्य ( Individualism ), समतावाद, बहुहितवाद ( Utilitarianism ) वगैरे तत्त्वांच्या आरोळ्या ऐकूं येतात; तर उलट दिशेनें सामाजिक मक्तेगिरी ( Privileges ), साम्राज्यवाद, राष्ट्रीयता ( Nationalism ), जातिनिष्ठा ( Communalism ), वंशशुद्धि ( Pedigree ) इत्यादि रूढ भावनांवर प्रवचनांचा, उपदेशांचा आणि धमक्यांचा अट्टाहास चालू आहे. मागील युद्धानें नुसतें आंगणच बदललें नसून त्याचा जोर आणि वेगहि फारच तीव्र होत आहे. धार्मिक सुधारकांना व त्यांना विरोध करणाऱ्यांना जी घटनासिद्धि करावयाला जवळ जवळ गेलीं १०० वर्षे लागलीं ती घटना ह्या आर्थिक सुधारकांनीं गेल्या चारपांच वर्षांत पुरी केली आहे. हिंदुस्थानांतील मोठ्यांतली मोठी राजकीय विरोधी घटना म्हणजे कॉंग्रेस, तिला कार्बीज करावयाला जुन्या सुधारकांना कमीत कमी गेलीं ३० वर्षे लागलीं. पण पुढील ५ वर्षे तरी ह्या नव्या आर्थिक सुधारकांमुळें किंवा त्यांचे विरोधी जातिनिष्ठ उद्धारकांपुढें कॉंग्रेसला टिकाव धरितां येईल कीं नाहीं, हें कोण सांगूं शकेल ? लखनौ–पॅक्टनतर लोकमान्य तीरोभूत झाले, आणि पुणें–पॅक्टनंतर महात्म्याला संन्यास घ्यावा लागत आहे. मला सांगावयाचा मुद्दा हा कीं, ह्या नव्या दंगलीमुळें समाजशास्त्राची बिल्डी आणखी सफर योजनें दूरच राहिली; माझे असें म्हणणें नाहीं कीं, हीं व अशींच सामाजिक युद्धें आणि वाद समाजशास्त्राला बाधक आहेत. मुळींच नाहीं. उलट आम्हीं वर म्हटलेंच आहे कीं हा विरोध समाजशास्त्राच्या निरीक्षणाचा मोठा विषय आहे. हीं युद्धें आणि वाद ह्या शास्त्राच्या निरीक्षणमंदिरांतील उमटणारे देखावे ( Phenomena ) आणि प्रयोग आहेत. प्रत्यक्ष अध्ययनाला ह्यामुळें किंचित् विलंब लागला तरी अप्रत्यक्ष अध्ययनाला अशा घडामोडींमुळें मोठी स्फूर्ति येते. समाजशास्त्राच्या अभ्यासांतले हे तर अलभ्य वस्तुपाठच होत. प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ता हेगल म्हणतो कीं, "समाजाच्या उन्नतीचीं बीजें विरोधविकासात आहेत. कार्ल मार्क्स त्याचा शिष्य, त्यानें ह्या विरोध-विकासावर आपली शिकवण सर्व रचिली. महात्मा गांधी सांगतात कीं, "आपली पद्धति झजावाताची आहे." शांतीचा प्रत्यक्ष पुतळा श्रीख्रिस्त म्हणतो, "मी विरोधाचीं भुतें उठवायला आलो आहें. शांतीचीं थडगीं बांधावयाला नव्हे." तर मग वर जी मी धोवयाची सूचना म्हटली ते वाक्य दुरुस्त करून त्याऐवजीं आता मंगलाचरण असें म्हणतों. हें मंगलाचरण श्री. पां. वा. गाडगीळ ह्यांनीं 'सोशॅलिझम' अथवा **'समाजवादाचा ओनामा'** हें आपलें पुस्तक गेल्या ऑक्टोबरमध्यें प्रसिद्ध केलें आहे. जे कार्य आगरकरांनीं धर्मशास्त्रात केलें, तें गाडगीळ व त्यांचे अनुयायांनीं अर्थशास्त्रांत आरंभलें आहे. त्यांना सनातनी पक्ष कसें तोंड देईल, तें पाहावें.

## ३. उपसंहार

येथपर्यंत मराठी वाङ्मयाचा जुन्या नव्या काळांतील वरील दोन महत्त्वाच्या विषयासंबंधीं ग्रंथांचा आणि धडामोडींचा विचार झाला. आता पुढें काय करावयाला पाहिजे, यासंबंधीं उपसंहाराद्दाखल एक दोन मुद्द्यांसंबंधीं विचार करून हें भाषण पुरें करितों. तत्त्वज्ञानाचा जो साक्षात्कारी भाग आहे त्यासंबंधीं कोणी कोणाला सांगून निकडून तो होण्यासारखा नाहीं. जो दुसरा तार्किक भाग आहे त्यांत नवी बरीच ग्रंथनिर्मिति व्हावयाची तर तिच्या पूर्वी निरनिराळ्या विषयावर प्रायोगिक व वैज्ञानिक अध्ययन पुरेसें झालें पाहिजे. पण या बाबतींत आमची विद्वान् मंडळी आणखी किती काळ पाश्चात्त्यांच्या श्रमावर हात टेकून राहणार हें कळेन नाहीं. बंगाल्यांतील सर जगदीशचंद्र बोस, डॉ. पी. सी. रॉय, मद्रासकडील डॉ. रामन् यांचीं उदाहरणें महाराष्ट्रापुढें आहेतच. प्रत्यक्ष तत्त्वज्ञानांतच प्रो. राधाकृष्णन् यांना स्वदेशीं व परदेशीं बरीच कीर्ति मिळालेली आहे. पण तीसुद्धा पौरस्त्य तत्त्वज्ञानाचें नुसतें समर्थन ( Apologia ) म्हणूनच मिळविली आहे. अलीकडे मराठींतून त्याच्या ग्रंथांचा अनुवाद होत आहे. 'Hindu View of Life' या त्यांच्या चार सुंदर 'हिबर्ट लेक्चर्सचा' मराठींत अनुवाद श्रीयुत बाबूभाई मेहता या गुजराथी गृहस्थानें नुकताच प्रसिद्ध केला आहे. श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं आपला 'भारतीय तत्त्वज्ञान' हा ग्रंथ याच वर्षी प्रसिद्ध केला आहे. पण तो केवळ "संकलनात्मक आणि सशितच झाला आहे". प्रसिद्ध षड्दर्शनादिवाय आणखी सहा सातच दर्शनाचें दिग्दर्शन केळकरांनीं केलें आहे; पण पाली ब्रह्मजाल सूत्रांत श्रीगौतमबुद्धांनीं आपलें दर्शन सांगण्यापूर्वी त्या वेळी भारतात निदान ६४ तरी भिन्न भिन्न दर्शनें होतीं असें स्पष्ट म्हटलें आहे. तात्यासाहेबांनीं या प्रदेशावर कांहीं प्रकाश पाडला असता तर त्यांच्या पुस्तकांत कांहीं नाविन्य आलें असतें. मराठींत स्वतंत्र दर्शनाचा योग केव्हां येईल तेव्हां येवो, तोंपर्यंत विश्वविद्यालयांतील विद्वानांनी भारतीय तत्त्वज्ञानाचें शास्त्रीय शोधन करून कालानुक्रम आणि विषयानुक्रम निर्विकारपणानें जुळवून तत्त्वज्ञानाचा एक नवीन इतिहास तरी लिहिणें फार अगत्याचें आहे. नवी दृष्टि नसली तरी पुढील अध्ययनाला एक नवीन दिशा दाखविण्याचें श्रेय या प्रयत्नानें मिळेल. समाजशास्त्राच्या बाबतींत मुंबई विद्यापीठानें बरींच वर्षे एक संस्था रडतखडत चालविली आहे. पण तिचें दृश्य फळ काहींच दिसत नाहीं. निदान मराठी वाचकांना तरी कांहीं लाभ झालेला दिसत नाहीं. स्वतंत्रपणानें काम करणाऱ्यांपैकीं रा. सा. ना. गो. चापेकराच्या 'बदलापूर ग्रंथाचा' उल्लेख वर झालाच आहे. ते म्हणतात त्याप्रमाणें हें बदलापूर गॅझेटच तयार झाले आहे. त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करून मला आमच्यांतील तरुण विद्वानांना एक नम्र सूचना करावयाची आहे कीं, अशा प्रकारची अखिल भारतांतून विषयवार आणि आंकडेवार वस्तोशांची माहिती त्रिटिश

सरकार आणि संस्थानें ह्यांनीं आज ५–६ दशवार्षिक खानेसुमारींतून अगदीं पुरून उरण्यासारखी मिळवून ठेविली आहे. Ethnography Survey, Philological Survey वगैरेंचे द्वारें आज ५०–६० वर्षे अव्याहत खर्च आणि श्रम करून सामग्री मिळविण्याचें काम चाललें असून, त्याचें मानानें प्रसिद्धीनें कामाला मात्र अद्याप कोणीच पुढें येत नाहीं हें कसें ? भरतखंड म्हणजे एक अफाट मानवी म्यूझियम आहे. मराठ्यांना महाराष्ट्रांत ही विपुल सामग्री हाताशीं तयार आहे. ह्या बाबतींत माझे मित्र श्री. दिवेकरशास्त्री आणि श्री. श्री. म. माटे ह्यांनीं जे श्रम केले आहेत त्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. विशेषतः श्री. माटे यांचा 'अस्पृश्यांचा प्रश्न' हा ग्रंथ सुंदर असून समतोल आहे ह्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करितों. महाराष्ट्रांतील ग्रामसंस्था, महाराष्ट्राची वसाहत, जमीनधारापद्धति असा एक एक सुटसुटीत विषय घेऊन त्यांतच आयुष्य वेचणाऱ्याची पुरेशी सामग्री वाट पाहात आहे.

महाराष्ट्रांतील समाजरचनेवर लिहिणारांनीं ह्यांतील ग्रामसंस्थेपेक्षां जातिसंस्थेकडेच अधिक नजर पुरविली आहे; आणि तीहि माझी जात थोर, तुझी जात नीच या अशास्त्रीय भावनेनें. यांतील कित्येक जाती अथवा जमाती आपआपल्या अंतर्बाह्य आचारांत किती स्वयंनिर्णित होत्या हें कुणाच्या लक्षांत यावें तितकें येत नाहीं. वैयक्तिक किंवा सामाजिक गुन्हे अथवा दोष घडल्यास त्याच्या निवाड्यासाठीं किंवा दंडासाठीं ह्या जाती सरकारी न्यायखात्याकडे जात नसत. अशी पंचाइत जातगंगा करी किंवा क्षेत्राच्या ठिकाणीं ग्रामाधिकारी जोशी असत त्यांच्याकडूनहि हा मनसुबा होत असे. ज्या जोश्याची निवड गांवच्या गोताकडून होत असे. तें गोत म्हणजे गांवच्या सर्व जातींच्या प्रमुखांचें पार्लमेंट असे, असे कज्जे अलीकडे शंकराचार्यांच्याकडे जातात. पण शंकराचार्यांचें ग्रामाधिकाऱ्यांच्या अधिकारावर अतिक्रमण आहे आणि तो ग्रामाधिकारी दोनशें वर्षांपूर्वी चालूं देत नसत, हें धुळ्याचे वकील भास्कर वामन भट ह्यांनीं भा. इ. स. मंडळाचें त्रैमासिक वर्ष १३ अंक ३ यांत सप्रमाण दाखविलें आहे. मंडळाचे संशोधक श्री. शंकरराव जोशी यांच्याकडे अशा कज्यांचीं शेपत्रें आणि शुद्धिपत्रें बरींच पाहावयास मिळतील. तसेंच गांवपाटील आणि जातपाटील यांचे अधिकार आणि कार्यक्षेत्रें कशीं भिन्न होतीं हेंहि श्री. शंकरराव जोशी ह्यांनीं स्पष्ट दाखविलेलें आहे. त्रैमासिक वर्ष २ पृष्ठ १३४-३५ ह्यांत म्हटलें आहे कीं, "न्यायमनसुबी सरकारांत न्यावयाचें प्रयोजन नाहीं. सर पाटील याहि करावा. वट अमल कोणी लोकामध्यें झाला तरी त्याचा न्याय दिवाणांत न आणावा. अलिकडे दिवाणांत नेतात ते न न्यावे." हें पत्र समस्त अष्टागर प्रांतांतील कोळी जातीबद्दलचें आहे. मी कर्नूल जिल्ह्यांत हिंडत असतांना तेथील धनगर जातीमध्यें अद्यापि हाच प्रकार पाहिला.

महाराष्ट्रांतील जातिसंस्था आणि ग्रामसंस्था ह्यांचा कारभार मध्ययुगांत देखील लोकसत्तात्मक होता.

राज्यक्रांति झाली तरी या लोकसभेवर परिणाम होत नसे. इंग्रजांच्या दंडशाहीनें

मात्र ही सत्ता नामशेष करून टाकली आहे.

विद्याखातें, कायदे करणारें विधिमंडळ, निवाडा करणारें न्यायखातें आणि अंमल-बजावणी करणार प्रधान मंडळ, हीं वस्तुत: परस्परांहून भिन्न व स्वतंत्र असावयास पाहि-जेत. पोलीसखातें व लष्करखातें एवढेंच काय तें सरकारकडे असावें, असें प्रसिद्ध समाज-शास्त्री हर्बर्ट स्पेन्सर ह्यांनी आपल्या 'Proper Functions of the State' या निबंधांत कंटरवानें सांगितलें आहे. तरी पाश्चात्त्य राज्यसंस्थेनें लोकांचे सर्वच हक्क आपल्या मुठींत वळले आहेत, आणि हेंच अतिक्रमण सर्वत्र चालू आहे. नवभारत, ग्रंथमालेतील 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' चे लेखक प्रो. पेंडसे ह्यांनीं ह्या विषयाचें विवेचन केलें असतें तर बरें झालें असतें. मराठ्यांचें आणि पेशव्यांचें दफ्तर आणि ठिकठिकाणीं अद्यापि सांपडणारी कागदपत्रें ह्यांचा उपयोग करून न घेता श्रुति स्मृति आणि बारकऱ्यांचे भारुड ह्यांतच हे प्रोफेसर गुरफटलेले आहेत. कोळी जसा आपल्या जाळ्यातच गुंतून मेलेला आढळतो, तशी महाराष्ट्राच्या इतिहासाची गत या ग्रंथप्रिय लोकांनीं केलेली दिसते. समाजशास्त्राच्या भावी अभ्यासूंनी ह्या कवचाच्या बाहेर यावें, तेव्हाच खरा इतिहास कळेल, आणि नवीन समाजशास्त्र बनेल.

मोंगलाईनंतर श्रीशिवछत्रपतींनीं हिंदुपदपादशाही स्थापन केली तेव्हांपासून सामाजिक स्वातंत्र्यावर राजाचें आक्रमण सुरू झालें. आपल्या घराण्यातील लग्नापुरती त्यांनीं पांच कुळी निर्माण केली. नेवरच्या प्रतापसिंह महाराजांनीं मराठा जातीवर निय-त्रण घालण्यासाठीं एक शिरस्तापत्र तयार केलें. त्यावर भोसले, महाडीक, शिरके, मोहिते आणि गुजर ह्या पांच कुळांतील ४३ प्रमुख मराठ्यांच्या सह्या आहेत. ह्याची अस्सल प्रत भा. इ. सं. मंडळांत आहे. मराठ्यांनीं आपसांतच शरीरसंबंध करावा. मध्यं-तरी पेशवाईमुळें मराठे जातीतील शिरस्ते बिसकळीत झाले होते. ते सुरळीत चालवावेत. हीं दोन कलमें स्पष्ट उल्लेखिलेली आहेत. आश्रित ब्राह्मणांनीं मराठ्यांचें पौरोहित्य ते सांगतील त्याप्रमाणें करावें, न केल्यास दुसऱ्या ब्राह्मणाची नेमणूक व्हावी. ह्याबाबत नेवरचें अपील छत्रपतींकडे यावें असा निर्बंध आहे.

अस्पृश्यतेच्या छडा लावण्यांत–निवारणाचा भाग तर राहूं द्या–मला स्वत:ला जो जन्मभर अनुभव आला आणि ज्ञानद झाला तो लक्षात घेता मला आणखी जन्म मिळाले तरी ते ह्याच शोधनांत आणि सेवाशुश्रूषेंत खर्चीन अशी उमेद वाटत आहे. एकच इशारा द्यावासा वाटतो. अशी कामें पूर्वग्रह अजिबात टाकून दिल्याशिवाय कोणी केव्हांहि हातीं घेऊं नयेत. ३६ वर्षांपूर्वी 'हिंदु धर्म आणि सुधारणा' या ग्रंथाच्या विद्वान् कर्त्यांनी आपल्या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणांत असा निष्कर्ष काढिला कीं, ब्राह्मण जातीनें हजारों वर्षे विद्याभ्यासंगाचे अनिश्रम केले, इतकेंच नव्हे तर कनिष्ठ जातींच्या उद्धार मनन स्वार्थत्याग करून चालविला. त्यामुळें त्यांच्या बुद्धीला वैभव्य झालें आहे. आणि त्यांच्या सख्येचा नव्हे तर गुणांचाहि झपाट्यानें ऱ्हास होत आहे. त्यानंतर ३६ वर्षांनीं आज पाहावें तों श्री. गो. म. जोशी ह्यांनीं आपल्या हिंदु-समाज रचनाशास्त्र ग्रंथांत

अगदीं उलट प्रकारचा छातीठोक सिद्धान्त काढला आहे तो असा—सृष्टीच्या घडामोडींत ब्राह्मण जात एकटी आज ४ हजार वर्षें टिकून राहिली आहे. तीच जात सुधारणा करण्यास लायक आहे. श्री. गोखले मागें म्हणून गेले कीं कनिष्ठ जातींवर विद्याव्यासंगाची आणि लोकसेवेची सारी जबाबदारी सोपवून ब्राह्मणांनीं स्वस्थ खेड्यांत जाऊन राहावें आणि आपली तनदुरुस्ती आणि मनदुरुस्ती करावी. ह्याच्या उलट जोशी आज म्हणतात. ब्राह्मणांनीं आपलीच सत्ता शक्य तितकी वाढवावी आणि कनिष्ठांची शक्य तितकी घटवावी. आतां कोणाचें ऐकावें? आपल्या मतें सिंगें परि तो आहे जैसें तैसें॥ तुका म्हणे थोर। बाबा गर्भीं ब्रह्मवृंदें॥ हा खरा प्रकार आहे असें समजून दोघांकडेहि दुर्लक्ष करावें झालें!

माझी तरुणांना हात जोडून विनंती आहे कीं, बाबांनो, तुम्ही आपले सर्व पूर्वग्रह पुनः सोडून द्या; आणि तुमच्यासाठीं आधींच मिळवून ठेविलेल्या माहितीला तुमच्या स्वतःच्या स्थानिक विविध अनुभवांची जोड देऊन, अशी कांहीं नवी दिशा दाखवा कीं जेणेंकरून आमचे पूर्वग्रह नाहीसे होतील, आणि नवीन आशा उत्पन्न होईल. परमेश्वर करो आणि हे मराठी वाङ्मयाचे पांग फिटोत!

६

# महाराष्ट्र नाना शंकरशेटला कां विसरला ?

श्रीमंत जगन्नाथ ऊर्फ नाना शंकरशेट हा एक असाधारण महात्मा महाराष्ट्रात अव्वल इंग्रेजीत होऊन गेला, पण त्याला महाराष्ट्र आज जवळ जवळ विसरून गेला आहे. असें कां झालें हाच एक विशिष्ट विषय प्रस्तुत लेखाचा आहे.

ह्या विषयाचे दोन भाग पडतात. पहिला प्रश्न असा आहे कीं, नाना संस्मरणीय पुरुष मुळीं होते की नव्हते ? मुळींच संस्मरणीय नसल्यास त्याला महाराष्ट्र विसरला काय ? हा दुसरा भाग अथवा प्रश्नच उद्भवत नाहीं. कारण पुरुष संस्मरणीय नसेल तर देशानें त्याला विसरणें हेंच साहजिक आहे. पहिल्या भागात पहिल्याच प्रश्नाचा विचार करूं.

## भाग १ ला

नाना शंकरशेट हे शंकरशेट बाबुलशेट ह्याचे पुत्र इ. स. १८०३ सालीं मुंबईस जन्मले त्या वेळीं पेशवाई अद्यापि बुडाली नव्हती. नाना फडणीस इ. स. १८०० सालीं दिवंगत झाले होते. मराठ्यांशीं इंग्रजांचें दुसरें युद्ध होऊन लवकर सुरजी अंजनगांवचा तह इ. स. १८०३ सालीं झाला; त्याच वेळीं मराठेशाही नसली तरी पेशवाई जवळ जवळ बुडण्याच्या पंथास

लागली. इंग्रजांचा हात महाराष्ट्रांत कायमचाच शिरकूं लागला. अशा संधीस एक नाना (फडणीस) अस्तंगत होऊन दुसरा नाना (शंकरशेट) जन्मला. पेशवाई इ. स. १८१८ ला पार बुडाली. इ. स. १८२२ साली ह्या दुसऱ्या नानाचे वडील श्रीमंत शंकरशेट मुंबईस वारले आणि त्याच्या अवाढव्य इस्टेटीची पूर्ण मालकी केवळ १८ वर्षांचें कोवळें पोर नाना शंकरशेटकडे आली! काय योगायोग!! कारण ह्या कोवळ्या तरुणानें एकदम उगवत्या इंग्रज प्रभूशीं पुढें ४३ वर्षें मोठ्या बाणेदारपणानें जें असामान्य सहकार्य केलें त्याची योग्यता आजकालच्या महात्मा गांधींच्या असहकार्याच्या खालोखाल एक महत्त्वाचा भाग म्हणून मुंबई इलाख्याच्या इतिहासांत चमकेल ह्यांत तिळमात्र शंकानाही. मग हा थोर पुरुषश्रेष्ठ संस्मरणीय नव्हे असें कोण म्हणेल? तरी आजच्या महाराष्ट्रांतील किती तरुण—मग ते कितीहि पठिक पदवीधर असोत—नानांची योग्यता खरोखरी किती आहे हे नानांच्या चरित्राचें महत्त्व खालील गोष्टीवरून सिद्ध होतें.

१. नानाचें घराणें गर्भश्रीमंत व्यापारी पेशाचें होतें. त्यांचे खापरपणजे नारायणशेट ह्यांचा काठेवाडांतील पोरबंदर येथें मोत्यें व इतर जडजवाहिराचा व्यापार होता. पणजे माणिकशेट ह्याकडे ठाणें जिल्ह्यांतील तालुके मुरबाड ह्या गावीं पोतदारी होती. हाच गांव ह्या इतिहासप्रसिद्ध घराण्याचा मूळ वतनाचा होता. पुढें नानाचे आजे बाबुलशेट ह्याच्या कारकीर्दीत मुंबईजवळील कल्याण प्रांत हा पोर्तुगीजाच्या ताब्यांत असल्यामुळे ह्या सर्व प्रांतांत पोर्तुगीजांची देवाधुडवीच नव्हे तर हिंदुधर्माला रसातळास नेऊं पाहणारी कारवाई चालली होती. अशा धामधुमींत वसईच्या खाडीच्या तोंडाशीं असलेलें घोडबंदर नावाचें मोक्याचें बंदर आपल्या घराण्याच्या व्यापाराचें केंद्र म्हणून निवडून बाबुलशेटनें आपलें बस्तान थाटलें! इतकेंच नव्हे कालांतरानें मुंबईबेट इंग्रजांकडे आऊन तेथील व्यापारपेठ वाढूं लागली म्हणून लागेच बाबुलशेटनें तेथेंहि आपली एक पेढी उघडली.

२. बाबुलशेटीना शंकरशेट पुत्र झाले. ते तर बापसे बेटा सवाई निघाले. त्यांनीं आपल्या बापाच्या जुन्या व्यापाराला नवीन वळण लाविलें. त्यासाठीं शंकरशेटला घरीं व्यावसाय कांहीं कमी नसताहि त्यांनीं मुंबईस एका युरोपियन कंपनींत नोकरी धरली. हेतु हा की नुसतें आपल्याला इंग्रजी भाषा यावी इतकेंच नव्हे तर इंग्रजांची व्यापारी मोड हस्तगत व्हावी. बाबुलशेटींना प्रथम प्रथम हा प्रकार पसंत पडला नाहीं, पण लगेच जेव्हां शंकरशेटींनीं व्यापारात चारांचे चव्वेचाळीस केले तेव्हां बाबुलशेटींनीं चिरंजिवाची पाठ थोपटली. शंकरशेटच्या अंतकाळीं "त्याच्या तिजोरींत सोळा लाख रुपये रोख आणि एक लाखाचें जवाहीर होतें" असें त्यांचे चरित्रकार रा. शिनके लिहितात!

३. अशा कर्तृत्ववान् वैश्याच्या पोटीं नाना हे इ. स. १८०३ सालीं रत्न निर्माण झाले. त्यांनीं वैश्य वृत्तींत तर आपल्या जनकावर सवाई शंकरशेटपणा गाजविला. इतकेंच नव्हे, तर महाराष्ट्रांतील मुत्सद्देगिरींतहि नाना फडणिसावर सवाई नानापणा गाजविला हें

भावी इतिहासकारांना कबूल करावें लागेल. चार पिढ्याचा गर्भश्रीमंतपणा भोगूनहि केवळ १८ वर्षांचे मूल असून त्या वेळचा पहिला मुंबईचा गव्हर्नर मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा महाराष्ट्राच्या शिक्षणाच्या बाबतींत नानाची सल्लाच नव्हे तर आर्थिक मदत मागावयास येतो ही काय लहानसहान गोष्ट ? ही गोष्ट नानाचा मोठेपणाच नव्हे तर अव्वल इंग्रजीचा पाया घालणाऱ्या इंग्रज बहाद्दरांचा नम्रपणाहि दाखविते. त्या वेळी हल्लींच्या चर्चिलप्रमाणें सारेच इंग्रज उर्मट असते तर इंग्रजांचे पाय येथें रोवलेच गेले नसते.

४. नाना इ. स. १८०३ साली जन्मले. इ. स. १८२२ साली बाप वारल्यावर एकदम सार्वजनिक कार्यांत अगदीं अग्रेसर म्हणून घडूं लागले. इ. स. १८४०च्या सुमारास तर त्याच्या भ्रुकुटीशिवाय महाराष्ट्रांतील सार्वजनिक चळवळीचे एक पानहि हालेना ! १८५७ सालच्या बंडात नाना सामील होते अशा मशय-पिशाचाने इंग्रज बहाद्दराला घेरले. पण जेव्हां मुंबईच्या पोलीस कमिशनराची बालबाल समक्ष खात्री झाली तेव्हां पुढील गव्हर्नरानी मागील सर्व गव्हर्नराप्रमाणे नानांची पुन मर्जी संपादण्याचा क्रम सुरू केला. फार काय नानांच्या निधनानंतर तेव्हांचे मुंबईचे गव्हर्नर सर बार्टल फ्रियर ह्यांनी व्यक्तिशःच नव्हे तर इलाख्याधिपति आणि ब्रिटिश बादशहाचा प्रतिनिधि म्हणून जीं दोन उघड दुखवट्याचीं पत्रे पाठविलीं व जीं रा. पितळे ह्यांनीं लिहिलेल्या चरित्रांत पान ३५०, ३५१ वर प्रसिद्ध झालीं आहेत, त्यावरून नानांची स्वामिनिष्ठाच नव्हे तर देशनिष्ठाहि सिद्ध होत आहे !

५. नानांचें सार्वजनिक कार्य. शिक्षणाचे बाबतीत इ. स. १८२२ साली बॉंबे स्कूल बुक ॲंड स्कूल सोसायटीपासून तो थेवटीं थेवटीं हल्लींची मुंबई युनिव्हर्सिटी स्थापन होईतोंपर्यंत पुरुषांच्या व बायकांच्या, प्राथमिक, दुय्यम आणि वरिष्ठ शिक्षणांत, सर्व प्रकारे नाना होते. युक्ति, नेतृत्व आणि दानशूरपणा सारखाच गाजत राहिला. राजकारणात — १८२९ साली मुंबईचे चीफ जस्टिस सर जॉन पीटर ग्रँट ह्यांनी हेबियस कॉर्पस ॲक्टच्या बाबतीत हिंदी लोकांची बाजू उचलली म्हणून त्या वेळचे गव्हर्नर सर जॉन माल्कम् ह्यांनी या उदार न्यायाधिशाला राजीनामा द्यावयास लावला म्हणून सरकारची निर्भर्त्सना करण्याकरितां जी हिंदी लोकांनी मुंबईत जाहीर सभा भरली तिचे नाना अध्यक्ष होते. इतकेच नव्हे त्याचा निषेध नानांनी केला, तेच माल्कमसाहेब हिंदुस्थानचे प्रत्यक्ष व्हाइसरॉय लॉर्ड बेंटिक ह्याच्याशी मिळून जेव्हां हिंदुस्थानांतील सतीची दुष्ट चाल बंद करू पाहात होते, तेव्हा बंगाल्यांतील ब्राह्मणानीं अतिशय तीव्र विरोध केला म्हणून महाराष्ट्रीयांची मदत मागण्यास लॉर्ड बेंटिकसाहेबाना नाना शंकरशेटच्या भेटीस पुन पुनः पाठविले ! ह्यालाच नाव सहकार्य अथवा प्रतिसहकार्य ! ह्यांतच इतराचा व नानांचा मोठेपणा दिसतो. जे आजहि गांधी-आयर्विनला लवकर साधेना तें त्या वेळी नाना बेटिकला साधले ! अनेक बिकट प्रसंगी नानांनी एकामागून एक तत्कालीन

लागली. इंग्रजांचा हात महाराष्ट्रांत पायमल्लीत शिरूं लागला. अशा संधीस एक नाना (फडणीस) अस्तंगत होऊन दुसरा नाना (शंकरशेट) जन्मला. पेशवाई इ. स. १८१८ त पार बुडाली. इ. स. १८२२ सालीं ह्या दुसऱ्या नानाचे वडील श्रीमंत बाबुलशेट मुंबईस वारले आणि त्यांच्या अवाढव्य इस्टेटीची पूर्ण मालकी केवळ १८ वर्षांचें कोवळें पोर नाना शंकरशेटकडे आली! काय योगायोग!! कारण ह्या कोवळ्या तरुणानें एकदम उगवत्या इंग्रज प्रभूशीं पुढें ४२ वर्षे मोठ्या धोरणानें जें असामान्य सहकार्य केलें त्याची योग्यता आजकालच्या महात्मा गांधींच्या असहकार्याच्या खालोखाल एक महत्त्वाचा भाग म्हणून मुंबई इलाख्याच्या इतिहासांत चमकत असल्याशिवाय राहणार नाहीं. मग हा थोर पुरुषश्रेष्ठ संस्मरणीय नव्हे असें कोण म्हणेल? तरी आजच्या महाराष्ट्रांतील किती तरुण—मग ते कितीहि पढिक पदवीधर असोत—नानांची योग्यता खरोखरी किती आहे हें नानांच्या चरित्राचें महत्त्व खालील गोष्टीवरून सिद्ध होतें.

१. नानाचें घराणें गर्भश्रीमंत व्यापारी पेशाचें होतें. त्यांचे खापरपणजे नारायणशेट ह्यांचा काठेवाडांतील पोरबंदर येथें मोत्यें व इतर जडजवाहिराचा व्यापार होता. पणजे माणिकशेट ह्याकडे ठाणें जिल्ह्यांतील तालुके मुरबाड ह्या गावीं पोतदारी होती. हाच गाव ह्या इतिहासप्रसिद्ध घराण्याचा मूळ वतनाचा होता. पुढें नानाचे आजे बाबुलशेट ह्यांच्या कारकीर्दींत मुंबईजवळील कल्याण प्रांत हा पोर्तुगीजांच्या ताब्यांत असल्यामुळें ह्या सर्व प्रांतांत पोर्तुगीजांची देशघुटवीच नव्हे तर हिंदुधर्माला रसातळास नेऊं पाहणारी कारवाई चालली होती. अशा धामधुमींत वसईच्या खाडीच्या तोंडाशीं असलेलें घोटबंदर नांवाचें मासल्याचें बंदर आपल्या घराण्याच्या व्यापाराचें केंद्र म्हणून निवडून काढून आपलें बस्तान थाटलें! इतकेंच नव्हे कालांतरानें मुंबईकडे इंग्रजांकडे जाऊन तेथील व्यापारेंठ वाढ लागली म्हणून लगेच बाबुलशेटनीं तेथेंहि आपली एक पेढी उघडली.

२. बाबुलशेटीना शंकरशेट पुत्र झाले. ते तर बारसे वेश मराठे निघाले. त्यांनीं आपल्या वडिलांच्या जुन्या व्यापाराला नवीन वळण लाविलें. त्यासाठीं शंकरशेटला घरीं व्यायाम काहीं कमी नसताहि त्यांना मुंबईस एका युरोपियन कंपनींत नोकरी धरली. हेतु हा की तुमतें अपल्याला इंग्रजी भाषा यावी इतकेंच नव्हे तर इंग्रजांची व्यापारी मोड हस्तगत व्हावी. बाबुलशेटींना प्रथम प्रथम हा प्रकार पसंत पडला नाहीं, पण लगेच जेव्हां शंकरशेटींनीं व्यापारात चाराचे चव्वेचाळीस केले तेव्हा बाबुलशेटींनीं चिरंजिवाची पाठ थोपटली. शंकरशेटच्या अंतकाळीं "त्याच्या खजिन्यांत सोळा लाख रुपये रोख आणि एक लाखाचें जवाहीर होतें" असें त्याचे चरित्रकार रा. पितळे लिहितात!

३. अशा कर्तृत्ववान् वैश्याच्या पोटीं नाना हे इ. स. १८०३ सालीं रत्न निर्माण झाले. त्यांनीं वैश्य वृत्तीत तर आपल्या जनकावर सवाई शंकरशेटपणा गाजविला. इतकेंच नव्हे, तर महाराष्ट्रांतील मुत्सद्दीगिरींतहि नाना फडणिसावर सवाई नानापणा गाजविला हें

भावी इतिहासकारांना कबूल करावें लागेल. चार पिढ्यांचा गर्भश्रीमंतपणा मोगूनहि केवळ १८ वर्षांचें मूल असून त्या वेळचा पहिला मुंबईचा गव्हर्नर मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा महाराष्ट्राच्या शिक्षणाच्या बाबतीत नानाची सल्लाच नव्हे तर आर्थिक मदत मागावयास येतो ही काय लहानसहान गोष्ट ? ही गोष्ट नानाचा मोठेपणाच नव्हे तर अव्वल इंग्रजीचा पाया घालणाऱ्या इंग्रज बहाद्दरांचा नम्रपणाहि दाखविते. त्या वेळीं हल्लींच्या चर्चिलप्रमाणें सारेच इंग्रज उर्मट असते तर इंग्रजांचे पाय येथें रोवलेच गेले नसते.

४. नाना इ. स. १८०३ सालीं जन्मले. इ. स. १८२२ सालीं बाप वारल्यावर एकदम सार्वजनिक कार्यांत अगदीं अग्रेसर म्हणून धडकू लागले. इ. स. १८४०च्या सुमारास तर त्यांच्या भ्रुकुटीशिवाय महाराष्ट्रांतील सार्वजनिक चळवळीचें एक पानहि हालेना ! १८५७ सालच्या बंडांत नाना सामील होते अशा संशय–पिशाच्चानें इंग्रज बहादरास घेरलें. पण जेव्हां मुंबईच्या पोलीस कमिशनराची बालंबाल समक्ष खात्री झाली तेव्हां पुढील गव्हर्नरांनी मागील सर्व गव्हर्नराप्रमाणें नानाची पुनः मर्जी संपादण्याचा क्रम सुरु केला. फार काय नानाच्या निधनानतर तेव्हांचे मुंबईचे गव्हर्नर सर बार्टल फ्रिअर ह्यानीं व्यक्तिशःच नव्हे तर इलाख्याविषयीं आणि ब्रिटिश बादशहाचा प्रतिनिधि म्हणून जीं दोन उघड दुखवट्याचीं पत्रे पाठविलीं व जी रा. पितळे ह्यांनीं लिहिलेल्या चरित्रांत पान २५०, २५१ वर प्रसिद्ध झालीं आहेत, त्यावरून नानाची व्यक्तिनिष्ठा नव्हे तर देशनिष्ठाहि सिद्ध होत आहे !

सर्वांनं गव्हर्नरांनी भेट घ्यावी व यानीं असा प्रकार पडगाभाट व पडयापुढें गारगा नाना मृत्युशय्येवर पडेपर्यंत चालूं होता. ज्यूरीचा व पेटी सेशनचा हक्क, स्मॉल कॉज कोर्टमध्येंहि बॅरिस्टरच्या मदतीवाचून कामें चालत असत त्याऐवजी साध्या वकिला-कडून काम चालणें, वगैरे गोष्टीसाठीं प्रत्यक्ष कायदे-मंडळांत एतद्देशियांचा शिरकाव मिळेपर्यंत सर्व हक्क नानांना पदोपदीं साम-दाम-दंड वगैरे निरनिराळ्या उपायांनीं संपादन करावे लागले ! त्या वेळच्या सर्वच संस्थांचे तेच बहुतेक संस्थापक होते. इतकेंच नव्हे तर बहुतेकांचे ते अध्यक्ष आणि सर्वांचे निदान आश्रयदाते तर होतेच ! फार तर काय मुंबई म्युनिसिपालिटी, मुंबई विश्वविद्यालय हींच नव्हत, तर बँक वेगैरे भर घालण्यासाठीं निघालेली व्यापारी चळवळ असो किंवा प्रत्यक्ष जी. आय. पी. रेल्वेसारख्या प्रचंड कंपनीची स्थापना असो, त्यांच्या प्रत्यक्ष ममतेशिवाय व मर्जी-शिवाय कोणतेंहि कार्य होऊंच नये असा त्या वेळीं नानांचा व्याप असे ! आणि या डोईजड झालेल्या रेल्वेचे नाना तर एक डायरेक्टर असत. आपलें वजन आहे की नाहीं हें पाहण्यासाठीं नाना केव्हां केव्हां आपण प्रवास करावयाचा असल्यास स्टेशनावर पाच पांच मिनिटें मुद्दाम उशीर करून जात, ते आल्याशिवाय त्यांचा फर्स्टक्लास रिझर्व्हड् डबा जागचा हालत नसे अशी आख्यायिका आहे !

असो. अशा तपशिलाच्या गोष्टी लिहीत बसल्यास लेखाचा विस्तार आवांक्या-बाहेर जाईल, म्हणून केवळ स्थूलमानानें व संक्षेपानेंच नानांच्या सार्वजनिक चरित्राकडे पाहणें भाग आहे. येणेंप्रमाणें इ.स. १८२२ पासून इ.स. १८६५ पर्यंत अव्वल इंग्रेजीच्या पहिल्या तीन पिढ्या नानांच्या केवळ मुठींत गेल्या. म्हणून ह्या युगाला महाराष्ट्रांतलें नाना–युग म्हटलें तरी अतिशयोक्तीचा आरोप आम्हावर येईलसें वाटत नाहीं. ह्यापुढें रानडे, टिळक वगैरेंचीं युगें झालीं. पण तीं त्यांच्या अगदीं नानाइतकीं मुठींत वळलीं गेलीं नाहींत. बडोद्याचे सयाजीराव, कोल्हापूरचे शाहू छत्रपति, पुण्याचे जोतिराव फुले, रानडे, गोखले, टिळक, मुंबईचे दादाभाई नवरोजी किंवा फेरोजशहा मेथा, वगैरे थोर थोर धुरीणांचीं बृहन्महाराष्ट्रांत सिंहासनें आणि प्रभावळ्या होऊन गेल्या. परन्तु आधुनिक महाराष्ट्राचा पितामह ही लौकिक संज्ञा जर कोणास देणें योग्य असेल तर ती, गुजराथ आणि महाराष्ट्राच्या दोन्ही देशांना आवरून धरणारी जी मध्यवर्ती मुंबई नगरी आहे तिच्यात जन्मून अंतर्धान पावणाऱ्या ह्या आमच्या नाना शंकरशेटजींनाच देणें प्राप्त आहे, असें आमचें मत विचाराअंतीं बनलें आहे.

सार्वजनिक चरित्राप्रमाणेंच नानांचें खासगी आणि धार्मिक चरित्रहि उज्ज्वळ आणि भाग्यवान् होतें. एक विशेष गोष्ट आणि त्याहूनहि विशेष गोष्ट म्हणजे त्यांच्या सार्व-जनिक अथवा खाजगी चारित्र्याला आपल्या विशिष्ट स्वजाति अभिमानाची दुर्गंधी कधींच सुटली नाहीं, हें भावी इतिहासकारांना अवश्य ध्यानात घेण्यासारखें आहे.

बंगालचे राजा राममोहन राय ह्यांना आधुनिक हिंदुस्थानचे पितामह समजण्यांत येतें. इसवी सन १८२२ पासून इसवी सन १८३१ पर्यंत (ह्या साली राम-

मोहन ब्रिस्टल येथें वारले ) नऊ वर्षे नाना त्यांचे सार्वजनिक चारित्र्यांत समकालीन होते. इतकेंच नव्हे तर सतीची चाल बंद करण्यांत नाना राममोहनाचे सहकारी होते. राममोहनांचें चारित्र्य अखिल हिंदुस्थानालाच नव्हे तर जगाच्या रंगभूमीवर चमकणारें होतें. अगाध विद्वत्ता आणि ऋषितुल्य धर्मप्रवर्तकत्व ही दैवी संपत्ति राममोहनांच्या वांट्याला आल्यामुळें राममोहनाकडे अर्थात् आधुनिक हिंदुस्थानचें पितामहत्व जातें खरें. तरी महाराष्ट्रापुरतेंच पाहावयाचें झाल्यास नानाला ( धार्मिक बाबीचा विचार वगळून ) महाराष्ट्राचा राजा राममोहन राय म्हणावयास हरकत कोणती ? असो. नाना शंकरशेट हे एक असामान्य पुरुषश्रेष्ठ होते म्हणून ते चिरस्मरणीय आहेत हे सिद्ध झालें. येथें आमच्या लेखाचा पहिला भाग समाप्त झाला.

[ या लेखाचा दुसरा भाग लिहिला गेला नाहीं ]

देण्याविषयीं भाग पाडण्याचा अधिकार जनतेला आहे कीं नाहीं ? पहिल्या प्रश्नासंबंधीं माझें स्वतःचें नम्र मत असें आहे कीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष दारूचें दुकान उघडण्याचा अधिकार जसा कोणत्याहि व्यक्तीला किंवा संस्थेला नाहीं तसाच तो सरकारलाहि नाहीं; कारण सरकार ही केवळ एक मानवी संस्था आहे. एकाद्या दारूवाल्याला फायदा दुसऱ्यानें घेणें हें जर उघड उघड अनीतीचें आहे तर ही अनीति राजकारणाच्या सबबीवर सरकारलाहि आचरण्याचा अधिकार नाहीं व असूं नये हें उघड आहे. दुसऱ्या प्रश्नाचें माझें उत्तर असें आहे कीं, सरकार जर हा व्यापार तात्काळ बंद करीत नसेल तर लोकांनीं घनघोर प्रयत्न करून त्यास तसें करण्यास भाग पाडण्याचा अधिकार सर्व जनतेसच काय पण शक्य असल्यास कोणाहि एका व्यक्तीसहि आहे. परंतु हा प्रश्न तत्त्वाचा नसून व्यवहाराचा आहे, आणि ज्या अर्थी दुबळ्या प्रजेनें समर्थ सरकाराशीं किंबहुना त्याच्यामागें लपलेल्या दुष्ट भांडवलवाल्यांशीं झगडावयाचें आहे त्या अर्थीं या बाबतींत विनाकारण संताप अगर त्रागा न करतां किंवा वायफळ अत्याचारहि न करतां कांहीं तरी जालीम उपाय करणें जरूर आहे. हें सोपें नसून तत्काळ घडवून आणण्यासारखें काम नाहीं हेंहि मी जाणून आहें.

## व्यापाराचा इतिहास

या निषिद्ध व्यापाराचा इतिहास फार मनोरंजक आणि बोधपर आहे. ह्या व्यापाराचा उगम आधुनिक पाश्चात्य राजकारणाशिवाय इतरत्र कोठें शोधून काढणें अत्यंत कठीण काम आहे. ख्रिस्चन आणि झोरोॲस्ट्रियन धर्मांखेरीज इतर कोणत्याहि आधुनिक सुधारलेल्या धर्मामध्यें दारूचा पूर्ण तिरस्कार व्यक्त करण्यांत आलेला आढळतो. इतकेंच नव्हे, कोणत्याहि हिंदी अगर पार्शी सहृदय सभ्य गृहस्थास या व्यापाराचा मनापासून तिरस्कार आल्याशिवाय राहणार नाहीं अशी माझी समजूत आहे. असें असून सुधारलेल्या देशांतील आधुनिक राजकारणात या व्यापाराचा व्यभिचार कसा शिरला, हा एक मोठा मनोरंजक प्रश्न आहे. हें कोडें मुळीच नाहीं. आधुनिक राजकारण म्हणजे भांडवलवाल्यांचा धुडगूस होय. जगात अद्याप खरी लोकशाही कोठेंच अवतीर्ण झाली नाहीं, आणि ती वसल्या असल्या कोणाच्याहि खांद्यावर लौकरच उतरणार आहे असेंहि भास नाहीं. परचक्राची भीति वाटल्यावरून अमेरिकेसारख्या सुधारलेल्या किंवा रशियासारख्या मागासलेल्या देशांतील मुत्सद्यांनीं जरी थोडाबहुत हा व्यभिचारसंन्यास केलेला आढळतो तरी तेथेंहि परचक्राची भीति नष्ट होतांच हा संन्यासहि असंगत होण्याची भीति उदय पावत असलेली आढळत आहे. याचें कारण एवढेंच कीं, जबाबदार मुत्सद्यांचे पाठीवर भांडवलवाल्यांचा सवाई सोटा उगारलेला असतो. आणि ह्या दोघांच्या संगनमतामुळें हा व्यभिचार पुन्हा पूर्वींहून अधिक दुणावतो. त्यापुढें धर्मांच्या किंवा नीतीच्या वायद्यांचें कांहीं चालत नाहीं.

## ह्या व्यापाराचें पिलूं

आमच्या देशांत गेल्या शतकांत ह्या व्यापाराचें हें पिलें कसें शिरलें, कसें मोठें झालें आणि आतां कसें टोईजड झालें आहे ह्या सर्व गोष्टी डोळे असणारास सहज दिसण्यासारख्या आहेत. पूर्वीच्या रामराज्यांतील गोष्ट राहो, पण परवांच्या आमच्या मराठी राज्यांत देखील दारूबाजी नव्हती असें विधान करण्याचें धाडस माझे हातून होत नाहीं. तरी पण हल्लींप्रमाणे दारूचें दुकान उघड मांडून त्याच्या कळावर सरकार-दरबारांत सरदारी पटकावणारे हल्लींचे बाटलीबहादूर शंभर वर्षांमागें निदान आमच्या देशात तरी अत्यंत दुर्मिळ होते असें मला वाटतें. त्याचा आतां आमच्यांत इतका सुळसुळाट झाला आहे कीं, ते आमच्या सरकारचे मुख्य आश्रयदाते झाले आहेत. मुंबई इलाख्याच्या चालू बजेटांत एकंदर जमा रु. १४०१२२००० आहे. त्यात अबकारी खात्याची जमा रु. ४२४५०००० आणि काळीचा वसूल रु. ५८१२८०००. मुंबई इलाख्याची लोकसंख्या अदमासें २ कोटी आहे. ह्यांत तान्ही मुलें, मोठीं माणसे व बायका या सर्वांचा समावेश होतो. ह्या इलाख्यांत दर माणशीं शेतकीचा कर २॥ रुपये तर दारूबाजीबद्दल दर माणशीं दोन रुपये वसूल द्यावा लागतो. असे असूनहि **"मुंबई इलाखा दारूबाज नाहीं"** अशी सरकारी माहिती खात्याकडून आरोळी ठोकण्यात आली आहे या बाबतीत माहिती खात्याकडून जें एक तीन पानांचें पत्रक प्रसिद्ध झालें आहे तें वाचून सरकारची इज्जत वाढते कीं कमी होतें हें कोणीहि आपल्याशींच ठरवावें. या पत्रकात सरकारच्यातर्फेच कबुली देण्यात आली आहे कीं, मुंबई व लगतचा ठाणे जिल्हा ह्यात गेल्या दहा वर्षांत दारूचा खप १४०००० गॅलननीं वाढलेला असून एका ल्हानशा कुलाबा जिल्ह्यांत तो २५००० गॅलननीं वाढला आहे. परंतु दारू पिऊन गुन्हे केल्याचें जें कोष्टक १९१९-१९२० सालच्या अबकारी खात्याच्या रिपोर्टांत सरकारनें प्रसिद्ध केलें आहे त्यांत कुलाबा जिल्ह्यांत ३७ आणि पुणें जिल्ह्यात १२०८ गुन्हे घडून त्यांना शिक्षाहि ठोठावल्याची नोंद करण्यात आली आहे. यावरून आमच्या स्वतःचे जिल्ह्याची दारूबाजीबद्दल जरी प्रसिद्धि नाहीं तरी आमच्या कपाळीं दारू पिऊन गुन्हे केल्याचा टिळा सर्वांपेक्षांहि अधिक ठळक लावण्यांत आला आहे. हें मात्र एक पुणेरी गौडबंगालच आहे. "मुंबई इलाखा दारूबाज नाहीं" आणि पुणें शहर दारू पिऊन गुन्हे करणारें आहे हें जे सरकार एकाच तोंडानें सांगत आहे ते आम्ही कोणत्या कानांनीं ऐकावें व कोणत्या मनानें विश्वासावें बरें ? तें कसेंहि असो ! आमच्या देशात शिरलेलें हा दारूचा व्यापार ऊर्फ उंटाचें पिलूं आता किती डोईजड झालें आहे आणि त्याला बाहेर काढणें म्हणजे सर्व घर पाडून नवीन, बांधण्यासारखें कष्टमय झालें आहे. एक शेतकी सोडून दारूबाजी ही सर्वांत अधिक उत्पन्नाची बाब सरकारनें करून ठेवली आहे.

# १

# दारूचा व्यापार, सरकार आणि बहुजनसमाज

या लेखाच्या मथळ्यांत सांगितल्याप्रमाणें नियमित आणि निश्चित स्वरूपांतच आज येथें आपल्यास जबाबदारपूर्वक विचार करावयाचा आहे. दारूचें अथवा इतर व्यसनाचें उच्चाटन करणें इतक्या साधारण स्वरूपांत, असल्या साधारण संभव व्यावहारिक फायद्याचें होईल असें संभवत नाहीं. ह्या विषयाचा बहुजनसमाजाच्या हिताच्या दृष्टीनेंच विशेष विचार करावयाचा आहे. सुशिक्षित वर्ग, भाडवलवाले, अधिकारीवर्ग, मोठमोठे जमीनदार, ह्यांच्या हिताची काळजी घेण्यास ते स्वतः समर्थ आहेत. बहुजनसमाजाची – निदान हिंदुस्थानांतील जनतेची तशी गोष्ट नाहीं. सरकार स्वकीय असो, परकीय असो, तें जनतेचें पूर्णपणें प्रतिनिधि होईपर्यंत तिचे ट्रस्टी या स्वरूपातच येथें राहणार; आणि त्या दृष्टीनेंच जनतेच्या पैशाचा व्यय करण्याचा त्याला अधिकार राहणार. कांहीं विद्वान् लोक दारूसारख्या व्यसनाचे बाबतींत व्यक्तिस्वातंत्र्याचा मुद्दा पुसडतात. रा. ल्याटेसारख्या व्यसनद्वेष्ट्यांनींसुद्धां हाच मुद्दा पुढें आणलेला आहे. आमचें सरकार जर पूर्णपणें प्रातिनिधिक असतें, तेव्हांहि जरी हा मुद्दा योग्य ठरला नसता, तरी शोभून गेला असता. आतां तो जनतेच्या दृष्टीनें विशेषतः निषिद्ध आहे. पुढारलेल्या वर्गांपैकीं कोणीहि किंबहुना प्रत्यक्ष सरकारदेखील ही सबब पुढें आणणें म्हणजे दुष्काळासारख्या कटकटीच्या काळीं, मद्यपान-बंदीसारख्या दुर्घट सुधारणेच्या कामींहि प्रागतिकांनीं आपल्या उलट जाणूनबुजून

गैरसमजाची धूळ उडवून घेण्यासारखे आहे. म्हणून हा मुद्दा अथवा सबब आजच्या विषयासंबंधीं कोणी पुढें आणणार नाहीत अशी माझी आशा आहे. दारू पिणाऱ्या कांहीं अपवादात्मक व्यक्ति असल्या तरी सबंध समाजचे समाज ह्या व्यसनापायीं मागासलेल्या स्थितींत वर निर्दिष्ट केलेल्या पुढारलेल्या वर्गांत आढळून येत नाहीं. उलटपक्षीं बहुजन-समाजांत अशा कित्येक जाती आढळतील कीं, सक्ति केल्याशिवाय त्यांच्या उन्नतीची जवळजवळ आशाच खुंटलेली आहे. दारूचा व्यापार, हल्लीं चालू आहे तशा प्रकारचा, बंद केल्यामुळें कांहीं मांडवलवाल्यांचा व्यक्तिशः तोटा होईल हें कबूल आहे. पण सरकार हें व्यक्तीसाठीं नसून सर्व जनतेसाठीं असतें.

## राजकीय स्वरूप

सरकारनें आणि प्रजापक्षाच्या कोणत्याहि पुढाऱ्यानें हा विषय राजकीय स्वरूपाचा नाहीं हें ध्यानांत ठेवणे अवश्य आहे. सामाजिक सुधारणेच्या कोणत्याहि विषयाला एकदा का राजकीय स्वरूप आलें कीं त्याची प्रगति खुंटून त्याला अनिष्ट वळण लागतें, इतकेच नव्हे तर भीक नको पण कुत्रे आवर असे सुधारकांनाच नव्हे तर सरकारलाहि म्हणण्याची पाळी येते. अशा असूनहि या बाबतींत सरकार आणि जनतेचे पुढारी यांचेकडून कळत न कळत वेळोवेळीं चुका होतात आणि अशी चूक झाली म्हणजे विशेषत. सरकारपेक्षा जनतेचेच जास्त नुकसान होतें; त्याचें कारण कोठल्याहि देशांत अधिष्टित सरकारपेक्षां प्रजापक्ष अद्यापि दुबळाच आहे. पुढाऱ्यांनींहि ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे कीं, सरकार मग तें स्वकीय असो किंवा परकीय असो तें बहुतेक शिरजोरच असतें. म्हणून अशा सार्वजनिक सुधारणेच्या बाबतींत प्रागतिक सुधारकांनी सरकारच्या साह्याला धावून जाण्यापूर्वी निराधार जनतेसंबंधीं आपली सर्व कर्तव्यें व जबाबदारी त्यांनीं पार पाडली आहे कीं नाहीं, हें पाहावें. परवां मी एकदा ज्ञानप्रकाशांत म्हटलें होतें कीं, दारूचा व्यापार बंद करणें हें आमच्या सरकारला सोपें आहे. त्या वेळीं जर्मनाचा पराजय करणें आणि दारूचा व्यापार सोडणें ह्या दोन गोष्टींची मीं तुलना करूनच वरील विधान केलें होतें. निदान कोणाहि सुधारक व्यक्ति किंवा संस्थेपेक्षां दारूचा व्यापार बंद करणें ही गोष्ट सरकारलाच अधिक सोपी आहे असे माझें अद्यापि प्रामाणिक मत आहे. हें मत राजकीय स्वरूपाचें नसलें तरी राजकीय अर्थशास्त्राला धरून आहे. तें कोणी सप्रमाण चुकीचें ठरविल्यास मी माफी मागून परत घेण्यास तयार आहे.

## मुख्य मुद्दा

माझा आजचा मुद्दा सरकारास दारूसारख्या निषिद्ध वस्तूचा उघडया छातीनें व्यापार चालविण्याचा अधिकार आहे किंवा नाहीं आणि तो नसल्यास सरकारला हा व्यापार सोडून

देण्याविषयीं भाग पाडण्याचा अधिकार जनतेला आहे कीं नाहीं? पहिल्या प्रश्नासंबंधीं माझें स्वतःचें नम्र मत असें आहे कीं, प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष दारूचें दुकान उघडण्याचा अधिकार जसा कोणत्याहि व्यक्तीला किंवा संस्थेला नाहीं तसाच तो सरकारलाहि नाहीं; कारण सरकार ही केवळ एक मानवी संस्था आहे. एकाच्या दारूबाजीचा फायदा दुसऱ्यानें घेणें हें जर उघड उघड अनीतीचें आहे तर ही अनीति राजकारणाच्या सबबीवर सरकारलाहि आचरण्याचा अधिकार नाहीं व असूं नये हें उघड आहे. दुसऱ्या प्रश्नाचें माझें उत्तर असें आहे कीं, सरकार जर हा व्यापार ताबडतोब बंद करीत नसेल तर लोकांनीं जारीनें प्रयत्न करून त्यास तसें करण्यास भाग पाडण्याचा अधिकार सर्व जनतेसच काय पण शक्य असल्यास कोणाहि एका व्यक्तीसहि आहे. परंतु हा प्रश्न तत्त्वाचा नसून व्यवहाराचा आहे, आणि त्या अर्थी दुबळ्या प्रजेनें समर्थ सरकाराशीं किंबहुना त्याच्यामागें लपलेल्या दुष्ट भांडवलवाल्यांशीं झगडावयाचें आहे त्या अर्थी या बाबतींत विनाकारण संताप अगर त्रागा न करतां शिवा वायफळ अत्याचारहि न करतां कोहीं तरी जारीन उपाय करणें जरूर आहे. हें सोपें नसून तत्काळ घडवून आणण्यासारखें काम नाहीं हेंहि मी जाणून आहें.

## व्यापाराचा इतिहास

या निषिद्ध व्यापाराचा इतिहास फार मनोरंजक आणि बोधपर आहे. ह्या व्यापाराचा उगम आधुनिक पाश्चात्य राजकारणाशिवाय इतरत्र कोठें शोधून काढणें अत्यंत कठीण काम आहे. खिस्ती आणि झोरोॲस्ट्रियन धर्मांशिवाय इतर कोणत्याहि आधुनिक सुधारलेल्या धर्मांमध्यें दारूचा पूर्ण तिरस्कार व्यक्त करण्यांत आलेला आढळतो. इतकेंच नव्हे, कोणत्याहि खिस्ती अगर पारशी सहृदय सभ्यगृहस्थास या व्यापाराचा मनापासून तिरस्कार आल्याशिवाय राहणार नाहीं अशी माझी समजूत आहे. असें असून सुधारलेल्या देशांतील आधुनिक राजकारणात या व्यापाराचा व्यभिचार कसा शिरला, हा एक मोठा मनोरंजक प्रश्न आहे. हें कोडें मुळीच नाहीं. आधुनिक राजकारण म्हणजे भांडवलवाल्यांचा धुडगूस होय. जगांत अद्याप खरी लोकशाही कोठेंच अवतीर्ण झाली नाहीं, आणि ती असल्या असल्या कोणाच्याहि वाट्यावर लौकरच उतरणार आहे असेंहि भाग नाहीं. परचक्राची भीति वाटल्यावरून असें रशियासारख्या सुधारलेल्या किंवा रशियासारख्या मागासलेल्या देशांतील मुत्सद्यांनीं जरी थोडाबहुत हा व्यभिचारसंन्यास केलेला आढळतो तरी तेथेंहि परचक्राची भीति नष्ट होतांच हा संन्यासहि अल्पकाल टिकण्याची भीति उत्पन्न झालेली आढळत आहे. याचें कारण एवढेंच कीं, जबाबदार मुत्सद्याचे पाठीवर भांडवलवाल्यांचा सवारी गोंदा उगारलेला असतो. आणि ह्या दोघांच्या संगनमतामुळें हा व्यभिचार पुन्हा पूर्वीहून अधिक दुणावतो. त्यापुढें धर्माच्या किंवा नीतीच्या वायफळांचें कांहीं चालत नाहीं.

## ह्या व्यापाराचें पिलूं

आमच्या देशात गेल्या शतकांत ह्या व्यापाराचें हें पिलूं कसें शिरलें, कसें मोठें झालें आणि आता कसें डोईजड झालें आहे ह्या सर्व गोष्टी डोळे असणारास सहज दिसण्यासारख्या आहेत. पूर्वीच्या रामराज्यातील गोष्ट राहो, पण परवांच्या आमच्या मराठी राज्यात देखील दारूबाजी नव्हती असें विधान करण्याचें धाडस माझे हातून होत नाहीं. तरी पण इतरांप्रमाणें दारूचें दुकान उघड मांडून त्याच्या बळावर सरकार-दरबारांत सरदारी पटकावणारे हल्लीचे बाटलीबहादूर शंभर वर्षांमागे निदान आमच्या देशात तरी अत्यंत दुर्मिळ होते असें मला वाटतें. त्यांचा आतां आमच्यात इतका सुळसुळाट झाला आहे कीं, ते आमच्या सरकारचे मुख्य आश्रयदाते झाले आहेत. मुंबई इलाख्याच्या चालू बजेटांत एकंदर जमा रु. १४०१२२००० आहे. त्यांत अबकारी खात्याची जमा रु. ४२४५०००० आणि कालीचा वसूल रु. ५८१२८०००. मुंबई इलाख्याची लोकसंख्या अदमासें २ कोटी आहे. ह्यांत तान्हीं मुलें, मोठीं माणसें व बायका या सर्वांचा समावेश होतो. ह्या इलाख्यांत दर माणशीं शेतकीचा कर २॥ रुपये तर दारूबाजीबद्दल दर माणशीं दोन रुपये वसूल द्यावा लागतो. असें असूनहि **" मुंबई इलाखा दारूबाज नाहीं "** अशी सरकारी माहिती खात्याकडून आरोळी ठोकण्यांत आली आहे. या बाबतींत माहिती खात्याकडून जें एक तीन पानांचें पत्रक प्रसिद्ध झालें आहे तें वाचून सरकारची इज्जत वाढते कीं कमी होते हें कोणीहि आपल्याशींच ठरवावें. या पत्रकात सरकारच्यातर्फेच कबुली देण्यांत आली आहे कीं, मुंबई व लगतचा ठाणें जिल्हा ह्यांत गेल्या दहा वर्षांत दारूचा खप १४०००० गॅलननीं वाढलेला असून एका लहानश्या कुलाबा जिल्ह्यांत तो २५००० गॅलननीं वाढला आहे. परंतु दारू पिऊन गुन्हे केल्याचें जें कोष्टक १९१९-१९२० सालच्या अबकारी खात्याच्या रिपोर्टांत सरकारनें प्रसिद्ध केलें आहे त्यांत कुलाबा जिल्ह्यांत २७ आणि पुणें जिल्ह्यात १२०८ गुन्हे घडून त्यांना शिक्षाहि ठोठावल्याची नोंद करण्यांत आली आहे. यावरून आमच्या स्वतःचे जिल्ह्याची दारूबाजीबद्दल जरी प्रसिद्धि नाहीं तरी आमच्या कपाळीं दारू पिऊन गुन्हे केल्याचा टिळा सर्वांपेक्षांहि अधिक ठळक लावण्यात आला आहे. हें मात्र एक पुणेरी गौडबंगालच आहे. " मुंबई इलाखा दारूबाज नाहीं " आणि पुणें शहर दारू पिऊन गुन्हे करणारें आहे हें जें सरकार एकाच तोंडानें सांगत आहे तें आम्ही कोणत्या कानांनीं ऐकावें व कोणत्या मनानें विश्वासावें बरें ? ते कसेंहि असो ! आमच्या देशात शिरलेल्या ह्या दारूच्या व्यापार ऊर्फ उद्यांचें पिलू आता किती डोईजड झालें आहे आणि त्याला बाहेर काढणें म्हणजे सर्व घर पाडून नवीन, बांधण्यासारखें कष्टमय झालें आहे. एक शेतकी सोडून दारूबाजी ही सर्वांत अधिक उत्पन्नाची बाब सरकारनें करून ठेवली आहे.

## दारूची बंदी कीं शिक्षणाची सक्ति?

त्यांत विशेष दुःखाची गोष्ट कीं, दारूबंदी कीं शिक्षणाची सक्ति हा पेंच बहुजनसमाजाच्या गळ्याला पडला आहे. दिवसेंदिवस लोक कर देण्याला अधिक नाखुष होणार. कराचें नांव काढलें कीं, लोक बेताल होतात. हा धडा झांशी म्युनिसिपालिटीनें पाणीपुरवठ्याचा आवश्यक कर बसविण्याचा प्रयत्न करून सर्वांस शिकविला आहे. अशा साडेसातीच्या वेळीं शिक्षणाचें मंगळसूत्र सरकारनें दारूच्या बाटलीच्या गळ्यांत बांधलें आहे. शिक्षण नको म्हणाल्यास जनतेचेंच नुकसान आणि दारूची बंदी नको म्हटलें तरी तिचेंच नुकसान. लंका जळली तरी मारुती सुरक्षित या न्यायानें जनता आणि त्यांचे दिवाण यांच्यांत वरील मंगळसूत्राचा डाव टाकून पुन्हा आपण मोठी राजकीय सुधारणा केली असें सरकार सांगत सुटलें आहे. **"पण्यांगनेव नृपनीतिरनेकरूपा"**. वरवर पाहणारास सरकारचा त्यांत मुळींच दोष नाहीं असें दिसून येतें. कारण सरकार थोडेंच दुकान मांडून बसलें आहे! दुकानें आमच्याच लोकांनीं उघडलेलीं व दारूहि बहुजनसमाजच अधिक पिणार. सरकारचे रिपोर्ट वाचावे तर त्यांत सालोसाल मद्यपाननिषेधाचें काम लोकांचे पुढारी मन लावून करीत नाहींत अशा उलट्या बोंबा आणि नक्राश्रु जागोजाग आढळून येतात. जणू काय व्यापार वाढविण्याचें काम सरकारचें आणि पोकळ निषेध करण्याचें काम दुबळ्या जनतेच्या ऐदी पुढाऱ्याचें. पूर्वींच्या राज्यात लोक दारू पीत होते. पण आतां जशी जो तो गांज्याची चिलीम आपणच भरतो; तशी पूर्वीं जो तो आपली दारू आपणच तयारहि करीत असे. परंतु आतां फक्तलास सरदारी मिळते. पूर्वीं कलालाची समग्र जात अस्पृश्य समजून बहिष्कृत वर्गांत गणली जात असे. हा फरक ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

## विषारी जाळें

हल्लींच्या सरकारनें झालें तरी ह्या व्यापाराचें विषारी जाळें एकदम पसरलें असे मुळींच नाहीं. मधि पाहून आणि गरज भासेल तसेंच हें *अनिष्ट जाळें सरकाराला कदाचित् नाखुषीनेंच पसरावें लागलें असेल.* पण "हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंच परिणामीं" अशा अनुभव सरकाराला येत असेल अशीच आमची अटकळ आहे. ह्या बाबतींत सरकारावर उगाच दगपापुगवा करून लम्यांश नाहीं हें सर्व खरें. तथापि मध्यप्रांतांत व मद्रास इलाख्यांत कित्येक ठिकाणीं दारूच्या पैदाशीवर, विशेषतः जंगली व संस्थानी रियासतींत सरकारांनीं प्रतिबंध ठेवलेला नाहीं. सरकारहि मधून मधून विक्रीच्या दारूचा कर होतां होईल तों अगदीं सौम्य ठेवून दारूड्याच्या प्रकृतीची काळजी घेण्याची व्यवस्था रास्तच आहे.

परंतु त्यांच्या अज्ञानामुळें होणाऱ्या द्रव्यहानीची काय वाट ? ज्या दारूची मूळ किंमत दोन-चार आणेहि नसेल तिच्यावर कर बसवून तिची किंमत २-४ रुपयांवर नेलेली असूनहि दारुबाजीचा विस्तार इतका अवाढव्य झालेला सरकारच कबूल करीत आहे. मग सरकार ही दारूची पैदाशीच आपल्या सामर्थ्यानें कां बंद करीत नाहीं ? पैदास बंद झाल्यावर विक्रीचा प्रश्नच राहात नाहीं. केवळ औषधोपचाराकरितां 'लायसन्स' देऊन इतर विषांप्रमाणेंच दारू हा एक पदार्थ विष समजून औषधांपुरता त्याचा खप ठेवण्याला जनतेकडून हरकत होईल असें वाटत नाहीं. परंतु तसें न करतां केवळ उत्पन्नाच्या सबबीवर सरकारनें हा विषाचा बाजार मोकळा ठेवला म्हणजे केवळ आपल्या सामर्थ्याचा दुरुपयोगच नव्हे काय ? कोणी म्हणतात, आतां काय, स्वराज्य ७ महिन्यांत मिळावयाचें आहे. पण स्वराज्य आज मिळून तरी हातीं काय लागणार आहे ?

## व्यभिचाराचा सांवळागोंधळ

दारूच्या व्यापाराचा प्रश्न हा स्वराज्याचा किंवा परराज्याचा नसून तो व्यभिचाराचा सावळागोंधळ आहे. आणि त्यावर जवळ जवळ ४५००००००रु.चें उत्पन्न अवलंबून असल्यानें तो व्यभिचार चालू ठेवण्याचें कितीहि अनीतीचें असलें तरी मोठें राजनीतीचें समजलें जात आहे. जे कोणी ह्या राजनीतीच्या उलट आहेत त्यांवर ४५०००००० रु. मिळून देण्याची जबाबदारी टाकण्यांत येत आहे ही मोठ्या शरमेची व चीड आणणारी गोष्ट आहे. दारू पिणारा एक, दुकान चालविणारा दुसरा, फायदा सरकारास आणि तोटा बहुजनसमाजास असा हा सांवळागोंधळ आज शंभर वर्षे गाजत आहे तो कधीं बंद होईल ?

८

# कोंकणी व मराठी

## परस्पर संबंध

(१) आर्य आणि अनार्य (आर्येतर हिंदी) ह्यांच्या संस्कृतींची तुलना हा मुख्य विषय. त्यांच्या भाषांची तुलना हें त्यांच्या अध्ययनाचें एक मुख्य साधन. मराठी ही एक आर्यभाषेशीं संबंध असलेली प्रचलित भाषा, आणि कानडी ही तामिळशीं संबंध असलेली एक चालू भाषा. ह्यांचा निकट संबंध महाराष्ट्रांत गेल्या सहस्रकांत जुळला कसा, हें मीं इ. स. १९२३ चे अखेर ‘केसरी’ पत्रांत लेखद्वारा दाखविलें आहे. कारण हा निकट संबंध सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनें विशेषतः तौलनिक भाषा दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. त्याच दृष्टीनें कोंकणी व मराठीचाहि संबंध महत्त्वाचा आहे.

(२) **कोंकणी** (मालवण, गोवा, मंगळूर इ. ठिकाणची) ही मराठीची उपभाषा गणली जात आहे. पण इतिहासाच्या दृष्टीनें हें विधान फारच कसोशीनें पारखणें जरूर आहे. मराठी, जी हल्लीं प्रौढ ग्रांथिक भाषा झाली आहे तिचा एक हजार वर्षांपूर्वीचा इतिहास माहीत नाहीं. किंबहुना तो होता कीं नाहीं हेंहि निश्चयानें आज सांगवत नाहीं. कोंकणी तर अशा प्रौढपणाला कधीं पोंचलीच नाहीं. पोर्तुगीजांच्या राक्षसी अत्याचारांतून ती आज जिवंत आहे, हेंच मोठें भाग्य. अशा परिस्थितींत ह्यांची तुलना करावयाची ती दोहोंच्या व्याकरणावरूनच. कोंकणीचें वाङ्मय नाहीं

निदान तें उपलब्ध नाहीं. जें स्वस्त आहे, तें अगदीं अलीकडचें. कोंकणीचीं ल्हान ल्हान व्याकरणेंहि एकदोन शतकांतलीच, व तींहि सहज मिळत नाहीत. अशा अनेक अडचणी आहेत.

( ३ ) डॉ. सबॅतियन रुदाल्फ दाल्गादो, D. D., D. C. L., G. C. हे एक सर भांडारकरांच्या तोडीचे नामांकित पंडित होऊन गेले. पूर्वाश्रमीचे सारस्वतब्राह्मण-कुलोत्पन्न. शेवटीं ते रोमन कॅथालिक पंथाचे मोठे धर्माचार्य झाले. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी त्यांनीं एक मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यात त्यांनी २१७७ अस्सल कोंकणी म्हणी संपादन केल्या आहेत. ( कोइंब्रा, पोर्तुगाल, इ. स. १९२२ ). हें एक वाङ्मयच म्हणावयाचें. ह्याना पूर्व आशियांतील पुष्कळच प्रचलित भाषा अवगत होत्या. त्यांचा प्रवासहि विस्तृत होता. ह्यानीं एक कोंकणी-पोर्तुगीज कोश ( Glossari Lasso Asiatico–Coimbra Portugal, 1921 A. D. ) पांच वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला. पण हे ग्रंथ परकीय भाषेत आणि रोमन लिपींत आहेत. इ. स. १९१२ मध्यें " Influence of the Portugese Vocabulary on the Asiatic Languages " ह्या नांवाचा एक तौलनिक भाषाविषयक ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केला. ह्यावरून त्यांचें अनेक भाषाप्रभुत्व कळतें. कोंकणीच्या पूर्वापार संबंधाविषयीं ह्या पंडितानें आपल्या वरील ग्रंथाच्या प्रस्तावनांतून जे सिद्धान्त प्रथित केले आहेत, त्यांचा सारांश असा :—

१. खुद्द गोमांतकांत नागर लोक जी भाषा बोलतात तीच खरी कोंकणी भाषा. उत्तरेकडे कुडाळीवर मराठीचा संस्कार, आणि दक्षिणेकडे मंगळूरांतील कोंकणीवर कानडीचा संस्कार, जास्त झाला आहे.

२. खुद्द गोमांतकांतहि हल्लींचे गोवनी भाषेंत एकदशांश शब्द पोर्तुगीज आहेत.

३. ही कोंकणी भाषा संस्कृत नाटकांतील अल्पभाषेसारखी आहे.

४. हिच्यांत कारकें, काळ, व धातुसाधितें विपुल आहेत; म्हणजे ही Inflective आहे. म्हणून ही संस्कृतजन्य भाषा आहे. द्राविड अथवा आर्येतर म्हणजे Agglutinative नाहीं.

५. व्याकरणदृष्ट्या ही मराठीहूनहि संस्कृतच्या अधिक जवळ आहे.

६. चालू मराठीपेक्षां जुन्या मराठीशीं हिचें सादृश्य अधिक आहे.

७. उच्चाराच्या दृष्टीनें ( Phonology ) ही गौडी भाषा आहे. विशेषतः बंगालीसारखी आहे.

८. ही मराठीची ग्राम्य किंवा अपभ्रंश नव्हे.

९. सारस्वत ब्राह्मणाची जी भाषा नष्ट झाली असें कांहीं युरोपिअन प्राच्य भाषाविद् समजतात, ती हीच असावी. विहार प्रांतांतील तिरहुतहून जे गौड सारस्वत पोर्तुगाल आले त्यांनी ही कोंकणांत सुरू केली असावी. इ. इ.

(४) अलीकडे मुंबईचे रावसाहेब डॉ. चव्हाण याच विषयावर व्याख्यानें देत असतात. ते हींच मतें प्रतिपादित आहेत. डॉ. डाल्गादो ह्यांचे ग्रंथ पोर्तुगीज भाषेत आहेत. त्यांच्या विचारांचा प्रचार रा. सा. चव्हाण इंग्रजींत करीत आहेत, हा एक आम्हांवर उपकारच आहे. मराठींत करते, तर बहुजनसमाज ह्या उपकारांचा अधिक वांटेकरी झाला असता. तौलनिक व ऐतिहासिक व्याकरणांत अधिक खोल शिरून ह्या विषयावर त्यांनी अधिक प्रकाश पाडावा अशी त्यांना विनंती आहे.

## ऐतिहासिक विवेचन

(५) हें विवेचन बाह्य पुराव्यांनींच होणारें आहे. पण अशा पुराव्यांची तूर्त तरी अत्यंत वाण आहे.

प्रथम आपण ही भाषा प्रांतीय (Territorial) आहे कीं जातीय (National) आहे, हें पाहूं. कोंकणांतच ही भाषा आढळते, येवढ्याच *आकुंचित अर्थानें ही भाषा हल्लीं प्रांतिक गणली जात आहे. पण मुळांत ही भाषा* कोंकणी नव्हती. म्हणजे कोंकण प्रांताशीं हिचा पूर्वापार संबंध नाहीं. हजार-बाराशें वर्षांपूर्वी ही भाषा कोंकणांत प्रचारांत असणें संभवनीय नाहीं. त्या वेळीं हा सारा किनारा कानडीनें हस्तगत केलेला होता, हें इतिहासावरून व उपलब्ध शिलालेख व ताम्रपटांवरून दिसतें. भूगर्भशास्त्राच्या दृष्टीनें जरी कोंकण हा प्रांत अर्वाचीन आहे, तरी ह्या कोंकणपट्टीचें व्यापारी दळणवळण फिनिशियन नांवाच्या अति प्राचीन दर्यावर्दी राष्ट्रानें पाश्चात्त्य इजिप्त, असीरिया, व त्याच्याहि पलीकडच्या प्राचीन राष्ट्रांशीं ठेविलें होतें, असे दाखले बरेच मिळतात. कापसाचें व रेशमाचें तलम कापड, मिरीं, वेलदोडे व इतर मसाले, मयूर, वानर इत्यादि प्राणी वगैरे माल, या फिनिशियनांकडून द्राविड मुलखांतून देशांतून पाश्चात्त्य राजवटींना पुरविण्यांत येत असे; व त्यासाठीं पश्चिम किनाऱ्यावर नामांकित बंदरेंहि असत. इतरा प्राचीन काळ सोडून, केवळ मध्ययुगीन संस्कृति जरी विचारांत घेतल्या तरी, ठाण्यापासून खालीं गोकर्णपर्यंत कानडीचें, तेथून खालीं दक्षिण कानडा जिल्ह्यांतील कासरगोड तालुक्यापर्यंत तुळु भाषेचें व त्याच्याहि खालीं सबंध केरळ देशांत तामिळचें (जिचें परिणत स्वरूप सुमारें तीन शतकांपूर्वी हल्लींच्या मल्याळी भाषेत होऊं लागलें), अशीं ह्या किनाऱ्यावर निरनिराळ्या भाषांचीं साम्राज्यें होतीं. मौर्य, कदंब, चालुक्य इत्यादि उत्तरेकडील राजवंशांचा पसारा इ. स. पूर्वी निदान २०० वर्षांपासून पुढें ह्या किनाऱ्यावर होऊं लागला. तोंपर्यंत द्राविडी भाषांच्या *साम्राज्याच्या केसालाहि धक्का नव्हता; व पुढेंहि ब्रिटिश शतकें राजकीय साम्राज्य* ढांसळलें तरी, भाषाविषयक द्राविडचा अंमल जनतेमध्यें चालू होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कोंकणी ही कोंकणांत प्रांतिक अथवा स्थानिक भाषा नसून उपरी आणि जातीय भाषा आहे हें सिद्ध होतें. आतां ती कोणत्या जातीची किंवा राष्ट्राची भाषा होती, हा प्रश्न उरला.

## कोंकण ह्या नांवाची व्युत्पत्ति

(६) कोंकण ह्या नावाच्या व्युत्पत्तीसंबंधीं बऱ्याच विद्वानांनीं आपले बरेच तर्क प्रसिद्ध केले आहेत. ते तर्क पुढीलप्रमाणें मी देत आहें. त्याची व्याप्ति हल्लींच्या कोइमतूर व सालेम ह्या तामिळ जिल्ह्यांत अशी प्राचीन नकाशांत ठरलेली होती. पण कोंग राष्ट्राचे लोक कदाचित् फिरते व कांहीं अंशीं जंगलीहि असावेत. त्यामुळें त्यांच्या राष्ट्राची व्याप्ति ह्या वर सांगितलेल्या हद्दीबाहेरहि पसरलेली असावी. गंग नांवाचें जें राजघराणें उत्तरेकडून येऊन म्हैसुरास प्रतिष्ठा पावलें, त्या राजांना कोंगणी वर्मा असा किताब होता, हें एल्. राइस आणि फ्लीट ह्यांच्या शोधांवरून उघड होतें. वर्मा हें क्षत्रियवाचक केवळ उपपद आहे. पण कोंगणी ह्या अस्सल द्राविडी पदांतील कोंगाण हेंच पद मुख्य आहे. कोंग हाचें संस्कृत केलेलें रूप गंग असणें मुळींच अशक्य नाहीं. कोंगण ह्या नांवांत कोंग हें आर्येतर जातिवाचक नांव आहे. आण म्हणजे देश असा द्राविड शब्द आहे; त्याचें मूळ स्वरूप आळ् अगे आहे. काड आणि काण अमेहि अरण्य अगर शेत ह्या अर्थी कानडींत व तुळु भाषेंत शब्द आहेत, ह्यावरून कोंगाण अथवा कोंकाण हें नांव सिद्ध होतें. ही व्युत्पत्ति जितकी सोपी आहे तितकीच उघड आहे. हिला हरकत काय ती एवढीच कीं, ह्या कोंग राष्ट्राची व्याप्ति प्राचीन नकाशांतून किनाऱ्यापासून किंचित् आंत देशावर ठरविण्यांत आली होती. परंतु ही हरकत भाषाशास्त्राची नसून भूगोलशास्त्राची आहे. आणि प्राचीन नकाशे आताप्रमाणें पूर्णत्वाला पोंचले नव्हते. खालील माहितीवरून ही भौगोलिक हरकतहि निवारतां येण्यासारखी आहे. कोंग जातीचे लोक किनाऱ्यावरहि देशांतल्याप्रमाणें पसरलेले आढळतात. ह्या जंगली जातीची एक गुन्हेगार टोळी जमखिंडी संस्थानच्या तुरुंगांत धरून ठेवलेली मीं माझ्या बाळपणीं प्रत्यक्ष पाहिली आहे. शातवाहनाचें राज्य (इ. स. १५० नंतर) बुडाल्यावर त्यांचा दक्षिणेकडील बराच भाग गंग राजानीं हस्तगत केला. त्याला गंगावाडी ऊर्फ गंगाडी (कोंगाडी) असें नाव होतें, असें एल्. राइस म्हणतो. कोंगाडी ह्या नावाची एक जंगली जात ठाण्याकडे अद्यापि आढळते. ठाकरवाडी (ठाकरडे), नाईकवाडी (नायकोंडे), असे लोक किनाऱ्याच्या प्रांतीं आढळतात. हे लोक दिसतात तसे मुळापासून जंगली नसून विपद्ग्रस्त असावेत. कोंकण हा प्रांत मुळांत महार, मांग, भिल्ल, ठाकुर, कोळी, कोंग इत्यादि एके काळीं राज्य केलेल्या लोकांचा होता. कदंबांनीं महारांपासून, चालुक्यानीं मोंगापासून, मौर्यांनीं कोळ्यापासून राज्यें घेतल्याचे वगैरे जे पुरावे आहेत त्यातच शोध केल्यास कोंगाचाहि पत्ता मिळणें अशक्य नाहीं. कोडग, कुर्ग-कोरग, ह्या जंगली व सुधारलेल्या जाती किनाऱ्यावर प्रसिद्धच आहेत. कोंग ह्या जातीचा "आण" म्हणजे देश जो कोंगाण, ह्याचा अपभ्रंश कोंकण ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. चिरकाण, बागलाण, तुरकाण, वगैरे नांवांतहि हाच आण शब्द आहे, व तो अनि

प्राचीन द्राविड शब्द आहे. पण कोंग राष्ट्र हें द्राविड आहे, कीं कोळ, भिल्ल, मांग इत्यादि पूर्वक्रम द्राविडांच्याहि पूर्वी आलेल्या अथवा येथीलच मूळ रहिवाशांपैकीं आहे हें ठरविण्यास मात्र पुरावा नाहीं. ते आर्य नाहींत एवढेंच तूर्त म्हणतां येईल. *कोंकणाला अपरांत असें दुसरें संस्कृत नांव आहे. परंतु त्याचा प्रस्तुत विषयाशीं कांहींच संबंध नाहीं.* म्हणून त्या मरतून नांवाचा येथें पाल्हाळ नको.

(७) तें कसेंहि असो, कोंग राष्ट्राशीं किंवा इतर कोणत्याहि एतद्देशीय रहिवाशांशीं चालू कोंकणी भाषेचा संबंध उत्तरेकडील कोणत्या तरी प्राकृताशीं पोंचतो : आणि विशेषेंकरून तिच्यांत कांहीं फार जुनीं संस्कृत रूपें मराठीहूनहि जास्त आढळतात. त्यावरून विशेषतः ही भाषा कोंकणांतली स्थानिक नसून उपरी आहे, एवढें तरी सिद्ध होतें.

## ही कोणत्या राष्ट्राची भाषा ?

(८) कोंकणी भाषा ही केवळ मराठीचा एक प्रांतिक पोटभेद नसल्यास ती कोणत्या तरी एका वेगळ्या राष्ट्राची असली पाहिजे. तें राष्ट्र अगर ती जात एक सारस्वत ब्राह्मण तरी असली पाहिजे, नाहीं तर रट्ठ, राठोड किंवा राष्ट्रकूट, मौर्य, कदंब इत्यादि जे मध्ययुगीन क्षत्रिय वंश मध्य हिमालयाच्या दक्षिण पायथ्यावरून गौतम बुद्धाच्या उदयकाळापासून तो सुमारें खिस्ती शकानंतरच्या ५०० शतकापर्यंत वेळोवेळीं दक्षिणेंत वसाहतीस आले, ते तरी असले पाहिजेत. ह्या सर्व क्षत्रिय वंशांना, मराठे हेंच एक सामान्य नाव देणें मुळींच अयोग्य होणार नाहीं. म्हणजे ही भाषा सारस्वत ब्राह्मणांची तरी असावी किंवा मराठ्यांची असावी. जर ब्राह्मणांची नसून मराठ्यांची आहे असें ठरल्यास, ती मराठीचीच एक शाखा, फार तर तिची एक प्राचीन शाखा किंवा हीच मराठीचें मूळस्वरूप, जिला वररुचि "महाराष्ट्री" म्हणतो, ती असावी असें होतें. पण उलटपक्षीं ती कोंकणात प्रथम सारस्वतांनींच आणली म्हणावी, तर सारस्वतांहिपेक्षां पूर्वी हजार-पांचशें वर्षे दक्षिणेंत आलेले मराठे कोणती भाषा बोलत होते हा प्रश्न उद्भवतो. ते जर सारस्वत ब्राह्मण येण्यापूर्वी कानडी भाषा बोलत होते, तर सारस्वतांनीं ही नवी कोंकणी आणल्याबरोबर, ती हजार वर्षे अंगीं मळलेली कानडी भाषा टाकून त्यांनीं ही नवीन भाषा स्वीकारणें शक्य आहे काय ? बरें, वादासाठीं तूर्त तीहि असंभवनीय गोष्ट गृहीत धरल्यास, दुसराच एक प्रश्न उद्भवतो. तो हा कीं, सारस्वतांनीं ही भाषा उत्तर हिंदुस्थानांतून एकदम कोंकणात नेली, कीं वाटेवर महाराष्ट्रांत काही दिवस वस्ती केल्या वेळीं तेथे स्वीकारलेली भाषा त्यांनी आपल्याबरोबर कोंकणात नेली ? पहिल्या तर्काला इतिहासांत मुळींच पुरावा नाहीं, आणि दुसरा तर्क खरा असेल, तर ही सारस्वतांची कोंकणी ही मराठीचीच शाखा ठरते व तिचा स्वतंत्रपणा नष्ट होतो. पण हा दुसरा तर्क

आपणांस मानवेना म्हणून, दाल्गादो ह्यांनी गौड सारस्वतांची एक निराळीच भाषा होती, ती आतां गोष्ट झाली आहे असा कांहीं पाश्चात्य पंडितांचा तर्क आहे वगैरे मोघम शंका प्रदर्शित करून वेळ मारून नेली आहे. दाल्गादो म्हणतात त्याप्रमाणें, गौडसारस्वत हे तिरहुतहून खालीं ओरिसाच्या बाजूनें दक्षिणेंत पैठण येथें कांहीं दिवस राहून मग खाली कोंकणांत उतरले, कीं काश्मीरहून ब्रह्मावर्त, राजपुताना, भडोच, सुरतेवरून परस्पर कोंकणांत उतरले, ह्याविषयीं अद्याप निश्चित पुरावा नाहीं. कोंकणी भाषेच्या अंतर्गत पुराव्यावरून हे दोन्ही मार्ग सारखेच संभवनीय दिसतात. किंबहुना निरनिराळ्या वेळीं हे लोक दोन्ही मार्गांनीं आले असल्याचे पुरावे इतिहासांत धुंडाळल्यास मिळण्याचा संभव आहे. पण त्यांची एक निराळीच भाषा होती व ती आतां लुप्त झाली, असें मानण्यास मात्र कांहीं निश्चित पुरावा नाहीं. उलट गौडसारस्वत ब्राह्मण तिरहुतहूनच आले असल्यास, त्यांची स्वतंत्र भाषा नसून ती दक्षिणेंत आल्यावर सिद्ध झालेली मराठीच होय असें म्हणणें भाग पडतें. इतकेंच नव्हे तर ह्या कोंकणी भाषेचें मूळ मराठी स्वरूप ब्राह्मणांनी बनविलेलें नसून क्षत्रिय-मराठ्यांनींच बनविलेलें असावें. पण तें मूळ स्वरूप सारस्वत ब्राह्मणांनीं कोंकणांत नेल्यावर त्यांनीं त्याला कांहीं अंशीं संस्कृत वळणावर नेलें आणि कोंकण व देश ह्यामध्यें अलीकडे पूर्वी दळणवळण नसल्यामुळें, एक जी कोंकणांतल्या सारस्वतांच्या वळणांतली कोंकणी मराठी, आणि दुसरी जी देशावरल्या ब्राह्मणांनीं पुढें लवकरच जिला ग्रांथिक स्वरूप देऊं लागल्यामुळें प्रौढ झाली ती देशी मराठी, अशा त्या मूळ मराठीच्या वाढीमुळें पुढें दोन भिन्न शाखा झाल्या, असें मानणें इतिहासाला धरून आहे, असें मला वाटतें.

(९) किनाऱ्यावर वसाहत करणाऱ्या मौर्य, कदंब, शेलार इत्यादि क्षत्रिय मराठ्यांचा धर्म पूर्वी बौद्ध किंवा जैन होता, हें कोंकणांतील त्या धर्मांच्या कोरीव लेण्यांवरून व शिलालेखांवरून दिसतें. पण पुढें शातवाहनांचें साम्राज्य इ. स. १५००चे सुमारास नष्ट होऊन ३०० वर्षें बेबंदशाही चालली. ह्यापुढें चालुक्यांच्या साम्राज्याचा उदय होऊं लागला. चालुक्य प्रथम शैव, नंतर वैष्णव होते. ह्यानंतर बौद्ध धर्माला हळूहळू उतरती कळा लागून अनुक्रमें जैन, शैव, आणि शेवटीं वैष्णव पंथाची चलती झाली. ह्यापुढल्या ५००।७०० वर्षांत मयूरवर्मा नांवाच्या एका मांडलीक राजानें सुमारें इ. स. ६१७ च्या शतकांत "नवीन कादंब" घराची गादी गोव्याकडे स्थापिली. तो वैष्णवपंथी होता. त्यानें राजपुतान्यांतून सुमारें दोन हजार ब्राह्मण आणविले, अशी दंतकथा आहे. सारा कोंकण प्रांत परशुरामानें समुद्र हटवून निर्माण केला, व तो त्यानें ब्राह्मणांस दान दिला; हे ब्राह्मण त्यानें कोंकणांतल्या कोळ्यांपासून निर्माण केले. त्यांचीं जाळीं तोडून त्यांच्यासाठीं जानवीं केलीं. पण ते आचारभ्रष्ट व कृतघ्न झाल्यानें पुनः दुसरे ब्राह्मण आणविले; इत्यादि पौराणिक दंतकथांचें तात्पर्य दक्षिण कानडा जिल्ह्याच्या गॅझेटिअरमध्यें वर्णिलें आहे. हे दुसरे ब्राह्मण कदाचित् मयूरवर्म्यानेंच आणिले असावेत व ते काठेवाडांतले सारस्वत असावेत. परशुरामानें आणिले, ही केवळ पौराणिक कल्पना

भाषांचीं अंतर्गत प्रमाणें म्हणजे शब्दकोश, व्याकरण, स्वरशास्त्र ( Phonology ), संप्रदाय ( Idioms ) इत्यादि अंतःप्रमाणांच्या तुलनेकडे वळूं.

## शब्दकोश

( १३ ) वर सांगितल्याप्रमाणें कोंकणी ही भाषा कोंकणांतल्या मूळ रहिवाशांची नसून, तेथें फार तर हजार बाराशें वर्षांपूर्वी गेलेल्या उपऱ्या लोकांची असल्यामुळे तिच्या शब्दकोशांत मराठी-शिवाय इतर स्वदेशी परदेशी, प्रचलित आणि मृत, इ. अनेक भाषांतील शब्दांची भेसळ मराठींतल्यापेक्षांहि फार झाली आहे. ह्याचें एक मुख्य कारण असें कीं, हिन्दुस्थानचा सबंध पश्चिम किनारा कराचीपासून कन्याकुमारीपर्यंत पाश्चात्त्य धाडशी लोकांच्या स्वाऱ्या, व्यापार, प्रवास इत्यादि अनेक प्रकारच्या दळणवळणाला अत्यंत प्राचीन काळापासून अगदीं मोकळा होता. हे दळणवळण सह्याद्रीच्या पूर्वेकडील प्रांतांशीं तसें नव्हतें. ह्या किनाऱ्याला विशेषतः ठाण्यापासून खालीं कन्याकुमारीपर्यंत परशुरामक्षेत्र असें पौराणिक नांव आहे. प्रस्तुत कोंकणी भाषा ह्या परशुरामक्षेत्रभर पसरली आहे. तरी तिचा खरा भर रा. सा. डॉ. चव्हाण म्हणतात त्याप्रमाणें उत्तरेकडील सोपारें गांवाजवळील वैतरणीपासून तों दक्षिणेकडील कारवार जिल्ह्याच्या सीमेवरील गंगावली नदीपर्यंत आहे. त्यांतल्या त्यांत तिचें खरें वैशिष्ट्य राजापूर तालुक्यांतील खारेपाटणपासून खालीं कारवाराजवळील शिवेश्वर गांवापर्यंतच आहे. ह्याच्या उत्तरेकडील भागांत मराठीचा व दक्षिणेकडील भागांत कानडीचा व त्याच्याहि खालीं मल्याळीचा, वरचष्मा भासत आहे; आणि मधल्या भागांतील हल्लींच्या कोंकणींत शेंकडा निदान दहा तरी शब्द पोर्तुगीज भाषेंतून आले आहेत असें शास्त्रज्ञ यांचें मत आहे. तें खरें आहे. पोर्तुगिजांच्या अमलानंतर कोंकणी भाषेंत किंवा कोंकणी भाषेसंबंधीं पोर्तुगीज भाषेंत जे कांहीं ग्रंथ झाले अहेत ते केवळ ख्रिस्ती पंडिताच्याच श्रमांमुळे झाले आहेत. ह्या पंडितांमध्यें पाश्चात्त्य धर्माचाच नव्हे तर पाश्चात्त्य भाषा आणि पेहरावांचाहि अभिनिवेश फार असतो. त्यामुळे पोर्तुगीज भाषेचें हें एकदेशी शब्दांचें ऋण मात्र त्यांना तत्काळ पटतें; त्याचप्रमाणें कोंकणीचा संस्कृताशीं ऋणानुबंधहि त्यांना सहज कुणारून देतां येत नाहीं. परन्तु कोंकणीचा द्राविड भाषेशीं किती ऋणानुबंध आहे हें कबूल करण्याची पाळी येते, तेव्हां मात्र ह्यांचें पांडित्य विरघळू लागतें. कानडी व इतर द्राविडी भाषेविषयीं लिहितांना कांहीं ख्रिस्ती विद्वानांचा जो चमत्कारिक प्रतिकूल ग्रह झालेला दिसतो तो रा. सा. चव्हाण यांच्या "कोंकण आणि कोंकणी" ह्या पुस्तकांतील खालील उताऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे.

"The Konkani language was at one time known as Lingua (Canarin or Canarina. Whatever may be the

consideration that led early Portuguese to call it Lingua Canarin, the following comparative table from Mr. Saldana's Notes on Goan language will show at a glance that Canarese or any of the Dravidian language had no hand whatsoever in building up of the Konkani dialect. The latter in fact shows a special affinity not only for Marathi and Sanskrit but also for Latin. (Page 14).

गोंवें येथील " हेरल्डो " पत्राच्या ४४५१ अंकात Mr. Stuarts Gomes लिहितात—" From the times of the Portuguese domination of Goa, the Goan Christians are dubbed as Canarians, and this term is considered offensive at present. The fact is that the Goans have nothing in common with Canarese or the Canarese people. "

शतकांचीं शतकें परधर्म व परराज्याच्या वातावरणांत वाढलेल्या अभिनिविष्टांचा कानडीवरील राग आणि लॅटिनवरील प्रेम पाहून वाईट वाटण्याचें कारण नाहीं. पण अशानीं दिलेल्याच तुलनात्मक शब्दावळीवर विसंबून रावसाहेब डॉ. चव्हाणांसारख्यांनीं कोंकणी ही कानडीपासूनच नव्हे तर प्रत्यक्ष तिची आई किंवा थोरली सख्खी बहीण मराठी हिच्याहूनहि भिन्न आहे किंवा स्वतंत्र आहे असें म्हणावें, हे मात्र आश्चर्य आहे. त्यांनीं आपल्या व्याख्यानांत कोंकणीहून मराठीची भिन्नता दाखविण्यासाठीं ज्या दोन चार शब्दांचीं कोष्टकें दिलीं आहेत, त्यांतील निदान तीनचतुर्थांश तरी शब्द मराठीहून मुळींच भिन्न नाहींत. त्या ख्रिस्ती मंडळींना, कदाचित् मराठी येत नसल्यास ही चूक शोभते, पण चव्हाणांना शोभत नाहीं. शब्दकोशाच्या दृष्टीनें पाहता खुद्द चव्हाण-साहेबांनींच आपल्या चौदाव्या पानावर " हाव ताका नंबूना " = मी त्यावर विश्वास ठेवीत नाहीं, " कुडले यो " = लवकर ये; वगैरे **कानडीचा प्रभाव दाखविणारे प्रयोग कबूल केले आहेत,** अशीं उदाहरणें आणखी विपुल देता येतील. पण ही गोष्ट द्राविड द्वेषापासून मुक्त असलेल्यांनाच मात्र पटण्यासारखी आहे. **कोंकणी ही मराठीच असल्यानें** तिच्यात मराठी शब्द किती आहेत हा प्रश्नच उरत नाहीं पण तिच्यांत संस्कृत तत्सम, मराठी तद्भव, आणि पोर्तुगीजशिवाय दुसऱ्या भाषांचे इतके शब्द आहेत कीं, ते द्राविड अगर आर्येतर भाषांतूनच आले असणें शक्य आहे. खालीं कांहीं कोंकणी म्हणी देतो. त्यांत ज्या शब्दाखालीं टिंबे दिलीं आहेत त्याच्याशीं संस्कृताचा फार दूरान्वय लागतो; व ज्याच्याखालीं रेघ आहे त्याचा संस्कृताशीं मुळींच संबंध लागत नाहीं, म्हणून ते आर्येतर शब्द असले पाहिजेत. हा संबंध कानडीच्या द्वारा लागतो, कीं तुळूच्या द्वारा, किंवा इतर कोणत्याहि आर्येतर भाषेच्या द्वारा हें तूर्त

असावी. पण या तर्काला दंतकथेखेरीज कांहीं पुरावा नाहीं. स्कंद पुराणांतील सह्याद्रिखंडांत हविग, शिवळी इत्यादि नांवांच्या ब्राह्मण जाती तुळु भाषा बोलणाऱ्या आहेत. मी मंगळूर येथें असतांना सन १९२४ सालीं या ब्राह्मणांकडून त्यांच्या स्थळ-पुराणाची अस्सल हस्तलिखित प्रत मिळविण्याचा प्रयत्न केला; पण प्रत मिळाली नाहीं. कोंकणांतील चित्पावन ब्राह्मणांविषयीं या सह्याद्रिखंड नांवाच्या स्थळ-पुराणांत कांहीं उल्लेख अनुकूल नसल्यामुळें अशी प्रत मिळणें कठीण आहे, असें रिस्लेसाहेबांचें मत पडलें. तथापि सारस्वतांविषयीं मात्र प्रतिकूल उल्लेख कोठेंच आढळत नाहीं. ते निश्चितपणें कोंकणांत केव्हां आले ? कोठून आले ? मराठीहून निराळी अशी त्यांची एक पूर्वी भाषा होती काय ? त्यासंबंधीं कांहीं तरी विश्वसनीय पुरावा मिळेपर्यंत त्यांच्या तोंडीं हल्लीं असलेली कोंकणी भाषा ज्या अर्थीं त्यांचीच असें म्हणता येत नाहीं, त्या अर्थीं हिचें मूळ हल्लींच्या महाराष्ट्रांत चालू असलेल्या मराठीपासून अगदीं भिन्न आहे, किंवा तिची वाढ स्वतंत्र आहे, असें म्हणतां येत नाहीं.

(१०) तें कसेंहि असो, उपरिनिर्दिष्ट "नवीन कदंब' वंशाचा संस्थापक पहिला मयूरवर्मा यानें आणिलेले ब्राह्मण सर्व सारस्वतच होते असें गृहीत धरिलें तरी त्यांचा काळ इ. स. पूर्वी ६००–७०० च्या पलीकडे ज्या अर्थीं जाऊं शकत नाहीं, आणि आधुनिक मराठीचा उगम ह्या काळाच्या पूर्वीं खास होऊं लागला होता असें ज्या अर्थीं संशोधक राजवाडे आणि वैय्याकरणीय रा. भि. जोशी यांचें मत आहे त्या अर्थीं इतिहासाच्या दृष्टीनें तरी कोंकणीची मराठीपासून भिन्नता आणि स्वातंत्र्य सिद्ध होत नाहीं, हें स्पष्ट दिसतें.

## वऱ्हाडी आणि इतर शाखा

(११) ज्याप्रमाणें कोंकणी त्याचप्रमाणें वऱ्हाडी अथवा नागपुरी ही एक मराठीची उपभाषा आहे. केवळ इतिहासाच्या दृष्टीनें पाहतांना नागपुरी ही कोंकणीपेक्षां अधिक जुनी आहे. पण ती मराठीपासून कोंकणीइतकी तुटून वेगळी दिसत नाहीं. याचें कारण कोंकणीपेक्षां ती जास्त अलीकडची हें नसून, तिचें आणि मराठीचें दळणवळण कोंकणीपेक्षां जास्त आहे, हेंच होय. वऱ्हाडी ऊर्फ नागपुरी भाषेत निराळे ग्रंथ नाहींत, व दळणवळणामुळें ते तसे असणें शक्यहि नाहीं. कोंकणींत जरी आज स्वतंत्र सारस्वत उपलब्ध नाहीं, तरी पूर्वी अल्प स्वल्प होतें, तें पोर्तुगिजांच्या अत्याचारांमुळें नष्ट झालें, व त्यांच्याच जुलमी राजसत्तेमुळें व धार्मिक दडपणामुळें अधिक निर्माण होणें अशक्य झालें. परंतु तें कधींच अस्तित्वांत नव्हतें, असें म्हणतां येणार नाहीं. कोंकणी भाषा विशेषतः सुशिक्षित सारस्वत ब्राह्मणांच्या व्यवहारांतली असल्यामुळें ती अल्प प्रमाणांत कां होईना, परंतु ग्रांथिक बनली म्हणून तिला कांहीं अंशीं वेगळेपणाचा भास प्राप्त झाला आहे. तो भास नागपुरींत

वेगळें सारस्वत असण्याचा संभवच नसल्यामुळें, व ती नेहमीं निरक्षर समाजांत वावरत राहिल्यामुळें ती एक केवळ निराळी बोली अशाच स्थितींत राहिली व अजूनहि आहे. ह्या वन्हाडीच्या पश्चिमेकडे खानदेशी व पूर्वेकडे हाळबी अशा मराठीच्या आणखी दोन शाखा आहेत. ग्रिअरसननें आपल्या "लिंग्विस्टिक सर्वे" मध्यें खानदेशीचा अंतर्भाव गुजरातींत आणि हाळबीचा हिंदींत केला आहे. परंतु त्यांनीं कोंकणीचा अंतर्भाव गुजरातींत किंवा कानडींत केला नाहीं, ह्याचें कारण त्याना किंवा कोणालाहि तसें करतां येतच नाहीं. ज्या प्राकृतांतून मराठीचा उद्भव झाला त्याच प्राकृतांतून कोंकणीचाहि झाला, ही गोष्ट दाल्गादो ह्यांनाहि कबूल आहे. ह्या सर्व ऐतिहासिक परिस्थितीचें अवलोकन केल्यावर कोणालाहि कोंकणी ही मराठीपासून भिन्न आहे किंवा स्वतंत्र आहे असा आग्रह धरतां येणार नाहीं.

(१२) वर सांगितलेली ऐतिहासिक आपत्ति किंवा उणीव पाहून पंडित दाल्गादो ह्याचे कोणी अनुयायी अशी शंका काढतील कीं, ज्या अर्थी कोंकणीचा अंतर्भाव मराठी-शिवाय हल्लीं चालू असलेल्या कोणत्याहि भाषेत करतां येत नाहीं आणि प्रत्यक्ष मराठीशींहि तिचें तादात्म्य पूर्णपणें सिद्ध करता येत नाहीं, त्या अर्थी कांहीं पाश्चात्य पंडित समजतात त्याप्रमाणें सारस्वत ब्राह्मणाची एक निराळी भाषा होती, व तिच्या-पासून कोंकणीचा उद्भव झाला असावा, असें जें दाल्गादो म्हणतात त्यांत काय वावगें आहे ? ही लुप्त भाषा आज सांपडत नाहीं,एवढ्याच आपत्तीचा फायदा घेऊन कोंकणीचा अंतर्भाव मराठींत करणें व कोंकणीवर मराठीची सत्ता चालविणें म्हणजे " बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर " असें म्हणण्याप्रमाणेंच जुलमाचें आहे. या शंकेवर माझें उत्तर असें आहे कीं, सारस्वताची आतां लुप्त झालेली एक भाषा पूर्वी केव्हा तरी होती, हें ज्या कांहीं पाश्चात्य पंडितांचें मत आहे, त्यांचीं नांवें व इतर पुरेसा दाखला दाल्गादो ह्यांनीं दिला नाहीं. दिला असता तर ह्या लुप्त समजल्या जाणाऱ्या भाषेविषयीं अधिक शोध करण्यास अवसर सांपडला असता. ह्या अनिर्दिष्ट पाश्चात्य पंडिताची ही एक केवळ शंका असावी; अशी भाषा होतीच असा त्यांचा काहीं सिद्धान्त नसावा. अशा शंकेवर दाल्गादो ह्यांनीं आपली स्वतःची दुसरी एक शंका स्थापिली, ती ही कीं, त्या लुप्त भाषेपासून हल्लींच्या कोंकणीचा उद्भव झाला आहे. दोनच नव्हे, अशा अनेक शंका जरी एकत्र केल्या, तरी नुसत्या शंकेच्याच जोरावर कोणताहि सिद्धान्त तयार होत नाहीं. मी तर उलट असें म्हणतों कीं, मुलीच्या चेहेरेपट्टींत आईच्याहून कांहीं थोडीं लक्षणें जास्त आहेत, एवढ्याचवरून मराठी कोंकणीची आई नव्हे किंवा बहीण नव्हे; इतकेंच नव्हे तर पाश्चात्य पंडितरूपी पोलिसांच्या कचेरीत जी दुसरीच एक बाई बेपत्ता झाली आहे अशी खबर लागली आहे, तीच बेपत्ता बाई कोंकणीची आई असावी, असें समजणें हें कोंकणीची आई मराठीच आहे, असें समजण्यापेक्षांहि अधिक धाडसाचें आहे! असो. ह्या ऐतिहासिक बाह्य मुद्दा येथेंच संपवून, आपण ह्या दोन्ही

भाषांचीं अंतर्गत प्रमाणें म्हणजे शब्दकोश, व्याकरण, स्वरशास्त्र ( Phonology ), संप्रदाय ( Idioms ) इत्यादि अंतःप्रमाणांच्या तुलनेकडे वळूं.

## शब्दकोश

( १३ ) वर सांगितल्याप्रमाणें कोंकणी ही भाषा कोंकणांतल्या मूळ रहिवाशांची नसून, तेथें फार तर हजार बाराशें वर्षांपूर्वी गेलेल्या उपऱ्या लोकांची असल्यामुळें तिच्या शब्दकोशांत मराठी-शिवाय इतर स्वदेशी परदेशी, प्रचलित आणि मृत, इ. अनेक भाषांतील शब्दांची भेसळ मराठींतल्यापेक्षांहि फार झाली आहे. ह्याचें एक मुख्य कारण असें कीं, हिन्दुस्थानचा सबंध पश्चिम किनारा कराचीपासून कन्याकुमारीपर्यंत पाश्चात्य घाडशी लोकांच्या स्वाऱ्या, व्यापार, प्रवास इत्यादि अनेक प्रकारच्या दळणवळणाला अत्यंत प्राचीन काळापासून अगदीं मोकळा होता. हें दळणवळण सह्याद्रीच्या पूर्वेकडील प्रांतांशीं तसें नव्हतें. ह्या किनाऱ्याला विशेषतः ठाण्यापासून खालीं कन्याकुमारीपर्यंत परशुरामक्षेत्र असें पौराणिक नांव आहे. प्रस्तुत कोंकणी भाषा ह्या परशुरामक्षेत्रभर पसरली आहे. तरी तिचा खरा भर रा. सा. डॉ. चव्हाण म्हणतात त्याप्रमाणें उत्तरेकडील सोपारें गांवाजवळील वैतरणीपासून तों दक्षिणेकडील कारवार जिल्ह्याच्या सीमेवरील गंगावली नदीपर्यंत आहे. त्यांतल्या त्यांत तिचें खरें वैशिष्ट्य राजापूर तालुक्यांतील खारेपाटण-पासून खालीं कारवाराजवळील निवेश्वर गांवापर्यंतच आहे. ह्याच्या उत्तरेकडील भागांत मराठीचा व दक्षिणेकडील भागांत कानडीचा व त्याच्याहि खालीं मल्याळीचा, वरचष्मा भासत आहे; आणि मधल्या भागांतील हल्लींच्या कोंकणींत शेकडा निदान दहा तरी शब्द पोर्तुगीज भाषेतून आले आहेत असें डाल्गाडो यांचें मत आहे. तें खरें आहे. पोर्तुगिजाच्या अमलानंतर कोंकणी भाषेत किंवा कोंकणी भाषेसंबंधीं पोर्तुगीज भाषेत जे कांहीं ग्रंथ झाले आहेत ते केवळ ख्रिस्ती पंडितांच्याच श्रमांमुळें झाले आहेत. ह्या पंडितांमध्यें पाश्चात्य धर्माचाच नव्हे तर पाश्चात्य भाषा आणि पेहरावांचाहि अभिनिवेश फार असतो. त्यामुळें पोर्तुगीज भाषेचें हें एकदेशी शब्दांचें ऋण मात्र त्यांना तत्काळ पटतें; त्याचप्रमाणें कोंकणीचा संस्कृताशीं ऋणानुबंधहि त्यांना सहज झुगारून देता येत नाहीं. परंतु कोंकणीचा द्राविड भाषेशीं किती ऋणानुबंध आहे हें कबूल करण्याची पाळी येते, तेव्हां मात्र ह्यांचें पांडित्य विरघळूं लागतें. कानडी व इतर द्राविडी भाषेविषयीं लिहितांना कांहीं ख्रिस्ती विद्वानाचा जो चमत्कारिक प्रतिकूल ग्रह झालेला दिसतो तो रा. सा. चव्हाण यांच्या "कोंकण आणि कोंकणी" ह्या पुस्तकांतील खालील उताऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे.

"The Konkani language was at one time known as . Lingua (Canarin or Canarina. Whatever may be the

consideration that led early Portuguese to call it Lingua Canarin, the following comparative table from Mr. Saldana's Notes on Goan language will show at a glance that Canarese or any of the Dravidian language had no hand whatsoever in building up of the Konkani dialect. The latter in fact shows a special affinity not only for Marathi and Sanskrit but also for Latin. (Page 14).

गोव्यें येथील " हेरल्डो " पत्राच्या ४४५१ अंकांत Mr.Stuarts Gomes लिहितात—" From the times of the Portuguese domination of Goa, the Goan Christians are dubbed as Canarians, and this term is considered offensive at present. The fact is that the Goans have nothing in common with Canarese or the Canarese people."

शतकांची शतकें परधर्म व परराज्याच्या वातावरणांत वाढलेल्या अभिनिविष्टांचा कानडीवरील राग आणि लॅटिनवरील प्रेम पाहून वाईट वाटण्याचें कारण नाहीं. पण अशांनीं दिलेल्याच तुल्नात्मक शब्दावलीवर विसंबून रावसाहेब डॉ. चव्हाणांसारख्यांनीं कोंकणी ही कानडीपासूनच नव्हे तर प्रत्यक्ष तिची आई किंवा थोरली सख्खी बहीण मराठी हिच्याहूनहि भिन्न आहे किंवा स्वतंत्र आहे असें म्हणावें, हें मात्र आश्चर्य आहे. त्यांनीं आपल्या व्याख्यानात कोंकणीहून मराठीची भिन्नता दाखविण्यासाठीं ज्या दोन चार शब्दांचीं कोष्टकें दिलीं आहेत, त्यांतील निदान तीनचतुर्थांश तरी शब्द मराठीहून मुळींच भिन्न नाहींत. त्या खिस्ती मंडळींना, कदाचित् मराठी येत नसल्यास ही चूक शोभते, पण चव्हाणांना शोभत नाहीं. शब्दकोशाच्या दृष्टीनें पाहता खुद्द चव्हाण-साहेबांनींच आपल्या चौदाव्या पानावर " हांव ताका नंचूना " = मी त्यावर विश्वास ठेवीत नाहीं, " कुडले यो " = लवकर ये; वगैरे **कानडीचा प्रभाव दाखविणारे प्रयोग कबूल केले आहेत,** अशीं उदाहरणें आणखी विपुल देतां येतील. पण ही गोष्ट द्राविड द्वेपापासून मुक्त असलेल्यांनाच मात्र पटण्यासारखी आहे. **कोंकणी ही मराठीच असल्यानें** तिच्यांत मराठी शब्द किती आहेत हा प्रश्नच उरत नाहीं पण तिच्यांत संस्कृत तत्सम, मराठी तद्भव, आणि पोर्तुगीजशिवाय दुसऱ्या भाषांचे इतके शब्द आहेत कीं, ते द्राविड अगर आर्येतर भाषांतूनच आले असणे शक्य आहे. खालीं कांहीं कोंकणी म्हणी देतो. त्यांत ज्या शब्दाखालीं टिंबे दिलीं आहेत त्याच्याशीं संस्कृताचा फार दूरान्वय लागतो; व ज्यांच्याखालीं रेघ आहे त्यांचा संस्कृताशीं मुळींच संबंध लागत नाहीं, म्हणून ते आर्येतर शब्द असले पाहिजेत. हा संबंध कानडीच्या द्वारा लागतो, कीं तुळूच्या द्वारा, किंवा इतर कोणत्याहि आर्येतर भाषेच्या द्वारा हे नूतं

ठरविणें फारच कठीण आहे. तरी ते बहुतकरून द्राविड शब्द असावेत असें अनुमान करण्याला पंडितांनीं इतकें नाखुश कां असावें हें कळत नाहीं.

१ तोण्णी थोडी पूण खोंड वळो = तण (गवत) थोडे पण खड्डा मोठा. ह्यांतील तण थोडी व खड्डा हे शब्द मराठींत आहेत. थोडी आणि वळ्ळे हे शब्द कानडींत आहेत. पूण हा शब्द पुन: ह्याचा अपभ्रंश आहे. अपभ्रंश महानुभावी मराठींतच सर्वत्र आढळतो. पूण हा एक शब्द वगळला तर ही सर्व म्हण आर्येतर शब्दांची आहे हें उघड दिसतें.

२ दुवेक तेल आमास पुणवेक सुनेक दिवाळीचे दिवाळीक. मुलीला अमावास्येला व पौर्णिमेला तेल व सुनेला दिवाळीस. दूव = दुहिता हा संस्कृत शब्द मराठीपासून स्वतंत्र आहे. आमास आणि पुनव हे शब्द कानडीचे द्वारा अपभ्रंश पावलेले. संस्कृत द्रतव आहेत.

३ वकाल गोरे खायना, वाण भरले विकनांनीं = वधू (नवीन सून) (फणसाचे) गरे खात नाहीं (असें दिसतें मात्र), उखळ मात्र बियांनीं भरलें. ती चोरून खात असावी असा अर्थ. ह्यांत वकाल (वक्कल) हा कानडी शब्द आहे. वाण ह्याचें निरुक्त लागत नाहीं. बिकन हें श्री ह्या अर्थी मराठी शब्दाहून निराळें रूप आहे.

(१४) अशा दृष्टीनें शोध करून कोंकणींतल्या असंख्य शब्दाचा माग लावल्यास ते दूरान्वित तद्भव आहेत किंवा कोंकणांतलेच मूळ देश्य आहेत हें दिसून येईल; आणि हे शब्द इतके विपुल आणि कोंकणीशीं इतक्या जुन्या काळापासून एकजीव झालेले आहेत कीं, कोणाहि परप्रेरित पंडिताला कोंकणी ही आमूलाग्र आर्य भाषाच आहे *आणि तिचा एक वेळ लॅटिनशींहि संबंध पोंचेल, पण द्राविड भाषांशीं पोंचणार नाहीं,* असा तोरा मिरविण्याला मुळींच अवकाश सापडेल असें दिसत नाहीं. माझा मुख्य मुद्दा असा आहे कीं, खुद्द मराठीचा जसा कानडीशीं निकट संबंध आहे, तसा शब्दकोशाच्या दृष्टीनें तरी क्वचित्‌ना जास्तच कोंकणीचाहि कानडी, तुळु, मल्याळी इत्यादि भोंवतालच्या द्राविडी भाषांशीं संबंध आणि ऋणानुबंध खास आहे.

कोंकणींत मराठींतल्याहून भिन्न अशा कांहीं देश्य शब्दांचाच भरणा नसून तिच्यांत कांहीं स्वतंत्र संस्कृत तद्भवांचाहि बराच भरणा आहे; त्यावरून ती भाषा *कित्येक परकीय पंडितांना मराठीपासून स्वतंत्र असावी असा भास होण्याचा संभव क्वचित* आहे, पण ही खरी स्वतंत्रता कशी नव्हे वगैरे गोष्टींचा खुलासा खालीं २० व्या व २१ कलमांत केला आहे.

## व्याकरण

(१५) कोणत्याहि दोन भाषांचा परस्पर संबंध ठरवावयाचा असल्यास केवळ शब्दकोशाचा पुरावा फारसा महत्त्वाचा नाहीं, हें दाल्गादो यांचें म्हणणें अगदीं खरें आहे. खरी तुलना करणाऱ्यांनीं त्या भाषांच्या व्याकरणाची आणि स्वरशास्त्राच्या दृष्टीनें त्यांच्या स्वरवैशिष्ट्याची म्हणजे Phonology चीच केली पाहिजे. ही तुलना करीत असतां दाल्गादो-सारख्या जाड्या अनेक भाषाभिज्ञाला मराठी ही कोंकणीची आई नसून फार तर बहीण असावी, आणि ती धाकटी बहीण असावी, असें कां मत द्यावें लागलें ह्याचा खुलासा होतो. इतकेंच नव्हे तर ह्या पंडितांच्या ह्या मतात पुष्कळच तथ्य असावें, हें कबूल करणेंहि भाग पडतें. परंतु एतद्विषयक एक मोठी अडचण अशी आहे कीं, कोंकणींतील सारस्वत पोर्तुगीजांनीं नष्ट केल्यामुळें ह्या भाषेची वाढ कशी झाली हें समजून तिचें मराठीशीं तंतोतंत नातें कसें आहे हें निश्चित ठरविणें अत्यंत कठीण झालें आहे. वरील ऐतिहासिक विवेचनांत एवढेंच सुचविण्यांत आलें आहे कीं, ह्या दोन्ही भाषांचें परस्पर नातें नसून त्या परस्परभिन्न आणि स्वतंत्र आहेत असें जर कोणी म्हणेल तर तें खरें ठरणार नाहीं; उलट ह्याचें फार जवळचें नातें आहे. आतां त्याच्या पुढें जाऊन हें जवळचें नातें मायलेकींचें आहे, कीं वहिणीवहिणींचें आहे, हें दिसेल तितकें पाहावयाचें आहे. कोंकणींत पोर्तुगीजांच्या जुल्मामुळें ग्रंथरचना तर अशक्यच होती; तथापि कोंकणीचा पोर्तुगीज कोश आणि तिच्यांतल्या म्हणींचा संग्रह वगैरे जे विद्वत्ता-पूर्ण ग्रंथ दाल्गादो ह्यांनीं प्रसिद्ध केले, इतकेंच नव्हे तर तिचें नीट अध्ययन रूढ व्हावें, म्हणून त्या पंडितानें जे स्वार्थत्याग सोसून व मार्गांत कर्मठ धर्माधिकाऱ्यांनीं जीं विघ्नें उप-स्थित केलीं त्यांना न जुमानतां दीर्घ प्रयत्न केले ते तर चिरस्मरणीय आहेत. थोडक्यांत सांगावयाचें तर, ह्या पंडिताचे तौलनिक भाषाशास्त्रावर फार मोठे उपकार झाले आहेत, ही गोष्ट विशेषतः हिंदी देशभक्तांनीं सदैव ध्यानात बाळगण्यासारखी आहे, हें जाणूनच पुढील तुलनेकडे वळणें बरें. एरवीं कृतघ्नतेच्याच नव्हे तर उथळपणाच्याही दोषाला आम्ही पात्र होऊं.

## साधित शब्द

(१६) आपण वर सिद्ध शब्दांचा विचार केला. ह्यापुढें आपण व्याकरणात शिरणार आहों. म्हणून प्रथम साधित शब्दांचा विचार करूं. कोंकणींतील व मराठींतील धातुसाधितांमध्यें साम्यभेद खालील कोष्टकावरून सहज दिसेल.

| | मराठी | | कोंकणी | |
|---|---|---|---|---|
| | सकर्मक | अकर्मक | सकर्मक | अकर्मक |
| वर्तमानकालवाचक | निजत | मारीत | निदत | मारीत |
| भूतकालवाचक | निजलेला | मारलेला | निदललो | मारलले |
| | निजून | मारून | निदोन | मारून |
| भविष्यकालवाचक | निजतां | मारतां | निदतो | मारतो |
| | ...... | ...... | निदतलो | मारतलो |
| | निजणार | मारणार | निदमार | मारणार |
| | निजतांना | मारतांना | निजतांना | मारतांना |
| सामान्यकालवाचक धातुसाधितनाम | निजणें | मारणें | निदोंक | मारूंक |
| | | | निदचें | मारचें |
| | | | निदच्येक | मारच्येक |

वरील कोष्टकावरून वाचकांच्या ध्यानांत सहज येईल कीं, कोंकणीचें मराठीशीं जितकें साम्य आहे तितकें इतर कोणत्याहि मृत अथवा जिवंत भाषेशीं नाहीं; आणि जेथें भेद आहे तेथें तो केवळ उच्चाराचा आहे; किंवा कोंकणींत कांहीं साधितांचीं रूपंच वेगळीं आणि जास्त आहेत. हाच प्रकार खालील कोंकणी प्रत्ययांवरून नामाच्या विभक्तींसंबंधानें आणि क्रियापदांच्या काळांच्यासंबंधानेंहि दिसून येत आहे. तो असा :—

| विभक्ति | एकवचनी प्रत्यय | अनेकवचनी प्रत्यय |
|---|---|---|
| प्रथमा | मूळरूप | विकार |
| द्वितीया | क, का | क, कां |
| तृतीया | न, ए, शीं | नीं, ईं, शीं |
| चतुर्थी | क, का | क, कां |
| पंचमी | ऊन, थान, च्यान, ज्येन, आक् | ऊन, थान, च्यान, आक् |
| षष्ठी | चो, ची, चें; चे, च्यो, चीं; जो, जी, जें; | चो, ची, चें; च्ये, च्यो, चीं |
| सप्तमी | आ, ई, न्त, र, चेर, ग्वेर. [जे, ज्यो, जीं | आ, ई, न्त, नि, र, चेर, ग्वेर |
| संबोधन | सामान्यरूप. | नो, नू |

वरील कोष्टकावरून दिसून येईल कीं, द्वितीया आणि चतुर्थीशिवाय बाकी प्रत्यय बहुतेक मराठीमारखेच आहेत. मात्र कोंकणींत कांहीं विभक्तींत निराळे जास्त प्रत्यय आहेत ते मराठींत नाहींत. पंचमीचे प्रत्यय ' च्यान ', ' ज्येन ' हे व्यावहारिक मराठींत आढळतात; जसें, माझ्येन किंवा माझ्याच्यानें हें काम होत नाहीं. मराठीच्या लिखाणांत जरी ' रामानें ' अशी तृतीया होते, तरी बोलण्यांत कोंकणीप्रमाणें ' रामानं '

असेंच रूप होतें. ह्याशिवाय विशेष महत्त्वाचें साम्य म्हणजे नामाचीं सामान्यरूपें बहुतेक सर्व मराठीप्रमाणेंच कोंकणींतहि होतात.

(१७) क्रियापदांच्या काळांचीं रूपें पाहिलीं असतां कोंकणीचें इतर कोणत्याहि चालू प्राकृतापेक्षां मराठीशीं विलक्षण साम्य आहे. इतकेंच नव्हे, तर गुजराती, सिंधी, अगर हिंदीपेक्षांहि, बंगाली अथवा ओरिया भाषेंतील काळांच्या आणि प्रयोगांच्या रूपांकडे तिच्या रूपांचा अधिक कल झुकत आहे, आणि तसाच मराठीच्याहि रूपांचा झुकत आहे. ह्या गोष्टीवरून मराठी भाषा, बंगालचा पश्चिम भाग आणि ओरिसा ह्या प्रांतांतून प्रवास करून दक्षिणेंत आल्यावर तिचें जें रूप बनलें, तें रूप सारस्वतांनीं कोंकणांत नेलें असावें असें अनुमान होतें. उदाहरणार्थ, भूतकाळचा 'ल' आणि भविष्यकाळचा 'न' अथवा 'ल' हा आदेश बंगालींत, ओरियेंत आणि मराठींत आहे. तो गुजरातींत, सिंधींत किंवा हिंदींत नाहीं. पण तोच नेमका कोंकणींत मान्य आढळतो. ह्या भविष्यकाळच्या 'ल'वरून आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा पुरावा लागत आहे, तो असा. व्याकरणकार रा. भि. जोशी ह्यांनीं आपल्या प्रौढबोध व्याकरणांत (पानें १६१, १६२ कलम (ई)) मराठींतील जुन्या आणि नव्या भविष्यकाळाचा विचार करीत असतांना म्हटलें आहे कीं, जुन्या मराठींत म्हणजे इसवी सन १२०६ ह्या वर्षापर्यंत जुन्या वर्तमानकाळाप्रमाणेंच भविष्यकाळाचीं रूपेंहि असत. इसवी सन १२८६ च्या परळ येथील मराठी शिलालेखांच्या "जो कोणी हुवी ए शासन लोपी", ह्या वाक्यांतील हुवी आणि लोपी हें वर्तमानकाळीं प्रयोग भविष्यकाळीं योजिले आहेत. तसेंच इसवी सन १२०६ च्या पाटणच्या मराठी शिलालेखांतील "येथें जें मविजे तें मढीचेन मापें मवावें" ह्या वाक्यांत मविजे हें वर्तमानकाळाचें रूप भविष्यकाळीं योजिलें आहे. पण ज्ञानेश्वरींत (इसवी सन १२९०) आणि त्याच्यापुढील काळांत ह्याच रूपापुढें 'ल' हा प्रत्यय लागून भविष्यकाळाचा प्रयोग होऊं लागला. हा मराठीचा 'ल' प्रत्ययच कोंकणींत 'लो' ह्या रूपानें आहे. जोशी आपल्या ह्याच (ई) कलमाचे आरंभीं म्हणतात, "हा भविष्यकाळाचा 'ल' कसा आला, कोठून आला हें सांगता येत नाहीं." परंतु कानडींच्या भविष्यकाळाच्या रूपांत नु, लु, रु असे प्रत्यय आहेत, त्यावरून मराठींत व कोंकणींतहि हे कानडी 'न' आणि 'ल' हे प्रत्यय अगर आदेश आले असावेत; शिवाय खुद्द जोशी आपल्या त्याच पानावरील (आ) ह्या कलमांत हा भविष्य-काळचा 'ल' जुनी मारवाडी, गरवाली, कमाउनी आणि नेपाळी ह्यामध्यें एकवचनी 'लो' आणि अनेकवचनी 'ला' असा आहे," असें जे म्हणतात, त्यावरूनच सारस्वतांच्या द्वारां हा 'ल' मराठींत आला असें म्हणण्यास काय हरकत आहे? इतकेंच नव्हे तर ह्या 'ल' ला जरी मराठींत जोशी म्हणतात त्याप्रमाणें "लिंग आणि वचन ह्या दोहोंचाही भेद नाहीं," तरी कानडी आणि कोंकणी ह्या दोन्ही भाषांत ह्या दोहोंचाहि भेद आहे. ह्या विलक्षण साम्यावरून, मराठीचा आणि सारस्वत ब्राह्मणाचा

समागम इ. स. १२०६ आणि १२९० च्या दरम्यान घडला असावा व त्यानंतर हे लोक ही नवीन अर्धवट संपादलेली ज्ञानेश्वरीच्या काळची जुनी मराठी घेऊन कोंकणांत गेले असावेत. त्यानंतर त्यांचा आणि सह्याद्रीच्या पूर्वेकडील मराठीचा संबंध तुटल्यामुळें, आणि कानडीचा संबंध जास्त जडत चालल्यामुळें, त्यांच्या भाषेत कानडी शब्दांचाच नव्हे तर, कांहीं क्रियापदांच्या रूपांचीहि भर पडत चालली. उदाहरणार्थ, "मला माहीत नाहीं" ह्या अर्थी कोंकणींत "माका गोत्त ना" असें म्हणतात. ह्या "गोत्त" शब्द निव्वळ कानडी आहे. आणखी पुष्कळशा शब्दांवरून, नामाच्या विभक्तींवरून आणि क्रियापदांच्या काळावरून कोंकणीचें जुन्या मराठीशीं साम्य नवीन मराठीपेक्षा किती तरी जास्त दाखवितां येतें. पण पुढच्या काळांत मात्र तिचें कानडीशीं साम्य आढळतें. संयुक्त प्रांत, विहार आणि बंगाल ह्या प्रांतांवर इ. स. १३०० शतकांत मुसलमानांनीं अनेक स्वाऱ्या करून तेथील लोकांचा अनन्वित छळ केला: बौद्ध धर्मांचा आणि मठांचा उच्छेद केला; म्हणून ते लोक उत्तरेस नेपाळांत व दक्षिणेंत ओरिसा प्रांतांत जीव घेऊन पळाले. त्याच धांदलींत गौडसारस्वत ब्राह्मणहि त्याच मार्गानें प्रथम गोदावरीच्या तीरावर आणि नंतर कोंकणांत उतरले असावेत. तेथें विजयनगरच्या कानडी साम्राज्यछत्राखालीं, पोर्तुगीजांची धाड येईपर्यंत, त्यांनीं आपल्या वसाहती सुखानें चालविल्या असाव्यात. ही उपपत्ति त्या काळीं घडलेल्या उत्तरेकडील व दक्षिणेकडील राज्यक्रांतीला अगदीं सुसंगतच आहे.

(१८) कोंकणीचा दुसऱ्या कोणत्याहि चालू प्राकृतापेक्षां मराठीशींच संबंध असल्याचें व त्यांतल्यात्यांत, बंगाली व ओरियाशीं संबंध असलेल्या मराठीशींच अधिक संबंध असल्याचें खालील गोष्टींवरून आणखी सिद्ध होतें. मराठींतील पंचमी विभक्तीचे "ऊन", "हून" हे, "होऊन" ह्या धातुसाधितावरून आले आहेत. जुन्या मराठींत 'घर होऊन' (घराहून) असें जें रूप क्वचित् आढळतें तें बंगालींतील घर "होइते" ह्या रूपाबरहुकूम आहे. हिंदी भाषेत द्वितीया आणि चतुर्थीचे प्रत्यय कु, को असे आहेत. आणि बंगालींत पंचमी "होइते" (होऊन) ह्या धातुसाधितावरून होते; ह्या दोन कारणांवरून सारस्वतांनीं ही भाषा उत्तरेकडून आणिली म्हणावी, तर इतर बहुतेक सर्व विभक्तींचे प्रत्यय — विशेषतः तृतीयेचे प्रत्यय दुसऱ्या कोणत्याहि भाषांशीं जुळते नसून मराठीशींच जुळतात. ह्यावरून सारस्वतांनीं दक्षिणेंत आल्यावरच ही भाषा घेतली असेंहि होतें. इतर भाषांतून एकेका विभक्तीचा बहुधा एकेकच प्रत्यय आहे. संस्कृताचाहि हाच प्रकार आहे. पण मराठीचे प्रत्यय एकेका विभक्तीला तीन चार आहेत आणि कोंकणींत तर त्याहूनहि जास्त आहेत. क्रियापदाचे काळहि ह्या दोन भाषांचे इतरांपेक्षा जास्त आहेत. ह्यावरून ह्या दोन्ही भाषा फिरत्या स्थितींतल्या लोकांच्या आहेत, आणि कोंकणी तर त्यातल्यात्यात जास्त आहे, हें उघड दिसतें. कोंकणींतले कांहीं काळ किंवा अर्थ हल्लींच्या नव्या मराठींत जरी प्रचारांत फारसे नाहींत तरी पूर्वी जुन्या मराठींत ते होते. हांव निजें = मी निजें; हांव मारीं = मी मारीं; तो करी = तो करी; ते करीत = ते करीत; हीं

रीतिभूतकाळाचीं रूपें कोकणींतलीं जुन्या मराठीसारखींच आहेत. हांव चालों, आमी करूं, तो करों, ते करोत हा कोंकणी विध्यर्थ जुन्या मराठींतहि होता. "चालों वाटे, आम्ही तुझाचि आधार" (तुकाराम), "सदाहि हित नायकों, बहु अपाय केले, करूं" (मोरोपंत). आणखी एक बारीक पण विलक्षण साम्य कोकणींत आणि मराठींत आहे, ते दुसऱ्या कोणत्याहि भाषांत आढळत नाहीं. तें असें : सकर्मक क्रियापदाच्या रूपांत "इ" हा आदेश होतो तो अकर्मकांत होत नाहीं. जसें, "हांव निजतां"= मी निजतों: "हांव मारीन" = मी मारीन. चमत्कार हा कीं, मराठींत हा "इ" आदेश विकल्पानें होतो, तसा कोकणींतहि तो विकल्पानेंच होतो!

(१९) हे सर्व प्रकार, व्याकरणाच्या ज्या रूपांनीं मराठी आणि कोकणीमधील साम्य सिद्ध होतें, त्यासंबंधीं झाले. आतां मराठींत जीं रूपें आहेत तीं कोकणींत नाहींत, आणि कोकणींत आहेत तीं मराठींत नाहीत त्याची वाट काय? आणि तींच तर वादाचा मुख्य विषय आहेत. कारण त्यांवरूनच दाल्गादोसारख्या पंडितांना, मराठीपासून कोंकणी भिन्न आणि स्वतंत्र असावी, अशी शंका येत आहे. वर निर्दिष्ट केलेल्या ऐतिहासिक परिस्थितीवरून आणि व्याकरणाच्या समान रूपांवरून कोकणी ही मराठीपासून भिन्न नाहीं हें सिद्ध झालें, तरी तिचा कांहीं कांहीं भाग मराठीपासून स्वतंत्र आहे, तो कशामुळें ह्याचा उलगडा करणें आवश्यक आहे. हें परस्पर स्वातंत्र्य ह्या दोन्ही भाषांतील जीं भिन्न भिन्न कालांचीं व अर्थांचीं रूपें आहेत त्यावरून मुख्यतः दिसून येतें. ह्याचा उलगडाहि ह्या भाषांच्या घटनेच्या इतिहासांतच सांपडणें शक्य आहे. ह्या दोन्ही भाषा उत्तरेकडून खालीं आलेल्या लोकांच्या आहेत. हे लोक निरनिराळ्या वेळीं आणि विंध्याद्रीच्या पूर्व आणि पश्चिम टोकाला वळसा घालून दक्षिणेंत उतरले आहेत. इतकेंच नव्हे, तर हे लोक म्हणजे सारस्वत ब्राह्मण आणि मराठे हे कांहीं काळ एकत्र राहून पुनः वेगळे राहूं लागले आहेत, व पुनः त्याच्यामध्यें सह्याद्रि आडवा पडला आहे. नर्मदेच्या उत्तरेकडील अथवा पूर्वेकडील दुसऱ्या कोणत्याहि चालू भाषाचा असा प्रकार घडलेला नाही. त्या, जुन्या पैशाची, शौरसेनी, मागधी, अर्धमागधी अथवा महाराष्ट्री ह्यापैकीं कोणत्या तरी एका प्राकृतांतून निर्माण होऊन, पुढें निश्चल आणि निर्विघ्न वाढत गेल्या, पण मराठीला मात्र विंध्याद्रीच्या दोन्ही टोकाला वळसे घालावे लागले आहेत, म्हणून हिच्यांत वरील चारपांचहि प्राकृतांची भेसळ झाली आहे. इतकेंच नव्हें तर तिचें चाळपण, मी 'केसरी'तील उपरिनिर्दिष्ट लेखांत सिद्ध केल्याप्रमाणें मानर्डाच्या तालमींत वाढलें आहे. निराळ्या वेळीं पण अगदीं असाच प्रकार कोकणीचाहि घडला आहे. ह्या परिस्थितीमुळेंच ह्या दोन्ही चालू भाषा इतर उत्तरेकडील किंवा पूर्वेकडील भाषांपासून जशा अगदीं भिन्न आहेत तशाच किंचित् अशानें परस्परांपासूनहि अगदीं भिन्न नसल्या तरी स्वतंत्र असल्याचा भास होण्याइतक्या वेगळ्या आहेत. हें स्वातंत्र्य स्पष्ट करून दाखविण्यासाठीं खालीं कांहीं उदाहरणें देतों.

(२०) राव. ग. चव्हाण ह्यांनीं आपल्या व्याख्यानाच्या १४ व ३२ पानांवर कोंकणी

समागम इ. स. १२०६ आणि १२९० च्या दरम्यान घडला असावा व त्यानंतर हे लोक ही नवीन अर्धवट संपादलेली ज्ञानेश्वरीच्या काळची जुनी मराठी घेऊन कोंकणांत गेले असावेत. त्यानंतर त्यांचा आणि सह्याद्रीच्या पूर्वेकडील मराठीचा संबंध तुटल्या-मुळें, *आणि कानडीचा संबंध जास्त जडत चालल्यामुळें, त्यांच्या भाषेंत कानडी शब्दां*-चाच नव्हे तर, कांहीं क्रियापदांच्या रूपांचीहि भर पडत चालली. उदाहरणार्थ, "मला माहीत नाहीं" ह्या अर्थी कोंकणींत "माका गोत्त ना" असें म्हणतात. ह्या "गोत्त" शब्द निव्वळ कानडी आहे. त्याणखी पुष्कळशा शब्दांवरून, नामाच्या विभक्तींवरून आणि क्रियापदांच्या काळावरून कोंकणीचें जुन्या मराठीशींच साम्य नवीन मराठीपेक्षां किती तरी जास्त दाखवितां येतें. पण पुढच्या काळांत मात्र तिचें कानडीशीं साम्य आढळतें. संयुक्त प्रांत, बिहार आणि बंगाल ह्या प्रांतांवर इ. स. १३०० शतकांत मुसलमानांनीं अनेक स्वाऱ्या करून तेथील लोकांचा अनन्वित छळ केला; बौद्ध धर्माचा आणि मठांचा उच्छेद केला; म्हणून ते लोक उत्तरेस नेपाळांत व दक्षिणेंत ओरिसा प्रांतांत जीव घेऊन पळाले. त्याच धांदलींत गौडसारस्वत ब्राह्मणहि त्याच मार्गानें प्रथम गोदावरीच्या तीरावर आणि नंतर कोंकणांत उतरले असावेत. तेथें विजयनगरच्या कानडी साम्राज्यछत्राखालीं, पोर्तुगीजांची धाड येईपर्यंत, त्यांनीं आपल्या वसाहती सुखानें चालविल्या असाव्यात. ही उपपत्ति त्या काळीं घडलेल्या उत्तरेकडील व दक्षिणे-कडील राज्यक्रांतीला अगदीं सुसंगतच आहे.

(१८) कोंकणीचा दुसऱ्या कोणत्याहि चालू प्राकृतापेक्षां मराठीशींच संबंध असल्याचें व त्यांतल्यात्यांत, बंगाली व ओरियाशीं संबंध असलेल्या मराठीशींच अधिक संबंध असल्याचें खालील गोष्टीवरून आणखी सिद्ध होतें. मराठींतील पंचमी विभक्तीचे "ऊन", "हून" हे, "होऊन" ह्या धातुसाधितावरून आले आहेत. जुन्या मराठींत 'घर होऊन' (घराहून) असें जें रूप क्वचित् आढळतें तें बंगालींतील घर "होइते" *ह्या रूपावरहुकूम आहे. हिंदी भाषेंत द्वितीया आणि चतुर्थीचे प्रत्यय कु, को* असे आहेत. आणि बंगालींत पंचमी "होइते" (होऊन) ह्या धातुसाधितावरून होते; ह्या दोन कारणावरून सारस्वतांनीं ही भाषा उत्तरेकडून आणिली म्हणावी, तर इतर बहुतेक सर्व विभक्तींचे प्रत्यय – विशेषतः तृतीयेचे प्रत्यय दुसऱ्या कोणत्याहि भाषांशीं जुळते नसून मराठीशींच जुळतात. ह्यावरून सारस्वतांनीं दक्षिणेंत आल्यावरच ही भाषा घेतली असेंहि होतें. इतर भाषांतून एकेका विभक्तीचा बहुधा एकेकच प्रत्यय आहे. संस्कृताचाहि हाच प्रकार आहे. पण मराठीचे प्रत्यय एकेका विभक्तीला तीन चार आहेत आणि कोंकणींत तर त्याहूनहि जास्त आहेत. क्रियापदाचे काळहि ह्या दोन भाषांचे इतरांपेक्षां जास्त आहेत. ह्यावरून ह्या दोन्ही भाषा फिरत्या भिर्तीतल्या लोकांच्या आहेत, आणि कोंकणी तर त्यांच्यापैकीं जास्त आहे, हें उघड दिसतें. कोंकणींतले कांहीं काळ किंवा अर्थ *हल्लींच्या नव्या मराठींत जरी प्रचारांत फारसे नाहींत तरी पूर्वीं जुन्या मराठींत ते होते.* हांव निजें = मी निजें; हांव मारीं = मी मारीं; तो करी = तो करी; ते करीत = ते करीत; हीं

रीतिभूतकाळाचीं रूपें कोंकणींतली जुन्या मराठीसारखींच आहेत. हांव चालों, आमी करूं, तो करों, ते करोत हा कोंकणी विध्यर्थ जुन्या मराठीतहि होता. "चालों वाटे आम्ही तुझाचि आधार" (तुकाराम), "सदाहि हित नायकों, बहु अपाय केले, करूं" (मोरोपंत). आणखी एक धारांक पण विलक्षण साम्य कोंकणींत आणि मराठींत आहे, ते दुसऱ्या कोणत्याहि भाषांत आढळत नाही. तें असें : सकर्मक क्रियापदाच्या रूपांत "इ" हा आदेश होतो तो अकर्मकांत होत नाही. जसें, "हांव निजतां"= मी निजतों: "हाव मारीन" = मी मारीन. चमत्कार हा कीं, मराठींत हा "इ" आदेश विकल्पानें होतो, तसा कोंकणींतहि तो विकल्पानेंच होतो!

(१९) हे सर्व प्रकार, व्याकरणाच्या ज्या रूपांनीं मराठी आणि कोंकणीमधील साम्य सिद्ध होतें, त्यासंबंधीं झाले. आतां मराठींत जी रूपें आहेत तीं कोंकणींत नाहीत, आणि कोंकणींत आहेत तीं मराठींत नाहीत त्याची वाट काय? आणि तीच तर वादाचा मुख्य विषय आहेत. कारण त्यांवरूनच दाल्गादोसारख्या पंडितांना, मराठीपासून कोंकणी भिन्न आणि स्वतंत्र असावी, अशी शंका येत आहे. वर निर्दिष्ट केलेल्या ऐतिहासिक परिस्थितीवरून आणि व्याकरणाच्या समान रूपांवरून कोंकणी ही मराठीपासन भिन्न नाहीं हे सिद्ध झाले, तरी तिचा कांहीं काही भाग मराठीपासून स्वतंत्र आहे, तो कशामुळें ह्याचा उलगडा करणें आवश्यक आहे. हें परस्पर स्वातंत्र्य ह्या दोन्ही भाषांतील जी भिन्न भिन्न कालांचीं व अर्थाचीं रूपें आहेत त्यांवरून मुख्यतः दिसून येतें. ह्यांचा उलगडाहि ह्या भाषांच्या घटनेच्या इतिहासातच सांपडणें शक्य आहे. ह्या दोन्ही भाषा उत्तरेकडून खालीं आलेल्या लोकांच्या आहेत. हे लोक निरनिराळ्या वेळीं आणि विंध्याद्रीच्या पूर्व आणि पश्चिम टोकाला वळसा घालून दक्षिणेंत उतरले आहेत. इतकेच नव्हे, तर हे लोक म्हणजे सारस्वत ब्राह्मण आणि मराठे हे कांहीं काळ एकत्र राहून पुनः वेगळे राहूं लागले आहेत, व पुनः त्यांच्यामध्यें सह्याद्रि आडवा पडला आहे. नर्मदेच्या उत्तरेकडील अथवा पूर्वेकडील दुसऱ्या कोणत्याहि चालू भाषांचा असा प्रकार घडलेला नाहीं. त्या, जुन्या पैशाची, शौरसेनी, मागधी, अर्धमागधी अथवा महाराष्ट्री ह्यापैकीं कोणत्या तरी एका प्राकृतांतून निर्माण होऊन, पुढें निश्चल आणि निर्विघ्न वाढत गेल्या, पण मराठीला मात्र विंध्याद्रीच्या दोन्ही टोकांना वळसे घालावे लागले आहेत, म्हणून हिच्यांत वरील चारपांचहि प्राकृतांची भेसळ झाली आहे. इतकेंच नव्हे तर तिचें बाळपण, मी 'केसरी'तील उपरिनिर्दिष्ट लेखांत सिद्ध केल्याप्रमाणें कानडीच्या तालमींत वाढलें आहे. निराळ्या वेळीं पण अगदीं असाच प्रकार कोंकणीचाहि घडला आहे. ह्या परिस्थितीमुळेंच ह्या दोन्ही चालू भाषा इतर उत्तरेकडील किंवा पूर्वेकडील भाषांपासून जशा अगदीं भिन्न आहेत तशाच किंचित् अंगानें परस्परांपासूनहि अगदीं भिन्न नसल्या तरी स्वतंत्र असल्याचा भास होण्याइतक्या वेगळ्या आहेत हे स्वातंत्र्य स्पष्ट करून दाखविण्यासाठीं खालीं काहीं उदाहरणें देतों.

(२०) राव. मा. चव्हाण ह्यांनीं आपल्या व्याख्यानाच्या १४ व ३२ पानांवर कोंकणी

*आणि मराठी शब्दांची तुलना करून, कोंकणी शब्द मराठी शब्दांपेक्षां संस्कृताला जवळ* आहेत असें ध्वनित केलें आहे. हांव = मी; उदक = पाणी; गीम = उन्हाळा; आयदन = मांडें; कुकट = कोंबडा, इ.; उलटपक्षीं, कुणबाऊ मराठींतील खालील उदाहरणें, नागर मराठींतल्या शब्दांपेक्षां संस्कृताला अधिक जवळ हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. कुणब्यांच्या भाषेंत "ध्या" म्हणजे दिवस असा शब्द आहे. ऋग्वेदांत वरुणाच्या स्तोत्रांत "*यच्चिद्धि ते विशो यथा प्रदेव वरुण व्रतम्। मिनिमसि द्यवि द्यवि ॥*" यातील द्यवि ह्याचा दिवस असा अर्थ आहे, त्याला वरील "ध्या" हा शब्द फार जवळ आहे. पुण्याकडील 'कुणबी' वत्र न म्हणतां 'पत्र' म्हणतात; हा शब्द प्रेक्ष-पेक्ष ह्याला नागर मराठींत वत्र पेक्षां अधिक जवळ आहे. करून शानी, देऊन शानी, हा कुणबी प्रयोग वेदांतील संस्कृतांत आढळतो, असें राजवाडे सांगतात. मराठींतील "हो" हाहि धातु संस्कृत "भू" चा अपभ्रंश आहे. पण कोंकणींत "जा" म्हणजे "हो" ह्या अर्थाचा शब्द संस्कृत जन्पासून झालेला ह्याच अर्थी आहे. "मुई जासी, साखर खासी" = मुंगी होशील तर साखर खाशील. ह्याच धातूपासून "जाय" असें एक साधित "पाहिजे" अशा अर्थी कोंकणींत आहे. "*दिवुळान् रिघतोंच शेण काढूंक जाय*" = देवळांत शिरतांच शेणहि काढावयाला (तयार असलें) पाहिजे. "*तुका जाय*"? = तुला पाहिजे काय? हिंदी व गुजरातीप्रमाणें मराठींत "चोर पकडला जातो" असा कर्मकर्तरी प्रयोग होतो. हा प्रयोग मराठींत नवा आहे. जुन्या मराठींत "धरिजे," "देखिजे" असा प्रयोग होतो. ह्याच रीतीनें कोंकणींत हा प्रयोग आहे. जसें :—"सोंदीर आणि संसार कोणाच्यान् चिंतून काढून न जो" = समुद्र आणि संसार कोणाच्यानेंहि चिंतून काढला जात नाहीं (थांग लागत नाहीं). ह्यांत "जो" हा शब्द मराठींतल्याप्रमाणें "जा" ह्या अर्थी नसून इंग्रजी कर्मकर्तरि *प्रयोगाप्रमाणें अस् = is ह्या अर्थी (is caught) असा आहे. अस्सल आर्य*-भाषेत कर्मकर्तरि प्रयोग होता कीं नाहीं ह्याची शंका आहे. तो प्राकृतात मात्र राजरोस आढळतो. संस्कृतांत तो आत्मनेपदींच आढळतो, व पदाचे प्रत्यय कानडीशीं अधिक जवळ आहेत म्हणून हा **कर्मकर्तरि प्रयोग कदाचित् द्राविड असावा अशी शंका येते.** असो. हें प्रकरणच स्वतंत्र आहे. तूर्त कोंकणींतल्या प्रयोग इंग्रजींतल्या प्रयोगाला किती जवळ आहे एवढें कळलें कीं पुरे. इंग्रजी भाषा सर्वस्वीं आर्य नाहीं हेंहि ध्यानात ठेवणें आवश्यक आहे.

(२१) वर ज्या शब्दांवरून कोंकणी ही मराठीपासून स्वतंत्र आहे असा भास होतो असे पुष्कळ शब्द इतरहि देता येतील. हे सर्व संस्कृत तद्भव आहेत. पण असले पुष्कळ संस्कृत तद्भव हल्लींच्या कुणबाऊ मराठींत किंवा जुन्या महानुभावींत आढळतात. ते नागर मराठींत सिवडुला कोंकणींतहि आढळत नाहींत. ह्यावरून ही जुनी महानुभावी अगर आतांची कुणबाऊ देखील मराठीपासून स्वतंत्र म्हणावयाची कीं काय? मात्र एवढें खरें कीं, कोंकणींत जे असे स्वतंत्र तद्भव सापडतात त्यांवरून ती

मूळ मराठीपासून कधीं फुटून वेगळी झाली हें ठरविण्याच्या कामीं कांहीसा अधिक पुरावा मिळतो. उदाहरणार्थ "वेगुवि" हें कोंकणी क्रियाविशेषणच घेऊं. हा शब्द जुन्या मराठींत "वेगोवित्तर" अशा रूपानें होता. आतां नाहीं. श्रीपतिकृत "रत्नमाला" नांवाचा एक त्रुटित ज्योतिषग्रंथ, शालिवाहन शके ९६१ सालांतला अगदीं जुना, भारत इतिहाससंशोधक मंडळानें आपल्या अहवालांत प्रसिद्ध केला आहे, त्याची भाषा अगदीं महानुभावी वळणावर आहे. त्यांतील प्रकरण ३, श्लोक १० मध्यें "वेगोवित्तर" असा मराठी शब्द आढळतो. संशोधक राजवाडे, ह्याचा अर्थ लागत नाहीं, असें तो म्हणतात हें कळत नाहीं. हा ग्रंथ म्हणजे मूळ संस्कृत श्लोक व त्यावरील त्याच वेळच्या मराठींतील टीका मिळून झाला आहे. "... अखिल (अश्लील) भोगानुभवं कुर्णां तैलाभ्यंगात् सपदि कुरुते सूर्यतनयः ॥ १० ॥" ह्या आपल्या संस्कृत श्लोकार्चे भाषांतर, ग्रंथकार श्रीपती आपल्याच तत्कालीन मराठींत असें करीत आहे :— "शनिश्चरे (शनिवारीं) पुरुषा(ला) तैलाभ्यंगास्तव वेगोवित्तर सकळभोग प्राप्ती" (१०) ह्यावरून "सपदि" ह्या संस्कृत शब्दाचें "वेगोवित्तर" ह्या तत्कालीन मराठी शब्दानें भाषांतर झालें आहे, हें उघड आहे. हाच शब्द 'वेगुवि' ह्या अपभ्रंशरूपानें हल्लींच्या कोंकणींत आहे व त्याच अर्थी, (वेगानें) असा क्रियाविशेषणवाचक आहे असें म्हणावयाला काय हरकत आहे? एकंदरींत हल्लींची कोंकणी ही मराठीपासून स्वतंत्र नसून तिच्यांतील कांहीं तद्भव व देश्य शब्द आणि व्याकरणाचीं रूपें जशीं सारस्वत ब्राह्मणांनीं आणिलीं आहेत तशींच कांहीं क्षत्रिय मराठ्यांनीं किंवा कुणब्यांनीं आणिलीं आहेत, असेंच अनुमान निघतें. शालिवाहन शके ९६१ त (इ. स. १०४०) जे सारस्वत ब्राह्मण व मराठे गोदावरीच्या आसपास मिळूनच होते, तेच वरील कलम (१७) मध्यें दर्शित केल्याप्रमाणें इ. स. १२०६–१२९० च्या दरम्यान विभक्त होऊन सारस्वत हे कोंकणात शिरून त्रावणकोरपर्यंत खालीं उतरले, आणि कुणबी व क्षत्रिय मराठे पुढें देशावरूनच खाली तंजावरापर्यंत द्राविड देशांत उतरले, असें मानण्यास काय हरकत आहे? असें न मानता उलट कोंकणी ही मराठीच नव्हे असें मानण्यास काय काय हरकती आहेत, त्यांचें विवरण वरील ऐतिहासिक विवेचनांत कलम ५ पासून १२ पर्यंत करण्यांतआलेंच आहे.

## स्वरवैशिष्ट्य

(२२) अनुस्वार :—कोंकणींत अनुनासिकांची लयलूट आहे, तशी मराठींत नाहीं. सदर्न मराठा रेल्वेनून गोव्याकडे जाऊं लागलें असतां, देशावरील माणसाला स्टेशनावरील नांवाच्या पाट्या वाचतांना अनुस्वारांची चंगळ पाहून मौज वाटते. तामिळ देशांत, रामेश्वरं, चिदंबरं, श्रीरंगं, वेंकटाचलं, मंडपं, अग्रहारं वगैरे पुल्लिंगी शब्दांवरहि अनुस्वार पाहून

प्रथमदर्शनीं संस्कृत येत नसतांहि तें येतें असें दाखविण्याचा तामिळांचा हा मोह असावा असें वाटतें. पण बिशप कॉल्डवेल्नें म्हटल्याप्रमाणें अशा शब्दांच्या पुढें पूर्वी "न" हें अर्धाक्षर होतें, त्याचा हा अनुस्वार झाला आहे. पालींत हा प्रकार आहे. "निद्दो होति निप्पापो धम्मपीतरसं पिवं ॥ ९ ॥" (धम्मपद, वग्ग १५ वा.) ह्यांत पिबन् ह्याचें पिवं असें रूप झालें आहे. असाच कांहीं तरी इतिहास ह्या कोंकणी अनुस्वाराचा असावा. त्यांत कोंकण्यांना गेंगाणे म्हणून हंसण्याचें कांहीं कारण नसून, उलट हा इतिहास त्यांनीं आपल्या अनुनासिकांच्या द्वारां कायम ठेविला ह्याबद्दल त्यांचे आभारच मानिले पाहिजेत.

(२३) रुंद स्वर :—इंग्रजींतील Bat, Ball ह्या शब्दांत असलेले अॅ, ऑ, ह्या स्वरांना अहमदाबादचे तौलनिक भाषाशास्त्री नरसिंगराव दिवाटिया हे रुंद स्वर असें म्हणतात. हे स्वर बंगालींत व कोंकणींत फार आहेत. हे स्वर नागर मराठींत नसले, तरी कुणबाऊ मराठींत आढळतात. यॅड (वेड) तॅल (तेल), वॉन् (गोण) हे स्वर रुंद आहेत. सर भांडारकर आपल्या "Wilson Phylological Lectures" मध्यें "The Law of Accentuation" संबंधीं बोलतांना, पाताळ, कापाड, वतान, जतान असे दीर्घ उच्चार कोंकणीचा विशेष म्हणून सांगत आहेत (पृष्ठ १९६). परंतु कुणबी मराठींत तर धोतार, मुस्लाड, बराण असे उच्चार आहेतच. शिवाय त्वांड, ग्वाड, प्वार, प्यार असे रुंद उच्चारहि विपुल आहेत. हे रुंद उच्चार संस्कृतांत मात्र नाहींत. पण कानडी बाराखडींत ए, ऍ, ऐ; ओ, ऑ, औ; असे तीन तीन स्वर आहेत. म्हैसूरकडील नागर कानडींत वेसर = कंटाळा, कोण = रेडा, असे दीर्घ स्वर आहेत. त्यांचेच हुबळीकडील कुणबाऊ कानडींत वॅसर अथवा ब्यासर, कॉण अथवा क्वाण असे रुंद स्वर होतात. ह्यावरून कोंकणीचा हा कांहीं विशेष नसून, हे स्वर मूळ द्राविडींतील किंवा मोंगली भाषेंतले असावेत, ते कोंकणींत आणि कुणबाऊ मराठींत कायम राहिले आहेत, पण नागर मराठींतून आणि नागर कानडींतून ते मागाहून गेले असावेत, असा तर्क करण्यास जागा आहे.

## संप्रदाय

(२४) संप्रदाय, म्हण (Idiom) विषयीं मला विशेष सांगतां येत नाहीं. कारण कोंकणीचा व माझा प्रत्यक्ष परिचय अल्प, आणि तोहि केवळ व्याकरणावरून मिळविलेला आहे. ह्या भागाचें विवरण ज्यांना दोन्ही भाषांचा बाळपणापासून निकट परिचय आहे त्यांनाच नीट करता येईल. दाल्गादो ह्यांनीं कोंकणी भाषेंतील म्हणींचा जो अपूर्व संग्रह केला आहे, त्यांतील कांहीं थोड्या म्हणी व त्यांचे अर्थ खालीं देऊन हें लांबलेले पुराण आटपतों. त्यावरून कोंकणी ही कशी जोरदार आणि मार्मिक बोली आहे ह्याची थोडीशी कल्पना वाचकांस होईल.

१. वसांऊचें थोडें दिवचें चड, हें जब्बर गोड = बोलावें थोडें आणि द्यावें फार, हें बरें.

२. लोखंड उदक प्याल्यार आतां कधींच मिळ न = तापलेल्या लोखंडानें उदक शोषण केल्यावर, मगरीनें गिळलेल्या मण्याप्रमाणें तें पुनः मिळण्याची आशा नसे.

३. वाटेन्नी हयांळी जगइना आणि मरइना = वाटेवरचें गवत जीर्ण होत नाहीं कीं मरतहि नाहीं — नम्र माणसें फार वेळ टिकतात.

४. गांवांतलो चोर व्हय, परगांवांतलो साव नय = स्वदेशी चोर बरा, पण परकीय साधु नको !

५. दुबैक मारुन सुनेक वॅकडावंक = लेकी बोले सुने लागे.

६. आडली सून कादले घरचे गुण = सुनेवरुन माहेरची पारख.

७. मोनेक स्वपन पडल्या सांगूं नो कळो = मुक्याला स्वप्न पडल्यास तो तें कसें सांगूं शकणार !

८. ते फिरंगे गेले आणि ते उंटे कावार झाले = मोठे लोक उठले कीं, मेजवानीहि आटपतेच. व्हानांनीं अर्धपोटींच हात धुतले पाहिजेत !

९. नेसली दांट विसरली वाट = मरकेदार लुगडें नेसलेली वया, त्या भरांत आपली वाट विसरुन भलतीकडेच चालली !

१०. उडाले कोले झाडली शेपटी = खाणें संपल्याबरोबर कोल्हा आपली शेपटी झाडून पसार होतो !

असो. तज्ज्ञांनीं मराठीच्या भोंवतालच्या द्राविड भाषांचें अधिक अध्ययन करून तौलनिक भाषाविषयावर अधिक अधिकारयुक्त प्रकाश पाडावा, म्हणजे शेवटल्या म्हणींतल प्रकार न घडून लेखकाचें समाधान होईल.

१

# कानडी आणि मराठी

## तुलनात्मक अध्ययन

मराठी व्याकरणकर्ते रामचंद्र भिकाजी जोशी हे हल्लीं आपल्या मराठी भाषेची घटना ह्या ग्रंथाची दुसरी आवृत्ति छापीत आहेत. त्यांत परिशिष्ट म्हणून वरील विषयावर एक लेख लिहावा अशी त्यांनीं मला विनंति केली. हिंदुस्थानांतील भाषांच्या व्युत्पत्तीची परिपूर्तता तौलनिक भाषाशास्त्राच्या साह्याशिवाय करूं पाहणें फार धाडसाचें, नव्हे धोक्याचें, आहे असें माझें फार दिवसांचें ठाम मत झालें असल्यानें, जोशी ह्यांचे विनंतीला मान देण्याची प्रथम मला छाती होईना. पण मजपेक्षां योग्य अधिकारी विद्वानांकडून त्यांची गरज भागेना म्हणून केवळ नाइलाजानें मीं हा लेख लिहिला. तो प्रमाणाबाहेर वाढला म्हणून त्याचा जरूर तेवढाच भाग जोशी ह्यांनी आपल्या परिशिष्टांत घेतला आहे. विद्वान् वाचकांनी निर्विकार मनानें ह्यांतील दोष दाखविल्यास मजवर फार उपकार होतील.

## पूर्वपीठिका

हाल नांवाच्या शातवाहन कर्त्यानें जुळविलेल्या " गाथा-सप्तशती " नावाच्या प्राकृत काव्यसंग्रहांतील ताल ३ ऱ्या शतकांतील ८९ व श्लोक असा आहे.

पोट्टं भरन्ति सउणावि माउआ अप्पणो अणुव्विग्गा विहलुद्धरण सहावा हुवन्ति जइ केवि सप्पुरिसा ॥ ८५ ॥ मराठींत अर्थ–पोटभरति पक्षी ही माई आपण अनुद्विग्न । विव्हलोद्धरण स्वभाव होती जरी कांहीं सत्पुरुष ॥ ८५ ॥

ह्यावरून खिस्ती शकाच्या सुमारें दुसऱ्या शकांतील महाराष्ट्री वाङ्मयाच्या भाषेशीं जुन्या व नव्या मराठीचा कसा काय संबंध लागतो ह्याची किंचित् ओशरती कल्पना येण्यासारखी आहे. अनेक प्राकृत भाषाकोविद जैन आचार्य मुनी विजयजी हे एकदां असे म्हणाले कीं, *ज्ञानेश्वरींची मराठी भाषा ही प्राकृत जाणणाराला जशी व जितकी* दुर्बोध वाटते तशी व तितकीच दुर्बोध हल्लींची मराठी जाणणारालाहि वाटते. ह्याचा अर्थ असा कीं, ज्ञानेश्वरी मराठी ही पूर्वीच्या प्राकृताहून जितकी अलीकडची तितकीच हल्लींच्या मराठीहून पलीकडची आहे. पण येवढ्यावरूनच ती दुर्बोध कां व्हावी? हिंदी, गुजराथी व बंगाली ह्या अर्वाचीन भाषांचा जुन्या प्राकृताशीं जितका संबंध जुळतो तितका मराठीचा कां जुळत नाहीं? त्याचें कारण मराठी ही कानडीचे मागून व तिच्या तालमीत किंबहुना सासुरवासांत वाढलेली भाषा आहे, म्हणून कानडीचा तिच्यावर जबर परिणाम झाला आहे. यदाकदाचित् वैदिक भाषेशीं मराठीचा संबंध असेलच तर तो कानडी भाषेचा मूळ द्राविडी भाषेशीं जितका दूरचा संबंध आहे त्याहून अधिक दूरचा असावा. तामिळपासून कानडी जितकी दूर आहे त्यापेक्षां शब्दकोशाच्या दृष्टीनें नसली तरी व्याकरणाच्या दृष्टीनें मराठी ही संस्कृतापासून जास्त दूर आहे. दूरीभाव डोळ्यात न भरण्याचें कारण असें कीं, आधुनिक मराठींत संस्कृत व तत्सम शब्दांचा भरणा फार होऊं लागल्यामुळें मराठी वस्तुतः आहे त्यापेक्षां संस्कृतच्यां जवळ असल्याचा भास होतो.

ज्ञानेश्वरीच्या मराठीचा उदय होऊं लागण्यापूर्वी वरीच शतकें कानडींतील लिखित वाङ्मयाची भरभराट होऊन चुकली होती. शके बाराशेंच्या पूर्वी मराठीच्या वाङ्मयाच्याच नव्हे तर शिलालेखांचाहि लगाचा तितका पत्ता अद्यापि लागत नाहीं. पण कानडीचा इतिहास ह्याहून अगदीं निराळा आहे. ता. २३ जुलै सन ६१३ च्या एक शिलालेखांत रविकीर्ति नांवाच्या एका जैनधर्मी कानडी कवीचा उल्लेख आहे तो भारवि आणि कालिदास ह्यांच्या तोडीचा होता असें त्याचें म्हणणें आहे. राष्ट्रकूट वंशांतील पहिला अमोघ वर्ष उर्फ नृपतुंग अथवा शव ह्या राजाचे नांवावर 'कविराजमार्ग' *नांवाचा अलंकारशास्त्रावरील एक कानडी ग्रंथ* प्रसिद्ध आहे. त्याचा काळ शके ७७५–७९९ चे दरम्यान आहे. ह्या पूर्वीच्या बऱ्याच ग्रंथांचे उल्लेख शिलालेखांतून मिळतात. पण ते ग्रंथ मात्र अद्यापि उपलब्ध नाहींत. ह्यानंतर १०२ शतकांनीं पंप आणि पोन्न हे कानडी कवि उदयास आले. पंपाचे आदिपुराण, रामायण, भारत इ. ग्रंथ प्रसिद्ध आहेत. केवळ लिखित व अभिजात वाङ्मयाच्या भाषेचा कानडीला हा मोठेपणाचा मान आहे असें नव्हे, तर विस्ताराच्या दृष्टीनेंहि हल्लीपेक्षां मध्ययुगीन कानडीचा मराठीहून अधिक मोठ्या प्रदेशावर विस्तार होता. "आनावेरियिंद आ गोदावरी

वरे गम " म्हणजे कावेरीपासून गोदावरीपर्यंत कानडीचें साम्राज्य पसरलें होतें. आणि त्यांतल्या त्यांत वक्कुंद ( बेळगांव ) आणि कोप्पळ ह्यांचेमधील प्रदेशांत तर अत्युत्कृष्ट अशा कानडीचा प्रचार होता अशा अर्थाचा उल्लेख " कविराजमार्ग " ह्या ग्रंथांत आहे असें प्रो. पाठक यांचें म्हणणें आहे. देवगिरीच्या यादव-घराण्यातील १२ व्या शतकांतल्या महादेव राजापर्यंत तरी कानडीच्या ह्या अबाधव्य प्रसाराला ओहोटी लागल्याचीं चिन्हें दिसत नाहींत. तोंपर्यंत महाराष्ट्राच्या निरनिराळ्या सम्राटांच्या राजधान्या खालीं कर्नाटकांतच बनवासी, बदामी, धनकटक, मालखेड इत्यादि दक्षिणेकडील शहरांत असल्यामुळें अर्थांतच अभिज्ञास मराठीच्या प्रसाराला गोदावरीच्या दक्षिणेकडे वाव मिळाला नाहीं. पण देवगिरीच्या यादवांच्या प्रतापामुळें महाराष्ट्राच्या राजकारणानेंच नव्हे तर वाङ्मयानेंदेखील जो अपूर्व उठाव केला आणि विशेषतः कानडीला दक्षिणेकडे रेटण्याची जी सुरुवात केली तिचा प्रभाव अद्यापि जाणवत आहे. मात्र आतां हा प्रसार बंद पडून लवकरच मराठीला मागें हटावें लागेल असें सेन्सस रिपोर्टाच्या आंकड्यांवरून दिसूं लागलें आहे.

## कानडी लिपि

कानडीचा वरचष्मा लिपींमध्येंहि दिसून येतो. खिस्त शकापूर्वी कदंब-घराण्यांतील राजानीं आपल्या दक्षिणेंतील स्वारीबरोबर मगध देशांतून जी एक ब्राह्मी लिपि नेली, तिचाच पुढें विकास होऊन हल्लींची कानडी व तेलगू लिपी झाली आहे असें भूलरचें मत आहे. ११ व्या शतकांत आढळणाऱ्या बालबोधीचें आणि हल्लींच्या कानडी वर्णमालेंतील बऱ्याच वर्णांचें साम्य दिसून येतें ते वर्ण ग, ण, क, द, ध, न, श, ल हे होत.

## शब्दकोश

मुसलमानी अमलांत मराठी शब्दकोशांत इ. स. १४ व्या, १५ व्या आणि १६ व्या शतकात अरबी, फारसी आणि उर्दू भाषेंतील शब्दांचा किती तीव्र वेगानें शिरकाव झाला तें ध्यानांत घेतलें असतां जितांच्या भाषेवर जेत्यांच्या भाषेचा किती लवकर पगडा बसतो हें समजतें. सतराव्या शतकाचे आरंभीं महाराष्ट्रांत मुसलमानी सत्तेचा कळस झाला होता. तेव्हांच्या दरबारी व्यवहारांतून चालू असलेल्या मराठी भाषेंत निम्मेअधिक, केव्हां केव्हां तीनचतुर्थांशाहूनहि अधिक, शब्द मुसलमानी भाषेचे असत. धार्मिक ग्रंथांतून आणि बायकांच्या तोंडांत मात्र मराठी भाषा कशीबशी जीव धरून होती. तथापि पेशवाई काळांत वामन, रघुनाथ, मोरोपंत इ० संस्कृतज्ञ पंडित कवींचा उदय होऊन चुकल्यामुळें मराठींत

तत्सम शब्दाचें थोडें प्रमाणाबाहेर दामटण्यांत येऊं लागलें. १४।१५।१६ व्या शतकांत परकीय भाषेचा हल्ला जसा मराठीवर झाला तसाच एक हजार वर्षांपूर्वी स्वकीय देशी भाषा जी कानडी तिचा हल्ला तत्कालीन महाराष्ट्रीवर झाला. फरक इतकाच कीं, मुसल्मानी भाषा परकीय असल्यामुळें तिचा प्रवेश धार्मिक आणि घरगुती व्यवहारांतून होऊं शकला नाहीं. पण कानडी ही देशी भाषा असल्यामुळें तिनें नुसता राजदरबारच नव्हे तर घरगुती देव्हारा, चूल, जातें, झोंपाळा हा साराच प्रदेश हस्तगत केला. महाराष्ट्रांतील शातवाहन ऊर्फ आंध्रभृत्यांच्या राजवटीची अगदीं अखेरची मर्यादा म्हणजे इ. स. ३०४ हें साल होय. त्यानंतर जवळ जवळ दोन शतकें आभिर, राठोड (राष्ट्रकूट), शेलार आणि इतर लहानसान घराण्यांची सत्ता अथवा धेंडाळी चालू होती. भाषावृद्धीचा तो काळच नव्हता. एकंदरींत इ. स. च्या पहिल्या पांच शतकांत गोदावरीच्या दोनहि तीरांवरील प्रांतांत महाराष्ट्रीचा किंवा तिला लागू असलेल्या एकाद्या अप्रौढ भाषेचा प्रचार होता म्हणावयास हरकत नाहीं. कृष्णेपर्यंत तर कानडीचाच मुलूख पसरलेला होता; किंबहुना कृष्णेच्या उत्तरेकडे आणि कऱ्हाडच्या बाजूनें कोंकणांतहि कदाचित् कानडीच चालू असावी. ५ व्या व ६ व्या शतकांत चालुक्यांचें साम्राज्य झालें. हे आणि त्यानंतरचे सम्राट् निवळ कानडी अथवा तेलुगू होते. त्यामुळें कानडीनें हां हां म्हणता गोदेचा किनारा गांठला. देवरकोंडें, कोईलकोंडें, गोवळकोंडें, नलगुंडें, हाणमकोंडें ह्या गांवांच्या नांवावरून हल्लींच्या निजामशाहीच्या पूर्वभागावरच नव्हे, तर इंदूर, तंदूर, माहूर, दारूर, एलूर (वेरूळ), कल्याणी, करहाटक, निंबाळ इत्यादि कानडी धाटाच्या नावावरून भीमथडी आणि गंगथडींवरहि कानडीनें आपला पगडा बसविला होता हें उघड दिसतें. स्थळांचींच नव्हे तर पूर्वी व्यक्तींचीहि पुष्कळ नांवें कानडीच असत हें खालील कांहीं प्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींच्या नांवांवरून दिसून येतें. पुलकेशी (चालुक्य), वड्डिग, कक्कल (राष्ट्रकूट), धाडियप्पा, वड्डिग, जिजाऊ (यादव), विठोबा, बसवण्णा, जयप्पा (शिंदे), व्यंकोजी (भोसले) याचें कारण त्या वेळच्या कानडी राजवटया हें उघड असतां चिंतामणराव वैद्यांसारखे शोधक आपल्या मध्ययुगीन भारतांत "त्या प्रदेशांत कर्नाटकी भाषेचा प्रसार कां व कसा झाला हें अद्यापि गूढ आहे" असें म्हणतात हेंच मोठें गूढ आहे!

बदामीचे व कल्याणीचे चालुक्य आणि नतर मालखेडचे राष्ट्रकूट सम्राट् कानडी होते. म्हैसुरांतील गंगवाडी राजदरबारांत तर जैन धर्माचार्यांचें मोठें प्रस्थ माजल्यानें त्यांनी संस्कृत आणि कानडी वाङ्मयाचा प्रसार सर्व दक्षिण आणि पश्चिम हिंदुस्थानात झपाट्यानें चालविला. त्यांनीं कानडीच नव्हे तर तामिळ, मल्याळी व तेलुगू ह्या चारहि द्राविडी भाषांची पुनर्घटना संस्कृताच्या पायावर केली. पूज्यपादासारखे विजिगीषु आचार्य इ. स. चौथ्या शतकापासून निरनिराळ्या राजवटींतून हिंडत असत व आश्रम मिळाल्याबरोबर जागजागी मठ स्थापन करून आपला तळ रोवीत. त्यांनी बौद्धधर्माला मागें हांकलें; इतकेंच नव्हे तर पाली आणि महाराष्ट्री भाषानाहि दाबून टाकून विद्वानांत

तरेंच सामान्य जनांत आपल्या मताचा प्रचार करण्यासाठीं संस्कृत आणि कानडी व मागाहून तेलगू वाङ्मय वाढविलें. चालुक्य राजे प्रथम प्रथम आपला जम बसण्यापुरतें जैनांशीं आणि बौद्धांशीं सहिष्णुतेनें वागले. पण पुढें पूर्वेकडील वेंगी घराण्यांतील चालुक्यांनीं व कल्चुरी घराण्यांतील राजांनीं शैवधर्माचा आणि कांचीच्या पल्लवांनीं वैष्णवधर्माचा जोराचा पुरस्कार चालविला, त्यामुळें जैनांचा बहुतेक आणि बौद्धांचा सर्वस्वीं नायनाट झाला; इतकेंच नव्हे तर ह्या नवीन धर्मांना भक्तिमार्ग बहुजनसमाजास पटण्यासारखा असल्यामुळें आधुनिक हिंदुधर्माची जरी घडी बसत चालली तरी जुन्या संस्कृत भाषेचा अवतार संपुष्टात आला. ह्या राजकीय आणि धार्मिक क्रांतींच्या धांदलींत देवगिरी येथें यादवांचा उदय (सुमारें १००० इ. स.) होईपर्यंत तुंगा आणि गोदा यांच्या दरम्यान कानडीचा व तिच्या आश्रयानें तेलगूचा विजय निरंकुशपणानें चालू होता. त्यानंतर मराठीनें हल्ला चढविला. तिनें अखेरीस तेलगूस मांजरा व मुशी नद्यांच्या पूर्वेस आणि कानडीस तर खालीं कृष्णेच्या पलीकडे घालवून प्रत्यक्ष तिच्या प्रांतीं कावेरी उतरून तंजावरावर आपला झेंडा रोविला. याचें श्रेय महादेव यादव आणि हेमाडपंत ह्यांना जितकें आहे तितकें, किंबहुना जास्तच भावार्थदीपिकेचे कर्ते ज्ञानेश्वरमहाराज याना आहे.

## मराठींत कानडी शब्दांचा भरणा

मराठींत ग्रंथरचना होण्यापूर्वी तिच्या कोशांतील शब्द अर्धेमुर्धे कानडींतून आलेले होते. पुढें वाङ्मयाच्या वाढीच्या जोरावर अभिजात बनल्यावर वाटेल त्या भाषेंतील शब्द ती आपल्या वेठीस धरूं लागली. जोशी ह्यांनीं आपल्या मराठी शब्दसिद्धि ह्या ग्रंथांत १७९–८० पानांवर मराठींत आढळणारे कानडींतील शब्द म्हणून सुमारें ३६३ शब्दांची यादी दिली आहे, पण ही यादी पूर्ण नाहीं. किती तरी पटींनीं जास्त शब्द निवळ कानडींतले हल्लीं मराठींत बेमालूम वावरत आहेत. वरील ३६३ पैकीं सुमारें ४० वर शब्द कानडींतले नाहींत. कानडींतले कित्येक शब्द हल्लीच्या मराठींतून गेले आहेत, तरी जुन्या मराठींत ते आढळतात. ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभव ह्या ग्रंथांत खालील कानडी शब्द आढळतात, ते आताच्या मराठींत नाहींत. आडवी = अरण्य, नींद = नीज, उपेगी = उपयोगी, मा (मनु) = मग, आणखी, अपाड (पाड) = चांगलें, बोण = नैवेद्य, मर्शी = शाई, भांगार = सोनें, आर्टता = असलेला, इत्यादि. पुढील शब्द अद्यापि प्रचारांत आहेत. मोळी (मोट्टी) = मोट, सगट (सगड) = सहित, उगळी = ओक, पळह = कापूस (पळकाच्या ह्या शब्दांतच हा योजला जातो), मुग (मुक) = मुग्ध इ. इ. एकाच ग्रंथांत जर इतके शब्द आढळतात तर सर्व वाङ्मयांत आणि विशेषतः बोलण्याच्या व्यवहारांत किती शब्द त्या काळीं असतील ह्याची नुसती कल्पनाच केली पाहिजे. मला तरी असें

वाटतें कीं, प्राचीन प्राकृत भाषेतून जे देशीय म्हणून शब्द निवडले जात व ज्यांचा निश्चित संबंध वैदिक अथवा इतर आर्य भाषांशीं जोडणें शक्य नव्हते ते सर्व शब्द द्राविड अथवा मुंडली ( किर्नी, तिबेटी, मॉनख्मेर ) भाषेतले असावेत. अशा सूक्ष्म दृष्टीनें पाहूं गेलें असतां जोशी ह्यांनी आपल्या 'शब्दसिद्धि' ग्रंथात मराठीच्या नांवाखालीं जो मोठा शब्दकोश संस्कृत व्युत्पत्तीसह दिला आहे, तो फिरून तपासण्याजोगा आहे. त्यांपैकीं निदान १५० वर शब्दांच्या व्युत्पत्तीविषयीं जबर शंका येत आहे. या १५० शब्दांपैकीं कांहींचा दूरचा संबंध जरी आर्य भाषेशीं लावणें शक्य असलें तरी हे सारे शब्द कानडींत पूर्वी वापरले जात व कानडीच्या द्वारांच ते मराठींत आले याविषयीं शंका बाळगण्याचें कारण कानडी जाणणारांना तरी नाहीं. ह्यामुळें हल्लींच्या मराठींतील संस्कृत आणि इतर परकीय तत्सम शब्द वगळले तर जे शुद्ध आणि संस्कृत शब्द ठरतात त्यांपैकीं शुद्ध मराठींतले कोणते आणि कानडीच्या द्वारां मराठींत आलेले कोणते हें ठरविणें कांहीं सोपें काम नाहीं. एक हजार वर्षे अगोदर प्रौढपणानें ज्या प्रदेशांत कानडी नांदली त्याच प्रदेशांत तिच्याच तालमींत वाढलेली मराठी पुढें नांदावयास आली हे ध्यानांत घेतलें तर वरील शिल्लक उरलेल्या शब्दसमूहावर मराठीपेक्षां कानडीचा हक्क अधिक शाबीत होतो असें मला वाटतें.

## कानडी क्रियापदें

कोणत्याहि भाषेमध्यें साधारणतः नामवाचक अथवा विशेषणवाचक शब्दांची परस्पर देवघेव होते, हें युरोपांतील अथवा हिंदुस्थानांतील अर्वाचीन भाषांच्या देवघेवीवरून आपल्या सहज ध्यानात येईल. पण क्रियावाचक शब्दांची देवाणघेवाण सहसा होत नाहीं. कारण धातुवाचक शब्द त्या त्या भाषेचें सारसर्वस्व असतात. म्हणून ते वरील मुलाप्रमाणें दत्तक घेण्यास कठीण किंवा असंभवनीय असतात. परन्तु कानडींतलीं पुष्कळ क्रियापदें हल्लींच्या मराठींत उजळ माथ्यानें वावरत आहेत. त्यांपैकीं विस्तारभयास्तव थोडीं देतो. कुट्टु = मारकूट, तब्बू = दाब, सरी = सरक, चटिगू = (जेवण) चाट, थोगू = थाक, पडी = पडीव, तुळी = तुडव, तुंबू = भर, कल्सु = कालव, उगळ्ळु = थुंक, जेज्जु = ठेच, आणकिसु = आपट, केदरु = खरड, ओदरु = ओरड, कोरि = कोर, फिल्लु = फळक, तिळिसु = फळीर, हेदरु = भेदर. त्याचप्रमाणें दोन भाषांचा कांहीं तरी विशेष आनुवंशिक संबंध असल्याशिवाय खालील शब्दांची देवघेव होणें शक्य नसतें. उदाहरणार्थ, शरीराचे अवयव, जवळच्या नात्याचे शब्द, इ. भाषेच्या व्यवहाराला अशा शब्दांची अनिवार्य गरज असते. म्हणून जेव्हां दोन भाषांत असे शब्द सामान्यपणें आढळतात तेव्हां त्यांपैकीं जी जुनी असेल तिच्याशीं नवीचा निकट संबंध आहे असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. त्यांपैकीं कांहीं शब्द खालीं देतों, ते असे—

**नात्याचे शब्द**—अव्वा = आई (आवा, आऊ), अप्पा = बाप (अप्पा, आबा), अक्का = मोठी बहीण, तंगी = लहान बहीण, अण्णा = मोठा भाऊ, तम्मा = लहान भाऊ दोड्ड = दादा, नन्न = नाना, ताई = आई (ताई), तंदी = बाप (तात), अत्ते = आते, कक्क = काका, माव = मामा, अज्ज = आजा. **शरीराचे अवयव**—बट्ट = पोट, होट्टी = पोट, गल्ल = गाल, मांडि = मांडी, पिंड्रि = पिंडी, कोव्ळ = गळा, तले = टाळू, बगल = बगला, बाजू, शिरा = शीर, यदि = छाती, शिपरी = केंस, शिपरी.

**अव्ययें**—कडक = घर, किळक = खालीं, इत्तकडे = इकडे, आत्तकडे = तिकडे, इष्टु = इतुके, एतुलें, लगु (लगु) = लवकर, बेगने = विगिविगि, लवकर इ. इ.

## व्याकरण

येथपर्यंत शब्दांचा विचार झाला; परंतु व्याकरणांतील साम्य ह्याहूनहि अधिक महत्त्वाचें आणि मनोहर आहे. त्यावरून तर मराठीचा कानडीशीं गूढ आनुवंशिक संबंध असावा अशी शंका येते. मराठीच्या पूर्वी पुष्कळ शतकें कानडीची घटना झाली आणि ही नवी घटना करणार जैन आणि बौद्ध प्रचारक संस्कृतज्ञ आणि प्राकृतज्ञ असल्यामुळें कानडीची मूळ पीठिका जरी तामिळ होती तरी व्याकरणांत कांहीं प्राकृताचें आणि किंचित् संस्कृतचेंहि वळण दिसणें साहजिक आहे. पुढें प्राकृतामधून निघालेल्या मराठीची घटना ह्याच कानडीच्या निकट सान्निध्यांत होऊं लागल्यामुळें कानडीच्या व नवीन मराठीच्या व्याकरणामध्यें थोडेबहुत साम्य दिसून येणें हेंहि साहजिक आहे. हें साम्य विशेषतः नामाच्या आणि क्रियापदाच्या अशा दोन्ही विभक्तींमध्यें आढळतें, ही विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे. ज्ञानेश्वरीची आणि तिच्यापूर्वीची जी मराठी तिला जुनी व त्यानंतरच्या मराठीला नवी म्हणण्याचा जो परिपाठ आहे तो केवळ ह्या भाषांतील शब्दांच्या नव्याजुनेपणावरूनच नव्हे तर ह्या दोन्ही विभक्तींच्या नव्याजुनेपणामुळेंहि पडला आहे. कानडींतहि नवी आणि जुनी असे भेद आहेत. ते कशामुळें पडले हें सांगणें मला तूर्त शक्य नाहीं. तरी नवीन मराठीच्या आणि नवीन कानडीच्या दोन्ही विभक्तींच्या घटना आणि सामान्यरूपें ह्यांमध्यें विलक्षण साम्य आहे ही गोष्ट आश्चर्यकारक आहे यांत शंका नाहीं.

## नामांच्या विभक्ति

कानडींत नामाचें विभक्तिरूप व्हावयाचें तें शब्दाच्या मूळ रूपाला हा किंवा तो या अर्थी जें सर्वनाम असेल त्याच्या विभक्तीचीं रूपें लागून सिद्ध होतें. हे विभक्तीचीं रूपें चारकाईनें तपासून

त्यांचा माग काढीत गेल्यास दिसून येण्यासारखें आहे. हाच प्रकार मराठींतहि आहे. घोडियाचा, पाणियांत, माळियाला, इत्यादि जुन्या मराठींतील रूपांवरून इयाच्या, इयांत, इयाला हीं 'इ' ह्या सर्वनामाचीं रूपें लागलेलीं स्पष्ट दिसतात. 'इ' हा कानडींतील 'हा' या अर्थी दर्शक सर्वनामवाचक शब्द आहे. गुरु शब्दाला ह्या 'इ' सर्वनामाच्या विभक्तीचीं रूपें जोडून कानडींत गुरुविनगे (द्वितीया), गुरुविनिंद (तृतीया), गुरुविन (षष्ठी) अशीं रूपें होतात. कोंकणात पूर्वी कानडीचा जास्त प्रचार असावा, म्हणून तिकडे घोडयेक (एकवचन), घोड्यांक (अनेकवचन) अशीं चतुर्थीचीं रूपें होतात. हा 'क' प्रत्यय कानडीचा आहे.

कानडींत अण्णा आवरू अथवा अण्णानवरू बंदरु म्हणजे अण्णा ते आले असा प्रयोग होतो ! ह्याच धर्तीवर बेळगूरकडचे मराठे अद्यापि 'अण्णा आले' असे न म्हणतां 'अण्णा त्यांनीं आले' असें म्हणतात. शके १५०० मधील त्र्यंबक कवीनें आपल्या 'बालबोध' नावाच्या योगावरील ग्रंथांत म्हटलें आहे कीं, 'भलेतेणें एथ नावें, प्रयागीं माधवीं विश्वरूपो तें पहावें, एतुलेनी ससारा देयावें, तिलोदक' ह्यांत भला ह्या शब्दाला तो ह्या सर्वनामाचें तृतीयेचें रूप लागलें आहे. आणि भल्यानें त्याच्याऐवजीं भलेतेणें असा प्रयोग झाला आहे. मराठीमध्यें सामान्य रूपाचा जुन्या षष्ठीचा जसा संबंध आढळतो तसाच कानडींतहि आढळतो. म्हणजे मनुष्यन असें षष्ठीचें रूप होतें, त्यालाच प्रत्यय लागून मनुष्यनन्नु, मनुष्यनिंदे, मनुष्यनिगे असें द्वितीयेचें, तृतीयेचें, चतुर्थीचें रूप होत जातें. ह्यावरून हा प्रकार कानडींतून आला असण्याचा संभव आहे. कारण, त्याजला, माझ्याच्यानें, तुमच्याहून, या षष्ठीच्या प्रत्ययाला पुनः इतर विभक्ति लागण्याचा दुहेरी प्रकार मराठींत नसतो. तोंत तो विकल्पेकरून आहे, तर कानडींत षष्ठीचें रूप जणूं कांहीं एक प्रकारचें प्रातिपदिकच होऊन बसलें आहे. 'आंत' हें शब्दयोगी अव्यय लावून सप्तमी करण्याचा नवीन प्रकार तसेंच 'आमच्या येथ', 'तुमच्या तिकडे' असे प्रयोगहि कानडीवरून येणें पुष्कळ शक्य आहे.

## क्रियापदांच्या विभक्ति

सर्वनामाचीं रूपें लागून ज्याप्रमाणें नामाची विभक्ति होते, त्याप्रमाणे इरु, अस, ह्या धातूचीं निरनिराळीं रूपें कोणत्याहि धातूच्या भूतकाळवाचक कृदंताला लागून त्या त्या धातूचीं निरनिराळ्या काळांचीं अथवा अर्थांचीं रूपें सिद्ध झालीं आहेत, असें कानडींतील रूपांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असता आढळून येते. हा प्रकार संस्कृतांत, विशेषतः प्राकृतांतहि आढळतो. पण मराठींतला जुना वर्तमानकाळ जाई, पाहे, असा जाऊन त्याचेऐवजीं वर सांगितल्याप्रमाणें कृदन्ताला 'अस' धातूचीं रूपें लागून होणारा जातो, पाहतो, असा नवीन वर्तमान आला; ह्याचें कारणहि कानडी प्रचारच असावा. कानडींत धातूचें 'त' प्रत्ययांत कृदंत

होऊन त्याला 'इरु' म्हणजे 'अस' धातूचीं तीनहि काळाचीं रूपें लागतात. मराठींत पूर्वी भविष्यकाळाचीं निराळीं रूपें नव्हतीं. हल्लींच्या भविष्यकाळाचें कानडींतल्या भविष्यकाळाशीं खालीलप्रमाणें साम्य आहे. त्यावरून भविष्यकाळाचा 'ल' कानडींतून आला असावा असें वाटतें. मी करीन = नानु माडुवेनु; आम्ही करूं = नाउ माडुवेवु. तो, ती करील = आवनु माडुवेनु, आवळु माडुवळु, तें करील = आदु माडुवदु.

मराठींतील द्वितीय पुरुषाचीं रूपें मात्र संस्कृताशीं अधिक जुळतात. वर्तमानकाळाचें उदाहरण:—मूळ माडु = कर धातु. तिचें माडुत असें कृदन्त होतें. माडुत (करीत) इद्दानें (आहे), माडुताने, करीत आहे = करितोय = करितो असा नवीन वर्तमान, कृन्दत आणि अस धातूचें रूप मिळून कानडींत भूतकाळहि असाव 'अस' धातूच्या साह्यानें होतो; पण मराठींत मात्र बंगालीप्रमाणें 'त' प्रत्ययाच्या साह्यानें भूतकाळ होतो. कानडींत ह्या 'त' चा 'द' होतो, व नतर त्याच्यांत इरु = अस धातूच्या रूपांचा एकजीव होऊन भूतकाळचें रूप सिद्ध होतें. "बाहेर पातली मुनीश्वर दुहिता" ह्यांतील पातली ह्या मराठी शब्दाचें पोटळ ह्या त्याच अर्थी भूतकालवाचक कानडी शब्दाशीं किती साम्य आहे हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. ह्यावरून हा भूतकाळाचा 'ल' हि कानडीच्या भूतकाळाचे प्रत्यय न, द, र, यांवरूनच आला असावा असें वाटतें. संस्कृतांत आख्यात प्रत्ययांना लिंगविकार होत नाहीं. त्याचप्रमाणें संस्कृतावरून झालेल्या मराठींतील क्रियापदाच्या काळांच्या जुन्या रूपांतहि लिंगविकार नाहीं. पण नवीन काळांत हा लिंगविकार आहे. त्याचें कारण केवळ कृन्दत विशेषणाला लिंगविकार होतो, येवढेंच नसून, कानडींत हा लिंगविकाराचा प्रचार आहे हेंहि असावें. सुंदर, निलट, वाईट, इ. अकारान्त विशेषणाला लिंगविकार होत नाहीं, मग अकार कृन्दताला तरी का व्हावा? संयुक्त क्रियापदाचा प्रचार मराठीप्रमाणेंच कानडींतहि आहे. करून सोड = माडी बिट; जेवण करून घे = ऊट माडींको; करून टाक = माडी बगी इ. आणखी बऱ्याच संयुक्त क्रियापदांचा प्रचार कानडीशीं विशेष जुळता आहे. नये हें क्रियापद केवळ बरदू या कानडी शब्दाची नक्कल आहे. बा = ये; आणि रदुअदे हा नकारार्थी प्रत्यय आहे.

## लकबा

वरील संयुक्त क्रियापदांप्रमाणें आणखी किती तरी भाषेच्या लकबा कानडींतून मराठींत आल्या असाव्यात. पायांत जोडा, अंगांत अंगरखा, गळ्यांत माळ घालणें, तोंडात मारणें, पाठीस लागणें, (अपराध) पोटांत घालणें, डोळ्याआड करणें, जीवावर येणें, इत्यादि ढबा केवळ कानडी आहेत. त्याला वाचायला येतें, हें वाक्य कानडींतल्या अवनिग ओदलिके बन्दते ह्या वाक्याचें शब्दशः भाषांतर आहे. भक्ति करीत जा, सांगत जेम, तो असेच सांगत आला आहे, ह्या लकबाहि कानडीच दिसतात. वरलीकडे म्हणजे पश्चिमेकडे; खालीकडे म्हणजे

पूर्वेस हे प्रयोग, मेळ (मेलादिक) आणि (कीळदिक) या तामील प्रयोगाच्या हुबेहुब प्रतिमा आहेत. वीस (द्विदश), तीस (त्रिदश) इत्यादिप्रमाणें कानडींत ही दहाचीच दुप्पट तिप्पट करून मोजण्याचा व्यवहार आहे, इतकेच नव्हे तर सत्तर न म्हणतां मराठे कुणबी तीन वीसा अन् दहा असें जें म्हणतात त्याचें मूळ कानडींतील मूर इप्पत्तु रदुहत्त या शब्दात तंतोतंत आहे.

कानडींतल्या आणखी एका लकबेचा फार जोराचा छाप मराठीवर पडल्याचें उदाहरण म्हटले म्हणजे मराठी शब्दाचें अंत्यस्वर 'उ' होणें. त्याचें कारण कोणी सांगतात कीं, अशा शब्दांपुढें संस्कृतांत विसर्ग होता, त्याचा 'ओ' झाला आणि मग त्याचा 'ऊ' झाला. कोणी म्हणतात कीं, कवितेंतील यमक साधण्यासाठीं हा उकारान्त होतो. पण पुढील जुन्या गद्य पंचतंत्रातील उतारा पाहिला असतां ही दोनहि कारणें लागू होत नाहींत असे दिसेल. "कव्हणी एके नगरीं देव शर्मा म्हणिजे ब्राह्मणु; तयाचिये भार्येसि प्रसूति जाली. एकु पुत्रु, एकु मुंगस, पुणु तयासि विश्वास तीना... थोरू विलापू करूं आदरिला..." हा उकारान्त अनिश्चित रीतीनें होत असे आणि तो आतां प्रचारांतून पार गेला आहे; त्यावरून ही एक कानडीवरून घेतलेली ढब होती आणि ती आतां नाहीं एवढेंच अनुमान निघतें.

## वाङ्मय

कानडी ही मराठीपेक्षां जवळ जवळ एक हजार वर्षे अधिक पूर्वीची भाषा असल्यानें तिचें वाङ्मयहि अधिक जुनें, विविध आणि अभिजात असणारच. आठव्या शतकांत नृपतुंग ऊर्फ अमोघवर्ष राष्ट्रकूट ह्याच्या वेळीं मराठी ही "महाराष्ट्री" च्या उदरांतून वाङ्मयाच्या दृष्टीनें तर राहोच, पण बोलण्याच्या उपयोगी अशी भाषा, या दृष्टीनेंहि बाहेर स्वतंत्र रूपानें वावरत होती कीं नाहीं ह्याची शंका आहे. अशा वेळीं ह्याच नृपतुंगाच्या नांवावर कविराजमार्ग नांवाचा अलंकारशास्त्राचा ग्रंथ कानडींत प्रसिद्ध होता. चपू नांवाचा काव्यप्रकार संस्कृतांत आढळण्यापूर्वी कानडीनेंच तो प्रथम प्रचारात आणला. दिगंबर पंथी धगधगीत वैराग्याच्या तापांतून बचावूनहि जैन कवींनीं शृंगारलीलावतीसारखीं काव्यें कानडींत रचल्यावर मग कोठें हजार-पाचशें वर्षांनीं रघुनाथ पंडितानें आपले नलदमयंती-स्वयंवर हे शुद्ध शृंगाराचें पहिले काव्य रचलें; आणि तेंहि पण तंजावरकडचाच होता असे म्हणतात. अनुप्रास म्हणून शब्दालंकाराचें जें एक अंग आहे ते निर्माण करण्याचें सर्वस्वी श्रेय कानडीलाच आहे असे सांगतात; आणि कानडींतला हा अनुप्रास पुढें मोरोपंतांनी व रघुनाथपंतांनीं उचलला. इतकेंच नव्हे तर मध्ययुगीन संस्कृत वाग्देवीलाहि हा दक्षिण देशात मिळालेला मणी आपल्या गळसरींत ओवण्यास कमीपणा वाटला नाहीं ! यक्षगान ह्यासारखीं कानडी नाटकें झाल्यावर किती तरी शतकांनीं

पुढें अण्णा किर्लोस्कराला पहिलें नांव घेण्यासारखें संगीत नाटक रचण्याची प्रेरणा झाली. आणि तीहि बेळगांवकडच्याच होता! उत्तरेकडील वऱ्हाडांत मराठींत नाट्य संगीत अद्यापि नाहीं. कीर्तन ही संस्था अस्सल मराठी असावी असा कित्येकांची फुशारकी आहे. पण अंगलगासी नांवाचे मलबारी कीर्तनकारांची स्तुति गॅझेट रिपोर्टांतूनसुद्धां अद्यापि दुमदुमत आहे.

वैष्णव-शैवांच्या भक्तिपंथाचा उदय प्रथम द्रविड देशांतच झाल्यानें तुक पर्यंचा व ललितांचाहि वहर तिकडेच अगोदर झाला; नंतर कीर्तनाचा प्रचार इकडे आला. पुरंदर विठ्ठलानें कृष्णलीलेचा रस कानडींत जितका व जसा वठविला आहे तसा व तितकी करामत बिल्हणचरित्राचें मराठी कवितेंत भाषांतर करणाऱ्या बीडकर विठ्ठलालाहि साधली नाहीं. पदें आणि लावण्यांसारख्या लौकिक काव्यांतहि कानडीचीच सरशी होती. नाहीं म्हणावयाला पोवाड्याची मात्र कानडींत उणीव भासते. कारण कर्नाटकांत अलीकडे बरींच शतकें स्वराज्याचा दुष्काळ गाजत आहे! ज्ञानेश्वरापासून रघुनाथपंतापर्यंत मराठी कवींनीं शिकस्त करून वरील पारडें पालटलें. हल्लीं तरी वैनगंगे पासून तुंगभद्रेपर्यंत व पलीकडे क्वचित् कावेरीपर्यंतहि मराठी वाङ्मयाचा दरारा चालू आहे. पण ह्या सर्व भाषाक्रांतीचें आणि हल्लींच्या मराठीच्या वैभवाचें बरेंचसें श्रेय कानडीलाच आहे. चालुक्य आणि राष्ट्रकूट राजांचे पदरीं कित्येक कवि आणि पंडित कानडी व तेलगू ह्या दोनहि भाषांत प्रवीण असलेले राहत असत. तसेंच देवगिरीच्या यादवाचे पदरीं कानडी किंवा तेलगू आणि मराठी भाषेंत पारंगत असे पंडित असले पाहिजेत. शहाजीचे पदरीं जयराम पंड्ये नांवाचा बारा भाषांची प्रौढी मिरवणारा कवि अगाच मासल्याचा होता. साताऱ्याच्या आणि तंजावरच्या भोसल्याच्या आश्रयानें मराठीची वाढ कानडीहून अधिक झाली. शेवटीं काव्यरसांत ज्या कानडीनें एकदां इतका मोठा कीर्तिरव गाजविला त्याच हतभागी कानडींत अलीकडे अशी एक अभद्र म्हण पडली आहे कीं, "आरी अरसु, हिंदुस्थानी सरसु, कन्नड बिरसु" म्हणजे मराठी मर्दांनी, मुसलमानी सरस आणि कानडी ही राठ!

वयाच्या मानानें मराठी ही सर्वांत मागाहून जन्मलेली म्हणून वडिक्रमानें ती शेवटची असावी. पण केवळ राजकारणाचे जोरावर तिनें हिंदुस्थानात संख्येच्या मानानें आता चौथा नंबर पटकाविला आहे. आणि अभिजात वाङ्मयाचे जोरावर तर तिचा आज दुसरा नंबर आहे. काव्याच्या, जुनेपणाच्या व भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें पाहतां, ज्ञानेश्वरीसारखा अभिजात ग्रंथ, पहिला नंबर पटकाविणाऱ्या बंगालीत तरी आहे की नाहीं ह्याची मला तरी निदान शंका आहे. जुन्या तामील कानडी भाषेंतील वाङ्मयाचा मात्र अद्यापि नीट शोध लागला नाहीं. तो जेव्हां पूर्णपणें लागेल तेव्हां भारतीय संस्कृतिविषयकच काय, पण मानववंशशास्त्रसंबंधीं हल्लींच्या कित्येक मतांत आमूलाग्र उलथापालथ होण्याचा बराच संभव आहे!

## उपसंहार

शब्दकोश, व्याकरण, वाक्यव्यवस्था, लकार आणि वाङ्मयवृद्धि इ. भाषेच्या निरनिराळ्या अंगांच्या दृष्टीनें, मराठी आणि कानडी ह्या दोन भाषांमध्यें किती व कसें साम्य आहे ह्याचें शक्य तितक्या संक्षेपानें शक्यतोंवर विवरण केलें आहे.

ह्या विषयाचें यथार्थ स्वरूप, सामान्य लोकांच्या तर राहोंच, पण विद्वानांच्याहि लक्षांत भरण्यास तौलनिक भाषाशास्त्राचा अभ्यास पौरस्त्य विश्वविद्यालयांतून सुरू झाला पाहिजे. अशा तुलनात्मक इतिहासाचा अवतार होईल तेव्हां होवो. तो दूरचा प्रश्न आहे. नुसतें आपल्या अर्वाचीन भाषांचा जरी तौलनिक अभ्यास चालू राहील तरी आम्हीं पुष्कळ मिळविलेसें होईल ! निदान मराठी व कानडी ह्या दोन भाषांचें तरी तुलनात्मक अध्ययन ह्यापुढें लांबणीवर पडूं नये. ह्या दोन भाषांच्या परस्परसंबंधाचें महत्त्व तौलनिक भाषाध्ययनांत कांहीं विशेष प्रकारचें आहे, हें तौलनिक व्याकरणवेत्यांच्या लक्षात जितकें लवकर भरेल तितकें लवकर फायदेशीर होईल तामील ती द्राविडी भाषा हें निर्विवाद. पण कसेंहि असलें तरी मराठ्याच्या मूळ पीठिकेचा छडा अद्यापि तितका निर्विवाद लागलेला नाहीं.

मराठी व कानडी ह्या दोघींचा उगम कदाचित् भिन्न असेल. नुसतें मराठीची मूळ पीठिका प्राकृत व कानडीची तामील असें म्हणण्यास कांहीं हरकत नाही. प्राकृत आणि तामील ह्या दोहोंचें मूळ शोधणें हा फार खोल प्रश्न आहे. मराठी आणि कानडी ह्या मुळांत जरी अगदीं भिन्न असतील, तरी त्यांच्यामध्यें अद्यापि जें कांहीं ध्यानांत घेण्यासारखें साम्य आढळत आहे तें ह्या निबंधांत कांहीं अंशीं दाखविण्यांत आलें आहे. विशेषत: हें साम्य व्याकरणदृष्ट्या नवीन मराठी आणि नवीन कानडी ह्यांमध्यें असलेलें आणि शब्दकोशदृष्ट्या जुनी मराठी व नवीन कानडी ह्यांमध्यें असलेलेंच ह्या निबंधांत दाखविण्यात आलें आहे. हेतु इतकाच कीं, जुनी संस्कृत, प्राकृत आणि तामील, कानडी, आदिकरून जुन्या द्राविड भाषा यांचा तुलनात्मक अभ्यास व्हावा. निदान अशा अभ्यासाच्या सहाय्याशिवाय मराठीची व्युत्पत्ति करूं इच्छिणाऱ्यांनीं केवळ संस्कृत-प्राकृतादि आर्य भाषांच्या माहितीवरून अवलंबून अनुमानें बांधीत राहूं नये. एवढीच अखेरची सप्रेम सूचना आहे.

# १०

# महाराष्ट्र विद्यापीठ व कर्नाटक

## मराठीचा प्रवास

(१) कानडी आणि मराठी ह्या मधल्या राशी ह्या दोन भाषांच्या व्युत्पत्तीचा तौलनिक संबंध काय आहे हे दाखविण्यासाठी मराठी व्याकरणकर्ते श्री. रा. भि. जोशी ह्यांच्या नवीन मराठी भाषेची घटना ह्या ग्रंथाचा शेवटचा भाग म्हणून एक निबंध मी लिहिला होता; तो १९२३ अखेर केसरीच्या चार अंकांतून प्रसिद्ध झाला आहे. त्यानंतर बंगाल, ओरिसा, तेलगण आणि दक्षिण कोंकण ऊर्फ केरळ ह्या चार प्रांतांतून गेल्या दोन वर्षांत मला प्रवास करावा लागला, त्यावरून हल्लीची मराठी ही केवळ महाराष्ट्री असे नांव असलेल्या एका प्राचीन प्राकृतातूनच आलेली नसून ती मगध देशातून पश्चिम बंगाल, ओरिसा, तेलगण, वऱ्हाड आणि १ हजार वर्षांपूर्वीचा उत्तर-कर्नाटक (कृष्णा आणि गोदावरी ह्यांमधला भाग) ह्या प्रांतांतून प्रवास करीत आलेली एक भाषा असावी असा माझा पूर्ण ग्रह बनत चालला आहे. इतकेच नव्हे तर अशा अर्धवट बनलेल्या स्थितीतच ही प्रगमनशील भाषा सुमारे १०००।१२०० वर्षांत उत्तर-कोंकण ऊर्फ अपरान्त या प्रांती आणि तेथून खाली दक्षिण कोंकण ऊर्फ केरळ या प्रांतात उतरली आणि त्या दोनहि प्रांतांत हल्ली ही मालवणी, गोव्हनी आणि कोंकणी या नावांनी रूढ आहे. मुंबई येथील ॲंथ्रॉपॉलॉजिकल सोसायटीचे व्हाइस प्रेसिडेंट राव ब. डॉ. चव्हाण ह्यांनी कोंकणी भाषेवरील आपली काही व्याख्याने प्रसिद्ध केली आहेत. त्यांत मराठीचा

कोंकणीशीं संबंध नसून कोंकणी ही स्वतंत्र व मराठीच्या पूर्वीची भाषा असावी असें प्रतिपादन केलें आहे! मंगळूर आणि कालिकत येथील कांहीं सारस्वत मंडळीमध्यें अलीकडे राव. ब. चव्हाणांप्रमाणेंच मराठीपासून सुटून स्वतंत्र सुभा करण्याची प्रवृत्ति मला आढळली. ह्याचे उलट असलेलें माझें मत पुढें कधीं तरी सविस्तर प्रसिद्ध करीन. तूर्त मला ह्या कलमांत मराठीच्या प्रवासी स्थितींत तिला किती प्रांत ओलांडावे लागले एवढेंच सांगावयाचें आहे.

## कानडी विरुद्ध मराठी

(२) इतर भाषाशीं मराठीचा कसाहि संबंध असो. गेल्या दीड हजार वर्षांत कानडी आणि मराठी ह्या दोन भाषांचा एकमेकां-विरुद्ध जीवनकलह किती जिवापाड चालला आहे ह्याची केवळ अंधुक प्रस्तावना मीं केसरींतील वरील लेखांत केली होती. माझ्यापेक्षां अधिक अधिकारी पंडित हा हृदयंगम भाषाविषय हातीं घेऊन महाराष्ट्र आणि कर्नाटक ह्या दोनहि देशावर उपकार करण्यास पुढें येईपर्यंत मी केवळ नाइलाजानें व भीतभीत अशा तौलनिक विवेचनाचें धाडस करीत आहें. मराठीचा जन्म व बाल्येपण कोठें आणि कसेंहि होऊन गेलें असो, तिचें सर्व वर्धन, शील, कौमार्य, चालुक्य आणि राष्ट्रकूट ह्या कानडी व तेलंगी राजवटींतून खास कर्नाटकांतच बनलें असें मीं वरील निबंधांत ध्वनित केलें आहे. जास्त निरीक्षणावरून मराठी ही कानडीची पोटची नव्हे तरी पाळलेली मुलगी आहे, असें मला वाटूं लागलें आहे. अशा रीतीनें मराठीची जशी महानुभावी जुनी "बालबोध मराठी" आणि चिपळूणकरांनीं संस्कृत शब्दालंकार आणि इंग्रजी विचारालंकार ह्यांनीं घडविलेली आजची सुसंस्कृत मराठी हीं दोन रूपें जशीं मराठी वाङ्मयात स्पष्ट दिसत आहेत, तशीच कानडींतहि जैन कविकुलगुरूंनीं वाढविलेली हळेकन्नड (जुनी कानडी) आणि अलीकडच्या संस्कृत-इंग्रजीच्या मिश्र संस्कृतींत स्वतः वाढलेल्या "सुशिक्षितांनी" घडविलेली नवी कानडी अशीं दोन रूपें स्पष्ट आहेत. पण कालाचा मात्र हा फरक ध्यानांत ठेवला पाहिजे कीं, जुन्या मराठीचें कौमार्य संपून ती महानुभावी वाङ्मय प्रसवूं लागण्यापूर्वी जुन्या कानडीला जवळ जवळ म्हातारपण येऊं लागलें होतें. ज्ञानेश्वराची भावार्थदीपिका इ. स. १२९० त संपूर्ण झाली. हा काळ जुन्या ऊर्फ बालबोध मराठीचा जन्मकाळ नसून तिचा वाङ्मय प्रसविण्याचा काळ होय. पण या कालाचे पूर्वीच हळे-कन्नडचे धुरंधर कवि जैन नागवर्मा, जैन अथवा लिंगायत केशव आणि ब्राह्मण रुद्रभट्ट हे होऊन गेले होते; व त्यांच्या मागे त्या जुन्या कानडीच्या तारुण्याचा भरहि मावळूं लागला होता. त्या वेळीं मराठी ही कानडीच्या दाईपणापासून जरी अगदीं वेगळी झाली होती, तरी देखील ती कानडीचा शब्दकोश, व्याकरण, छंद-रचना व व्यवहारातल्या चालीचें संप्रदाय ह्यांतच अद्यापि गुरफटलेली आढळते.

## चौदावें शतक

(३) इ. स. १४ व्या शतकाचा प्रारंभ हा ज्ञानेश्वरीच्या उदय होऊन मराठीचा भाषा ह्या नात्यानें कानडीपासून स्वतंत्र होण्यानेंच महत्त्वाचा नाहीं, तर राजकीय इतिहासाच्या दृष्टीनें दक्षिणेंत जी मोठी राज्यक्रांति झाली तिच्यामुळेंहि महत्त्वाचा आहे. चालुक्यांचे मांडलिक देवगिरीचे यादव हे *मराठी बोलणारे होते. आणि त्यांचेंच दुसरें महामंडलेश्वर म्हैसूरचें होयसळ-घराणें* कानडी बोलणारें होतें. हे दोघेहि चालुक्याच्या उलट बंड करून स्वतंत्र झाल्यावर लवकरच मुसलमानाची टोळधाड येऊन हिंदुपदपादशाहीला कायमचाच धक्का दसल्यामुळें यादवांचा आणि होयसळांचा नायनाट झाला आणि जरी लवकरच त्या भयंकर यज्ञ-कुंडातून ओरगळच्या राजवटीचें रूपांतर होऊन विजयनगरचें नवीन राज्य उदयास आलें तरी कर्नाटकाची उत्तर सीमा जी आतांपर्यंत गोदावरीचें दक्षिण-तीर होती ती ह्यानंतर कृष्णेचें दक्षिण-तीर होऊन प्रत्यक्ष राजधानी तर तुंगभद्रेच्याहि दक्षिण-तीरावर *प्रतिष्ठित झाली. इ. स. १५६५ तील तालीकोटच्या लढाईंत ह्या शेवटच्या हिंदुपादशाही* वरून मुसल्मानांचा वरवंटा सफाईनें फिरला आणि कर्नाटकाच्या राजवैभवाची जी अगदीं मिणमिणीत मेणबत्ती कावेरीच्या तटावर जीव धरून होती ती देखील हैदर अलीनें इ. स. १८ व्या शतकांत फुंकून पार नाहींशी केली.

(४) अशा रीतीनें राजकारणाच्या दृष्टीनें कर्नाटकाचा बुडता पाय जो उत्तरोत्तर खोलात जाऊं लागला तो अद्यापि यावा तसा वर येत असलेला दिसत नाहीं. मुसल-मानाच्या वरवंट्याखाली, विशेषतः तालीकोटच्या निःपातानतर, कानडी बोलणारे मराठे जे रेड्डी, राजू, होयसळ, पल्लव ऊर्फ पालवे, कदंब इ. ते कायमचे दबून गेले. पण देवगिरीचे जाधव, फलटणचे निंबाळकर, बदामीचे शिंदे आणि माने, वाडीचे सावंत, कोकणपट्टीतले आंग्रे, मोरे, शिर्के इ. अनेक घराणीं जरी प्रत्यक्ष राजपदावरून चमकत नव्हतीं, तरी त्यांचीं वरून कोळशाप्रमाणें दिसणारीं द्रव्यें इतकी सहज ज्वालाग्राही होतीं की, शहासुनु शिवरायानें फुंकर मारल्याबरोबर तीं मराठी स्वराज्याचीं होमकुंडें बनलीं. सतराव्या शतकांत नवीन महाराष्ट्र महोदधि जो उचंबळला तो उत्तरेस नर्मदेपासून तों दक्षिणेंत तुंगभद्रेपर्यंत पसरला; इतकेंच नव्हे तर तिच्याहि पलीकडे कावेरीच्या कांठीं तंजावरावर त्याची ध्वजा लागली. एकंदरींत ह्या द्विगुणित राज्यक्रांतीमुळें, अगोदरच चौदाव्या शतकांत स्वतंत्र झालेली जी मराठी भाषा, तिला जरी शिवपूर्वकाली मुसल्मानी राजकारणाचा आणि फार्सी भाषेचा सामुरवाम सोसावा लागला तरी शिवोत्तरकाली तिला राजकारणाची अपूर्व जोड मिळाल्यामुळें ती एखाद्या महापुरानें बेफाम झालेल्या नदी-प्रमाणें गोदावरीचा किनारा हा आपला मुख्य प्रदेश ओलांडून स्वस्थ न बसतां कृष्णेच्या पलीकडील व तुंगभद्रेच्या उत्तरेकडील कानडीचाहि प्रांत जी एकदा व्यापून बसली आहे, ती तो अद्यापि परत करण्याचीं कांहींच चिन्हें दिसत नाहींत. ज्या प्रदेशाला

खरोखरी उत्तर-कर्नाटक म्हणावयाला पाहिजे त्याला आम्ही आतां दक्षिण-महाराष्ट्र म्हणत आहों.

## पुण्यांतील जाहीर सभा

(५) सुमारें महिन्यापूर्वी मुंबई विश्वविद्यालयांत कानडीचें अध्ययन अधिक शास्त्रीय रीतीनें व्हावें अशा अर्थाचा एक लेख मद्रास व कलकत्ता युनिव्हर्सिटींतील भाषाध्ययनाचे दाखले देऊन मीं प्रसिद्ध केला होता. आतां पुणें विश्वविद्यालयाची चळवळ जोरांत आली आहे. परवां शिवाजी-मंदिरांत ह्या नवीन विद्यालयासंबंधीं विद्वानांची जी जाहीर सभा झाली, तिच्यांतील वक्तेच नव्हत तर श्रोते देखील एकूण एक मराठीचेच अभिमानी असतील असें वाटतें. मी स्वतः जरी मराठाच असलों तरी कानडीचे जे मराठीवरचे उपकार झाले आहेत ते महाराष्ट्रानें विसरावेत असें मला कधींहि वाटणार नाहीं. म्हणून श्री. नरसोपंत केळकरांनीं जो वरील सभेंत मूळ ठराव आणिला त्याच पायावर थोडाबहुत शक्य असल्यास फेरफार करून पुणें विश्वविद्यालयाची उभारणी व्हावी असें मला वाटतें. त्याचीं कारणें अशीं :

(६) पुणें येथील विद्यापीठांत सांगली, कोल्हापूर आणि धारवाड येथील कॉलेजें सामील करून घ्यावींत, आणि कर्नाटकांतल्या त्या कॉलेजांना भाषेचें माध्यम मराठी अथवा कानडी निवडण्याचा अधिकार द्यावा. त्या कॉलेजांना हा अधिकार मुंबईच्या डोईजड विद्यापीठांत मिळण्याचा संभव नाहीं. कारण मुंबईचें पीठ हें विद्यापीठ नसून सिंधी, गुजराथी, मराठी व कानडी या भाषांची—दधूपक्षी वरवरयांचा—इंग्रजी भाषारूपी बरमाईकडून अपमान करण्यासाठीं बांधलेल्य एक लग्नमंडप आहे, किंवा युरोपियन, पार्शी आणि गुजराथी श्रीमंताच्या शिलोप्याचे वेळीं बसण्याचा एक क्लब आहे; किंवा फार तर अलीकडे नवीन नवीन निघणाऱ्या राजकीय पक्षांचें एक लुटुपुटीचें रणांगण आहे! तें कांहींहि असो, अर्वाचीन चान्द्र भाषांची खरी उपपत्ति शिकविण्याचें ते स्थान नव्हे एवढें खरें. जरी पुढें कधीं काळीं या अनागोंदी दरबारात गुजराथीची आणि मराठीची दाद लागली तरी दुबळ्या आणि दडपलेल्या कानडीची दाद तेथें लागण्याची आशा नाहीं. अशा आशेला पुणें विद्यालयांत जागा मिळण्याचा निदान संभव तरी आहे.

## कर्नाटकाची दुर्दशा

(७) कानडी भाषा ज्या देशांत बोलली जाते त्या कर्नाटकाची जितकी दुर्दशा हल्लींच्या काळीं झाली आहे तितकी हिंदुस्थानांत काय किंवा बाहेर काय, दुसऱ्या कोणत्याहि देशाची किंवा राष्ट्राची झालेली नसेल. हा देश अथवा राष्ट्र आज हैद्राबाद आणि म्हैसूर ह्या दोन संस्थानांतून आणि मुंबई व मद्रास ह्या दोन इंग्रजी इलाख्यांतून विभागून ह्याचे चार तुकडे पडले

आहेत. वरील राजकीय भेदच नसून ह्या भागांत हिंदु, मुसलमान, ख्रिश्चन, जैन, इ. धार्मिक भेद आणि ब्राह्मण ब्राह्मणेतर इ. नवीन तट्टे फार माजले आहेत. ह्यामुळें म्हैसूरची स्वतंत्र युनिव्हर्सिटी आणि एका स्वतंत्र हिंदु संस्थानाची सत्ता आणि संपत्ति ह्या स्वतंत्र युनिव्हर्सिटीस मिळूनहि कानडी भाषेच्या खऱ्या उत्कर्षाचीं चिन्हें दिसत नाहींत, अशी रड त्या युनिव्हर्सिटीच्या अहवालांतून ऐकूं येत आहे. जर पुणें पीठानें केवळ युनिटरी (एकमुखी) होण्याचा नाद निदान आरंभींचीं कांहीं वर्षे तरी सोडून कर्नाटकाला आपल्या पंगतीस घेतलें तर महाराष्ट्रानें कर्नाटकाचें जुनें भाषाऋण फेडण्याचा निदान प्रयत्न केल्याचें तरी श्रेय मिळविल्यासारखें होईल. मुंबई इलाख्यां-तल्या कर्नाटकांतले विद्यार्थी म्हैसूर विद्यापीठांत शिकावयास जाण्याचा जसा संभव नाहीं, तसाच नुसतें कर्नाटकास पुण्याप्रमाणें स्वतंत्र पीठ उभारण्याची संधि व सामर्थ्य येण्याचाहि संभव नाहीं. हिंदु-मुसलमानांची एकी दूरच आहे. उत्तर आणि दक्षिण-महाराष्ट्राची तरी एकी करण्याचें श्रेय पुण्यानें संपादावें.

(८) मी केवळ कानडी आणि मराठी ह्यांचा भाषाविषयक संबंध आणि त्यांचें उच्च आणि शास्त्रीय अध्ययन ह्याच दृष्टीनें हा लेख लिहिला आहे. राजकारण, प्रांताभिमान, दरबारांतील शिरकाव, सरकारी नोकऱ्या मिळण्याचा संभव वगैरे खऱ्या विद्येशीं संबंध नसलेल्या अवांतर गोष्टींकडे—जरी ह्यांचाच हिंदी विद्यापीठांतून सुळसुळाट फार आहे तरी—ह्या लेखांत मी पूर्ण दुर्लक्ष केलें आहे. ह्यामुळें ह्याची व्यावहारिक बाजूनें किंमत आणि प्रासंगिकताहि फार कमी ठरणार आहे. फार तर काय, पण कर्नाटकांतील नमूद केलेलीं कॉलेजें आणि कदाचित् पोटाच्या मागें लागलेला पांढरपेशा वर्गहि पुणें पीठापेक्षा मुंबई पीठाकडेच येनीं करीच करें धाव घेत राहील हेंहि मी जाणून आहें. तरी पुण्यानें हें धाडस करून आणि एकमुखी होण्याचा नाद सोडून एक प्रकारें स्वार्थत्याग करून दाखविल्यास, मला अशी आशा वाटते कीं, महाराष्ट्राची आणि कर्नाटकाची कांहीं वेळ तरी एकी झाल्यानें, पुण्यानें खरोखर कोणत्याहि स्वार्थाचा त्याग केला नसून आपला उत्तम प्रकारें स्वार्थच संपादिला असें त्याला परिणामीं दिसून येईल.

## ११

# राधामाधव-विलास-चंपू : आणि रा. राजवाडे.

जयराम पिंड्ये नांवाच्या कवीनें केलेला वरील चंपू ऊर्फ श्री शहाजी राजे ह्याची प्रशस्ति शोधून काढण्याचें श्रेय प्रसिद्ध शोधक रा. राजवाडे ह्यांनीं मिळविलें आहे, त्याबद्दल कोणीहि इतिहास-भक्त ह्या शोधकाचा सदैव ऋणीच राहील. हा चंपू प्रसिद्ध करतांना राजवाडे ह्यांनीं मराठींत एक विद्वत्तापूर्ण बारीक टाइपाच्या २०० पानांची प्रस्तावना जोडली आहे. शोधकाच्या विद्वत्तेची किंबहुना मार्मिकतेचीहि शंका घेणें कोणासहि सोपें जाईल असें वाटत नाहीं. पण मूळ चंपू ७६ पानांचा व त्याची प्रस्तावना २०० पानांची हा प्रकार 'मिया मूठभर तर दाढी हातभर' असा झाला आहे. जयराम कवीनेंहि उघडपणें श्री शहाजी प्रशस्ति ह्या नांवानें काव्य न लिहितां, त्याला राधामाधव-विलासाची प्रस्तावना जोडून, श्री. शहाजीच्या कीर्तीला विनाकारण दुय्यमपणा आणिला आहे. मनुष्याची स्तुति केली असतां ती कोणी वाचणार नाहीं, म्हणून कवीनें राधाकृष्णाच्या स्तुतींत श्री शहाजीची स्तुति मिसळून देण्यांत श्री शहाजीचें महत्त्व वाढेल असें कवीचें लाघव आहे, अशी संपादकानें कल्पना लढविली आहे. मूळ चंपूच्या आधारें शहाजी राजे ह्यांच्या चरित्राचें मराठींत विवरण करण्यांत संपादकानें चरित्रनायकाविषयीं आपला योग्य आदर व अभिमान व्यक्त केला आहे. ह्या मार्मिक विवरणाप्रीत्यर्थ प्रस्तावनेचीं १२५ पानें म्हणजे ६२ रकानें खर्ची पडले आहेत, ह्यात फारसें कांहीं वावगें नाहीं. आधुनिक

काळांतील पहिलें हिंदु स्वराज्य स्थापण्याचें मुख्य श्रेय श्री शिवछत्रपतींना देऊन, त्याच्या पूर्वतयारीचें श्रेय त्यांच्या जनकांना ह्या तडफदार शोधकानें दिलें आहे, ह्यांतहि कांहीं आश्चर्यकारक नाहीं. आश्चर्य इतकेंच कीं, मध्यंतरीं श्री रामदासाच्या नांवानें किंचित् गुणगुणें वाजविण्याची हुक्की ह्या आड्या शोधकालाहि आली आहे. रामदास आणि श्री शिवप्रणीत स्वराज्य यासंबंधीं चालू प्रश्नांत वादाचा डाव राज-वाड्यांच्या इतरत्र थैमान करणाऱ्या लेखणीवरहि पडून तिनें आपली दुडकी चाल ह्या गडकाळ प्रदेशांत किंचित् आवरलेली आहे, हें त्यातल्या त्यांत समाधान मानण्या-सारखें आहे! परंतु जणूं काय ह्या प्रदेशांतील कांटेरी लगाम आपल्या नाचऱ्या लेख-णीला आवडला नाहीं हें पाहून, प्रस्तावनेच्या शत्रीं उरलेल्या ७०।७५ पानांत मालकानें तिला केवळ स्वैर संचार करूं दिला आहे, असें म्हटलें असतां फारशी अतिशयोक्ति होईल, अशी आम्हांला भीति वाटत नाहीं. हीं पाऊणशें पानें ह्या विद्वान् शोधकानें स्वतंत्र ग्रंथद्वारां लिहिलीं असतीं तर संपूच्या, अगर श्री शहाजीच्या, किंबहुना राजवाडे ह्यांच्याहि कीर्तीस मुळींच कमीपणा आला नसता. इतकेंच नव्हे तर दक्षिणेंतील मानव-वंश, तौलनिक भाषा, व्युत्पत्ति, कालमान, देशरुढी वगैरे गंभीर विषयांवर ह्या नाणाव-लेल्या लेखकांचे अधिक समादरार विचार आम्हांला वाचावयाला मिळाले असते, अशी आशा करण्यांत आम्ही त्यांचा कमलाहि उपमर्द करीत नाहीं. कुठली राधा, कुठला माधव, त्यांचा कसला विलास, त्यांत जुन्या मताच्या पिढ्यांनीं श्री शहाजीचें चरित्र काळविलें म्हणून नव्या मताच्या राजवाड्यांनींहि त्याच कालवगांत वरील महत्त्वाच्या विषयांवरील आपल्या घाईनें बनविलेल्या मतांची खिचडी कालवावी, हें लेखकाचें नसलें तरी निदान वाचकांचें मोठें दुर्दैव आहे. राजवाडे म्हणजे कांहीं असे तसे शोधक नव्हत. त्यांचीं कांहीं मतें आदरणीय नसलीं, तरी लोकांना वाचनीय वाट-णारच! मग एका जुन्या चरित्राच्या लांबट प्रस्तावनेत त्यांनीं आपलीं इतकीं महत्त्वाचीं व अवजड मतें अशा आगंतुक रीतीनें कां घुसडलीं हें समजण्यालाहि वाचकाला किंचित् संशोधनच करावें लागत आहे. एकंदरींत सर्वच प्रकरण 'आठ हात लांकूड, तर नऊ हात ढलपी' अशा न्यायाचें झाल्यानें पुढेंमागें हें एक मिश्रजात ऐतिहासिक काव्य म्हणून प्रसिद्धीला येईल कीं काय न कळे.

शेवटच्या ४३ रकान्यांतील राजवाड्यांच्या प्रत्येक विधानाचें परीक्षण करणें म्हणजे त्यांच्याहूनहि प्रचंड ग्रंथाचा विस्तार करावा लागेल. त्यांचीं सर्वच विधानें खोटीं आहेत, किंवा खरीं आहेत असें म्हणण्याचें धाडस कोणासहि करतां येणार नाहीं. पण, तर पुष्कळ ठिकाणीं त्यांनीं आपले पुरावे दिले आहेत व तेहि बरेच परिश्रम करून दिले आहेत. त्यांचीं विधानें निरुत्तर खात्री करणारीं नसलीं, तरी विचाराला प्रेरक आहेत, इतकें प्रांजलपणें कबूल करून प्रस्तावनेच्या ह्या भागासंबंधीं आम्हांला जें जें कांहीं सामान्यतें व विशेषकरून आक्षेपार्ह वाटतें तें वाचकांपुढें ठेवण्याची रा. राजवाड्यांची परवानगी घेतों.

आमच्या मतें सर्वसामान्य आक्षेप असा आहे : इतिहासकार किंवा संशोधक ह्यानें आपल्या स्वतःच्या लाडक्या भावना, पक्षपात, धर्म, समजुती, सामाजिक अथवा वैयक्तिक लकबा, ह्यांपासून स्वतःस निदान इतिहास हा विषय हातीं असे तोपर्यंत तरी, अलग ठेवावें. रा. राजवाडे ह्यांनीं ही खबरदारी घेतली आहे असें दिसत नाही. ज्यांना हा ताटस्थ्ययोग साधत नाहीं, त्यांनीं इतिहासाचा नाद सोडावा ! नाहीं तर नदीच्या उगमांतच विष कालविण्याच्या पातकाचे धनी त्यांना व्हावें लागेल ! आर्य म्हणजे कोणी एक अति श्रेष्ठ मानववंश, अनार्य म्हणजे त्याच्या उलट चट सारे हलके वंश, आर्यांची वर्णव्यवस्था म्हणजे एक अजब चीज, जणूं तिच्यांत कांहीं दैवी जादू भरली आहे, ती भौतिकवृत्तिपर नसून आध्यात्मिक वृत्तिदर्शक अथवा स्थितिदर्शक आहे, ह्या वर्णव्यवस्थेच्या गुरुस्थानीं ब्राह्मण हे अगदीं मुळापासून होते, व ते अद्यापि तसेच आहेत; क्षत्रिय आणि वैश्य, हे वर्ण त्यांच्या तुलनेनें हीन दर्जाचे आहेत इतकेंच नव्हे तर ब्राह्मणां-पासून रक्तानें व वृत्तीनें ( मग ती वृत्ति मौतिक असो वा आत्मिक असो ) हे प्रथम-पासूनच अलग आहेत, ह्या व अशा इतर कल्पना आमच्या अवाढव्य देशांत बद्धमूल झाल्या आहेत व आमच्यांतील अनेक पुरातन मिश्र संस्कृतीमुळें, किंबहुना खऱ्या संस्कृतीच्या अभावामुळें अशा ह्या अनैतिहासिक कल्पनांना अगदीं सोवळें धार्मिक स्वरूप प्राप्त झालें आहे. ह्यामुळें विशेषतः धार्मिक अथवा सामाजिक विषयावर तात्त्विक विचार करावयाचा झाल्यास आमच्या देशांत खरे अधिकारी पुरुष विरळाच सांपडतील. आर्यांशिवाय द्राविड नाग, मुद्गल ( मोगल ) इत्यादि अनार्य वंश आर्यांच्या पूर्वी अथवा मागून ह्या देशांत आले किंवा आले होते; व ते कित्येक बाबतींत आर्यांहून न्यून, तर कित्येक बाबतींत आर्यांहून उच्चतर अथवा सुसंस्कृत अशा स्थितींत होते. अथवा शक, पल्लव, जाठ इत्यादि वंश आर्यांच्या घरींच राहणारे, किंबहुना तदंगभूतहि असतील असा संभव आहे; ह्यामुळें हिंदी आर्यांचा प्रदेश कल्पनेनेंहि नक्की रेखाटतां येत नाहीं. मग वस्तुतः निश्चित करण्याचे धैर्य इतिहासाचा गंधहि ज्यांना नाहीं, त्याच्याशिवाय इतरांस होणें शक्य नाहीं. आर्यांची व्याप्ति निश्चित ठरवितां आली, तरी रक्तानें असल आर्य हिंदुस्थानांत आज शंभरांतच नव्हे तर हजारांत तरी एक नेमका निवडून काढतां येईल की नाहीं, ह्याची शंका आहे. रक्तानें आर्य कोणास म्हणतां येईल, हे ठरविणें ज्यांना हल्लींचे मानववंशशास्त्र माहीत नाहीं त्यालाच सोपें जाईल असीं अज्ञानी धन्य माणसें आपल्यास आर्यच काय, तर ब्राह्मण अथवा क्षत्रिय ही पदवी छातीवर हात ठेवून स्वीकारण्यास लाजानेंच नव्हे तर कोटिशःहि पुढें येतील. आणि ह्या अनैतिहासिक चढाओढीस शंकराचार्य म्हणविणारे, शानी डोळे झांकून हातभार लावतील ह्यात कांहीं आश्चर्य नाहीं. आश्चर्य आहे तें हें कीं, इतिहासकार म्हणविणारीं कांहीं मोठमोठीं धेंडें ह्या भानगडींत आजवर पडत आलीं आहेत. फार तर काय, प्रसिद्ध पंडित शिरोभूषण भाषाशास्त्र पार-गत मॅक्स मुल्लर हे जर आज जिवंत होऊन आर्य कोण, अनार्य कोण हे ठरवूं लागले,

तर केवळ भाषांच्या अनिश्चित पुराव्यावरूनच त्यांनीं ज्यांचें आर्यानार्यत्व ठरविलें तें प्रस्तुत मिळणाऱ्या इतर पुराव्यावरून अबाधित ठेवतील कीं नाहीं ह्याची शानवाच आहे!

मानव वंशांविषयीं सिद्धान्त ठोकून देणें दिवसेंदिवस तर्के कठीण होत चाललें असतांहि आमच्या देशांतील विशेषतः आमच्या महाराष्ट्रांतील कांहीं इतिहास संशोधक स्थितीचे कर्णीच्या उगमाविषयीं बिनधोक सिद्धान्त प्रसिद्ध करीत आहेत; आणि अशा शोधकांत राजवाडे ह्यांची गणना होत आहे ह्याचें आम्हांस आश्चर्य वाटत आहे. बरेच परिश्रम करून ही मराठ्यांची पूर्वपीठिका ठरविण्यांत त्यांना पूर्ण यश आलें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. मराठे हे मूळचे फार प्राचीन काळीं हिंदुस्थानाबाहेर राहणारे व पुष्कळ दिवसांपूर्वी फिरत फिरत दक्षिणेंत येऊन वसाहत करून राहिले, किंवा मूळचे दक्षिणेंतलेच राहणारे ही देखील सहजासहजीं ठरवितां येण्यासारखी गोष्ट नाहीं. भाषा-शास्त्राचा पुरावा गणनेंत न घेतला, तरी शरीरमापनशास्त्र आणि पुरातन वैवाहिक चाली-रीती कांहीं अशा सर्वत्र आढळतात कीं, कदाचित् ते दक्षिणी द्रविड असतील, अशी शंका येण्यास जागा मिळते. देवकांची चाल, मातुल कन्येशीं विवाह वगैरे गोष्टींत त्यांचें दक्षिणेंतील इतर द्रविडांशीं साम्य आढळतें; पण इतर पुष्कळ गोष्टींत ह्यांचें रजपुतांशीं, विशेषतः पल्लवांशीं फार साम्य असल्यामुळें हे बाहेरून येऊन येथील द्रविडांत मिसळले असावेत, असा अधिक संभव आहे. हे लोक क्षत्रिय आहेत ह्यांत शंका नाहीं. वंशदृष्ट्या रजपुतांचा आर्यांतच समावेश होत असल्यानें ह्या मुद्यावर म्हणण्यासारखा मतभेद माज-विला नाहीं तरी तूर्त चालवून घेतां येईल. पण मराठ्यांना दक्षिणेकडील क्षत्रिय कल्पून ते उत्तरेकडील क्षत्रियापेक्षां दर्जानें हीन आहेत, अशी राजवाड्यांनीं आपली भावना करून मराठ्यांवर इतिहासकाराला न शोभण्यासारखी जी आग पाखडली आहे, ती मात्र प्रमाणाबाहेर आहे. रावबहादूर चिं. वि. वैद्यांनीं " मध्ययुगीन भारत, भाग २ रा परिशिष्ट ५ " ह्या आपल्या नवीन ग्रंथांतील भागांत राजवाड्यांची ही चूक दुरुस्त कर-ण्याचा जोराचा प्रयत्न केला आहे. त्याकडे वाचकांना हवाला देऊन तूर्त थाम भागण्या-सारखें आहे. दक्षिणेकडील क्षत्रिय जे मराठे त्यांच्यांतहि पुनः महाराष्ट्रिक, विराटे, आणि रट्टे जे आहेत, ते परस्परांहून भिन्न आहेत, असा राजवाडे ह्यांनीं रोख दिला आहे. त्यासंबंधीं वैद्यांनीं ज्याअर्थी कांहींच उल्लेख केलेला नाहीं, त्याअर्थी ह्या मुद्यांचा जास्त विचार करणें जरूर आहे.

## मराठ्यांविरुद्ध आगळीक.

गेल्या अंकांत आम्हीं रा. राजवाड्यांचे इतिहाससंशोधक ह्या पदवीला न शोभणारे कांहीं दोष दाखविले. मानवी इतिहासां-तील अमुक एक संस्कृति दुसरीहून श्रेष्ठ आहे, अमुक एक धर्म इतराहून श्रेष्ठ आहे किंबहुना एकाच देशांतील अमुक एक जाति अथवा उपजाति तिच्या समकालीन व समानशील दुसऱ्या जातीहून अथवा उपजातीहून वरी किंवा

चाईट आहे म्हणून थयथयाट करणें हें इतिहाससंशोधकाचें मुळींच काम नव्हे. पण ह्या फेरांत पडण्याची राजवाड्यांना आनुवंशिक खोड लागली आहे, हा त्यांचा सामान्य दोष आहे. रा. चि. वि. वैद्य ह्यांनीं संशोधनाहून अधिक श्रेष्ठ दर्जाचें म्हणजे इतिहास लिहिण्याचें अथवा ऐतिहासिक मीमांसा करण्याचें काम स्वीकारूनहि त्यांनीं जो उपद्व्याप केला नाहीं, तो ह्या संशोधकानें चालविला आहे; म्हणून अशा अनाठायीं उपद्व्यापांचा वेळींच निषेध करणें आमचें कर्तव्य आहे. रा. वैद्य देखील अमुक कोणी आर्य म्हणून श्रेष्ठ व इतर कोणी अनार्य म्हणून कनिष्ठ, अमुक जाति क्षत्रिय व इतर शूद्र वगैरे ठरविण्याच्या अनैतिहासिक भानगडीत गुरफटलेले दिसून येतात. तरी त्यांच्यांत एक प्रकारची जी प्रशंसनीय समतोल वृत्ति व प्रामाणिक जबाबदारी दिसून येते ती राजवाड्यांच्या गांवींहि नाहीं. त्यामुळें, उपरिनिर्दिष्ट सामान्य दोषांहूनहि विशेष निषेधार्ह अशा कित्येक घोडचुका त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत केल्या आहेत. त्यापैकीं पहिली ही कीं, महाराष्ट्रांतील मराठे व कुणबी ह्यामध्येंच त्यांनीं भिन्नता करून स्वस्थ न राहतां, महारट्टे, विरट्टे आणि रट्टे इ. मराठ्यांमध्येंच एक प्रकारचा उच्चनीच भाव निर्माण करून सर्व मराठा समाज हा हीन क्षत्रिय, अराष्ट्रीय १६०० वर्षे परतंत्र राहिलेला अतएव नादान आहे असें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे.

गोदावरी कांठावरील मराठे महारट्टे म्हणवितात व तुंगभद्रेवरील लोक आपल्यास नुसते रट्टे किंवा रड्डी म्हणवितात येवढ्यावरूनच त्यांच्या मूळ दर्जांत भिन्नता मानण्याची आम्हास मुळींच आवश्यकता दिसत नाहीं. हल्लीं ब्रिटिश सरकार एखाद्या जमीनदारालाहि "महाराज" बनवीत आहेत व तंजावराकडील श्री शहाजीच्या वंशजांनाहि ते राजे म्हणावयालाहि कांकूं करीत आहेत. म्हणून येवढ्याशा उपपदावरून वंशदृष्ट्या दरभंग्याचे ब्राह्मण महाराज तंजावरच्या हल्लीच्या क्षत्रिय शिवाजी राजाहून वरिष्ठ आहेत असा सिद्धान्त ठोकून देण्याला राजवाडे तयार होतील काय? "वर्णानां ब्राह्मणो गुरु" ह्या न्यायानेंच जर दरभंग्याचे महाराज दर्जानें श्रेष्ठ ठरतील म्हणावें, तर पूर्णावतार गणलेल्या क्षत्रिय श्रीकृष्णाहूनहि त्याचा एखादा ब्राह्मण पाणक्याहि श्रेष्ठच मानावा लागेल; महारट्टे आणि रट्टे ह्याच्या दरम्यान विराठे हा एक तिसरा भेद राजवाड्यांनी आपल्या व्युत्पत्ति स्फूर्तीनून नवीनच निर्माण केला आहे. कारण काय, तर वाईला विराटनगरी असेंहि कोणी म्हणत असत आणि तेथें जवळपास विराटगड म्हणून एक डोंगर आहे! एवढा शोध केल्याबरोबर त्याला असा संशय येऊं लागला कीं विराटे व बेरड हे एकच असतील! काय हे राजवाड्यांचे मापाव्युत्पत्तिशास्त्रावरील प्रभुत्व!! ह्यावरून पांडवांच्या व्याही विराट हाहि एक बेरड ठरला म्हणावयाचा! फार तर काय, पुरुषसूक्तांतील विराट् पुरुष हाहि एका प्राचीन बेरडांच्या टोळीचा नायकच होता म्हणावयाचा! बेरड ह्या शब्दाची खरी व्युत्पत्ति येणेंप्रमाणें आहे. हा कानडी शब्द मूळ बेडरू अथवा ब्याडरू असा अनेकवचनी आहे. त्याचे एकवचन ब्याड असें आहे. तो संस्कृत व्याध शब्दापासून किंवा तेलगू पेड म्हणजे

महार अथवा मोठा ( उरीया बोडो; संस्कृत बृहत् मोठा म्हातारा, जुना ) ह्यापासून आला असला पाहिजे. तें कांहीं असो. विराट आणि वेरड ह्या दोन शब्दांचा मुळींच कांहीं संबंध नाहीं, हें राजवाड्यांनीं कानडी भाषेकडे यत्किंचितहि लक्ष पुरविलें असतें तर समजून आलें असतें. रड्डी हे आज एक हजाराहून अधिक वर्षें महारट्ट्यांहून अलग झालेले आहेत; त्यांची भाषा कानडी किंवा तेलगू, तर महरट्ट्यांची मराठी; जैन धर्मांतून रड्डी हे लिंगायत धर्मांत गेले आहेत; तर महारट्ट बुद्ध धर्मांतून शैव धर्मांत गेले आहेत. इत्यादि महत्त्वाच्या धडामोडींमुळें ह्या दोघांत आता पुष्कळ फरक दिसून येणें साहजिक आहे. तरी पण राजवाड्यासारख्या शोधकाला त्यांचें मुळांतलें निरतिशय साम्य स्पष्ट दिसूं नये हें आश्चर्य होय. असले नसते भेद दक्षिणेकडील क्षत्रियांत त्यांनीं रचिले आहेत, इतकेंच नव्हे तर, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, पल्लव इत्यादि अनेक शतकें दक्षिणेंतच वास्तव्य करून राहणाऱ्या राजवंशींतील मराठ्यांच्या विशिष्ट घराण्यांना केवळ आपल्या भिंवईची भीति घालून, बिचाऱ्या इतर सामान्य मराठ्यांच्या पंक्तींतून उठवून निराळ्या पाटावर बसविलें आहे. नागपूरच्या आजच्या जिवंत राजे भोसल्यांनीं डॉ. कुर्तकोटींच्या शापाला भिऊन आपला दर्जा घालविला, तर आमच्या ह्या हजारों वर्षांपूर्वींच्या स्मृतिशेष राजघराण्यांनीं राजवाड्यांच्या कृपाप्रसादानें उत्तम क्षत्रियत्वाचा मान मिळविला ! कोण हे कुर्तकोटी आणि राजवाडे ह्यामधील अंतर ! !

आम्ही खालील कोष्टकात पंधरा निवडक राजवंशींतील घराण्याची तपशीलवार माहिती देतों. ह्या सर्व घराण्यांत पिढ्यान्‌पिढ्या रोटीव्यवहार तर काय, पण बेटी-व्यवहारहि झालेले ऐतिहासिक दाखले आहेत. ह्या सर्व घराण्यांनीं राजवैभव भोगिलें आहे. इतकेंच नव्हे तर कांहींनीं पातशाही गाजवून, कांहींनीं तर नर्मदेच्या पलीकडील मोठमोठ्या नामांकित उत्तर क्षत्रियांचीं सिंहासनें कैक वेळां पालथीं घातलीं आहेत. ह्यांचे शरीरसंबंध उत्तरेकडील क्षत्रियांशींच नव्हे तर दक्षिणेकडील साधारण साधारण मराठ्यांशीं केव्हा प्रत्यक्ष तर केव्हा पर्यायानें, झाले असले पाहिजेत. प्रत्यक्ष राजांच्या परस्पर विवाहाचे दाखले इतिहासांत जसे मिळतात तसे त्यांचे किंवा त्यांच्या नातलगांचे दाखले मिळविणें सोपें नाहीं; तरी अशा दाखल्याच्या अभावावरूनच ह्या राजघराण्याचा वंशदृष्ट्या दर्जा इतर मराठ्याहून श्रेष्ठ मानणें हें मराठा समाजाला तरी रुचणार नाहीं. इतकेंच नव्हे तर असला भेद राजघराण्यानाहि रुचणार नाहीं. चालुक्य, राष्ट्रकूट इ. त्यांनीं त्यांनीं राज्यें मिळविलीं तेवढेच राष्ट्रभक्त व श्रेष्ठ आणि बाकीचे कनिष्ठ व अराष्ट्रीय ठरविणें, हा कोठला न्याय ? श्री शिवाजीला स्वराज्य संपादण्यांत यश मिळालें नसतें, तर तेहि कनिष्ठच ठरले असते ना ? त्यांनीं किंवा इतरांनीं जे यश संपादिलें तें काय एकएकट्यानें संपादिलें किंवा आपल्या समानशील जातभाईंच्या जोरावर मिळविलें ? हीं चार दोन घराणीं वगळलीं असता बाकी सर्व मराठा समाज पेंढारी माळोंनीं म्हणावाच ठरतो काय ? आणि असें पेंढारी पालखी सरणारे उत्तरेकडील क्षत्रियात नाहींत किंवा नव्हते काय ? ज्या मराठा समाजानें जवळ जवळ दोन हजार वर्षें राजवैभव भोगिलें,

आणि मध्यंतरी आलेली मुसलमानांची लाट परतून परत स्वराज्यहि स्थापिलें, त्यांच्यातील पुढाऱ्यांना तेवढे निरखून श्रेष्ठ मानणें आणि त्यांच्यांतील अनुयायांना पारतंत्र्याखालीं चिरडलेले असें समजून कनिष्ठ मानणें, हा शुद्ध विपर्यास आहे. अशानें कोणाची फसगत होण्याचा संभव नाहीं.

| आडनांव | अपभ्रंश अथवा पर्याय | वंश | गोत्र | देवक | राजधानी |
|---|---|---|---|---|---|
| १ स्वातिवाहन | शातिवाहन सातव, शालिवाहन साल्व ? | शेष | कौंडिण्य | | पैठण |
| २ चोळ | | | | | कांची, सेलम |
| ३ गंग | गोंक, वंक, निकम | सूर्य | मानव्य | | म्हैसूर |
| ४ चालुक्य | चाळके, साळुंखे | सूर्य चंद्र | काश्यप वसिष्ठ | कमळ, साळुंखीचें पीस | वातापि, धनकटक |
| ५ राष्ट्रकूट | राठोड | सूर्य चंद्र | कौशिक, अत्रि, गौतम | मर्यादवेल, शंख | मान्यखेट, मालखेड |
| ६ पल्लव | पालव, साल्व | सूर्य | भारद्वाज | कळंब | कांची |
| ७ यादव | जाधव | सोम | कौंडिण्य | कळंब, पांच पालवी | देवगिरी |
| ८ भोज | भोय, होयसळ, भोइरे, भोइटे, भोसले | सूर्य | वसिष्ठ शालकायन | शंख, रुई | सातारा, कोल्हापूर, मुधोळ, म्हैसूर |

| आडनांव | अपभ्रंश अथवा पर्याय | वंश | गोत्र | देवक | राजधानी |
|---|---|---|---|---|---|
| ९ काळभ्र | कळभूर्य, काळमोर, कलच्छुरी | चंद्र | | | त्रिपुर, मदुरा |
| १० सेंद्रक | सिंधु, शिंदे, छंद | सूर्य शेष | कौंडिण्य | कळंब, रुई, अगाडा | छिंदवाडा, कल्याडगी |
| ११ शिलाहार | शेलार | सोम | दाल्म्य | कमळ | कोल्हापूर |
| १२ सात्वत | सांवत, सातपुते | सोम | कौंडिण्य | | सांवतवाडी |
| १३ परमार | पवार | सूर्य | भारद्वाज | कळंब | फलटण |
| १४ कदंब | कदम | सूर्य | भारद्वाज | हळद | गोंवें, बनवासी |
| १५ मौर्य | मोरे | सोम | बृहदश्व | मोराचें पीस | जांवळी |

वरील पंधरा नांवें आणि त्यांचे अपभ्रंश आजकालच्या सामान्य मराठ्यांत सर्रास आढळतात. ह्याशिवाय मराठ्यांत अद्यापि कितीतरी सुप्रसिद्ध आणि तेजस्वी घराणीं आढळतील कीं ज्यांना, सरदाऱ्या, सरंजाम, जहागिऱ्या मागें उपभोगिल्या आहेत व आताहि उपभोगीत आहेत. ह्यांपैकीं कित्येक घराणीं पूर्वी नुसत्या देशमुख्या, पाटीलक्या करून हल्लीं तीं राज्यपदारूढ झालीं, तर ह्याच्या उलट कांहीं उच्च पदावरून उतरून आता नुसते नांगराचे धनी बनले आहेत. पुष्कळ वेळां आपापसांत युद्धें करून वैभवाचा नाश करून घेतला आहे, तर पुष्कळ वेळां आपल्या हाडवैऱ्यांशीं जूट धरून त्याहून अधिक जबरदस्त अशा तात्पुरत्या संकटांतून आपला निभाव करून घेतला आहे; आणि जरी यदाकदाचित् बादशाही दरबारांतील वजन मराठ्यांच्या हातून गेलेलें दिसलें, तरी थंड देशांत ज्याप्रमाणें वरती बर्फाचें दाट आवरण पडलें असताहि त्याचेखालीं पिकें सुरक्षित वाढत असतात, त्याप्रमाणें डोक्यावरील बादशाही छत्राची कधींहि क्रांति होवो, महाराष्ट्रांतील मराठ्याच्या स्थानिक स्वातंत्र्याला कायमची मूठमाती कधींच कोणाला देता आली नाहीं. ह्याचें कारण मराठा म्हणजे केवळ आपल्या तलवारीवरच अवलंबून राहणारा अन्योपजीवी प्राणी नसून, त्याच्या आड न कोणी येईल तर तो कांहीं काळ नांगराचा फाळ मोडूनहि त्याची तलवार करून आपलें स्वत्व व आपला

इतिहास राखील असा आहे. ह्या गुणांत जसा गोदेच्या काठचा महरट्टा, तसाच तुंगेच्या कांठचा रट्टडीहि कोणास हार जाणार नाहीं. कलकत्ता युनिव्हर्सिटीचे प्रो. सेन ह्यांनीं मराठ्यांची राज्यपद्धति "Administrative system of the Marathas" ह्या नांवाचा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यांतील Village System ह्या भागांत अशी स्पष्ट कबुली दिली आहे कीं, "मराठा शेतकरी हा बंगाल्या-प्रमाणें ज्या पायाची लाथ बसली तो पायच पुनः चाटण्यास तयार असणारा भ्याड प्राणी नाहीं. पेशव्यांचें राज्य खालसा झाल्यावर जे युरोपिअन अंमलदार शेतावर जात त्यांच्याशीं खेडवळ मराठेहि दिलदार आणि स्वतंत्र बाण्यानें आपला आब राखून कसे वागत ह्याचें प्रत्यक्ष एल्फिन्स्टनहि फार कौतुक करीत असे." पान १७१ वर एल्-फिन्स्टनच्या शब्दांतच त्याचा खालील अभिप्राय दिला आहे. These (village) communities contain in miniature all the materials of a state within themselves and are almost sufficient to protect their members if all other Governments were withdrawn. "खेड्यांतील पाटलाचें राज्य म्हणजे एक आपल्यापुरतें लुटुपुटीचें संस्थानच असे. वरील सरकार जरी लयास गेलें तरी हें संस्थान आपलें रक्षण करून घेण्यास समर्थ असे." पण आमच्या संशोधकांस ह्या हाडीमाशीं खिळलेल्या स्थानिक स्वातं-त्र्याची कांहीं किंमतच नाहीं. ज्यानें उठावें त्यानें अटकेवर घोडा नाचवावा, तरच तो स्वतंत्र; मग त्यांत दुसऱ्याच्या स्वातंत्र्याची आहुति पडली, किंबहुना आपल्या शेजाऱ्यांची व स्वकीयांचीहि आबाळ झाली तरी बेहत्तर! अशा उपद्रवी दिमाखखोर कर्झनशाहीचें [illegible] आपल्या पायांवर उभारून आपली पगडी तोलून धरणाऱ्या गणराज पद्धतीची [illegible] बंगाल्यांनीं व युरोपिअनांनीं वाखाणावी आणि आमच्या स्वकीय इतिहासग्रंथ[illegible] मात्र तिला हेटाळावें ह्याचें इंगित काय? गणराज पद्धतीचा पाया बळकट असल्या[illegible] साम्राज्यपद्धतीची इमारत तिच्यावर उठविणें शक्य नाहीं. दक्षिणेंतील मराठ्यांनीं [illegible]

ब्राह्मणांतच अशी लठ्ठालठ्ठी सुरू झाली आहे हें काय मराठ्यांचें भाग्य कीं दुर्भाग्य ! आपल्या मतें मिळें। परी तें आहे जैसें तैसें ॥ हें तुकोबाचें म्हणणेंच खरें ! दुसरें काय !!

## जैन लिंगायतांशीं भांडकुदळपणा व महाराष्ट्राची बदनामी

रा. राजवाडे ह्यांनीं मराठ्याविरुद्ध आगळीक करून एकाच जातींत दुही माजविण्याचें पुण्य कर्म संपादन केलें आहे, हें मागच्या अंकीं दाखविलें. आतां त्यांनीं "सनातन" म्हणविणाऱ्या हल्लींच्या भेंडगुजरी हिंदु धर्माचे आपण सर्वाधिकारी आहों अशी स्वतःची भ्रामक कल्पना करून घेऊन; तीच आपल्या भाळ्या भोळ्या याचक अनुयायांत पसरविण्याचा उपद्व्याप ह्या लांबट प्रस्तावनेंत कसा चालविला आहे हें या अंकीं सांगावयाचें आहे. मराठ्यांविरुद्ध लिहितांना मनाची नसली तरी जनाची लाज ठेवावी लागतेच. कारण, मराठे पडले अर्वाच्य शस्त्रधारी. ते हीन असोत उत्तम असोत, नाकें मुरडीत कां होईना, त्यांना क्षत्रिय म्हटल्याशिवाय आपली पोळी पिकत नाहीं, अशी कांहीं "संशोधकांची" समजूत झालेली दिसते. पण ह्या पोळीचा व खऱ्या सत्यशोधनाचा कांहीं संबंध नाहीं, अशी आमची नम्र बुद्धि झाली आहे. लोकायतीक, जैन, बौद्ध, लिंगायत इत्यादि स्मृतिशेष अथवा हल्लीं हयात पण अशस्त्रधारी वैश्य जातींविषयीं आणि धर्मांविषयीं खरीं खोटीं मतें पसरवितांना ह्या "संशोधकाची" लेखणी क्षणहींच बेलगामी होते. परंतु जोंपर्यंत आम्हांला सत्यावरच दृष्टि ठेवावयाची आहे, तोंपर्यंत मराठे – ते आर्य असोत नसोत, त्यांना कोणी धूर्त क्षत्रिय म्हणोत किंवा शूद्र म्हणोत – कोण आहेत हें आम्हांला खऱ्या इतिहासांतच पाहिलें पाहिजे. जोंपर्यंत ब्राह्मणांना तो इतिहास कळत नाहीं, किंवा कळूनहि पोटासाठीं ते तो निराळे मांडवीत आहेत तोंपर्यंत मराठ्यांनीं आपणच आपलें मूळ शोधणें उचित आहे: व तसा अल्प प्रयत्न मागच्या अंकीं झाला.

ह्या अंकांत राजवाड्यांनीं आपल्या लेखणीची भांडकुदळ जैनबौद्धांवर विनाकारण कशी उगारली आहे ते पाहूं. शहाजीचें चरित्र, त्यात जैनबौद्धांना शिव्या, असें केवळ जाणूनबुजून विपर्यास राजवाडे ह्यांनीं केलें आहे. तें सम्य शब्दांत केलें असतें, तर त्यांच्या हेतूचा तरी आम्हांला संशय आला नसता तीहि वाट त्यांनीं मोकळी ठेविली नाहीं. पान १३८–९ व इतर पुष्कळ ठिकाणीं जैन बौद्ध इ. धर्मांना सनातन धर्मांचे द्वेष्टे, असूयक, स्त्रीशूद्रादि 'हल्कट' जातींत व समाजांत आपले पाखंड पसरून ब्राह्मण्याचा उच्छेद करणारे, इ. इ. उघड उघड निंदात्मक उद्गार काढिले आहेत, हे फार अयोग्य आहे; "ब्राह्मण म्हटला म्हणजे त्याला देहान्त शिक्षा नाहीं, असा दंडक असल्यामुळें, विकट प्रसंगीं इतर वर्ण शिक्षा ऊर्फ दंड टाळण्यासाठीं ब्राह्मणाचें सोंग घेत."

(पान १२८) अशा इतिहासाचा विपर्यास करून जैन बौद्ध महंतांना त्यांनी स्पष्ट "सोंगाडे संन्याशी" ठरविलें आहे. इतकेंच नव्हे तर त्यांच्या जुल्माला कंटाळून मराठे हे उत्तरेकडून दक्षिणेंत आले,(पान १५८). दक्षिणेंत आल्यावरहि "जैन, लिंगायत, मानभाव, गोरख पंथी इत्यादि नानापाखंडी ह्या लोकांना भुलवीत व हे लोक त्यांच्या भुलविण्याला बळी पडत........जो कोणी पोटाला देईल मग तो स्वधर्मी असो, विधर्मी असो, त्याची सेवा करण्यास हे नागोलन्न मराठे व यजुर्वेदी ब्राह्मण सारखेच तयार असत" (पान १९४) इ. वाक्यांनीं जैन, लिंगायत, मराठे ह्या सर्वांची सारखीच वेअब्रू केली आहे. शेवटच्या ह्या एकाच वाक्यात राजवाड्यांनीं आपलें चित्पावनी हृदय उघडें करून, जैन, लिंगायत, मराठे आणि देशस्थ ब्राह्मण ह्यांची थोडक्यांत सांगावयाचें तर अखिल महाराष्ट्राची बदनामी केली आहे. चित्पावन हे महाराष्ट्रांत येऊन फार दिवस झाले नाहींत, तोंच आपल्या पोषक मातृभूमीवर कसे व किती उलटूं शकतात, ह्याचें हें एक शहाजोग उदाहरण राजवाड्यांच्या लेखणींतून गळून पडलें आहे, हे महाराष्ट्रानें घ्यानांत ठेवण्यासारखें आहे. श्रीशहाजींची व भोसले घराण्याची व्यक्तिशः तळी उचलून राजवाड्यांनीं अखिल मराठा जातींविषयीं आपला तिरस्कार व्यक्त करण्याचें धाडस खालील वाक्यांत केलें आहे. "अशा राजकीयदृष्ट्या अर्धवट, लज्जास्पद व अधम स्थितींत दक्षिणेंतील नाग महाराष्ट्रिकोत्पन्न मराठे म्हणजेच उत्तरेकडील ऐत्तिरेय ब्राह्मणानें गायिलेल्या भोजक्षत्रियांचे वंशज जे शहाजी राजे भोसले त्यांनीं यवनाशीं करामतीनें व पराक्रमानें झुंजून स्वराज्याना पाया घालण्याचा साहसी उपक्रम स्वतःच्या एकट्याच्या हिमतीवर रचिला; आर्य क्षत्रियाचें नांव पुनरपि त्रिभुवनभर गाजविलें, आणि अखिल आर्यांच्या बेचाळीस पिढ्यांचा उद्धार केला"! ह्यावरून राजवाड्यांची निष्ठा एका भोसले कुळावर तरी होती, असा कोणी गैरसमज करून घेतील, तर पान १९२ वर भोसले कुळाच्याहि बदनामीचें विष त्यांनीं पुढील वाक्यांत ओकलें आहे. "भोसले हे पंचकुळीच्या बाहेरील मराठ्यांना परमार्थानें सत्कुलदृष्ट्या कमतर समजत, तर उलट बाहेरील मराठे लोक, भोसले व त्यांची दशकुळी व पंचकुळी ह्यांना रागानें कमअस्सल म्हणून नांवें ठेवीत." हा बेशरम कुटाळपणा मराठ्यांपुरता येथेंच न थांबविता भोसले घराण्याचान धर्म मात्र खरा धर्म, त्यांची संस्कृति तेवढीच उच्च दर्जाची आणि अखिल मराठ्यांचा धर्म व संस्कृति मात्र अत्यंत हीन दर्जाची हें ठरविण्याकरितां त्याच पानावरील पुढच्याच वाक्यात "एकपक्षाची जैनलिंगायतावर साम्राज्य चालविण्याची योग्यता, तर दुसऱ्या पक्षाची सामान्य देशमुखीहि टिकविण्याची अयोग्यता; एक चतुरस्र विद्येचा भोक्ता; दुसरा विद्येचा पिढीजात शत्रु. एक सनातन धर्माचा व गोब्राह्मणांचा कैवारी, दुसरा भेटेल त्या देवधर्माचा व साळूमाळूचा अनुयायी!" एकंदरींत राजवाडी हृदय म्हणजे विषाचें एक पेवच कसें होतें, हें त्यांना पूर्ण ओळखावयाचें असेल त्यांनीं हा अनैतिहासिक प्रस्तावनारूपी उपद्व्याप समग्र मार्मिकपणानें वाचावा अशी आमची शिफारस आहे. आम्ही तरी स्पष्ट म्हणतो कीं, ही संशोधनी प्रस्तावना नव्हे तर एका

चित्पावनाला वगळून यांनी उरलेल्या अखिल आधुनिक महाराष्ट्राची एकजात शद्वानेग बदनामी आहे! ज्याला जशी सहन होईल तशी होवो!!

जैन बौद्ध हेहि क्षत्रियच होते व मराठेहि क्षत्रियच आहेत, हें राजवाड्यांनाही कबूलच आहे. तेव्हां जैन बौद्ध ह्या स्वकीयांच्या जुल्माला कंटाळून मराठ्यांनीं दक्षिणेंत येणें हें संभवत नाहीं; मुळीं हें खरेंच नाहीं. पारशांप्रमाणें अगर चित्पावनांप्रमाणें मराठे जर महाराष्ट्रांत बाहेरून आले असतील, तर ते निदान फेणाला भिऊन जीव धरून दडून बसण्यासाठीं आले नाहीत. राज्यें आणि साम्राज्येंदेखील चालविण्यासाठीं आले आहेत. हें मत राजवाड्यांसारख्या उपटसुळाला सहन होत नसलें तरी श्री. चि. वि. वैद्या-सारख्या सन्मान्य व जबाबदार इतिहासकाराला मान्य आहे; इतकें पुरे. परंतु हा अंक मराठ्यांना पाठबळ देण्याकरितां आम्ही लिहीत नाहीं. ते ब्राह्मणांना पुरून उरण्यासारखे आहेत. श्री शहाजीच्या चारित्र्याच्या सावलीखालीं बसून राजवाड्यांनीं भारतीय धर्माचा खोटा इतिहास पसरविण्याचें जें दुकान उघडलें आहे, तें मात्र आम्हांला उघड्या डोळ्यानीं पाहवत नाहीं. लोकायतिक जैन, बौद्ध, लिंगायत, मानभाव, शीख, इ. वेद-बाह्य धर्मांच्या इतिहासाचीं साधनें अद्यापि संग्रहित व्हावयाचीं आहेत. तीं हळूहळू होऊं लागलीं आहेत. त्यांना आपल्या अनैतिहासिक हातांचा स्पर्श करून राजवाड्यां-सारख्या ब्राह्मणांनीं विटाळ वाटवूं नये अशी आमची नम्र सूचना आहे. सर्व ब्राह्मण सारखेच अनधिकारी आहेत, असें आमचें म्हणणें नाहीं. विजयनगर कॉलेजचे दोन प्रोफेसर एम्. एस्. रामस्वामी अय्यंगार आणि बी. शेषगिरीराव हे देशस्थ ब्राह्मण आहेत. त्यांनीं गेल्या सालीं "Studies in South Indian Jainism" (*दक्षिण हिंदुस्थानांतील जैन धर्माचें अध्ययन*) हा आपला स्तुत्य ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. ह्या ग्रंथाचा निष्कर्ष असा स्पष्ट निघत आहे कीं, दक्षिण हिंदुस्थानांतील मध्य-युगीन वाङ्मय, सद्धर्म व सुसंस्कृति ह्यांचें सर्वच नाहीं तरी बहुतेक श्रेय, जैन आणि बौद्ध धर्मांच्या उदार आणि विरक्त प्रचारकांनाच आहे. जैन-बौद्धांचा धर्म आणि संस्कृति हीं आर्य आहेत किंवा अनार्य आहेत हा प्रश्न बाजूस ठेविला, तरी तीं वेद-बाह्य आहेत, येवढें निर्विवाद आहे. निदान त्यांना ब्राह्मणी हातांचा विटाळ घडला नाहीं, हें तरी निश्चित आहे म्हणून महाराष्ट्रांतील काही ब्राह्मण म्हणविणाऱ्यांनीं ती साळूमाळूंची संस्कृति, ती सोंगाड्या सन्याशांची वृत्ति, ती नागनरसोबांची कृति असे इतरांना भासवून तिला हेटाळावें, ह्यात ब्राह्मणी हृदय ओळखून असणाऱ्यांना आश्चर्य वाटण्यासारखें काहीं नाहीं. आश्चर्य हेंच कीं, विजयनगरचे वरील दोन्ही देशी ब्राह्मण इतिहासकारानीं जैन-बौद्धांचे सप्रमाण गोडवे गावे आणि आमच्या महाराष्ट्रांतील संशोधकांनीं तिकडे दुर्लक्ष करून त्यांची नुसती कुटाळकी करीत बसावें. आमच्या मतें खरा प्रकार असा आहे.

जैन-बौद्धांचा धर्म व संस्कृति ब्राह्मणाच्याइतकीच जुनी आहे. किंबहुना जैनांची संस्कृति ब्राह्मणांच्याहूनहि फार दिवसाची प्राचीन असावी. आम्हाला ती शुद्ध द्राविड

असावी असा जबर संशय येऊं लागला आहे. तिचा जन्म उत्तर हिंदुस्थानांत झाला कीं पश्चिम एशियांत झाला, हें ठरविणें तूर्त तरी कठीण आहे. ज्या क्षत्रियानें तिला निर्माण केलें ते हिंदी आर्य कीं पश्चिम आशिआंतील प्राचीन द्राविड होते किंवा मध्य आशियांतील मुद्गल ऊर्फ मोगल होते हें ठरविण्यास अद्यापि पुरेशीं साधनें उपलब्ध झालीं नाहींत. मूळ पीठिका कशीहि असो, जैन-बौद्धांची वृत्ति ब्राह्मणांप्रमाणें जुलमी, आततायी अथवा अत्याचारी मुळींच नव्हती. उलट त्यांनीं प्राथमिक अवस्थांतरया व मागसलेल्या दक्षिण हिंदुस्थानांत सात्त्विक धर्म व अत्युच्च संस्कृतीचा अलोट प्रसार केला असतांहि ब्राह्मणांनीं मात्र इ. स. ७०० पासून ९०० वर्षांच्या काळांत त्यांचा कल्पनातीत छळ करून, दक्षिणेंतील राजवटींतून त्यांना घालवून दिलें व त्यांनीं अत्यंत श्रमानें व स्वार्थत्यागानें दळलेल्या संस्कृतीच्या पिठावरच आतां ब्राह्मणी शंकराचार्य चरत आहेत व रेघा ओढीत आहेत. इ. स. ७०० शतकापर्यंत जैनधर्म आणि जैन संस्कृतीचा प्रसार आणि विजय दक्षिणेंत निरंकुशपणानें होत होता. दक्षिणेंतील (महाराष्ट्रांतील) सामान्य जनता ह्या संस्कृतीची होती; इतकेंच नव्हे तर कदंब, यादव, शिंदे, राष्ट्रकूट, चालुक्य, कल्चुरी इत्यादि प्रसिद्ध क्षत्रिय राजवटींनीं जैन, बौद्ध अथवा लिंगायत धर्म उघडपणें अथवा प्रच्छन्न सहानुभूतीनें स्वीकारलेला होता. सुमारें इ. स. ७५० पर्यंत श्री. चिं. वि. वैद्यांनीं आपल्या मध्ययुगीन भारतांत वर्णिल्याप्रमाणें दक्षिणेंत अथवा समग्र भारतांत जातिभेदाचीं बंधनें हल्लींप्रमाणें निगडित झालीं नव्हतीं. इतकेंच नव्हे तर व्यक्ति अथवा समूह जैन, बौद्ध, लिंगायत अथवा वैष्णव धर्मांचा अथवा संप्रदायांचा स्वीकार करीत किंवा अदलाबदलीहि करीत. मात्र एवढेंच कीं, राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें हें धर्मांतर केवळ पोट जाळण्यासाठीं नसून अत्यंत भक्तीनें व श्रद्धेनें होत असे. कदाचित् राजवटींत असें धर्मांतर झाल्यास ते राजकीय धोरण म्हणून होत असे. पण तेथेंहि केवळ रा. राजवाडे बरळतात त्या न्यायानें पोटाची खळगी भरण्यासाठीं होत नसे. फार तर काय, उत्तरीय ब्राह्मण कुमारिल भट्ट आणि दाक्षिणात्य ब्राह्मण आद्य शंकराचार्य ह्या दोघांनीं ज्या जैन बौद्ध धर्मांची गळेचेपी केली, ते दोन्ही धर्म केवळ राजवाडे हिणवतात त्याप्रमाणें साळूमाळू नव्हते. प्रत्यक्ष कुमारिल (सुमारें इ. स. ७००) ह्यानें प्रथम बौद्धाचें शिष्यत्व पत्करिलें होतें. नंतर त्यानें कृतघ्नपणें त्यांच्यावरच उलटून त्यांचा नाश केला. आद्य शंकराचार्यांनें तर बौद्धांचा विज्ञानवाद, अहिंसावाद, विभूतिवाद, मूर्तिपूजा, पुनर्जन्म ऊर्फ अवतारवाद आणि सन्यास संप्रदाय हीं सारीं तत्त्वें आपलीशीं करून, जुन्या वैदिक धर्मांच्या यज्ञयागाचा व कर्मठपणाचा पसारा गुंडाळून ठेवून, हल्लींच्या भेंडगुजरी, कमअसल, बेवारसी, बेपत्ता हिंदुधर्मांची मूळ मेढ रोवली आणि बौद्ध-जैन धर्माला हतवीर्य केल्याचें कुमारिल भट्टाचें श्रेय अथवा अपश्रेय इ. स. ७०० नंतर आपण बळकावलें. ह्यावरून जैनबौद्ध आचार्य हे सोंगाडे संन्याशी आणि साळूमाळू किंवा कुमारिल आणि शंकराचार्य हेच कृतघ्न व धरगिळू हें वाचकांनीच ठरवावें. अशा शंकराचार्यांना धर्माचार्य

म्हणण्यापेक्षां धर्मसुत्त्वही म्हणणें अधिक शोभेल. आद्य शंकराचार्यांनें तर बौद्धतत्त्वांवर इतका ताव मारिला आहे कीं, त्याचे काळीं त्यास वैदिकमताचे लोक 'प्रच्छन्न बौद्ध' असा टोमणा मारीत. पों तर त्यानें द्राविडांची पूजा, शाक्तपंथ, देवीपूजा आणि लिंगपूजा ह्यांच्याच परंपरागत मळावर आणि विशेषतः बौद्धांचा विज्ञानवाद ऊर्फ मायावादाच्या आयत्या आधारावर आपला "शांकरदिग्विजय" गाजविला! असें असतां राजवाडे ह्या ब्राह्मण प्रचारकांना परिव्राजकाचार्य समजतात आणि जैनांच्या व बौद्धांच्या अथवा लिंगायतांच्या आचार्यांची सोंगाडे संन्यासी म्हणून निंदा करितात हिला काय म्हणावें? अशा निंदेला **चित्पावनी चोराची उलटी बोंब** ह्याहून अधिक अन्वर्थक नाव कोणी वाचकानें शोधून काढिल्यास ते आम्ही आभारपूर्वक इतिहाससंशोधकास व्हाल करूं!

कसेंही असो. जैन धर्मावर जो जुलुमाचा आरोप राजवाड्यांनीं केला आहे तो *मात्र उलट्या काळजाचा आहे. सुमारें इ० स० ७०० पर्यंत दक्षिणेंत सामान्य जनसमुदायांतच नव्हे, तर प्रसिद्ध राजवटींतूनहि जैन, बौद्ध आणि द्राविडी शैव धर्मांचीच बलवत्तर प्रतिष्ठा होती.* वैदिक यज्ञयागांची कांहीं चालुक्य राजांनीं अधून मधून उचल केली, पण संस्कृतीशीं समेट करूं पाहणाऱ्या हर्षांच्या वैष्णवसंप्रदायानें आर्य संस्कृतीच्या जीर्णोद्धारार्थ चालुक्यांनीं केलेल्या ह्या तुरळक प्रयत्नांनाहि दाबून टाकून शेवटीं आर्यसंस्कृति नामशेष केली, व हर्षांच्या द्राविडी संस्कृतीची ध्वजा कायमची उभारली. हर्षांची सारी हिंदु संस्कृति आणि हिंदु धर्म वेदबाह्य आहेत. इ. स. ७०० पर्यंत ही संस्कृति जैनांच्या अथवा द्राविड शैवाच्या नांवावर विस्त होती. दक्षिणेंतील पुष्कळसा मोठा ब्राह्मण समुदाय जरी संस्कृतीनें पूर्वीपासूनच पूर्ण द्राविड होता अथवा ह्या काळीं झाला होता, तरी त्याला आर्यांच्या संस्कृतीला अशा प्रकारे मूटमारी मिळाली, हें पाहून वाईट वाटत होतें. म्हणून वस्तुतः नाहीं, तरी नांवानें तरी निदान ही दाक्षिणात्य संस्कृति आर्यांच्या नावानें विकावी, असा त्यांचा फार दिवसांचा प्रयत्न होता. इ. स. *७५० च्या सुमारास अशा खवळलेल्या ब्राह्मणांनीं तत्कालीन राजांच्या साह्यानें पुनः एकवार आणीबाणीचा आणि शेवटचा प्रयत्न केला व तो मात्र पूर्ण यशस्वी ठरून बौद्ध* धर्मास तर तिलांजळीच मिळाली व जैन धर्मास भयंकर धक्का बसून, तो आतां कसाबसा जीव धरून आहे. जैन-बौद्धांच्या उलट ह्या प्राणघातकी चळवळीचा मुख्य पुढाकार तिरुज्ञानसंबंदर आणि तिरुनावुक्करसर ऊर्फ अप्पार ह्या दोन समकालीन शैव ब्राह्मणांनीं घेतला. पहिल्यानें मदुरेच्या कूण नांवाच्या पाण्ड्य राजाला आणि दुसऱ्यानें कांची येथील महेंद्रवर्मा नांवाच्या पल्लव राजाला जैन धर्मांतून शैव धर्मांत घेतलें. तेव्हांपासून जैनांवर कल्पनातीत भयंकर कहर गुदरला. **आठ हजार जैन आचार्यांना व पुढाऱ्यांना सुळावर चढवून देहान्त शिक्षा** देण्यात *आल्या. ( रामस्वामी आयंगारचा वरील ग्रंथ, पान ६६।६७ पाहा. )'अशा देहान्त शिक्षेचीं चित्रें अद्यापि मदुरा येथील प्रसिद्ध* मीनाक्षीच्या देवळांतील भिंतींवर मोठ्या हिमायतीनें कोरलेलीं स्पष्ट आढळतात.

राजवाड्यांनीं हें देऊळ पाहिलें आहे. त्यांच्या नाहीं, तरी जैनाच्या डोळ्यांना हीं भेसूर चित्रें दिसण्यासारखीं आहेत. पण लक्षांत घेतो कोण? प्रोफेसर आयंगार हे ब्राह्मण असूनहि वरील तिरुज्ञानसंबंदर आणि अप्पार ह्या दोन ब्राह्मणांच्या कसाईपणाबद्दल आपला निर्भीड शेरा पान ७० वर इंग्रजीत स्पष्ट शब्दांत दिला आहे. त्यांचें शब्दशः भाषांतर असें आहे : "जैनांसंबंधीं सामान्य लोकांत गैरसमज पसरविणें आणि त्यांच्या आचारासंबंधीं काळ्याकुट्ट रंगांत प्रतिकूल वर्णनें चठविणें हा संबंदरचा मुख्य हेतु होता. शिवीगाळ म्हणजे युक्तिवाद नव्हे. ज्याअर्थी संबंदर आणि अप्पार ह्यांच्या काव्यांत जैनांविरुद्ध अंगावर शहारे उठविणाऱ्या शिव्याशापांच्या वर्षावाशिवाय दुसरें कांहींच नाहीं, त्याअर्थी त्यांनीं स्वीकारलेली जैनावर जय मिळविण्याची पद्धत केवळ अडाणीच नव्हे, तर क्रूरपणाची होती, असा निर्णय करणें आम्हाला भाग आहे." ब्राह्मणांविरुद्ध ब्राह्मणानेंच दिलेल्या ह्या निर्णय वाचणाऱ्या वाचकांनींच ठरवावें, कीं "जैन सोडून साप मारावा, कीं ब्राह्मण मारावा!" झाली ती गोष्ट झाली. पण राजवाड्यांसारख्या संशोधकांनीं ती आपल्या अनुयायांना उलट कां भासवाची? सापहि असें कृत्य करीत नाहीं, तें महाराष्ट्रीय संशोधक अलीकडे का करूं लागले आहेत? हें कोडें कोणी उकलील काय?

रा. राजवाड्यांनीं अखिल महाराष्ट्राची कशी नाचक्की केली आहे, हें वर दाखविलें. ब्राह्मणाला तेवढें पूज्य मानून बाकी उरलेल्या क्षत्रिय वैश्यांसंबंधीं त्यांनीं आपला अनादर उघडपणें व्यक्त केला आहे. शूद्र म्हणजे तर कुत्र्या-मांजराहून कमी, अशी त्यांची भावना दिसते. आर्य स्त्रियांविषयीं देखील त्यांची दाक्षिण्यबुद्धि नाहीं, तर मग शूद्रांविषयीं कोठून असणार? त्यातल्या त्यात शूद्र स्त्रियांविषयीं त्यांनीं जी बेशरमपणाची नालस्ती केली आहे, ती वाचून तर राजवाड्यांना आई होती की नाही, ह्याचाहि संशय येऊं लागतो. आर्यवंश आणि ब्राह्मण वर्ण ह्यांच्या धुंदीमुळें स्त्रीदाक्षिण्य ही चीज त्यांच्या मनःकोशांतून अजीबात नष्ट झालेली दिसते. पितृसावर्ण्य आणि मातृसावर्ण्य अशा गंभीर विषयांची मीमांसा त्यांना ह्याहून अधिक भारदस्त वृत्तीनें, निदान शब्दांनीं तरी न्यास करतां आली असती. असो हा लेखांक फार लांबला म्हणून बाकीचा विषय पुढील अंकीं समाप्त करूं.

## केवळ ब्राह्मणेतर द्वेष

मागील तीन अंकांत रा. राजवाड्यांनीं जवळ जवळ अखिल महाराष्ट्राची नाचक्की केली आहे हें दाखविलें. त्यांचें संशोधन म्हणजे ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादावरील एक चिथावणी पाचवा वेदच म्हटलें तरी चालेल. ह्या आधुनिक परशुरामानें २२ वे वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करून समंध महाराष्ट्राला भाग लावण्याचा घाट घातला आहे. पान १९८ वर, विश्वामित्रावरहि ...ण करण्याच्या महत्त्वाकांक्षेनें ह्या ब्राह्मणानें वर्णव्यवस्थेच्या उपक्रमाची एक नवीनच

सृष्टि निर्माण केली आहे. ती अशी: " ( १ ) प्रथम ब्राह्मण उर्फ ब्रह्मन् हा एकच शुभ्रमास्वर वर्णी वर्ण होता. ( २ ) त्याला रक्तलोहित वर्णी क्षेत्र उर्फ क्षत्रिय लोक भेटून ब्रह्मक्षत्र नामक द्वैवर्ण्य बनलें. ( ३ ) पुढें विश लोक सामावून त्रैवर्ण्य उत्पन्न झालें. ( ४ ) शेवटीं उत्तर कुरुंत व उत्तर मद्रांत कृष्णवर्ण शूद्रांचा समावेश होऊन क्रमसिद्ध चातुर्वर्ण्य झालें. " रा. राजवाड्यांच्या मतें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हेही जणूं रक्तानें भिन्न आहेत असें त्यांच्या ह्या लिहिण्यावरून दिसतें. ब्राह्मण हेच आर्य बाकीचे कोणीतरी. कदाचित् चित्पावन तेवढेच आर्य असतील! एकूण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तिघे एकजात आर्य हें मतहि राजवाड्यांच्या संवंळ्याला चालत नाहींसें दिसतें! इतकेंच नव्हे, तर त्यांच्या स्वप्नसृष्टींत आर्यांचा असा एक काल होता कीं आर्यांचे सारे आदमी ( औरती नव्हेत, त्या शूद्राहूनहि अधम ) गण्या, गोप्या, दौल्या, दगड्या-चट सारे, पळीपंचपात्री वाजविणारे सर्फेतीहून पांढरे ब्राह्मणच होते. त्यांत ते एकच गोष्ट सांगावयाला विसरले कीं हे सगळे आदमी चित्पावनच होते. असो. ह्या एकजात पांढऱ्यांनीं हळूहळू रंगिलाच्या औरती लाटल्या आणि जीं पोरटीं झालीं, तीं बापाच्या वाणाची समजण्यात आलीं. ह्यालाच पितृसावर्ण्य असें जाडें नांव आहे. पुढें गौतम बुद्ध नांवाच्या एका सोंगाड्या संन्याशानें फार घाण केली. कां, तर त्यानें आर्यांची कंदुरी आणि रक्ताभाताचा नैवेद्य बंद केला. तो स्त्रिया व शूद्रांना वेदांतील गुपित सांगूं लागला! तो चित्पावन असता तरी आमच्या ह्या परिसरामाला खपतें. पण तो एक दुष्ट क्षत्रिय होता. दुष्ट कसा म्हणाल तर त्याला पळीपंचपात्रीचा वीट आला होता. आणि त्यानें स्त्री-शूद्रांना ( जे भाळे भोळे गौतमाच्या काळापूर्वीं ब्राह्मणाच्या पायांवर लोटांगण घालीत होते, ) ब्राह्मणांच्या पायांवरून उचलून त्यांच्या स्वतःच्या तंगड्यांवर उभे राहण्यास शिकविलें! त्यामुळें हल्लींच्या जाती झाल्या, असें हे परिसराम संशोधक सांगतात. बौद्धधर्मामुळें सवगोलंकार झाला अशी कोल्हेकुई आजवर एकूं येत होती, तर आता आपल्या परिसरामाला बौद्धामुळें जातिभेद माजला असें म्हणण्याची उलटी वाचा फुटूं लागली आहे. काळीज उलटें तेथें वाचा कशी सुलटी असावी!

" बौद्धामुळें आपल्या आयाबहिणींची चालरीत सारी गेली " अशी पांढऱ्या ब्राह्मणांस काळजी पडली म्हणून त्यांनीं मातृसावर्ण्याचा कायदा केला, असा राजवाड्यांनीं शोध लावला आहे! जणू ते करतील तीच पूर्वदिशाः निदान राजवाड्यांची अशी समजूत दिसते. ते म्हणतात कीं बुद्धाच्या काळापर्यंत पादरा नर व काळी मादी ह्यांचे पोटीं जी प्रजा होई तिचा वाण पांढरा समजला जाई. म्हणजे पितृसावर्ण्याचा कायदा होता. पुढें बुद्धानें जें पाखंड माजविलें त्यामुळें ब्राह्मणांना आपल्या आयाबहिणींची नीति सांभाळण्याकरिता अशा प्रजेचा वाण काळा ठरवावा लागला. म्हणजे संस्कृत भाषेंत सांगावयाचें झाल्यास मातृसावर्ण्याचा कायदा करावा लागला. हा ब्राह्मणी कायदा कधीं कोणीं केला असो वा नसो, पण त्याबद्दल प्रायश्चित्त् बौद्ध धर्माला काय म्हणून? चोर सांपडत नाहीं तर संन्याशाला चळी देण्याचाच हा न्याय दिसतो! त्याअर्थीं बौद्ध हे

सोंगाडे संन्याशी त्याअर्थी त्यांना सुळी देण्यांत पुण्यच आहे! ते ब्राह्मण असते तर त्यांच्याकडे वांकड्या डोळ्यांनीं पाहण्याचीहि कोणी छाती करूं नये असें मनुस्मृति म्हणाली असती. त्यांनीं शूद्र स्त्रीशीं दंगामस्ती केली म्हणून काय झालें? पण तेंच उलट जर एखाद्या शूद्रानें एखाद्या ब्राह्मणीवर हात टाकला तर त्याला नुसती देहान्त शिक्षाच नव्हे तर त्याच्या पुढील पिढ्यांना यावच्चद्रदिवाकरौ अस्पृश्यपणाची सजा! आणि ह्याचें कारण काय तर राजवाडे म्हणतात बौद्ध धर्म!! राजवाड्यांच्या विचाराचा व भाषेचा आग्यपणा हुबेहूब दाखवावा म्हणून आम्हीं मुद्दाम ह्या एकान्यांतील भाषा त्यांना आवडेल अशी स्वीकारली आहे. अमेरिकेतील निग्रो स्त्रीपुरुषांसंबंधीं तेथील हल्लींचे पांढरे नराधम जे लिंचिंगचे रूपानें अत्याचार व अनाचार करितात, तेच बुद्ध पूर्वकालीं व किंचित् उत्तर काळीही ब्रह्मावर्तांत चालू होते; व ते अजीबात बंद करण्यासाठीं पितृसावर्ण्याचे ऐवजीं मातृसावर्ण्याचा कायदा करून ब्राह्मणांनीं मोठें पुण्य जोडलें, असा राजवाड्यांच्या पराशर स्मृतीचा भावार्थ दिसतो.

हिंदुस्थानांतील मानववंशमीमांसेची अशी मखलाशी करूनच राजवाड्यांनी ब्राह्मणांचा वरिष्ठपणा स्थापण्याचा हा प्रयत्न केला आहे असें नव्हे तर, भाषा विकास-मीमांसेतहि त्यांनीं असाच पक्षपात दाखविला आहे. त्यांच्या मतें संस्कृत भाषा काय ती ब्राह्मणानाच येत होती व तीही ब्राह्मण पुरुषांलाच. बाकी चट् सान्या मानव प्राण्यांची आणि ब्राह्मणांच्या बायकांची देखील त्या भाषेत जीभच वळत नव्हती; म्हणून ते सर्व प्राणी हैंगार्ड प्राइज त्यांना 'चोरी' बोली बोलत असत, असा टोला दिमाखानें मारला आहे. जैन बौद्ध क्षत्रियांनीं आपला धर्म, स्त्रिया, वैश्य आणि शूद्रांमध्यें अफाट पसरला. इतकेंच नव्हे तर विंध्येत मागासलेल्या दक्षिण मार्तीं जंगली जातींतहि ह्या बौद्ध जैन प्रचारकांनीं अत्यंत विरक्त आणि दिगंबर राहून आपल्या उदार धर्माप्रमाणें आपल्या संस्कृत वाङ्मयाचा आणि विविध साहित्याचा किती झपाट्यानें प्रसार केला हें ज्यांना समजून घ्यावयाचें असेल त्यांनीं आम्हा गेल्या अंकांत सांगितलेले विजयनगरचे प्रोफेसरद्वय रामस्वामी अय्यंगार आणि श्री. शेषगिरीराव ह्यांचें गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेलें पुस्तक वाचावें; म्हणजे राजवाड्यांची वरील गर्वोक्ति किती पोल आणि दुसऱ्यावर डाग देण्यासारखी क्रूर आहे हें स्पष्ट दिसेल.

रा. राजवाड्यांच्या चातुर्वर्ण्यासंबंधीं कल्पना फारच गांवढळपणाच्या व अनैतिहासिक आहेत. ते म्हणतात त्याप्रमाणें चातुर्वर्ण्याची संस्था केवळ हिंदुस्थानच्या हद्दीवरील उत्तर कुरूंतच हिंदी आर्यांमध्यें होती असें नसून, ही संस्था इराणांतील आर्यांमध्यें, व शिवाय हिंदुस्थानाबाहेर राहणाऱ्या प्राचीन शक पार्थवांमध्येंहि रूढ होती. अथ्रवण = ब्राह्मण, रथेष्टारः = रथे (ऊर्फ क्षत्रिय), वास्त्रियस् = विश, हूतोक्ष = हूईटी (शूद्रोर्ड शूद्र) असे वर्ण व तद्वाचक वरील शब्द हिंदुस्थानाच्या बाहेरील झेंद अवेस्ता भाषेत होते. ह्यावरून शूद्र हे देखील (निदान ह्या शब्दांनीं ओळखलें गेलेलें राष्ट्र तरी) स्वतीनें अनार्यच होते कीं नाहीं याचा संशय येत आहे. उत्पत्तीं ब्राह्मण आणि सूर्यवंशी

क्षत्रिय हे वर्ण द्राविड अथवा अनार्य होते असें पार्जीटरचें मत आहे. शूद्र हा शब्द वेदांत आढळत नाहीं. तो पुरुषसूक्तांतच "पद्‌भ्यां शूद्रो अजायत" असा आढळतो. पण पुरुषसूक्त हा वेदांतील अगदीं अलीकडचा भाग असून तो प्रक्षिप्त असावा असाहि कांहीं मान्य संशोधकांचा तर्क आहे. "कंदहारांत शूद्रोई नांवाचें एक राष्ट्र होतें व दक्षिण सिंधू नदीचे तीरावर शूद्रोम हा नांवाचें एक शहर होतें" असें लासन् नांवाच्या जर्मन वैदिक संशोधकाचें म्हणणें आहे. परंतु ब्राह्मण तेवढेच आर्य आणि शूद्र म्हटलें कीं सारे अनार्यच—नव्हे तर कुत्र्यांहून देखील कमी—अशा ज्या गांवढळांची समजूत आहे, त्यांच्यापुढें जर्मन पंडितांचेंच काय पण प्रत्यक्ष स्वर्गांतील बृहस्पतीचेंहि मत आणून ठेविलें तरी त्यांचा ब्राह्मणेतरद्वेष कसा कमी व्हावा! अशाच ब्राह्मणांनीं आज दोन हजार वर्षें हिंदुस्थानांत ब्राह्मण आणि शूद्र ह्या दोनच जाती आहेत, परशुरामानें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली, वैश्यांची तर उत्तमांत गणनाच नाहीं; वगैरे वगैरे मतें ब्राह्मणेतरांच्या रोमरंध्रांतून समरस करून दिलीं आहेत.

ज्यांच्या डोळ्यांत क्षत्रिय व वैश्य भरत नाहींत त्यांनीं "अतिशूद्र" ह्या नांवानें "अस्पृश्य" गणलेल्या महारामांगांना बरें पाहावें ही तर अशक्यच गोष्ट. जणूं काय महारामांगांना चार शिव्या हासडल्याशिवाय शहाजीचें चरित्र पुरें होतच नाहीं. म्हणून, पान १४१ वर राजवाड्यांच्या लेखणींतून खालील मुक्ताफळें गळून पडलीं आहेत. "त्रैवर्णिक ज्याला दासकर्म म्हणत, तें अर्धरानटी शूद्र उच्च व सुखाचें कर्म समजत. सध्यां महारमांग लोक यूरोपियनांच्या रेल्वेवर खडी फोडण्यांत जसा अभिमान बाळगितात व ग्रामसंस्थेंत महारकी करीत बसण्यापेक्षां खडी फोडण्याची कामगिरी करण्यांत उच्चतर व किफायतशीर धंदा मिळाला म्हणून संतोष मानतात, तसाच अभिमान व संतोष त्रैवर्णिकांची वेठबिगार करण्यांत त्या कालच्या अर्धरानटी शूद्रांना वाटे." बिचाऱ्या महारामांगांनो! खरेंच कां अजुनी तुम्ही इतके नादान आहात!! आजकालच्या महारामांगांच्या सात्त्विक महत्त्वाकांक्षा ज्या राजवाड्यांना दिसत नाहींत, त्यांनीं वेद-कालच्या "शूद्र" नावाच्या बाणेदार राष्ट्राचा उकिरडा कां फुंकावा हें गूढ आम्हांला कळत नाहीं. पान १४० वर त्यांनीं वैश्यांचीहि अशीच नाहक कुरापत काढली आहे.

ते म्हणतात, वैश्य हे "स्वास्थ्याच्या काळांत ब्रह्मक्षत्रियांहून जास्त पटाईत असत; परंतु डावपेचाच्या व ठोकाठोकीच्या कामात पंगू असत. ह्या पंगू पण द्रव्योत्पादक टोळीला ब्रह्मक्षत्रियांनीं विश हें नांव ठेविलें, परंतु त्यांचें मूळ नांव पणी असावें, व हे पश्चिमेकडील पणी लोकाचें—ज्याला आधुनिक युरोपिअन लोक फिनीशिअन्स व प्राचीन रोमन प्यूनिक म्हणतात—सवंश असावेत, किंवा पूर्वेकडील पीतवर्ण चिनी लोकांशीं वंशसंबद्ध असावेत." पण ही सर्व मीमांसा वैश्यांना पंगू म्हटल्याशिवाय राजवाड्यांना करतां आली नसती काय? परंतु पंगू जात ब्राह्मणांची; पण तीच आज, ज्या जातींत पूर्वी हर्षवर्धनासारखे सम्राट् निपजले तिला म्हणते पंगू! 'लंगडें तें लंगड, पण गांवदरीला वी चरत न्हे' अशी एक कुणब्यांत म्हण आहे, ती राजवाड्यांना लागू

पडते. पणी शब्दावर जी त्यांनी व्युत्पत्तीची कोटी लढविली आहे तीहि अशीच लंगडी दिसते. कारण पृथु नांवाचें प्राचीन राष्ट्र भारतीय युद्धाच्या पुष्कळ पूर्वीं हिंदुस्थानच्या सरहद्दीवर होतें. त्याचें मूळचें नाव पर्णी असें होतें, असें प्राचीन रोमन इतिहासकार स्ट्रॅबो ह्याचें म्हणणें आहे. ह्यावरून पणी हे फिनिशिअन्स किंवा पंगू वैश्य नसून पृथु, पार्थव, अथवा पल्हव नांवाचें शूर क्षत्रिय वर्णाचें व बहुतकरून आर्यवंशाचें एक राष्ट्र होतें; इतकेंच नव्हे तर त्या पर्णी अथवा पल्हवांनीं, रोमन लोकांच्या ज्या स्वाऱ्यावर स्वाऱ्या खिस्ती शकापूर्वी इराणावर झाल्या त्या मागें हटवून सुमारें ५०० वर्षेपर्यंत भूमध्य समुद्रापासून तों पंजाबापर्यंत एक मोठें साम्राज्य चालविलें. त्याच पल्हवांशीं मराठ्यांचें अतिसाम्य आहे हें मागील अंगांत सांगितलेंच आहे. त्याचा विस्तार करण्यास येथें स्थळ नाही. पुढें केव्हांतरी ह्या साम्याचा विस्तारपूर्वक विचार करूं.

थोडक्यांत समारोप करावयाचा झाल्यास राजवाड्यांना कोणाचेंच बरें पाहावत नाहीं असें दिसतें! दुर्योधनाप्रमाणें त्यांना स्वतःशिवाय सर्व जग वाईटच दिसत असावें काय? जातीनें जरी ते ब्राह्मण म्हणवितात तरी ज्याच्या त्याच्यावर ते आपली लाठी उगारल्याशिवाय संशोधनाचें (?) एक पाऊलहि टाकण्याची त्यांची पात्रता दिसत नाहीं. शठं प्रति शाठ्यं हा क्षत्रियांचा गुण. जैन बौद्धांनीं तोहि टाकून दिला. पण निरुपद्रवी किंबहुना निराश्रितांवरहि राजवाड्यांची लाठी चालते; मात्र ते ब्राह्मण व त्यांतल्या त्यांत चित्पावन नसावेत इतकेंच त्यांचें पाहणें असतें! हा कसला गुण अथवा कोणता वर्ण!! अतिशूद्रालाहि हा गुण साधणें कठीण!! ह्या उर्मटपणालाच राजवाडेसाहेब राष्ट्रीयपणा असे समजत असावेत. नाहीं तर ब्राह्मणापेक्षा वैश्य पंगू असे त्यांना कां वाटलें असतें? राष्ट्रीयपणाचें हें एक विशिष्ट लक्षण अशी गैरसमजूत विशेषतः महाराष्ट्रांत अलीकडे पसरूं लागली आहे. हा लाठी प्रयोग निदान राधामाधव-विलासचंपूंत तरी नसेल असें आम्हांस वाटलें होतें; पण विपरीत प्रकार येथेहि दिसल्यामुळें आम्हांला टीकेची लाठी उचलावी लागली, ह्याबद्दल आम्ही दिलगीर आहों. ब्राह्मण येथून तेथून सर्वच वाईट असें कोणींहि ब्राह्मणेतरांनीं म्हणूं नये अशी आमची प्रामाणिक इच्छा आहे. पण राजवाड्यांसारख्यापुढें आमचा नाइलाज होतो. चित्पावनांतहि भूषणभूत रत्नें गेल्या पिढींत झालीं; पुढें होतील. प्रागतिक म्हणजे केवळ पोटार्थी नव्हे हें आगरकरांनींच आपल्या त्यागानें दाखविलें; राष्ट्रीय म्हणजे उर्मट नव्हे हें गोखल्यांनीं आपल्या विनयानें शिकविलें; फार काय पण संशोधक म्हणजे केवळ उकिरडा उकरणारा नव्हे, हे श्री. चि. वि. वैद्य अद्यापि आपल्या जबाबदार परिश्रमानें सिद्ध करीत आहेत. पण असे अपवाद थोडे. उलट ब्राह्मण म्हणविणाऱ्यांत चहूंकडे "वाचि वीर्यं द्विजानो" उर्फ लाठीप्रयोगाचाच सुकाळ झाल्याने त्या संसर्गामुळें राजवाड्यांच्या लेखणीनें दोन हजार वर्षांपासून इतिहासात प्रसिद्ध झालेल्या मराठ्यावर अराष्ट्रीयत्वाचा वार केला ना! आणि तोहि शहाजी शिवाजीच्या नांवानें! अर्वाचीन मराठ्यांवरचा राग त्यांनीं गौतम, महावीर इत्यादि प्राचीन क्षत्रिय आचार्यांवर काढून,

त्यांच्या प्रचारकाची गणना सोंगाड्या संन्याशांत तरी निदान इतक्या उद्दामपणानें करावयाला नको होती. समजा, एखाद्या जैनाला राग येऊन, त्यांनीं राजवाड्यांना ' हिजडे संशोधक ' म्हटलें तर त्यांना व त्यांच्या जातभाईंना तें आवडेल काय ?

विक्षिप्तपणा, उर्मटपणा, एकांगीपणा इत्यादि विक्षोभकारी दुर्गुण नसते तर राजवाड्यांच्या लेखणीचा आजकाल होत आहे त्यापेक्षां किती तरी पटींनीं जास्त गौरव झाला असता. संशोधनाच्या कामीं त्यांनीं जी दगदग सोशिली आहे व जी सेवा बजावली आहे तीहून जास्त फारच थोड्यांनीं बजावली असेल, हें आम्हीं त्यांना प्रत्यक्ष पाहिलें नाहीं तरी त्यांच्या परिश्रमावरून म्हणूं शकतों. प्रस्तुत ग्रंथांतहि त्यानीं जी वर्णनीय तडफ दाखविली आहे, तिचेबद्दल आम्हीं त्यांचें अभिनंदन प्रथमच केलें आहे. पुढल्या पिढ्यांनीं त्यांना कलमबहादर म्हणून आठवावें; हा कोणी एक कलमकसाई होता असें हिणवूं नये, एवढीच आमची इच्छा आहे, आणि ह्या इच्छेनेंच त्यांच्या लेखणीच्या वारांनीं ज्या कोणा मुक्या-पांगुळ्यांना जखमा झाल्या असतील त्यांची आम्ही ह्या टीकेच्या मिषानें शुश्रूषा केली आहे. " आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुं मनागसि " इतकें सुचवून राजवाड्यांची आम्ही रजा घेतों.

# १२

## पुणेरी पेशव्यांची राष्ट्रीय (!) कामगिरी

"केसरी"कारांनीं प्रो. जदुनाथ सरकारांची भेट घेऊन, त्यांचे मराठ्यांच्या इतिहाससंबंधीं विचार प्रसिद्ध करण्याचा खटाटोप ता. ४ नवंबरचे अंकांत केला आहे. त्याविषयीं माझें स्पष्ट मत लिहून देण्याचा फारच आग्रह झाल्यानें मी लिहीत आहें.

जदुनाथ हे इतिहासाचे मोठे वरच्या दर्जाचे व्यासंगी आहेत, हें कोणासहि कबूल करावें लागेल. पण मराठ्यांच्या आधुनिक इतिहासाच्या कांहीं नाजूक भागासंबंधीं लिहितांना प्रो. जदुनाथबाबूंची परकीयत्वामुळें जी धांदल उडते ती अक्षम्य नसली. तरी अनुकंपनीय आहे. तात्यांनीं बिचाऱ्या बाबूना सार्वोद्धाराच्या पिंजऱ्यांत खेचून उत्थापारणीच्या निवडक प्रश्नांच्या जाळ्याची गांठ त्यांच्या गळ्यास लावून त्यांचा जो अंत पाहिला, तो मात्र तितका क्षम्य दिसत नाहीं. 'मराठे आणि इंग्रज' असें जे तात्या उत्तरार्ध १४ पानांवर "नानासाहेब पेशव्यांनीं इंग्रजांच्या हातानीं आंग्र्यांना मारण्यांत जो मराठेशाहीचा अक्षम्य द्रोह केला" असें स्पष्ट कबूल करतात तेच आतां बंगाल्याकडून मराठ्यांचा पाणउतारा करून व अशा शिताफीनें दोघांची नामुष्की करून आपल्या घरसोडीचें प्रदर्शन करितात, ह्यास काय नाव द्यावें? ही तात्याशाही राष्ट्रीय कामगिरी! तात्यांना जसा आपल्या पक्षाचा लाभ व्हावा ही इच्छा, तशीच जदुनाथालाहि आपलीं पुस्तकें खपावींत असें वाटणें मानवी आहे. पत्रकारानें

स्वतःच्या जाहिरातीखातीं हा कठीण प्रश्नांचा पाश आपल्या गळ्यांत अटकविलेला पाहून ग्रंथसारानें ही खुबी ओळखलेली दिसते. कारण चालून आलेली संधी विनाकारण न दवडतां त्यांनींहि आपल्या भावी पुस्तकांची जाहिरात "केसरी"त फुकट प्रसिद्ध करून वरती नफ्यांत ब्राह्मणांकडून बहादुरीचें शिफारसपत्र मिळविलें! हें सर्व ठीक झुळलें पण या खटाटोपांत इतिहासमीमांसेचा कितीसा संबंध पोंचतो, हा किंचित् गैरसोयीचा प्रश्न शिल्लकींतच पडला; येवढेंच काय तें व्यंग उरलें!

"पेशव्यांनीं फार मोठी राष्ट्रीय कामगिरी बजावली" येवढेंच सांगून जदुनाथ आटपते घेते, तर मलाही लिहिण्याची दगदग घेण्याचें मोठेंसें कारण नव्हतें. पण ह्या बंगाली बाबूनें पुढील दोन उद्गार काढिले असें जें केसरीकार सांगतात, तें खरें असल्यास मात्र बाबूमजकुरास मराठ्यांच्या इतिहासाचा गाढवाळपणा करून घेण्याची अक्कल असो किंवा नसो (तो पुढचा प्रश्न आहे) पण इच्छा तरी फार तीव्र नाहीं असें तूर्त दिसून येतें. शिवाजीमहाराज जातिभेद मानीत होते, ह्या सबबीवर जदुनाथांनीं कांहीं शितोडे उडवून आपलें लाघव दाखविलेलें पुष्कळांच्या स्मरणांतून अद्यापि गेलें नाहीं, तोंच आता पुनः थोरल्या शाहूमहाराजांवरच नव्हे तर सगळ्याच मराठ्यांवर ह्या परकीय इतिहासकारानें आपली खप्पामर्जी दाखविली आहे. ते प्रसिद्ध झालेले उद्गार असे :—

(१) "साताऱ्याच्या शाहूमहाराजांच्या अंगांत राज्य चालविण्याची धमक नव्हती. त्यांच्या मताप्रमाणें सगळ्या गोष्टी चालल्या असत्या तर तो एक मोंगलांचा दक्षिणेंतील लहानसा जहागीरदार होऊन राहिला असता."

(२) "साम्राज्याच्या कल्पना मराठ्यांच्या डोक्यांत त्यानींच (पेशव्यानींच) भरवून दिल्या. त्यांनींच (पेशव्यांनींच) मराठ्यांस साम्राज्य व संपत्ति मिळवून दिली."

हे उद्गार धाडसाचे आहेत. हे इतिहासकारांस पेलण्यासारखे मुळींच नाहींत. खुद्द पेशव्यांची चंदी चरत असलेल्या कोणत्याहि ब्राह्मण हरिदासाला किंवा शाहिराला हीं अशीं विधानें करण्याचें धाडस झालें नाहीं. फार तर काय, राजवाड्यांसारखे विचारी, केळकरांसारखे समतोल, सरदेसायासारखे विशेष लक्षणविरहित अशा ब्राह्मण लेखकांनाहि पेशव्यासंबंधीं लिहितांना आपला मोह आवरता याचा; पण ह्या परक्या बंगाल्याला तो आवरता येऊ नये, ह्यात कांहीं तरी गोडबंगाल आहे, असें वाटतें.

शिवरायाच्या अवतारापासून तों पहिल्या शाहूच्या सुटकेपर्यंत इतिहास लिहिणें जितकें सोपें व सुकर आहे, तितकें शाहूच्या सुटकेपासून तों नानासाहेब पेशव्यांच्या मरणपर्यंतचा मराठ्यांचा इतिहास लिहिणें सोपें नाहीं. निदान सुकर तर मुळींच नाहीं. खरी लिहिण्याची गोष्ट येथली. त्या बाईंनीं लिहिल्या आहेत. पण खरा इतिहास अद्यापि कोणीं लिहिला नाहीं, असें आपलें मला वाटतें. इतिहास लिहिणें म्हणजे जसें नुसत्या घडलेल्या गोष्टी टिपणें नव्हे, तसेंच घडलेल्या गोष्टींच्या आरशांत आपल्या लाडक्या उपरतींचें प्रतिबिंब दाखवणेंहि नव्हे, तर घडलेल्या गोष्टींची न्यायशुद्ध पर-

परा ओळखूनच स्वस्थ न राहतां, शक्य असल्यास समाजशास्त्राच्या कांहीं नैतिक सिद्धान्तांची उठावणी, ह्या परंपरेच्या पायावर करतां आल्यास प्रयत्न करणें होय. हा प्रयत्न करावयाचा तर तो ज्या जातीचा इतिहास लिहावयाचा, त्याच जातीकडून तो झाला पाहिजे, अशी माझी तरी टाम समजूत झाली आहे: म्हणजे महाराष्ट्राचा इतिहास लिहावयाचा तर मराठ्यांनींच लिहावा, महाराष्ट्रांतील ब्राह्मणांनीं लिहूं नये. असें म्हणण्याइतका दूर मी तूर्त वाहून जात नाहीं. पण महाराष्ट्राच्या इतिहासावर, विशेषतः त्याच्या उपरिनिर्दिष्ट नाजूक भागावर — बंगाल्यांनीं, गुजराथ्यांनीं, किंबहुना महाराष्ट्रांत हल्लीं वस्ती करून राहिलेले मुसलमान, पार्शी अथवा खिरस्ती परधर्मीयांनीं देखील आपल्या अंगांत विशेष नैतिक घमक असल्याचा योग्य आत्मविश्वास असल्याविना, लिहिण्याचें किंबहुना बोलण्याचेंहि धाडस करूं नये, असें मला वाटतें !

पहिल्या शाहूच्या चरित्राविषयीं किंबहुना चारित्र्याविषयीं विचार करतांना, पुष्कळांना एक अक्षम्य मोह सुटण्याचा साहजिक संभव आहे; तो हा कीं, ह्या शाहूकडे शिवरायाशीं तुलनात्मक दृष्टीनें पाहावें. पण ही ऐतिहासिक शास्त्राच्या दृष्टीनें मोठी नालायकी व गहन अपराध आहे. कारण शिवराय लोकोत्तर पुरुष होते; तसा शाहू नव्हता, हा कांहीं त्याचा गुन्हा नव्हे. शाहू मोठा साम्राज्यसंस्थापक होता, असें कोणी कधीं म्हटलें नाहीं. पुढें म्हणतील कीं नाहीं, ह्याची फारशी शंका नाहीं. पण स्थापलेलें साम्राज्य पुढें चालविण्याची ताकद त्याच्यात नव्हती आणि त्याच्या मताप्रमाणें झालें असतें, तर तो केवळ मोगलांचा जहागीरदारच झाला असता, असें म्हणणें म्हणजे " बंगाली बाबू आणि दिडकीचा साबू " असें म्हणण्याइतकेंच निष्कारण निंदाव्यंजक आहे. फरक इतकाच कीं, ही फटकळ मराठी म्हण, गांवठी पोरांच्या तोंडांत आढळते. पण वरील बंगाली उद्गार एका बड्या इतिहासकाराच्या तोंडून निघाले असा त्या विचाऱ्यावर आरोप आला आहे. मोगलांच्या कैदेंत शाहू केवळ विलासांतच रंगला होता आणि म्हणून तो सुटून आल्यावर त्यानें साताऱ्यांतील " धणीचा बाग "सारखे केवळ रंगमहालच बांधले हें म्हणणें अगदीं शाहूची कामगिरी व स्वभाव ओळखण्याचें किंचित् कठीण काम करण्याची आपल्यांत पात्रता नाहीं, असा कबुलीजबाब देणेंच होय.

शिवरायांनीं घातलेल्या साम्राज्याच्या पायावर इमारत उभारण्याच्या कामीं शाहूला प्रत्यक्ष त्याच्या जातींतीलच नव्हे, जर जवळच्या आप्तांतील प्रतिस्पर्ध्यांकडून जितके जोराचे अडथळे आले, तितके प्रत्यक्ष शिवरायालाहि हा पाया घालण्याच्या कामीं आले कीं नाहीं हा लक्षांत घेण्यासारखा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. शाहूनें लढवय्येपणा केला नाहीं हा त्याचा अक्षम्य अपराध, ह्यांत शंका नाहीं. पण एवढ्यावरून त्याच्यांत खरा मुत्सद्दीपणाहि नव्हता, असा कांगावा करण्यांत कोणती इतिहासज्ञता आहे, हें मला तरी कळत नाहीं. ज्यानीं त्याच्या पायातील जोडे उचलले त्या नानासाहेब पेशव्यांत तरी लढवय्येपणा होता काय ? निदान शिपायास शोभणारा सरळपणा तरी ? मात्र ज्याचे मरेपर्यंत जोडे उचलावे, त्याचीच मरतांना केसांनीं मान कापावी व त्याच्या

पाणीदार वायकोच्या भावाला लालूच देऊन, त्याच्याकडून तिला सतीच्या चितेवर डांबावें, अशी त्याच्यांत गनिमी होती हें खरें. पण हा हरामखोरपणा म्हणजे मुत्सद्दे-गिरी, आणि असल्या हरामखोराच्याच बाप-आजांचे कान धरून त्यांच्याकडून साम्राज्याची पुढील इमारत उठाविणें म्हणजे मुत्सद्देगिरी नव्हे, असें का ह्या बंगाली बाबूला वाटतें ?

## श्रीशाहू व नाना

प्रो. जदुनाथांनीं वरील विषयावर जीं दोन विधानें केलीं, त्यापैकीं पहिलें त्याच्या अक्कला शोभण्यासारखें नाहीं, हें पहिल्या अंकांत सांगितलें. आतां दुसरें त्याहूनहि धाडसाचें विधान— साम्राज्याची कल्पना मराठ्यांच्या डोक्यांत त्यांनींच (पेशव्यांनीं) भरवून दिली. त्यांनींच मराठ्यांस साम्राज्य व संपत्ति मिळवून दिली. ह्यासंबंधीं संक्षेपानें विचार करूं.

वरील विक्षिप्त वाक्यांत ज्या शब्दाची व अर्थाचीहि ओढाताण झाली आहे ते " पेशवे " व " मराठे " " साम्राज्य " " संपत्ति " " कल्पना " हे होत. " पेशवे " ह्याचा पेशवेपदावर ज्या ज्या व्यक्ति व घराणीं आलीं तीं सर्व असा व्यापक अर्थ किंवा नुसतें एक भट घराणें असा रूढार्थ, असे दोन अर्थ आहेत. " मराठे " म्हणजे महाराष्ट्रांत राहणाऱ्या मराठे ब्राह्मण इत्यादिपासून महारमांगापर्यंत सर्व जाती असा विकृत अर्थ आणि महाराष्ट्रांत किंवा बाहेर राहणारे " मराठे " क्षत्रिय राष्ट्र किंवा जात असा साधा सरळ अर्थ, असे दोन होऊ शकतात. ह्या दुसऱ्या दोन अर्थांनीं प्रो. जदुनाथांनीं वरील दोन " पेशवे " व " मराठे " हे शब्द योजिले आहेत, ह्यांत शंका नाहीं. " साम्राज्य " म्हणजे इतर राज्यावरचें एक मध्यवर्ती राज्य असा व्यापक किंवा उत्तर हिंदुस्थानांतील दिल्लीचें पातशाही पद असाहि विशिष्ट अर्थ होऊं शकतो. ' संपत्तीच्या ' अर्थाला सीमाच नाहीं. त्यात रामदासाच्या झोळीचाहि समावेश होऊं शकतो. ह्या शेवटच्या अर्थानें पाहतां मराठ्यांसच काय, पण हल्लींच्या वैभवशाली युरोपियन सम्राटांनाहि ही झोळीची संपत्ति ब्राह्मणांशिवाय विशेषतः शेवटच्या तिघ्या पेशव्यांशिवाय मिळवून देणारा कोणीच समर्थ नाहीं. हें मला जदुनाथांपेक्षांहि अधिक माहीत आहे. तरी पण वरील चारी शब्दांचा शेवटच्याशिवाय इतर कोणत्याहि अर्थानें विचार करता, जदुनाथांचें म्हणणें साफ खोटें आहे, इतकेंच नव्हे तर हल्लींच्या ताणलेल्या परिस्थितींत विनाकारण जातीजातींतील वैमनस्य वाढविणारें आहे, असें माझें मत आहे.

पेशवे म्हणजे मराठे नव्हत, ह्याची जाणीव बाबूजींला पूर्ण होती हे त्यांच्याच तुलनेवरून स्पष्ट होतें. चित्पावन ब्राह्मण कोंकणांतून शाहूच्या वेळीं वरती घाट ओलांडून नुकतेच येऊं लागले होते, हेंहि त्याना माहीत असावें. देशस्थ ब्राह्मण त्याचा अगदीं

हलक्या जातीप्रमाणें तिरस्कार करीत, असें त्यांनीं आपल्या शिवचरित्रांत पान ४८२ वर म्हटलें आहे. उलट शिवरायाच्या खासगी चरित्राविषयीं व हिंदुस्थानांत हिंदूंचें स्वराज्य स्थापन करण्याच्या यशस्वी कामगिरीविषयीं ह्या पुस्तकाच्या शेवटीं त्यांनीं आपला अभिप्राय दिला आहे. इतकेंच नव्हे, तर शेवटच्या पानावर हिंदूंना छत्रपति ऊर्फ सम्राट् होतां येतें हे शिवाजीनें शिकविलें, असें जो जदुनाथ म्हणतो, तोच पान ४८२ वर पेशव्यांनीं ह्या छत्राचा नाश केला, असेंहि म्हणतो. हा ग्रंथ जदुनाथानें सन १९१९ त लिहिला. त्यावर पांच वर्षें उलटतात न उलटतात तोंच, हेच जदुनाथ आतां म्हणतात कीं, ह्याच पेशव्यांनीं मराठ्यांस साम्राज्य व संपत्ति दिली! हें काय गौड-बंगाल आहे, ईश्वर जाणे! मेलेल्या स्वराज्यसंस्थापक छत्रपतीपेक्षां जिवंत स्वराज्यवादी ब्राह्मणी वर्तमानपत्राच्या संपादकाला सामान्य लोक भितात; पण ही ग्राम्य भीति जदुनाथासारख्या निस्सीम इतिहास-भक्ताला बाधावी, हा केवळ कालमहिमा! "मराठे" म्हणजे हीन जातीय (Low Castes). महाराष्ट्र म्हणजे जातिभेदानें सडलेला, हल्लींप्रमाणें श्री शिवरायाचे वेळीं देखील तो जातवार दृष्टीला पाहिलेला इ. इ. कांहीं अंशीं अल्प दृष्टीनें व बाकीच्या अंशीं क्षुद्र बुद्धीनें जदुनाथानें काढलेले उद्गार त्याच्या "शिवाजी आणि त्याचा काल" ह्या पुस्तकांत आढळतात. शिवाजी शूद्र होता; त्याचें राजकीय ध्येय अगदीं आकुंचित होतें; तो आणखी पुष्कळ दिवस जगला असता, तरी पेशव्यांच्या कार्टी त्याच्या राज्याचा जो नाश झाला, तो त्याला चुकवितां आला नसता; वगैरे ह्या बाबूनें विनधोक म्हटलें आहे (पान ४८२). जणू काय, शिवाजी परशुरामाहून चिरंजीव झाला असता, तरी पेशवे हे २२ वे वेळीं पृथ्वी निःक्षत्रिय करण्यास अवतरणारच, ही विधिघटना आजच्या ह्या बंगाल्याला कळून चुकली आहे. जणूं पेशवे शिवाजींच्या पांचवीला पुजलेच होते.

प्रो. जदुनाथ कांहीं म्हणो न म्हणो, इ. स. १६६४ त श्रीशिवरायानें प्रसिद्धपणें आपल्यास राजा म्हणविलें व इ. स. १६७४ त पुनः आपल्यास छत्रपति ऊर्फ पातशहा म्हणवून विधिपूर्वक अभिषेकहि करून घेतला. प्रथम प्रथम जरी मराठे त्याच्या विरुद्ध गेले, तरी बहुतेक मराठे आपलें सर्वस्व अर्पून प्रमुखपणें आणि देशस्थ ब्राह्मण, शेणवी, प्रभू आणि महार ह्या चार जाती त्याला आपापल्या मगदुराप्रमाणें साह्य झाल्या. पहिल्या बाजीरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळेपर्यंत किंवा फार तर त्याचा मुलगा नानासाहेब श्रीशाहूच्या मरणामुळें निरंकुश होईपर्यंत महाराष्ट्राला ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद म्हणण्याइतका बाधक झाला नाहीं. ह्याचें सर्व श्रेयहि श्रीशाहूसच आहे. ह्या श्रेयामुळें प्रत्यक्ष शाहूला तरी मरेपर्यंत विश्रांति मिळाली नाहींच; पण तो मेल्यावर लगेच सबंध भोसले घराण्याची विलक्षण वाताहत झाली. ती अशी कीं, त्याच्या प्रत्यक्ष वारसांस कायमचा तुरुंगवास, एकुलत्या एक बायकोस देहान्त शिक्षा, कोल्हापूर छत्रपतीस कायमचा ग्रह, आणि नागपूरच्या भोसल्यास महाराष्ट्राबाहेर एक प्रकारची हद्दपारी मिळाली. भोसल्या-इतकीच प्रसिद्ध नसणें, तरी तितकींच खानदानी मराठ्यांचीं इतर जीं तेजस्वी घराणीं

होतीं, तीं नष्ट झालीं किंवा मागें पडलीं. घोरपडे, जाधव, आंग्रे, दाभाडे इ. इतिहास-कर्त्या खानदानी मराठ्यांची ही गति, तर मग देशस्थ ब्राह्मण, शेणवी, प्रभू, महार वगैरेंची काय कथा ! श्रीशाहूच्या श्रेयांचा आणि मुलुखगिरीवर कधीं न गेल्याचा फायदा एका भाग्यशाली व प्रसंगदक्ष भट नांवाच्या चित्पावन घराण्यानें पूर्ण घेतला. ह्या घराण्यानें शिंदे, होळकर, धारचे पवार, पुरंदरे, पटवर्धन, भानू, इ. नवीन घराणीं उठवून त्यांच्या साह्यानें बरीच राष्ट्रीय कामगिरी केली ह्यांत कांहीं संशय नाहीं. पहिल्या बाजीरावापर्यंत झालें तें झालें; पण तो निवर्तल्यावर रघूजी भोसल्यानें बाबूजी नाईक बारामतीकर ह्यास पेशवा करा, अशी श्रीशाहूस सल्ला दिली. तेव्हां रघूजीनें स्वतः सेनापतित्व स्वीकारून शाहूच्या हुकुमतीखालीं साम्राज्य स्थापण्याची हमी घ्यावी, अशी अट घातली असतां, १८ वर्षांचा पोर नानासाहेब पेशवे यानें काय केलें असतें, हें मुत्सद्दी शाहूनें पाहावयाचें होतें. ह्या १८ वर्षांच्या पोराहून, रघूजी हा खास वयानेंच नव्हे, तर अनुभवानें वृद्ध, स्वभावानें शांत, धोरणी, करारी व निर्व्यसनी मुत्सद्दी होता. इतकेंच नव्हे तर सर्व आयुष्य मुलुखगिऱ्या करून साम्राज्यसंस्थापनेंत पुढें महादजी शिंद्यानें जी कामगिरी केली, तशी कर्नाटकांत व बंगाल्यांत करून शाहूची त्यानें खात्री केली होती. जर काय व्यंग असेल, तर तें इतकेंच कीं, तो शाहूच्या अस्सल जातीचाच नव्हे, तर घराण्यांतला जवळचा आप्त असल्यानें डोईजड होईल, अशी भीति होती. पण शाहूच्या मांडीवर लोळणारा मानसपुत्र पहिला बाजीराव कोठें डोईजड झाला नव्हता ? दाभाड्यासारख्या प्रत्यक्ष सेनापतीला दाभण्यांत "घ" च "मा" बाजीरावानें केला, म्हणून गंगाजळ निर्मळ उमाबाई दाभाडीपुढें बाजीरावाचा गळा आणि नागवी तलवार ठेवून, शाहूलाहि हात जोडून उभें राहावें लागलें नाहीं काय ! तें असो. पण १८ वर्षांच्या पोराला म्हणजे मानसपौत्र नानाला पेशवाई देऊन तीन वर्षे झालीं नाहींत, तोंच त्यानें प्रतिनिधीच्या वरिष्ठ पदाला निर्माल्यवत् केलें; गायकवाडाचें तोंड दाबलें, रघूजी भोसल्याला मेडाऱ्याच्या लढाईंत अगदीं लुटलें, आणि प्रत्यक्ष करवीर छत्रपति श्री संभाजीला थाप दिली ( नव्हे गुप्त तह केला ) कीं शाहूचे मरणानंतर करवीरकरांनाच सातारा आणि कोल्हापूरचीं अशीं दोन्हीं सिंहासनें देतों ! संभाजीशीं हा गुप्त करार, नाना आणि चुलता चिमाजी अप्पा ह्या दोघांच्या सह्यांनीं दिला. तो लेख नंतर ४२८ असा होता. "सातारचें राज्य स्वामीचें; आणि एक–छत्री शिक्का महाराजांचा ( संभाजीचा ) चालावा. शाहू महाराजाचा जीवात्मा आहे, तो चाहाकारी आम्ही त्याचे; परंतु अंतर्यामी स्वामीचे, शाहू महाराज ह्यांनीं कैलासवास केल्यावर दोन्ही राज्यें स्वामीचीं आणि आम्हीं सेवक स्वामीचें" ! भट घराण्याच्या बढतीसाठीं उर्फ साम्राज्यस्थापनेसाठीं नानानें जीं अघटित कृत्यें केलीं, तीं सर्वच का त्यानें शाहूला कळवून केलीं ? अशा मानस पौत्रालाच पुनः ज्या शाहूनें आपले पचप्राण व आपल्या वंशाचे गळे देऊन, वरती कोल्हापूर घराण्याचा दत्तक घेऊं नका, असें स्पष्ट बजाविलें, तो मार्गीआड झाल्याबरोबर नानाचा बंदखोर भाऊ सदाशिवराव जेव्हां करवीर

छत्रपतीकडे फितूर होऊन, त्यांची पेशवाई पटकावूं लागला तेव्हां साम्राज्याच्या एकीच्या सबबीवर तुमचा पेशवाहि मीच होतों, म्हणून स्वतः नानासाहेब कोल्हापुरास लाळ घोटूं लागला. हा केवढा मुत्सद्दीपणा ! अगदीं कडेलोट ! !

वर घडलेल्या उलथ्या सुलथ्या अनेक प्रकारांबद्दल मी भट घराण्याला किंबहुना नानासाहेबालाहि दोष देत नाहीं. पण जदुनाथ बाबूला मी विचारतों कीं, ह्यांतील निदान हे उलटे प्रकार जर घडून आले नसते, तर काय मराठ्यांना साम्राज्य व संपत्ति मिळाली नसती ? त्या सरदेसाईनीं आपल्या मराठी रियासत भाग २ पान ५ वर नाना आणि चिमाजीचा करवीर छत्रपतीशीं गुप्त करार दिला आहे, त्यांनींच, शाहूनें वृद्ध आणि पराक्रमी रघुजी भोसल्यापेक्षां १८ वर्षांच्या नानावर अधिक विश्वास दाखविल्याबद्दल महाराजाची पाठ थोपटली आहे; आणि ते आतां सर्व जगास आव्हान करीत आहेत कीं, "महाराष्ट्रांत दुसरी कोणती व्यक्ति जास्त कर्तृत्ववान् होती, हें पेशव्यांच्या आक्षेपकांनींच दाखविलें पाहिजे !" पण मी नानासाहेबांचा आक्षेपक म्हणून नव्हे तर अंशतः चहाता म्हणून सरदेसायांना विचारतो कीं, नानाच्या १८ व्या वर्षींच त्याला असले आगाऊ अजिंक्यपत्र देण्याचा मोह सरदेसायांना कां सुटतो ? तरुण चित्पावनांना ( पहिला बाजी व नाना ) सात खून माफ, तर वृद्ध रघूजीकडून निदान एक खून होईपर्यंत तरी त्यावर विश्वास ठेवण्यास काय हरकत होती ! बरें, रघूजीनें तरी पेशवाईसाठीं आपले दांत कोठें विचकले होते ! ती मागणी बाबूजी नाईक ह्या भट घराण्याच्या व्याह्यासाठींच केली ना ?

हा आकस धरून शाहूला न कळवतांच नानांनीं रघूजीवर उत्तरेकडे हल्ले चढविले. तेव्हां जवळच्या कारभाऱ्यांनीं शाहूजवळ तक्रारी पुष्कळ केल्या; त्यांना काय परिणाम झाला ? "ब्राह्मण माजले; भोसले लुटले, म्हणाले. महाराजांनीं दोन दिवस ऐकोन उत्तर केलें. माझे ब्राह्मणांनीं लाथा मारल्या तरी पुरवले, परंतु त्यांची सावली लागत नाहीं. मद्यप्राशन करून दौलत बुडविली." शेवटल्या वाक्याचा संदर्भ लावतांना जे सरदेसाई, पाँडिचरीच्या गव्हर्नरकडून रघूजीला दारूच्या बाटल्यांचा नजराणा आला, त्या बाटल्या रघूजीच्या बायकोला आवडल्या, येवढ्यावरून द्राविडी प्राणायाम करीत बसले आहेत, तेंच पुनः गोविंदपंत बुंदेले उत्तर हिंदुस्थानांतून पेशव्याकडे "पोरी, चिजा, उंची वस्त्र ६०" पाठवीत असत, असा घाणेरडा आरोप रा. राजवाडे करितात, म्हणून राजवाड्यांवर रागावतात, ह्याची मोठी मौज वाटते. इतकेंच नव्हे तर नानानीं उत्तरेंतून एक पत्र पाठविलें आहे, त्यांतील त्यांचा रंगेलपणा, शृंगार, रसभिज्ञता व विद्वत्ता पाहून सरदेसाई उलट त्याचें फार कौतुक करितात ! "प्यारी ! तूं गोड तर तुझें कुर्तेंहि गोड" असल्याच हा कांहींसा विलायती प्रकार दिसतो. असो. तरी आजकालच्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाची भुरळ आमच्या चार दिवसांच्या बंगाली पाहुण्यावर कां पडावी, हा प्रश्न तसाच उरला.

## मराठे आणि पेशवे

मराठ्यांना साम्राज्याची कल्पना कोणी दिली, याची पंचाईत बंगाल्याला पडावी पाहिजे? ती मराठ्यांमध्यें स्वयंभू आहे. प्राचीन काळापासून त्या कल्पनेचा इतिहास राजपूत किंवा मराठा या ग्रन्थांतच संक्षेपानें लिहिला आहे. उत्तरेकडील अशोक-मौर्यांप्रमाणें राष्ट्रकूट-चालुक्य-यादवांशिवांनीं दक्षिणेंतून दिल्ली कैक वेळां मुळापासून हालविली आहे. जुन्या गोष्टी राहूं द्या. आधुनिक साम्राज्याच्या कल्पनेचा बार सिसोदे ऊर्फ भोसले घराण्यानें भरलें आहे. भट घराणें हीहि भोसले घराण्याची एक शाखा आहे. बाजीराव आणि नाना अशीं दोन अपत्यें असतांना भाग्यशाली शाहूमहाराजांना निपुत्रिक कोण म्हणेल? त्या विधीनें शाहूचीं औरस मुलें पाळण्यांतच मारलीं, त्यानेंच ह्या दोन मानसपुत्रांना त्यांच्या मांडीवर बसविलें. ब्राह्मणांस आनंद वाटावयाला नको किंवा मराठ्यांना राग यावयाला नको. हिंदुस्थानांतील फार दिवसांच्या वर्णविरोधाचा विध्वंस करण्याची विधिनिर्मितच ही एक युक्ति होती. बाजीरावानें नुसत्या लष्करीपणांत यश मिळविलें, पण कर्जापायीं चिरडून मेला. नानासाहेब दीर्घसूत्री व हद्दीबाहेर कपटी होता. कपटाची सूतशेखरमात्रा तो रोज पसा पसा खाऊं लागला. स्वतःच्या भावाच्या कर्तबगारीवरहि विश्वास नाहीं, असा हा ब्राह्मणी औरंगजेब आपल्या कपटाच्या धडग्यांत गुदमरून मेला. नादिरशहाच्या स्वारीचा कडू धडा शाहूला व बाजीरावाला मिळाला होता, तरी शाहूमहाराज मेल्याबरोबर ज्या नानाला दाही दिशा मोकळ्या झाल्या असतांहि त्यानें पुढील ११ वर्षे उत्तर हिंदुस्थानांतील मुलुखगिऱ्यांत जाऊन भाग घेऊन पानिपतचें अरिष्ट टाळलें नाहीं, याबद्दल सरदेसायांनीं आपल्या पुस्तकांत फार दोष दिला आहे. पण ह्या दोषाची खरी मीमांसा करण्याचें धैर्य सरदेसायांस नाहीं, तर अदुनाथांत कोठून येईल? ती मीमांसा हीच कीं, सर्व सत्ता तत्त्वदृष्ट्याच नव्हे तर तपशीलदृष्ट्याहि केवळ भट घराण्यांतच नव्हे तर खुद्द आपल्याच मुठींत नेहमीं दाबलेली रहावी, अशी राक्षसी महत्त्वाकांक्षा नानास भोंवली. अबदालीनें १७४८ पासून १७६१ पर्यंत दिल्लीवर अनेक स्वाऱ्या केल्या. बादशहा मरणान्त वेदनेनें हृदय फोडणाऱ्या किंकाळ्या कुमकेसाठीं फोडूं लागला, मल्हाररावाची लबाडी उघडकीस आली. महादजीशिवाय राणोजी-शिंद्यांचीं जयाप्पा दत्ताजी, शेवटीं जनकोजीचीही पुत्ररत्नें ह्या रणकुंडांत गडप झालीं; शिंदे होळकराच्या पाळतीवर ठेविलेले स्वतः नानाचेच दिल्लींतील सरदार आणि वकील अनुक्रमे अंताजी माणकेश्वर आणि हिंगणे यांनीं अमूल्य संधी वांया दवडली जात आहे, ती न जावी म्हणून स्वतः नानानेंच यावें म्हणून निर्वाणीचीं पत्रें अनेक पाठविलीं. ह्या कामगिरीवर पाठविलेला रघुनाथराव पूर्ण नालायक ठरून त्याच्या दुहीमुळें शिंदे-होळकर प्रत्यक्ष शत्रु बनले आणि अखेरीस गोविंद बुंदेल्यांनींहि हात टेकले, तरी नाना पुणें आणि कोल्हापूरच्या दरम्यानच लुडबुडतो व अखेरीस पानिपतचें प्रायश्चित्त मिळाल्यावर पश्चात्ताप करण्यालाहि

त्याला वेळ न मिळतां तो जर फुटून पर्वतीच्या टेकडीवर मरतो, ह्या सर्वांतलें इंगित काय ? तें सरदेसायांनीं किंवा रघुनाथांनीं इच्छा व धैर्य असल्यास सांगावें नाहींतर तोंड आटपावें. इंगित हेंच कीं, नानाचें अतिदीर्घसूत्री कपट ! न जाणो येवढें अवाढव्य करटजाळही केवळ साम्राज्य स्थापण्याच्याच सदिच्छेनें नाना आपल्या आत्म्यामोंवतीं गुरफटून घेतलें असेल म्हणून मी देखील ह्या ऐतिहासिक पुरुषाला दोष देत नाहीं. पण तो अपेशी झाला, येवढें तरी आजकालचे ब्राह्मण आणि त्यांच्या पिंजऱ्यांतले बंगाली साक्षीगार कबूल करतील काय ?

सरदेसायांची दृष्टि ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादानें विकृत झालेली नाहीं, हें त्यांच्या पुस्तकावरून स्पष्ट दिसत आहे, तरी ते आपल्या विचारसरणीच्या अगदीं अखेरपर्यंत न जातां मध्येंच कोठेंतरी मुक्काम करतात, ह्यांत किंचित घरसोपडणा दिसतो. असो. म. रियासतमध्यें भाग ३ पान ९३ वर सरदेसायांनीं खालील उद्गार अटकेवर झेंडा ह्या मथळ्याखालीं काढला आहे. कोणास वाटेल कीं, हा रघुनाथरावाविषयीं किंबहुना भट घराण्याविषयीं असावा, पण नाहीं. तो उद्गार असा : "**सर्वस्व खर्ची घालून राष्ट्रकार्य करण्याची खरी प्रवृत्ति त्या वेळीं एकट्या शिंद्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि सरदाराचे ठिकाणीं राहिलेली दिसत नाहीं. म्हणूनच पुढील सर्व उद्योगाचा भार एकट्या शिंद्यावर पडला; आणि महादजीसारखा पराक्रमी पुरुष पानिपतच्या संकटांतून ईशदयेनें वांचला नसता, तर शिंद्यांचे हा उद्योगाचा व त्यांच्या घराण्याचा इतर कित्येक शूर घराण्याप्रमाणें मागमूसहि राहिला नसता.**" जाड टाइप मीं एवढ्यासाठीं घातला आहे, कीं हा ब्राह्मणांचा उद्गार चंगाळ्याच्या डोळ्यांत भरावा म्हणून बाकी शिंद्यासारखीं आणखी किती तरी शूर पण इमानी मराठा, व ब्राह्मण घराणीं त्या वेळीं [ कदाचित् आतांहि असतील] होतीं, हें सरदेसायांनीं कबूल केलेंच आहे, पण त्यांच्या घरसोडीमुळें अधिक स्पष्ट केलें नाहीं. असो.

पहिला शाहू सन १७४९ त साताऱ्याच्या रंगमहालात वारला नाहीं; तर सन १७६१ त पर्वतीवर वारल्या ! नाना हे मराठेशाहींत घुसडलेलें शाहूचें पिल्लू होते. त्याचें बरेंवाईट शाहूने माध्यावर लादणें इतिहासकारास भाग आहे. पहिला बाजी स्वरूपानें फार देखणा होता. तसाच पानिपतास मारला गेलेला विश्वासरावहि सुरेख होता. नानावर आईची छाया पडली होती, असें सरदेसाई म्हणतात. शाहूची छाया त्याचा नातू जो नाना त्यावर पडली होती, असें मी म्हणतों. स्वतः लढाईवर न जातां, परबल्या रणसमामाची दुष्ट मुत्सद्दी ऊर्फ गरीब अथवा पोकळ मुत्सद्देगिरी करणें, ही शाहूची खोड नानाला लागली; व ह्या खोडीमुळें ओघानेंच ह्या आजानातवाला दुसरी एक अक्षय खोड लागली, ती ही कीं, हानासाहेबांचे पहिल्या नंबरचे मातब्बर सरदार आपघात भांडू लागले तर सत्तावलानें दोघांस नरम करून, पण शाबूत राखून, पुनः कामास न लावतां, त्यांच्यात कोंबडें झुंज लावून कोण जिंकेल त्याच्या गळ्यांत बायका-

प्रमाणें स्वयंवर माळ घालायची! या खोडीमुळेंच चंद्रसेन जाधव दुखला व निंबाळकर दाभाड्याचा शत्रु झाला! हिचा वर्ण नाहीं तरी गुण मात्र नानाला लागला. पुढें नानानें उचललेल्या असभ्य खोडीमुळें रघूजी भोसले रुसला; मल्हारराव होळकर व मुरारराव घोरपडे बिथरले; जयाप्पा, दत्ताजी व जनकोजी शिंद्यासारखीं अमूल्य रत्नें बिनमोबदला हारपलीं. हे सारे मराठे होते, पण बंगाल्यांत रघूजीचा सरदार भास्करराव कोल्हटकर चित्पावन ना? अलीवर्दीखानानें त्याचा खून करविला, त्याचा सूड उगविण्यास नानानें खळ हातानें कां मदत केली नाहीं? आजानातवांच्या या समान खोडींत एक महदंतर होतें. शाहूनें जें हें दौर्बल्य अथवा कपट दाखविलें, त्याच्या मुळाशीं भोसले घराण्याची राजसी महत्त्वाकांक्षा वाढवावी, असा हेतु होता, असें शाहूचा कोणी शत्रुहि म्हणणार नाहीं. पण नानांनीं आपल्या गळ्याभोंवतालीं करारांचें जें अवाढव्य जाळें गोंवून पानिपतचें पिशाच्च उठविलें व त्याच्या तोंडांत पेटलेल्या अग्निकुंडांत सर्व महाराष्ट्रानी व शेवटीं आपलीहि आहुति दिली, त्या कृत्याबद्दल त्यांच्या मित्रासहि काय म्हणतां येईल, हें सांगवत नाहीं. ह्याला इतिहासांत म्हणा किंवा काव्यांत म्हणा, एकच उपमा आहे. नंद घराण्याचा सर्वस्वीं नाश करून पेटलेल्या कुंडांत, मिळमिळीत सौभाग्याला कंटाळलेली झळझळीत विधवा जी मुरादेवी, तिचीच! मुरादेवी व नानासाहेबांमध्येंहि जर कांहीं फरक असेल तर तो इतकाच कीं, बाईच्या कृत्याला यश तरी आलें पण बुवाच्या वांट्याला तेंही आलें नाहीं! नसो, पण दोघांचेहि हेतू सार्वजनिक व साम्राज्य संपादक असण्याचा संभव आहे. म्हणून साधनांच्या अभावांचा फायदा दोघांनाहि देऊन तूर्त त्यांना मुक्त करणें मला भाग आहे. निदान ह्यांत मनाचा थोरपणा तरी आहे.

शाहू सन १७६१ त वारला त्याच न्यायानें शककर्ते शिवाजीमहाराज सन १६८० त न वारतां ते वानवडी येथें सन १७९४ त महादजीच्या मरणानें मेले. किंबहुना मारले गेले असावे, असें मला दिसतें. जदुनाथ सरकाराला तसें न दिसल्यास माझा काय इलाज? मोठीं माणसें मरणानंतर पुष्कळ दिवसांनीं मरतात व कीर्तीं अजरामर करितात; व लहान माणसें मरणाआधींच मरतात व कीर्ति तर जन्मलेलीच नसते; ही स्थिति व्यक्तींचीच नसून मराठ्यासारख्या अद्यापि जिवंत राष्ट्राचीही आहे, हें जदुनाथाला मीं सांगावें काय? कुठें मराठ्यांचें फारा शतकांचें साम्राज्य! कुठें त्यांच्या प्रतिभाशाली कल्पना! कुठें त्यांचीं चिरस्मरणीय व वंदनीय कृत्यें! कुठें त्यांचा दरारा! एकूण कुठें हा महाराष्ट्र महोदधि आणि कुठें ह्या महोदधीवर उठलेली भट घराण्याची एक भाग्यशाली पण अपयशी लाट! आणि लाट सागराला कारण, असें प्रतिपादणारा कुठें हा बंगाल्याचा द्राविडी प्राणायाम!

जदुबाबू! महाराष्ट्रभूमि खडकाळ आहे. तिच्यावर चार चार हजार फूट सखल उंच दऱ्याखोरीं आहेत. बंगाल-बिहारप्रमाणें सपाट, मऊ मेणानें पसरलेली व आयतें पीक देणारी नव्हे. पूर्वींचे मराठे राहत. ज्यांनीं परवां साम्राज्य उभारलें ते मावळे

नाचणीच्या शिळ्या भाकऱ्या खाणारे व रानडुकरांचीं हाडें चोखणारे होते; आयता रसगुल्ला खाणारे बंगाली बाबू नव्हते. नुसत्या लेखणीनें शांतीचे ढोंग माजविणाऱ्या हल्लींच्या युरोप-अमेरिकेंतहि साम्राज्यें मिळत नाहींत, तर ३०० वर्षांपूर्वीच्या हिंदुस्थानांत तें कसें शक्य आहे? तरवारीच्या सावलीखालीं लेखणी कागदावर चुरचुर चालते, पण ती तशा उन्हात व खडकाळ जमिनीवर चालेल का? महात्मा गांधीजींचीं अनत्याचारांवरील पुराणें ऐकून जदुनाथ इतक्या लवकर मराठ्यांचा दरारा विसरले काय? मग काय, आतां बंगाल्च्या लेखणीनें व गुजराथ्यांच्या सोंवळ्यानें किंबहुना महात्माजींच्या केवळ श्रद्धापूर्ण आशीर्वादानेंहि आम्हांला राजकीय मोक्ष मिळणार आहे काय? पुढच्या गोष्टी पुढें. कारण महादजी शिंद्यानंतर जुन्या युगावर पडदा पडून नवें चालू झालें आहे. तें असो. पण मागच्या राजकारणाची मीमांसा करतांना जदुनाथानें शिवरायाचें ध्येयहि टाकाऊ ठरविलें, हा कोण ऐतिहासिक अत्याचार! इतकेंच करून स्वस्थ न राहतां पेशव्यांना कल्पना दिली, साम्राज्य दिलें, संपत्ति दिली इ. इ. तिलांजलि देतांना नदीवरचा भट जसा अर्थ न समजतांच मंत्र बडबडतो, तशी जुन्या युगाची तिलांजुलि देतांना जदुबाबू भाळ्या भोळ्यांना चुकीचा संकल्प सांगत आहेत, त्याचें वर्णन मी कोणत्या शब्दांत करूं! केवळ शक्य तितक्या सौम्य शब्दांत सांगावयाचें झाल्यास "मराठ्या आजोबाला बंगाली नातू शिकवूं लागला" हें माझें वर्णन आहे. पण नातवाला अक्कलदाढ येईपर्यंत आजोबालाहि धीर आहे, हें मला माहीत आहे. पुरे!

# १३

## मराठेतर कोण ?

‘ विजयी मराठा ’कारांनीं गेल्या अंकीं ब्राह्मणेतर कोण ह्या प्रश्नाची मीमांसा केली आहे. आतां मराठेतर कोण ह्या विषयावर मीं माझे विचार प्रसिद्ध करावेत असा त्यांचा आग्रह आहे. आणि ह्यासाठीं गेल्या केसरींतील रा. बामणगांवकर त्यांचा मराठेतर हिंदू हा लेख मजकडे पाठविला आहे. हा लेख पाहिल्यानंतर ह्यांतील बरेच विचार मला पसंत आहेत. परंतु मी जर माझे निर्भीड विचार प्रसिद्ध करीन तर त्यांतील कांहीं भाग माझे मित्र बामणगांवकरांना पसंत पडणार नाहीं, तर कांहीं भाग स्वतः वि. मराठाकारांनाहि कदाचित् रुचणार नाहीं. पण राजकारणांतील विचार एका सख्ख्या भावाचेहि जर दुसऱ्यास पटत नसतात, मग माझेच तेवढे सर्व विचार इतरांस पटतील अशी आकांक्षा मीं कां बाळगावी ? बामणगांवकर किंवा वि. मराठाकार हे जसे माझे मित्र आहेत तसेंच ब्राह्मणांतहि माझे पुष्कळ जिवल्य मित्र आहेत. मतभेद होतात ते केवळ विचार चुकल्यानें होतात किंवा वाईट हेतूमुळेंच होतात असें नसून दृष्टीचा ठाव बदलल्यामुळेंहि होतात, हें जर खरें असेल तर एकाच विषयाकडे पाहावयाचें झाल्यास निरनिराळ्या माणसांनीं दृष्टीचा ठाव बदलून पाहिल्यास सत्य लवकर दिसूं लागतें, हें मित्रांना सांगणें नको. अमित्रांना, त्यांचे स्वतःचेच विचार जरी कोणीं घोटून दाखविले तरी ते वाइटच वाटतील. म्हणूनच त्यांच्यासाठीं प्रयत्न नाहीं.

ज्या राष्ट्रीय पक्षाकडे माझा स्वतःचा ओढा आहे, त्यांतच रा. वामणगांवकर तूर्त वावरत आहेत. फरक इतकाच की मी कोणत्याच पक्षाच्या चाव्रकाला पाठ देण्यास तयार नाहीं—कारण कोणताच पक्ष अलीकडे एक वर्षभरहि एका ठिकाणीं उभा राहून आपल्या ध्येयाची साक्ष आपल्या वर्तनानें इतरांस पटविण्याची दगदग करीत नाहीं; रा. वामणगांवकर अशा स्थितींतहि, "राष्ट्रीय" पक्षांतच आपला मोक्ष अद्यापि शोधीत आहेत, ह्यावरून त्यांचा सत्यशोधकपणा माझ्यापेक्षां अधिक चिवट आहे, हें मला कबूल करणें भाग आहे. तरी ते आपल्या सुंदर लेखाच्या पहिल्याच वाक्यांत "ब्राह्मण तेवढा वगळावा व अहिंदू तेवढा मिळवावा, ह्या अहिंदू वृत्तिपर पक्षाची प्रतिष्ठा झाली आहे" असें जें जगाला भासवीत आहेत त्या भासाला सर्व ब्राह्मणहि बळी पडतील कीं नाहींत, ह्याची मला शंका येत आहे. कारण माझे मित्र रा. अ. ब. कोल्हटकर ह्यांनीं स्वतः ब्राह्मण असूनहि जी ब्राह्मणेतरासंबंधीं दृष्टि ठेवली आहे; तिच्यांत मला जास्त बाणेदारपणा दिसत आहे. श्री. अच्युतरावांनीं आपल्या ता. ३ एप्रिलच्या "चाबुकस्वारांत" ब्राह्मणेतर पक्षाच्या केवळ नांवाउलट्च आक्षेप घेतला आहे; ध्येयाउलट मुळींच नाहीं. पुण्यांत जीं त्यांचीं सडेतोड भाषणें अलीकडे झालीं आणि विशेषतः प. लो. वा. छत्रपति आणि विद्यमान श्री. सयाजीराव महाराज ह्यांची प. लो. वा. टिळक व रानडे ह्यांच्याशीं त्यांनीं जी नुकतीच मार्मिक तुलना केली, तीं त्यांचीं भाषणें व तो ओजस्वी लेख ज्यांनीं वाचला असेल त्याना असें खास दिसेल कीं, अच्युतरावामध्यें आक्षेप घेण्यासारख्या ब्राह्मण्याचे जंतु आतां कांहींच शिल्लक उरले नाहींत. असल्या ब्राह्मणाना ब्राह्मणेतर पक्षांत येण्याला काहीं अडथळा राहिला असेल तर तो त्यांच्या स्वतःचाच. पण नावाची सबब सांगून कोल्हटकर अद्यापि दूर आहेत. तर वामणगांवकर मात्र स्वतः ब्राह्मणेतर असूनहि मराठा आणि मराठेतर ह्या नाजूक विषयांत गढले आहेत. असो. दोघांचा उद्देश स्तुत्य आहे, असें मला वाटत आहे.

कोणत्याहि विषयासंबंधीं केवळ शुष्क निर्विकारपणा दाखवून स्वस्थ न राहतां, त्याबद्दल सहानुभूति दाखविल्याशिवाय त्याचें मर्म कळत नाहीं, हें रा. कोल्हटकरानीं आपल्या खोल घोरणी स्वभावानें सिद्ध केलें आहे. ह्याना दाखला ब्राह्मणेतराबद्दलची त्यांची धडाडीची सहानुभूतीच होय. वामणगावकराची धडाडी कोल्हटकराच्याहून रतीभरहि कमी नाहीं. उणीव आहे, ती केवळ निष्काम सहानुभूतीचीच. ती असती तर त्यांच्या प्रस्तुत लेखाच्या पहिल्याच घासांत असा मक्षिकापात झाला नसता. हिंदू असोत, अहिंदू असोत, ब्राह्मण जातीच्या अन्यायाला वैतागून ब्राह्मणेतर पक्ष जो आजकाल इतर सगळ्या जगाला कवटाळींत आहे, त्यांत जर कोणाची अधिक चूक होत असेल तर ब्राह्मणेतरापेक्षां ती ब्राह्मणाचीच अधिक आहे असें वि. मराठाकारांनी आपल्या गेल्या अंकांत दाखविलें आहे. तें रा. वामणगांवकरानीं पाहावें. माझा प्रस्तुत विषय मराठेतर एवढाच आहे. म्हणून मी वि. मराठाकारांच्या विचारांची पुनरावृत्ति करीत नाहीं. तरी पण वि. मराठाकारांना मला एवढेंच जाणवावयाचें आहे कीं, जें पाप ब्राह्मणानीं केलें म्हणून

"ब्राह्मण" नांवाची एक नवीन अस्पृश्य जात ब्राह्मणेतर पक्षांनीं निर्माण केली आहे, तेंच पाप आजकालचे मराठे करूं लागले आहेत; म्हणून मराठेतर पक्ष लवकरच निर्मिल अशी जी धोक्याची सूचना रा. बामणगांवकर देत आहेत, तिचा सर्व मराठ्यांनीं आदरपूर्वक विचार करावा. जर तसा विचार करतील तर महत्त्वाच्या तिऱ्हाइतांना असल्या जातीजातींतील तंटे तोडण्याची रिकामटेकडी मध्यस्थी करण्याचें कारणच उरणार नाहीं.

रा. कोल्हटकर आपल्या वर निर्दिष्ट केलेल्या लेखांत म्हणतात, "ब्राह्मणेतर पक्षास "जरीपटका संघ" हें नांव आम्हीं मागें सुचविलें होतें. दे. भ. विठ्ठल रामजी शिंदे ह्यांनीं "बहुजन पक्ष" असें नांव ठेविलें होतें. पण नांव कोणतेंहि असो, सध्यांचें ब्राह्मणेतर हें निरर्थक नांव ह्या पक्षास शोभत नाहीं, व तें बदलण्याचा विचार ह्या बैठकींत होईल अशी आम्हांस आशा आहे." ब्राह्मणेतर ह्या नांवाचा वीट जसा देशभक्त कोल्हटकरांना आला आहे, तसा मराठेतर ह्या नांवाचा वीट देशभक्त बामणगांवकरांना पुढें येणार नाहीं ह्याची हमी ते देतील काय ? मीं स्वतः जी बहुजन पक्ष अशी शब्दयोजना सहा वर्षांपूर्वी केली ती केवळ एक पोकळ नांव प्रचारांत आणण्यासाठीं नव्हे; किंबहुना जातिभेदाचा मला स्वभावतःच वीट आला आहे, त्याचें केवळ प्रदर्शन करण्यासाठींहि नव्हे; तर केवळ जातींच्या पायांवरच एखादी चळवळ करूं गेल्यास आज नाहीं उद्यां समंजस माणसांना तिचा वीट येणें क्रमप्राप्तच आहे, निदान क्षम्य तरी आहे असें मला तेव्हां वाटलें व अद्यापि वाटत आहे. शिवाय दुसरी एक मला ह्याहूनहि वाईट शंका येत आहे ती ही की, रा. बामणगांवकरांनीं अत्यंत सद्हेतूनें हें धोक्याचें शिंग फुंकलें आहे, त्याचें वारें कानांत शिरल्यामुळें कांहीं बांसरांनीं जर कदाचित् महाराष्ट्रांत मराठेतर पक्ष निर्माण केला, तर त्याचा प्रतिध्वनि लिंगायतेतर समाज ह्या रूपानें कर्नाटकांत उमटणार नाहीं ह्याची तरी हमी बामणगांवकर घेतील काय ? नाहीं तर *गणपतीची सोंड मागें लागल्यानें माकड निर्माण होऊन, तें बामणगांवकरांच्या ह्या नवीन* गणेशोत्सवाचा बेरंग करील ! मग राष्ट्रवीर बामणगांवकरांनीं पुनः केसरीकडे धांव घेतल्यास कर्नाटकातील लिंगायत बंधू आतांप्रमाणें स्वस्थ बसतील काय !

जातिवाचक राजकारण म्हणजे एक मनोरंजक आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ आहे. तो खेळ युरोपांत जशी सुधारलेलीं (!) राष्ट्रें उर्फ जाती आजवर खेळत आलीं आहेत, तसेंच मागासलेल्या हिंदुस्थानांतील जाती उर्फ राष्ट्रेंहि आज खेळावयाला लागलीं आहेत. ह्या खेळांस पाश्चात्यांनीं पौरस्त्यांस मुळींच हसावयास नको. मग एतद्देशीयांनीं कां हंसावें बरें ? हा मनुष्यस्वभावाच्या आंधळेपणाचा बोधप्रद खेळ आहे. ह्या खेळांत *ज्या राष्ट्रावर अथवा जातीवर डाव येत असतो, त्याला एकट्यालाच वगळून बाकीच्या* सगळ्या खेळगड्यांनीं तात्पुरतें एकत्र होऊन त्या बिचाऱ्या आंधळ्याला जीव नकोसा करून टाकावयाचें असतें. ब्राह्मणेतर अहिंदूंना तेवढेंच मिळवूं पाहतात, असें जें बामणगांवकर म्हणतात, त्यावरून त्यांनीं हा खेळ कधीं खेळला नसावा अशी शंका येत आहे. गेल्या दोन

शतकांत नुसत्या युरोपांत जीं स्थानिक युद्धें झालीं, त्यांत हा डाव आळीपाळीनें इंग्लंड व फ्रान्स ह्या डोईजड राष्ट्रांवर जेव्हां येत असे तेव्हां बाकीचीं सर्व डोईजड न झालेलीं राष्ट्रें एकत्र होत असत. इंग्लडचें किंवा फ्रान्सचें डोकें हलकें झाल्याबरोबर डाव बदलत असे. ह्या खेळाला मराठींत साधें बालबोध आंधळी कोशिंबीर हें नांव असून तिकडे "बॅलन्स ऑफ पॉवर" हें भपकेदार नांव असे. पण अर्थ एकच; आणि डाव अंगावर येण्याचें कारणहि केवळ डोईजडपणाच! गेल्या दोन चार शतकांत ह्याच कारणा-मुळें हा डाव ब्राह्मणांवर आला होता, तो आतां हातवाईवर आला आहे. न जाणो, उद्यां मराठ्यांवर आणि परवां लिंगायतांवरहि येईल. वामणगांवकरांनीं मात्र उगाच खेळांत घाई करूं नये, नाहींतर खेळांत रडी झाली ह्या सबबीवर ब्रिटिश एंपायर ऊर्फ मतलबी एंपायर भलत्यांचेच डोळे बांधतील व आपण मजा पाहतील.

ब्राह्मणेतर पक्ष निघण्यापूर्वीं सुमारें १० वर्षांमागे रा. विजयी मराठाकार मजकडे आले होते. तेव्हां मीं ह्या खेळाचें रहस्य सांगून म्हटलें होतें कीं, सावध न राहिल्यास हा डाव महाराष्ट्रापुरता तरी मराठ्यांवर येण्याचा संभव आहे. विजयी मराठाकार हें विसरण्याइतके बेसावध नाहींत. म्हणूनच कदाचित् ते आजहि मजकडे आले असतील. असो. वामणगांवकर म्हणतात कीं महाराष्ट्रांत मराठा जात बहुसंख्याक आहे. गोष्ट अगदीं खरी आहे, पण डाव येण्यास बहुसंख्या हें कारण नसून डोईजडपणा हें कारण असतें. एरवीं ब्राह्मणांवर आज डाव का आला असता? ते काय बहुसंख्यांक आहेत? इतकें कशाला! आज नर्मदेच्या दक्षिण देशांत जसा हा डाव ब्राह्मणावर आला आहे, तसाच उत्तरदेशांत तो मुसलमानांवर आला आहे. मग ते काय बहुसंख्याक आहेत? मुळींच नसून, त्याचें डोकें मात्र मतलबी एंपायरानीं अगदीं जड करून सोडलें आहे, हेंच कारण होय. तशांत खिलाफतवाल्यानीं तर त्यांना हरभऱ्याच्या झाडावर चढविल्यामुळे हें आधींच जड झालेलें डोकें त्यांच्या खांद्यावरून त्यांच्या पायांत येऊन, त्यावरच ते अलीकडे क्वेट्टा, कलबुर्गा, कलकत्ता येथें अडखळल्यानें रक्तबंबाळ होत आहेत. महा-राष्ट्रांत ब्राह्मण रक्तबंबाळ होत नाहींत ह्याचें कारण ते रक्ताला फार भितात. त्यांचे डोकें कितीहि जड झालें तरी राजकारण हा केवळ एक शिळोप्याचा खेळ — क्वचित्प्रसंगीं पोटाचा धंदाहि आहे, हें त्यांस माहीत आहे. करमणुकीसाठीं — किंबहुना पोटासाठीं, प्रसंग उत्तमांग जे डोकें तेंहि गमावून घेण्याइतके कांहीं ब्राह्मण बेसावध नाहींत. फार झालें तर फिरें म्हणून ते हार खातील आणि फक्त एकदां डोळे बांधण्यास सांगतील.

ह्या डावांत मराठेतरांनीं मात्र केवळ आपण अल्पसंख्याक आहोंत याच सबबीवर बेसावध राहूं नये. त्यांनी मराठ्यांच्याच मागें मागें धावावें असेंहि मीं म्हणणार नाहीं. ब्राह्मणेतर पक्षाच्या चाबकाच्या जोरावर यांच्या रिंगणात फिरणारे मराठेहि जर तसें म्हणत नाहींत, तर माझ्यासारख्या स्वतंत्राला तरी म्हणण्याचें काय कारण? ह्या दृष्टीनें ह्या खेळाकडे पाहत असतां मला सर्वांत जास्त भीति वाटते, ती विनाकारण अस्पृश्य मानलेल्या माझ्या हिंदु बंधूंकरितांच होय. खरोखर पाहतां हिंदुस्थानांत हे "अस्पृश्य"च

बहुसंख्याक आहेत. ह्यांचें डोकें कधींच जड झालेलें नाहीं, ह्यांच्याविषयीं मला जें वाईट वाटतें, तें ह्यासाठीं कीं, ह्या बिचाऱ्यांना ब्राह्मण काय, ब्राह्मणेतर काय, ख्रिस्ती काय, मुसलमान काय, मजूर काय, भांडवलदार काय, स्वकीय काय, परकीय काय, कोणीहि प्रामाणिकपणानें ह्या राजकारणाच्या खेळांतच घेण्यास तयार नाहींत; म्हणून मी स्वतः जरी जातवार प्रतिनिधित्वाच्या उलट होतों, तरी ह्यांच्यासाठीं मी त्या तत्त्वाचा पुरस्कार करीत आहें. पण चेम्सफर्ड आणि मॉंटेग्यु ह्या परकीय भटजी शेटजींनीं ही मज गरिबाची विनंति धिःकारली; आणि त्यांनीं उलट मुसलमान व ॲंग्लोइंडियन ह्या अल्पसंख्याक डोईजडांपुढें आपली मान वांकविली! म्हणून खरें "मराठेतर कोण?" ह्या प्रश्नाचें जर माझ्या मनांतलें उत्तर कोणी विचारील तर मी स्पष्ट सांगेन कीं ते मुसलमान, अस्सल युरोपियन, आणि त्यांच्या अव्यारि मागें लागलेले अर्धवट ॲंग्लोइंडियन हेच होत! अशांना भिऊन किंवा भुलून जर कोणी हल्लीं चालू असलेल्या ब्राह्मणेतर पक्षांतून फूट पाडण्याचा प्रयत्न करील, आणि त्या प्रयत्नांत जर प्रामाणिकपणा असेल तर अशा प्रामाणिक मित्रांना मी नम्रपणानें सांगेन कीं आपला नेम चुकला; जे अप्रामाणिक असतील त्यांची गोष्टच वेगळी.

"अस्पृश्यां"विषयीं लिहीत असतां रा. वामणगांवकरांनीं माझी व. प. लो. यामी श्रीशाहू छत्रपतींची तुलना केली आहे. त्यांनीं हा मुद्दा अजिबात गाळला असता तर बरें झालें असतें. अस्पृश्यतानिवारणाचें काम खाप्न टेकडीवर धावत जाण्याप्रमाणें केवळ शक्तीचें आहे. येथें लोकमान्यतेची अगर राजमान्यतेची शक्ति हाच मुख्य मुद्दा आहे. ह्या दोन्ही शक्ति अंगीं नसतां माझ्यासारख्या सामान्य व्यक्तीनें हें काम शिरावर घेणें म्हणजे धाडस आहे. असलें धाडस फार तर क्षम्य आहे, आणि त्याबद्दल माझ्या टीकाकारांनीं आजवर मला क्षमा केली किंवा कांहीं जहाल सोंवळ्या पक्षांनीं माझी गय केली हें मी माझें भाग्यच समजतों. तात्पर्य काय, कीं हा प्रश्न व्यक्तींचा नसून शक्तीचा आहे. उशीरां कां होईना, लोकमान्य-गांधीजींनीं हें काम अंगावर घेतलें, म्हणून ह्याला ह्या डी. सी. मिशनचें बळ आलें आहे. श्री शाहूमहाराज तर बहुजनसमाजांत लोकमान्यच नसून, प्रत्यक्ष छत्रपति श्रीशिवरायाचा अंश असल्यानें जी कामगिरी त्यांचेकडून झाली ती अशी त्यांच्या शत्रूंनीहि दृष्टीआड करूं नये. अलीकडे म्हैसूरच्या महाराजांनीं चरख्याची प्रतिष्ठा आपल्या पूजेंत केली आहे, असें ऐकतों. माझ्या हिंदू बंधूंनीं आपल्या तेहतीस कोटी मूर्तींचें उद्यापन करून त्यांना चरख्याची खरी (दिखाऊ नव्हे) पूजा केल्यास, खरोखरीच एका वर्षात स्वराज्य मिळेल, आणि ते टिकाऊ दिसेल असें मलाहि इतर पुष्कळांप्रमाणें वाटतें. पोपाळाची पिपाणी मुरळ टाकून बहुजनसमाज हा सात्त्विक धर्माचा तप आरंभील तर महात्मा गांधीजींच्या जन्माचें सार्थक होईल. इतकेंच नव्हे तर मी हेंहि म्हणण्याचें धाडस करितों कीं, असलीं साधेपणाचीं तपें केवळ गांधीजींसारख्यांनीच करण्यापेक्षां म्हैसूर महाराजांप्रमाणें सर्वच महाराजांनीं चालविल्यास, आपलीं सर्व लष्करें आणि दुकानें घेऊन इंग्रजांना दुसरा देश आजच

पाहावा लागेल. त्याला वर्षांची तरी मुदत कशाला पाहिजे ? परंतु जोंपर्यंत काश्मीरांतल्याप्रमाणें केवळ राज्यारोहणाप्रीत्यर्थ लक्षावधि रुपयांचा चुराडा होतो, तोंपर्यंत गांधीजींसारख्यांनीं जन्मचे जन्म घेतले तरी, स्वराज्याचीहि वर्षांचीं वर्षें मुदतबंदीच होत राहील; हातीं प्रत्यक्ष कांहींच लागावयाचें नाहीं ! जी गोष्ट खादीची, तीच अस्पृश्यता निवारणाचीहि आहे हें जाणून, इतर सर्व मतभेद बाजूस सारून, रा. वामणगांवकरांनीं दिवंगत श्रीशाहू छत्रपतींच्या श्रेयाला काट मारूं नये येवढेंच माझें म्हणणें आहे.

विजयी मराठाकारांनीं ब्राह्मणेतर मीमांसा चालविलेली पाहून वामणगावकरांकडून मराठेतर मीमांसा सुरू करण्यांत आली आहे ! मला वाटतें आतां ही "इतर" मीमांसा आमच्या देशांत पुरे झाली. डोईजडपणाची मेख मनुष्यस्वभावांतच ईश्वरानें जणुं मारली आहे. तिला ब्राह्मण काय, इतर काय, किंबहुना मराठेतरांप्रमाणें तिसरे कोणी काय, बळी पडण्याचा सारखाच संभव आहे. हा "इतर" रोग नुसत्या मीमांसेनें बरा होणें नाहीं. तसें असतें तर वर्णव्यवस्थेच्या विषाचें पीक आमच्या ह्या हतभागी देशांत इतकें माजलें नसतें. मीमांसा आणि मीमांसाविद्यालयें आमच्या देशांत थोडीं का आहेत ? निदान पुणें शहराच्या पश्चिमभागीं अशा विद्यालयांच्या पाट्या गल्लोगल्लीं चमकत आहेत. आणि म्हणूनच हल्लीं ब्राह्मणेतर पक्ष हिंदुस्थानांत फोफावत आहे. हा "इतर" रोग समूळ उखडून टाकावयाचा असल्यास ही मीमांसेची सारंगी हिंदूंनीं हिंदीमहासागरांत फेकून द्यावी, किंवा तिच्याशिवाय चैनच पडत नसेल तर एखाद्या इतिहाससंशोधकमंडळाच्या प्रदर्शनांत भावी पिढीच्या कल्याणासाठीं धोक्याचें चिन्ह म्हणून ठेवावी, आणि सर्व पक्षांनीं हातीं चिकाटीची कुदळ घ्यावी असें माझें प्रांजल मत आहे. मग कोणी कांहीं म्हणो !

## १४

# वेदोक्त कीं पुराणोक्त ?

कोलंबसानें अमेरिका शोधून काढिली, पण तो दरिद्री मेला. ख्रिस्तानें जगदोद्धारासाठीं एका धर्माची स्थापना केली; पण स्वतः त्याला दोन चोरांच्या मध्यें सुळावर डांबून प्राण सोडावा लागला. शेवट गोड झाला नाहीं, तरी इतिहासानें अशा कित्येक महात्म्यांना गोड करून घेतलें आहे. पण मानवी मतलब आणि मानवी कपट इतकें गहन आणि चिरपरिणामी आहे की इतर असंख्य महात्म्यांना देहान्त शिक्षा मिळूनहि वर इतिहासांत त्यांच्याच नव्हे, पण त्यांच्या वंशाच्या व जातीच्या कीर्तीला अक्षय्य कलंक फासण्यात आला आहे. हयहय-वंशी क्षत्रिय कार्तवीर्य अर्जुन हा महान् पराक्रमी चक्रवर्ति होऊन गेला. त्याच्या आणि अयोध्येच्या सूर्यवंशी क्षत्रिय घराण्यात दीर्घकालीन तुंबळ युद्ध झालें. त्यांत हयहयांचा कायमचा नायनाट तर झालाच, पण त्याचे जेते जे सूर्यवंशी क्षत्रिय त्यांनाहि उतरती कळा लागली. पण ही कळागत लावणारे जे भृगु कुलातील ब्राह्मण हे पुढें आले आणि विशेषतः त्यांतील परशुराम ह्याला ईश्वराचा अवतार बनवून त्यानें अखिल क्षत्रिय कुळाचा एकवीस वेळा नाश केला, अशी खोटी हूल पौराणिक इतिहासात उठवलेली गाजत आहे. हिरण्यकश्यपू हा पराक्रमी आणि भक्तिवान शैव सम्राट् द्राविड वंशाचा होता. केवळ तो वैष्णव नव्हता एवढ्यावरून प्रत्यक्ष त्याच्याच पोटच्या मुलास त्याच्या उलटें फितवून त्याला साधु ठरवून व त्याच्या बापाचा वध करून त्याचा देश, धर्म आणि सगळी

सस्कृति गारद करून टाकण्यात आली ! बळीचें दान आणि वामन अवताराची गोष्ट
तान तर पुराणें लिहिणाऱ्यांच्या भटाडीच्या वेदारमपणाचा कळस झालेला प्रसिद्धच
आहे. फ्रेंचांच्या आणि जर्मनांच्या चालू लढायांतील एकाच पक्षाकडून केवळ वर्तमान-
पत्रांतील लेख एकत्र करून त्यांचें एक पुराण बनविलें, तर त्यांत जितका खरा इतिहास
मिळेल, तितकाहि इतिहास आर्यांच्या व अनार्यांच्या कलहानंतर बनविलेल्या पुराणांत
मिळणें कठीण आहे. चालू वर्तमानपत्रांचा आणि मध्य युगांत पुराणाचा विचारी महिमा
अगाध आहे ! जनतेला ह्या विषाचें वाळकडू अशा कुशल आणि दीर्घ पद्धतीनें देण्यांत
आलें आहे, कीं तिचा दृष्टिकोन बदलणें केव्हां केव्हां मानवी शक्तीच्या पलीकडची
गोष्ट होऊन जाते.

ह्या हतभागी हिंदुस्थानाच्या गेल्या चार हजार वर्षांहि पूर्वीपासूनच्या इति-
हासांत वेदोक्त आणि पुराणोक्त विषयांची इतकी दीर्घकालीन आणि गहन दंगल अगदीं
आज चालू घडीपर्यंत माजून राहिली आहे, कीं तिचें सविस्तर स्वरूप स्पष्ट करून
दाखविण्याकरितां एक मोठी ग्रंथमालिकाच लिहावी लागेल. ती कधीं लिहिली जाईल
तेव्हां जावो, तूर्त पाश्चात्य व आमच्या देशांत पुरातत्त्व शोधनार्थ जे तुरळक तुरळक प्रयत्न
चालले आहेत, त्यांच्या द्वारां अशा मालेची आणि पर्यायानें भावी विचारक्रांतीची
पूर्वतयारी चांगली जोरांत होऊं लागली आहे. ह्या तयारींत देशोदेशींचे विश्वविद्याल-
यीन निःस्पृह पंडितच पडले आहेत, असें नव्हे, तर जनतेचे मोठे मोठे अशिक्षित समूह
व त्यांचे पुढारी राजेरजवाडेहि आता पडूं लागले आहेत. एका बाजूस कलकत्ता
हायकोर्टाचे एक माजी जज्ज आणि प्राचीन इतिहाससंशोधक मि. एफ्. ई. पार्जिटर
ह्यांनीं अलीकडे प्रसिद्ध केलेला भारतीय पुराणासंबंधीं एक क्रांतिकारक ग्रंथ व दुसऱ्या
बाजूस उत्तरेकडे बडोद्यास सुरू झालेली. व दक्षिण महाराष्ट्रांत प. स्वो. श्री शाहू-
महाराजांच्या नेतृत्वाखालीं कोल्हापुरास नावारूपास आलेली वेदोक्ताची चळवळ, हीं
आमच्या वरील विधानांचीं दोन ठोकळ उदाहरणें होत. श्री शाहू छत्रपती आणि पार्जिटर
ह्या दोन विभूति नुसत्या नांवानेंहि परस्परांस माहीत असण्याचा संभव नाहीं. तरी मूळ
पुराणांचे अभिमानी पार्जिटर आणि वेदोक्ताचे अध्वर्यु श्री शाहू छत्रपति ह्यांच्या
प्रयत्नाचें रहस्य निरखूं लागलें असतां, एकच विचारक्रांतीची धुरा मानेवर घेऊन
परस्परांस माहीत नसतांनाहि एकाच ध्येयाकडे धीरे धीरे वाट चालणाऱ्या दोन वृषभेंद्रां-
प्रमाणें हे दोन पुरुष शोभत आहेत, असें सदय सत्यशोधकांना तत्काळ दिसल्यावाचून
राहणार नाहीं.

उत्तर ( आधुनिक ) पुराणांचा निषेध करून वेदोक्ताची ध्वजा श्री शाहूनें एका-
पक्षीं उभारली, आणि केवळ ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें पाहतां वेदांचा फोलपणा
सिद्ध करून, पार्जिटरनें वेदाहिपूर्वींच्या मूळ पुराणाची ध्वजा उभारली हें पाहून वरवर
विचार करणारांची अशी दिशाभूल होण्याचा संभव आहे, कीं वरील दोघां पुरुषाचे
प्रयत्न परस्पर विरोधी आहेत. पण वस्तुतः अशा मुळींच प्रकार नाहीं. ज्या पुराणांवर

श्री शाहूनें हात उगारला तीं पुराणें खिस्ती शकाच्या सुमारें १००० वर्षांपूर्वी संपलेल्या महाभारताच्या युद्धानंतर, ब्राह्मणांनीं दूषित केलेलीं अथवा निर्माण केलेलीं आहेत. ज्यांचा पक्ष पार्जिटरनें उचलला आहे, तीं मूळ पुराणें क्षत्रियांनीं आपल्या वंशासंबंधीं आणि पराक्रमासंबंधीं केलेलीं होत. ह्यांचा विषय केवळ ऐहिक व राजकीय होता; तर उलट पक्षीं ब्राह्मणी पुराणाचा विषय आणि हेतु, देव, तीर्थ आणि क्षेत्रें ह्यांचें स्तोम माजवून शुद्ध धर्माच्या उलट एका नवीन धर्माची उभारणी करण्याचा आणि अशा खटाटोपीनें क्षत्रियांवर आपल्या ब्राह्मण जातीचा आणि वृत्तीचा वरचष्मा मिरविण्याचा होता. येणें-प्रमाणें पुराणामध्यें जी पेशवाई माजविण्यांत आली, तिच्यामुळें प्राचीन क्षत्रियांचा पूर्ण पराभव होऊन त्यांची पहिली पायरी कायमची नष्ट होऊन, ब्राह्मण हे चातुर्वर्णाचे गुरु बनले आणि क्षत्रिय त्यांच्या भजनीं लागले. हल्लीं जसे पोवाडे करणारे आणि म्हणणारे शाहीर असतात, तसे भारतीय युद्धापूर्वी सूत, मागध, बंदीजन इत्यादि नांवांचे पुराणें रचणारे व म्हणून दाखविणारे विशिष्ट अधिकारी पुरुष असत. ह्या अधिकारी वर्गाचा जन्म क्षत्रिय पुरुष आणि ब्राह्मण लोकांच्या स्त्रिया ह्यांच्यापासून झालेला असे. राजे लोकांच्या वंशावळी आणि पराक्रम, पौराणिक गीतांच्या रूपानें रचून यज्ञयागामध्यें व इतर विशिष्ट महत्त्वाच्या राष्ट्रीय प्रसंगीं मोठ्या आविर्भावानें म्हणून दाखवून, प्राचीन बहुजनसमूहाच्या स्मृतिपटावर ताजा ठेवणें व त्याच्या पुढाऱ्यांना भावी वैभवाची स्फूर्ति चढविणें हें ऐहिक पण शुद्ध आणि पवित्र कार्य ह्या सूतांचें असे. त्या वेळचें जग क्षत्रिय-प्रधान असे. लिहिण्याची कला प्रचारात नसल्यानें अगोदरचीं पुराणें व मागाहून झालेले वेद, केवळ पठणाच्या द्वारांच अस्तित्वांत राखावे लागत असत. भारतीय युद्धानंतरचा काळ कलियुग असें समजण्यांत येत आहे. चातुर्वर्णाच्या हल्लींच्या विकृत स्वरूपाला त्याच काळापासून सुरुवात होऊन ह्या कलीच्या किल्ल्यात नवीन ब्राह्मणप्रधान धर्माची व संस्कृतीची उभारणी होऊं लागली. नवीन पुराणें रचण्याचें काम सूत आणि मागधा-पासून ह्या काळात ब्राह्मणांनीं आपल्याकडे घेतलें. इतकेंच नव्हे तर त्यांचा विषय आणि हेतुहि त्यांनी पार बदलून टाकले. श्री शाहूमहाराज, सत्यशोधक, पार्जिटर किंवा तत्सम इतर इतिहाससंशोधक ह्या सर्वांचा हल्ला जरी ह्या ब्राह्मणकृत उत्तर पुराणावर होऊं लागला, तरी इतिहाससंशोधकांना ज्याप्रमाणें प्राचीन मूळ पुराणांची अलीकडे माहिती झाली आहे, त्याप्रमाणें सत्यशोधक किंवा इतर असल्या साध्याभोळ्या बहुजन-समाजाला मूळ पुराणांची पायाशुद्ध माहिती झालेली असणें संभवनीय नसल्यामुळें, पार्जिटरप्रमाणें उत्तर पुराणांच्या उलट मूळ पुराणांची ध्वजा फडकविणें त्यांना अशक्यच होतें. म्हणून न समजतांच त्यांना अथवा श्री शाहूराजांच्या त्यांच्या पुढाऱ्यांना अर्धवट माहिती असलेल्या वेदोक्ताची ध्वजा उभी करावी लागली. वेदमार्ग जरी उत्तर पुराणां-प्रमाणें सर्वस्वीं ब्राह्मणकृत नव्हता, तरी वेद आणि वेदांग हीं ऐहिक नसून पारमार्थिक होतीं आणि क्षत्रियांप्रमाणें त्यांत ब्राह्मणाचा शिरकाव होता. आणि कलियुगांत तर क्षत्रियांचें लक्ष्य परमार्थावरून उडून त्यांचें वर्चस्व प्रमाणाबाहेर वाढून, केवळ धार्मिक

चाव्रतींतच नव्हे तर सर्व ऐहिक व्यवहारांत ते केवळ भूदेवच बनले. त्यामुळे पुराणें रचण्याचें सर्वस्वी क्षत्रियांचें काम जसें त्यांनीं आपल्याकडे घेतलें, तसें वेदांचेंहि अध्ययन अध्यापन हीं कामें हळूहळू आपल्याचकडे ठेवून आणि कलियुगांत ब्राह्मण आणि शूद्र ह्या दोनच जाती आहेत; अशी हूल उठवून ब्राह्मण वर्ग आपणच सर्वाधिकारी बनला. ह्याचा परिणाम शेवटीं असा झाला कीं, "गोब्राह्मण परिपालक" श्री शिवरायासारख्या क्षत्रिय कुलावतंसालाहि वेदोक्ताचा अधिकार आपल्यापुरता आपल्या भारंभार सोनें ब्राह्मणांना वांटून विकत घ्यावा लागला. तथापि असल्या काल्पनिक गोष्टींतहि त्यांच्या असल्या वेदाजाला अद्यापि शाब्दिक युद्ध चालवावें लागलें आहे.

वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत एक गोष्ट येईल कीं खरा लढा वेदोक्त आणि पुराणोक्त ह्यांमध्यें नसून तो पूर्वीचीं अथवा मूळचीं क्षत्रियकृत पुराणें ह्यांत आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास हा लढा ब्राह्मण व क्षत्रिय वर्गांतला असून तो पुरातन काळचा आहे, व ह्या तत्त्वाच्या लाटा अद्यापि आणि पुढेंहि भारतीय इतिहास महोदधीवर कमीअधिक प्रमाणानें उसळत राहणारच. जोंपर्यंत हल्लींची विषारी वर्णव्यवस्था कायम आहे आणि तिचे मतलबी आणि धूर्त मंडणमिश्र वाचवूक ह्या जरठ देशांत पोट भरून आहेत, तोंपर्यंत ह्या महोदधीला अशीच शाब्दिक भरती-ओहोटी येत राहणार. ह्या लाटांना कोणी सनातन धर्माचा विजय, कोणी स्वराज्य, कोणी भारतीय इतिहाससंशोधन, कोणी आर्यांचा विस्तार अशीं अनेक भुरळ घालणारीं नावें देतील; पण रहस्य जाणणारांना नांवाच्या फोलपणा कळल्याशिवाय राहणार नाहीं.

पार्जिटर साहेबांचा Ancient Indian Historical Tradition ह्या नांवाचा एक ग्रंथ नुकताच ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटी प्रेसनें प्रसिद्ध केला आहे. हा सुमारें ३२५ पानांचाच लहानसा ग्रंथ आहे, तरी ह्याची "मुरत लहान पण कीरत मोठी होणार" अशी चिन्हें दिसत आहेत. पाश्चात्य वैदिक पंडितांनीं आजपर्यंत संस्कृत भाषा आणि भारतीय आर्य धर्माच्या पायावर भारतीय इतिहाससंबंधीं व समाजरचनेसंबंधीं जे कांहीं सिद्धान्त रचले होते, त्यांसंबंधीं कोणत्याहि प्रकारें पूर्वग्रह करून न घेतां, अगदीं स्वतंत्रपणानें, धिटाईनें आणि बारकाईनें प्राचीन आणि मध्ययुगीन संस्कृत वाङ्मयाचेंहि मंथन करून, मि. पार्जिटर ह्यांनीं आपलीं कांहीं अंशीं क्रांतिकारक विधानें विचारी जगापुढें ह्या ग्रंथाच्याद्वारें मांडलीं आहेत. तीं सर्व जशींच्या तशींच भावी पंडितांना मान्य होतील कीं नाहींत, हें जरी आजच सांगणें कठीण आहे, तरी भारतीय इतिहासाच्या कालगणनेवर आणि आर्यांच्या व द्राविडांच्या समाजरचनेसंबंधीं प्रस्तुत रूढ झालेल्या कित्येक कल्पनांवर ह्या विधानांचा धक्का बसून तीं कांहीं काळ डळमळू लागतील असें दिसतें.

वेद, उपनिषदें, भारत, रामायण, व त्यानंतरचीं हल्लीं रूढ असलेलीं मुख्य मुख्य पुराणें आणि इतर प्राचीन संस्कृत वाङ्मय ह्यांचें मंथन करून, पार्जिटरनें जीं निर्भीडपणानें आपल्या ह्या ग्रंथांत महत्त्वाचीं विधानें केलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं खालीं

दिली आहेत. "वैदिक वाङ्मयांत प्राचीन भारताची थोडी माहिती मिळण्यासारखी आहे, पण ती सर्व ब्राह्मणाच्या व ब्राह्मणी धर्माच्या दृष्टीने दिलेली आहे, आणि क्षत्रिय पुराणाच्या साहाय्यानें आम्हांला क्षत्रियाच्या दृष्टीनें भारताच्या प्राचीन राजकारणाची कल्पना येणारतां येण्यासारखी आहे." (पान ८) "वैदिक वाङ्मयांत ऐतिहासिक दृष्टि मुळींच नाहीं. इतकेंच नव्हे तर या वाङ्मयांत ब्राह्मणांनीं आपल्यासंबंधीं जे हक्क आणि अधिकार सांगितले आहेत ते (एकपक्षी असल्यानें) नेहमींच विश्वसनीय आहेत असें मानतां येत नाहींत." (पान ९) याचीं तीन कारणें आहेतः (१) "वैदिक वाङ्मय हें धार्मिक असून, ऐतिहासिक नाहीं. (२) ब्राह्मणांना ऐतिहासिक दृष्टीच नव्हती. (३) ते रानावनांतील आश्रमांत राहात असल्यानें त्यांना (ऐहिक व्यवहाराची) काटेकोर माहिती असणें शक्यच नव्हतें." (पान १०) वेदांतील विषयांपेक्षां पुराणांतील विषयांचा काळ अधिक प्राचीन होता. "श्रुति" हा शब्द वैदिक धर्मग्रंथांना लावण्यात येतो, पण "इति श्रुतिः" "इतिनः श्रुतम्" असे शब्दप्रयोग पुराणांतील ऐहिक विषयांसंबंधीं पुष्कळ वेळां करण्यांत आले आहेत आणि तशा विषयांचा उल्लेख वैदिक वाङ्मयांत कोठेंच नाहीं. (पान १९, २०) ह्या "श्रुति" पदाचा प्रयोग त्यातल्या त्यांत मागाहून रचलेल्या पुराणात मुळींच आढळत नसून पूर्वीच्या प्राचीन भागांत विशेषतः क्षत्रियाच्या कथाभागांतून आढळतो; आणि जेव्हां जेव्हां वेदांतील कथाभागासंबंधीं असा प्रयोग करण्यांत येत असे, तेव्हां तेव्हा "वैदिकी श्रुति" असा विशेष प्रयोग आढळतो. (पान २१) तसेंच ज्याप्रमाणें "वेदवित्" "योगवित्" "सांख्यवित्" इ. प्रयोग, वेदान्त, योग आणि सांख्य आदि करून शास्त्रांचे वेत्ते ह्या अर्थी वायु, मत्स्य इत्यादि पूर्वीच्या पुराणात आढळतात, त्याचप्रमाणें "वंशवित" "वंशकुशल" "पुराणज्ञ" असेहि शब्द वरचेवर आढळतात. . ह्यावरून राजलोकांच्या वंशावळीचें अध्ययन करणारे व रक्षण करणारे कोणी अधिकारी पूर्वी असत असाहि अर्थ निघतो. (पान २७). वेदाप्रमाणेंच पुराणाचें नुसतें प्राचीनत्वच नव्हे तर महत्त्वहि दर्शविण्याकरितां, मत्स्य, वायु, मार्कंडेय, ब्रह्मांड, पद्म इत्यादि जुन्यांतल्या जुन्या पुराणात स्पष्ट म्हटलें आहे कीं, ब्रह्मदेवाचे तोंडातून वेद निघण्याच्याहि पूर्वी त्यानें पुराणाचें स्मरण केलें. वेदाच्या चार संहितांचें जनकत्व ज्याप्रमाणें श्री व्यासाकडे आहे, तसेंच अठरा पुराणाचें जनकत्वाचाहि आरोप त्याच्यावरच आहे. तो खरा असो, खोटा असो, वेदाच्या जशा संहिता कोणाकडून तरी करण्यांत आल्या तशीच भारत-रामायण आणि इतर १८ पुराणाचे विषयाला मूलाधारभूत प्राचीन कथांची एकादी संहिता असावी, अशा अर्थाचा उल्लेख ब्रह्मांड भाग २ रा. ३४, १२–१६, वायु ६०, १२–१६ विष्णु अंश ३ रा. ४, ७–१० ह्या स्थळीं आढळतो. विष्णु पुराणांतील अंश ३ अध्याय ६ श्लोक १५ वा असा स्पष्ट आहे:— पुराण संहितां चक्रे पुराणार्थ विशारदः। प्रख्यातो व्यासशिष्योभूत् सूतो वै रोमहर्षणः ॥ १५॥ म्हणजे, वेदाच्या चार संहिता करून कृष्णद्वैपायन व्यासानें त्या आपल्या चार शिष्यांमध्यें अनुक्रमें पैल,

वैशंपायन, जैमिनी, आणि सुमंत ह्यांमध्यें वांटून दिल्या. तशीच सर्व प्राचीन कथांची एक पुराणसंहिता करून ती आपला प्रख्यात शिष्य जो सूत रोमहर्षण ह्यास दिली. ह्या सर्व विवेचनावरून दिसून येईल कीं, जरी ही पुराणसंहिता ग्रंथरूपानें आज उपलब्ध नाहीं, तरी हल्लींच्या अनेक पुराणाना आधारभूत अशी ती वेदसंहिता-काळीं होती आणि तिच्यांत वर्णिलेल्या गोष्टी तर वेदकाळाच्याहि पुष्कळच पूर्वीं घडून आल्या असल्या पाहिजेत. ह्या पुराणसंहितेनंतर व्यासानें महाभारत केलें !

> अष्टादश पुराणानि कृत्वा सत्यवती सुतः ॥
> भारताख्यानमखिलं चक्रे तदुपबृंहितम ॥
>
> मत्स्य पुराण ५३-७०

अशाच अर्थाचा उल्लेख प्रत्यक्ष महाभारतांत पर्व १ अ. १ श्लोक ५४-६४ त आहे. पुराणांतील जितके उतारे महाभारतात आढळतात, तितके महाभारतांतील उतारे पुराणांत सांपडत नाहीत. ह्या गोष्टीवरूनहि पुराणाचें भारतापेक्षांहि अधिक प्राचीनत्व सिद्ध होतें. (पान २२).

पार्जिटरचीं वरील विधानें बहुतेक सहज पटण्यासारखीं आहेत. त्या ग्रंथाचें वैशिष्ट्य ह्या विधानांत नसून तें त्यानें निरनिराळ्या क्षत्रिय आणि ब्राह्मण कुलांच्या ज्या महत्त्वाच्या वंशावळींचे फार बारकाईनें अध्ययन केलें आहे, व त्यावरून जीं पिढ्यांची अनुमानें काढलीं आहेत त्यांत आहे. यादव, हैहय, द्रुह्यु, तुर्वस, कान्यकुब्ज, पौरव, काशी, वायव्येकडील आनव, पूर्वेकडील आनव, अयोध्या विदेह, आणि वैशाली ह्या १२ क्षत्रिय, आणि भार्गव, आंगिरस, वासिष्ट, आणि इतर कांहीं ब्राह्मण घराण्यांच्या अनुक्रमें ५५ व ९४ पिढ्यांच्या वंशावळी परस्परांशीं ताडून, निरनिराळ्या पुराणांतून त्यांतील कित्येक पिढ्यांच्या पुरुषांच्या पराक्रमाचा किंवा शरीरसंबंधाचा उल्लेख झालेला एकत्र निर्दिष्ट करून, प्राचीन इतिहासाची उभारणी करण्याचा जो प्रयत्न केला आहे, तो विशेष मननीय आहे. पान १४८-१४९ वर ज्या ९५ पिढ्या, त्यांतील यादव (सोम) वंशांतील श्री कृष्णाचा मुलगा सांब आणि अयोध्येच्या सूर्यवंशातला बृहत्क्षय हे शेवटचे राजे आहेत. श्रीकृष्ण हा भारतीय युद्धांत पांडवांच्या बाजूनें लढला आणि बृहत्क्षयाचा बाप बृहद्बल हा कौरवांच्या बाजूनें लढत असता अभिमन्यूच्या हातानें मारला गेला. ह्या पिढीनंतर कलियुगाला आरंभ झाला. मगध देशाच्या गादीवरील चंद्रगुप्ताच्या राज्यारोहणाचा काल खिस्ती शकापूर्वीं ३२२ धरून त्याच्यामागें नंद घराण्याचीं ८० वर्षें, १० शिशुनाग वंशांतील पुरुषाचीं १६५ वर्षें, प्रद्योत घराण्यांतील ५ पुरुषांचीं ५२ वर्षें आणि बृहद्रथ घराण्यांतील १५ पुरुषांचीं २३१ वर्षें अशीं एकूण ५२८ वर्षें होतात. ह्याप्रमाणें ३२२ + ५२८ = ८५० खिस्ती शकापूर्वीं मगध देशाचा बृहद्रथ घराण्यांतला पहिला राजा सेनाजित् ह्याचा काळ होतो. हस्तिनापुरचा पौरव राजा अधिसीमकृष्ण, अयोध्येचा ऐक्ष्वाकु राजा दिवाकर हे ह्या सेनाजिताचे

समकालीन होते. हे तिन्ही समकालीन राजे आणि भारतीय युद्धांतील हस्तिनापूरचा युधिष्ठिर राजा ह्यांच्यामध्यें, हस्तिनापूर, अयोध्या व मगध देशाच्या गादीवर अनुक्रमें, ५, ४, ६ पुरुष असले. सरासरीनें त्यांच्या ५ पिढ्या, आणि प्रत्येकीं अदमासें २० वर्षे धरलीं असतां, सेनाजिताच्या आणि युधिष्ठिराच्या दरम्यान १०० वर्षे होतात. येणेंप्रमाणें हिशेब करून पार्जिटरनें ख्रिस्ती शकापूर्वी ८५० + १०० = ९५० वर्षे हा भारतीयुद्धाचा काळ निर्णित केला आहे. इतर विद्वानांनीं हा काळ १४००।१५०० ख्रि. पू. धरला आहे. पण पार्जिटरनें आपले पुरावे नमूद केले आहेत, त्यावरून त्याच्या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे. ज्या प्राचीन इतिहासाच्या जीर्णोद्धारासंबंधीं पार्जिटरचा प्रयत्न आहे, तो ह्या कलियुगाच्या आरंभापासून म्हणजे ख्रिस्ती शकाच्या ९५० वर्षाच्या पूर्वीपासून मागच्या काळांतला आहे. आणि ह्या इतिहासाच्या उभारणी-साठीं त्याला वेदोक्त आणि उत्तर अथवा ब्राह्मणकृत पुराणोक्त विषयाच्या उलट झगडावयाचें आहे. कारण त्याच्या म्हणण्याप्रमाणें हे दोन्ही विषय खऱ्या प्राचीन इतिहासाला मुळींच साधक नसून त्यांपैकीं उत्तर पुराणें तर उघड उघड बाधक आहेत. वेदांतील विषय धार्मिक आणि दृष्टि पारमार्थिक असल्यानें त्याचा ऐहिक इतिहासाच्या बाबतींत तादृश उपयोग नाहीं. उत्तर पुराणें तर जाणूनबुजून ऐहिक, विशेषतः क्षत्रियांच्या इतिहासाचा विपर्यास करण्याकरतां किंवा बौद्ध, जैन, शैव अथवा अशाच इतर क्षत्रिय अथवा द्राविड धर्मांचा पाडाव करण्याकरता लिहिलीं अथवा लिहविलीं गेलीं आहेत. ह्यावरून हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास लिहिणें किती कठीण काम आहे, हें ध्यानांत येईल. केवळ इतिहासाचा अभाव असण्यापेक्षा खोट्या इतिहासाची लयलूट होऊन, उलट ह्या खोट्या इतिहासालाच धर्माचें सर्वमान्य आणि पवित्र स्वरूप येण्यानें खऱ्या इतिहासाची किती भयंकर हानि होते, हें साधारण जनसमूहासच नव्हे, तर परकयांच्या ओंजळीनें पाणी पिणाऱ्या पुढाऱ्यांनाहि समजून येणें पुष्कळ वेळां अशक्य होऊन बसतें. म्हणूनच पार्जिटरसारख्या सत्यशोधकांच्या निष्काम प्रयत्नाचें महत्त्व "सत्यशोधक" म्हणविणाऱ्या बहुजनसमाजाला तरी लवकर पटेल की नाहीं, ह्याची वानवाच आहे.

पार्जिटरनें १२ क्षत्रिय मुख्य घराण्यांच्या एकंदर ९५ पिढ्यांच्या वंशावळी एकमेकांच्या लगत लावून त्यांतील कित्येक प्रमुख आणि पुराणप्रसिद्ध राजपुरुषांचा समन्वय अथवा समकालीनता ठरवीत करून जी ऐतिहासिक कामगिरी केली आहे, ती फारच महत्त्वाची झाली आहे. वैवस्वत मनूपासून तों अयोध्येच्या सूर्यवंशी सगर राजा-पर्यंत ४० पिढ्या होतात. अयोध्येचें हें ऐक्ष्वाकु घराणें आणि दक्षिण माळव्यांतील (माहिष्मति ऊर्फ हल्लींचे महेश्वरचें) हैहय वंशांतील क्षत्रिय घराणें ह्यांचें भृगु नावाच्या ब्राह्मण पुरोहित घराण्यामुळें महायुद्ध जुंपलें. तें सुमारें १० पिढ्या चालून त्यांत बऱ्याच क्षत्रिय कुळांचा नायनाट झाला. क्षत्रियांच्या ह्या आपसांतील यादवीचा फायदा घेऊन ब्राह्मणांनीं आपल्या परशुरामाचें स्तोम माजविलें आणि त्यानें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय (!) केल्यामुळें पुढें क्षत्रियच उरले नाहीत, अशी हूल उठविली. असो! सगर राजानें

हैहयाचा पूर्ण निःपात केल्यावर कृतयुगाची समाप्ति होऊन त्रेतायुगास प्रारंभ झाला. पुढें सगरापासून त्याच्याच कुळांत झालेल्या ६५ वा राजा श्री दाशरथी रामापर्यंत २५ पिढ्या झाल्या. ह्या वेळीं रामरावणांचें दुसरें महायुद्ध होऊन, त्रेतायुग सपून द्वापार युगास आरंभ झाला. त्यानंतर श्रीरामचंद्राच्या कुळांतला शेवटचा ९५ वा राजपुरुष जो वृहद्‌क्षय त्याचा बाप बृहद्बलै हा भारतीय महायुद्धांत पांडवांकडील अभिमन्यूचे हस्तें युद्धांत मारला गेला. ह्या वेळीं द्वापारयुग सपून हल्लीं चालू असलेलें कलियुग सुरू झालें. कलियुगांत पुराणें लिहिण्याचें काम ब्राह्मणाकडे आल्यानें मुळीं क्षत्रिय व वैश्य हे वर्गच अस्तित्वांत नाहींत असें त्यांनीं ठरविलें; मग राजेलोकांच्या वंशावळीच काय पण ऐहिक राजकारणाचें महत्त्व आणि ऐतिहासिक दृष्टीचा मागमूसच उरला नाहीं ह्यांत काय नवल ! पार्जिटरनें क्षत्रियांच्याच १२ घराण्यांच्या ९५ पिढ्यांच्या वंशावळ्यांचीच समकालीन माहिती दिली आहे असें नाहीं; तर ब्राह्मणांच्या अथवा ऋषींच्याहि भृगु, आंगिरस आणि वासिष्ठ ह्या तीन घराण्यांच्या ९४ पिढींचा समन्वय करून कोष्टकांच्या रूपानें दाखविला आहे. ह्यांत अयोध्येच्या ऐक्ष्वाकु सूर्यवंशी घराण्याचा आणि त्यांचे पुरोहित वासिष्ठ घराण्याचा जम बसण्यासारखा आहे. पण ऋषी कुळाची परंपरा औरस पुत्राच्या द्वारें होत नसून, बहुतेक शिष्य अथवा दत्तक पुत्राचे द्वारें होत होती. ह्यांतील कित्येक पुरुष ब्राह्मण वंशांतले, तर कित्येक क्षत्रिय वंशांतले ब्राह्मणाची वृत्ति धारण केलेले आढळतात. उदाहरणार्थ, भृगुकुळांतील ६२ आणि ६३ वा पुरुष वध्याश्व आणि दिवोदास हे क्षत्रिय होते. आंगिरस कुळांतील ५४ वा पुरुष भारद्वाज ह्या ब्राह्मणाला दुष्यन्ताचा पुत्र भरत ह्यानें दत्तक घेतलें आणि त्याच्याबरोबर अजामीढ ह्या क्षत्रिय राजपुत्रानें ब्राह्मणाची वृत्ति स्वीकारली. वासिष्ठ कुळांतला ९२ वा पुरुष, वेदांच्या आणि पुराणांच्या संहिता करणारा प्रसिद्ध श्री कृष्णद्वैपायन व्यास ऋषि तर सत्यवती नांवाच्या कोळिणीचा मुलगा होता ! एकूण काय, कीं ब्राह्मणाची दृष्टि पारमार्थिक असल्यामुळें त्याना ऐहिक वंशपरंपरेचें महत्त्व मुळींच वाटत नव्हतें. ऋषींचे एक तर विवाहच होत नसत, झालेच तरी वंशशुद्धीची त्यांना गरजच भासत नसे. तथापि आधुनिक ऐहिक विषयांत गुरफटलेल्या ब्राह्मणांनीं आपल्या जातिशुद्धीच्या नांवानें उलट्या आरोळ्या माराव्या, ही किती भयानक नवलाची गोष्ट !

प्रस्तुत संशोधकाचीं अगदीं नवीं आणि अत्यंत धाडसाचीं अनुमानें जीं आहेत, तीं ह्याहून पुढेंच आहेत. त्यांनीं आपल्या ग्रंथाच्या पहिल्या २३ भागांत पुराणांची पूर्वपीठिका, त्यांतील वंशावळीचा समन्वय व त्यावरून कालगणनेचा वगैरे विचार केल्यावर, २४ व्या भागांत ह्या पुराणांतल्या कथानकावरून हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाची जुळवाजुळव केली आहे. आणि मग २५ आणि २६ व्या भागांत ह्या कथानकांवरून निरनिराळ्या प्राचीन राजवटींतील क्षत्रिय आणि ब्राह्मण वर्गाच्या वंशांसंबंधीं स्वतंत्र अशीं अनुमानें काढलीं आहेत. हीं मात्र फार वादग्रस्त होणार आहेत. त्यांचें मुख्य अनुमान असें आहे कीं हिंदुस्थानांतील प्राचीन राजघराण्यांचे परस्पराहून

भिन्न आणि स्वतंत्र असे तीन मुख्य वंश आहेत. ते वैवस्वत मनूपासून झालेला मानव अथवा सूर्यवंश, पुरूरवा ऐल ह्यापासून झालेला पौरव अथवा सोमवंश, आणि सुद्युम्ना-पासून झालेला आणि ह्या दोहोंहतरा प्रसिद्ध नसलेला सौद्युम्नवंश. ह्यांपैकीं सर्वांत प्राचीन आणि प्रतिष्ठित असा सूर्यवंश अयोध्या, विदेह, वैशाली येथे होता. ऐलवंश हा मागाहून प्रतिष्ठान ( अथवा हल्लींचें अलाहाबाद )' येथें उदयास येऊन, पुढें क्रमा-क्रमानें बहुतेक सर्व उत्तर आणि मध्य हिंदुस्थानभर पसरला आणि त्यानें आपली छाप सूर्यवंशावरहि बसविली. सौद्युम्न हा गया आणि पूर्वदेश व्यापून होता. ह्यांपैकीं ज्याला हल्लीं आर्यवंश समजण्यांत येते, तो काय तो ऐल हाच होय; मानव अथवा सूर्यवंश येथील मूळचा द्राविड वंश होता, आणि सौद्युम्न हा तिबेट अथवा ब्रह्मदेशांतून आलेला मोंगल वंश असावा. ह्या ऐलाची उर्फ आर्यांची उत्पत्ति मूळ मध्य हिमालयांतून झाली असावी. नंतर सर्व हिंदुस्थानभर ह्यांचा पगडा बसल्यावर ह्यांचा विस्तार पश्चिमेकडे इराणांत झाला असावा. त्याचप्रमाणेंच ब्राह्मणवर्ग मूळचा सर्व अनार्य होता. तो प्रारंभीं मानव अथवा सूर्यवंशी राजाच्या आश्रयाला होता; तो निराळा वंश नसून एक निराळी वृत्ति, वर्ण, अथवा धंदा होता. तो धंदा म्हणजे जादू, मंत्र अथवा वैदकी करण्याचा होता. ऐलाच्या अथवा आर्यांच्या सहवासानें ब्राह्मण हे यज्ञयाग आणि पौरोहित्य करूं लागले. त्यापूर्वी ते केवळ वैदु अथवा जादुगार असून कडक तपश्चर्या करण्यांत मात्र त्यांची प्रसिद्धि असे. आणि त्यासाठीं राजदरबारीं त्यांना मोठा मान असे; इतकेंच नव्हे तर राजेलोकांशीं त्यांचा शरीरसंबंधहि होत असे. प्रथम ऐल अथवा आर्य क्षत्रियांनीं ब्राह्मणांशीं मोठा विरोध केला; पण पुढें विशेषतः दौष्यन्ति भरताच्या काळापासून ब्राह्मण हे संस्कृतीनें आणि धर्मानें आर्य बनले; आणि त्यांच्या द्वारा आर्य संस्कृतीचा विस्तार हिंदुस्थानभर झाला. स्वतः भरताला मुलगा नसल्यामुळें, त्यानें भारद्वाज नावाच्या ब्राह्मणाला दत्तक घेतलें होतें. दैत्य, दानव, राक्षस हीं नांवें द्राविड आणि अस्सल सूर्यवंशी क्षत्रियांचीं होतीं. ते आर्यांप्रमाणेंच किंबहुना कांहीं बाबतींत अधिकच सुधारलेले होते. दैत्यांचा गुरु शुक्राचार्य यांना संजीवनी विद्या अवगत होती. व वेदाचे मंत्रहि जुन्यांतले जुने तेवढे मानव राजे आणि मानव ऋषी-च्याच नावानें आहेत. आर्य पुरूरव्याच्या नावानें एकच आहे व तोहि पण मागाहून दुसऱ्या कोणीं तरी केला असावा, असें अनुमान आहे. हे मानव राजे व ऋषी मध्य आणि पूर्व देशांतलेच होते. ह्यावरून वेदांची रचना प्रथम पूर्वेकडे होत होती व पुढें हळूहळू ती पश्चिमेकडील देशांतून होत गेली. जसजसा ऐलाचा उर्फ आर्यांचा हिंदु-स्थानांत प्रसार होत गेला, तसतसा आणि विशेषकरून भरताच्या काळानंतर वेद-रचनेवर आर्य संस्कृतीचा परिणाम होऊं लागला; इतकेंच नव्हे तर ब्राह्मण वर्ग जो मूळ अनार्यधर्मी होता, तोहि आर्यधर्मी होऊन वेदांनाहि आर्य वळण लागलें.

असो! ह्या अनुमानाचा सांगोपांग विचार करावयाचा झाल्यास निराळीच एक लेखमाला लिहावी लागेल. एवढें मात्र खरें कीं पार्जिटरने आपल्या विधानांच्या पुष्ट्यर्थ

आगजाणीं भरपूर पुरावे दिले आहेत; आणि ते सर्व अत्यंत मनन करण्यासारखे आहेत. ह्या नवीन ग्रंथामुळें इतकें उघड होतें कीं जरी हल्लींचीं मुख्य पुराणें अगदीं विकृत स्वरूपांत आहेत, तरी त्यांचें नीट संशोधन केल्यास, त्यांतून प्राचीन खऱ्या इतिहासाचीं साधनें सांपडण्यासारखीं आहेत. इतकेंच नव्हे तर केवळ इतिहासाच्या दृष्टीनेंच पाहूं गेल्यास प्रत्यक्ष वेदांपेक्षांहि ह्या पुराणांचें महत्त्व अधिक आहे. वेद ज्या काळीं लिहिले गेले, त्याच काळची माहिती त्यांत ग्रथित झाली आहे, आणि वेद जसेच्या तसेच अद्यापि राखले गेले आहेत. पण उलट पक्षीं पुराणात विलक्षण ढवळाढवळ झाली असून शिवाय गोष्टी घडलेला काळ, लिहिल्या गेलेल्या काळाच्या फार पूर्वीचा होता. ह्यावरून वेदांची विश्वसनीयता हल्लींच्या पुराणाहून अर्थात पुष्कळ अधिक आहे, हें स्वतः पार्जिटरनें स्पष्ट आणि प्रांजलपणें सांगितलें आहे. तरी पण वेदांतील विषयच मुळीं ऐहिक नसल्यामुळें आणि ते रचणारे जे ब्राह्मण त्यांच्यांत ऐतिहासिक दृष्टीचा अत्यंत अभाव असल्यामुळें पुराणांतच जे कांहीं इतिहासाचे कण मिळण्यासारखे आहेत, आणि ते पुष्कळ आहेत, त्यांची किंमत वेदांतील काव्यापेक्षां फार मोठी आहे, असें पार्जिटरनें वेळोवेळीं निक्षून सांगितलें आहे. ह्या ग्रंथामुळें 'वेदोक्त कीं पुराणोक्त ?' ह्या वादावर पुष्कळ प्रकाश पडून त्याचा ओघ बदलून त्याला निराळेंच वळण लागेल, असें मानण्यास बरीच जागा आहे.

## १५

# चातुर्मास्य, तुकोबा व त्यांची टवाळी

चातुर्मास्याचा इतिहास चमत्कारिक आहे. बौद्ध, जैन आणि ब्राह्मणादि पंथांचे परिव्राजक पूर्व काळीं अखिल भारतात हिंडत. पावसाळ्याचे चार महिने कोठें तरी विहारांत राहात. तेव्हां आसपासचे श्रावक जन त्यांचेकडे उपासनेस जात. पौर्णिमा, अमावास्या, दोन अष्टम्या हे महिन्यांतून चार दिवस उपोसथाचे ठरलेले असत. उपोसथाचा अर्थ उपोषण असा वैष्णव पंथानें केल्यावर ह्या चार तिथींच्या ऐवजीं दोन एकादशा झाल्या. आषाढ शुद्ध एकादशीपासून तों कार्तिक शुद्ध द्वादशीअखेर चार महिने पावसाळ्याचें चातुर्मास्य जें हल्लीं प्रचारात आहे, तें भागवत काळापासून चालत आलें आहे. श्रावण पौर्णिमेला बौद्ध भिक्षुना नवीन चीवर वस्त्रं देण्याचा किंवा ब्राह्मणांना यज्ञोपवीतें ( जानवीं ) देण्याचा मोठा विधी असे. ह्या पुनिवेला पोवती, राखी, दोरे इत्यादि देण्याचीं किंवा घालण्याचीं जी व्रतें बायकांत पसरलीं, त्यांचें कारण सापाचें विष चढूं नये, स्वकीय परकीय असा भेदभाव राहूं नये, सुंदर अर्भकाना किंवा तरुण स्त्रीपुरुषाना दृष्टिदोष घडूं नये, आपला भाऊ आणि नवरा दीर्घायु व्हावे इत्यादि भोळ्या भावाचे तांत्रिक तोडगेच होत. ते महायान बौद्ध धर्मांतून किंवा प्राचीन शैव तंत्रमार्गांतून आले आहेत. पोटाळलेल्या साधु, गोसावी, भट वगैरेंकडून ह्याच चातुर्मास्यांत विशेषतः बायकामुलांमध्यें अशा तोडग्यांना ऊत आणला जातो पण खऱ्या भागवत किंवा ब्राह्म धर्माला हे तोडगे विरोधक आहेत, हें तुकारामांनीं खालील अभंगांत सांगितलें आहे.

> आली सिंहस्थ पर्वणी। न्हाव्यां भटां झाली धणी॥ १॥
> अंतरीं पापाच्या कोडी। वरी वरी बोडी डोई दाढी॥ २॥

बोडिलें तें निवालें । काय पालटलें सांग वहिलें ॥ ३ ॥
पाप गेल्याची काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥
भक्ति भावें विण । तुका म्हणे अवघा शीण ॥ ५ ॥

व्रतें आणि सोडगे केवळ मतलबासाठीं करण्याचा तुकारामांना वीट होता. इतकेंच नव्हे तर क्षुद्र देवताचीहि मात्रा तुकोबाजवळ चालत नव्हती. त्यांना क्षुद्र म्हणणारे महापंडित व पत्रींवर देखील खालील देवांच्या नांवांवर राष्ट्रीय उत्सव आजकाल चालवीत आहेत. त्या सर्व देवांचा तुकारामानीं किती रोकडा निषेध केला आहे, तसा कोणी तरी लोकसंग्रहकर्ते आज करीत आहेत काय ?

नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ॥ १ ॥
बळिया माझा पंढरीराव । जो या देवांचाहि देव ॥ २ ॥
रंडी चंडी शक्ति । मद्य मांसातें भक्षिती ॥ ३ ॥
बहिरव खंडेराव । रोटी सुटी साटीं देव ॥ ४ ॥
गणोबा विक्राळ । लाडू मोदकांचा काळ ॥ ५ ॥
मुंजा म्हैसासुरें । हे तो कोण लेखी पोरें ॥ ६ ॥
वेताळें फेताळें । जळो त्यांचें तोंड काळें ॥ ७ ॥
तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पति ॥ ८ ॥

ह्या चतुर्मास्यांत न्हाव्यां-भटांची जी धणी होत आहे, ती बायकांकडूनच नसून मतलबी आणि राष्ट्राच्या नांवानें पोत पाजळणाऱ्या पत्रीवरांकडूनहि ती होत असते. विशेषतः भाद्रपद मासांत स्वतःच्या बायाबहिणींचाहि उद्धार देशभक्तांच्या अव्वल आखाड्यांत आता लवकरच सुरू होईल. तुकारामाच्या धर्माला मेंताळ्याचा धर्म म्हणून हाणणारे महाराष्ट्र सारस्वतभक्त व संशोधक अलीकडे पुस्तकें लिहून पोट भरीत आहेत पण अशांचा मतलबसिंधु तुकाराम ओळखून काय म्हणतात तें पाहा :—

ओनाम्याच्या काळें । खडे मांडविले बाळें ॥ १ ॥
तेचि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥ २ ॥
रज्जु सर्प होता । तोंवरीच न कळतां ॥ ३ ॥
तुका म्हणे साचें । मग नाहीं बागुलाचें ॥ ४ ॥

राष्ट्रधर्माची कड घेऊन अलीकडील रा. भावे ह्यांच्यासारख्या संशोधकानींहि तुकारामांना नांवें ठेविलीं आहेत. वटसावित्रीला यमाचा बागुलबोवा दिसून ती भ्याली. तसे हे आजकालचे ओनामा पंडित मुसलमानांना भिऊन गणोबाच्या भजनीं लागले आहेत. तुकारामांवर टीका करून आपण विद्वान म्हणवीत आहेत. पण तुकाराम त्यांच्या धर्माला बागुलबोवाचा धर्म म्हणत आहेत! असल्या धर्माला खडे ठेवून मुलांना हिशेब शिकविण्याप्रमाणेंच खऱ्या भक्तांनीं कमअसल ठरविलें आहे. जोंवर कळत नाहीं,

तोंवरच दोरी सापाप्रमाणेंच भिवविते, असें तुकोबा म्हणतात. त्यावरून परिणत अवस्थेंत पंढरपूरची मूर्तभक्तिदेखील त्यांना अपुरी वाटली असावी, येरवीं पुढील अभंग त्यांनीं केला नसता.

मनोमय पूजा । हेचि पढीये केशी राजा ॥ १ ॥
घेतो कल्पनेचा भोग । न मानेचि बाह्यरंग ॥ २ ॥
अंतरींचें जाणें । आदि वर्तमान खुणें ॥ ३ ॥
तुका म्हणे कुडें । कोठें सरे त्याच्यापुढें ॥ ४ ॥

मनोमय पूजा केशीराजाला पढीय म्हणजे प्रिय आहे, म्हणून तुकाराम बाहेरच्या रंगाला मानीत नाहींत. ते भक्तीच्या खुणेनें आदिवर्तमान ओळखतात. पण आम्ही इतिहाससंशोधक मात्र कोंबड्यासारखे उकिरडाच उकरीत आहोत ! नम्रता व भक्तिभाव ह्याशिवाय इतिहाससंशोधक काय, कीं सत्यशोधक काय, कोणीच होऊं शकत नाहीं !

चातुर्मास्याचें आणखी एक गुळचट लक्षण आहे, तें हें कीं, ह्या महिन्यांत जितके उपास असतात, तितक्याच मेजवान्याहि असतात. त्यामुळें गोडघाशेपणा वाढला आहे. एकादशीची गुडधणी आणि द्वादशीची पुरणपोळी ह्या दोहोंवर हक्क सांगणारे हरीचे लाल ह्या चातुर्मास्याचे शेवटीं लठ्ठ होतात; बिचाऱ्या बायकांच्या हाताला मात्र तेलाच्या लाटलाटून घट्टे पडतात ! जोशी बिल पास झालें त्यामुळें फार तर ग्रामजोशी नष्ट होतील. घरोघरीं गोंजावलेलीं पोटें पुढच होणार त्यांची काय वाट ? लहानपणीं मी एकदां माझ्या आईचे माहेरचे खेड्यांत गेलों होतों. तेथील कुलकर्ण्याचे घरीं श्रावण मासांत रोज पुरणाचें जेवण बिनचूक होत असे. सोमवार शिवाचा, मंगळवार गौरीचा, शुक्रवार लक्ष्मीचा, बुधवार विठोबाचा, गुरुवार दत्ताचा, शनिवारीं शनीसंतर्पण आणि रविवारीं त्याचा बाप जो सूर्य त्याच्या नांवानें आराधना ! श्रावणांतील एकादशीच्या दिवशीं देखील बायकांना पुरण घालवेंच लागे. खेड्यांत एकच जरी ब्राह्मणाचें घर असलें, तरी बाहेर गावाहून ब्राह्मण सवाष्णी आणावी लागत असे, आणि दुष्काळांतहि हा कुळाचार चालविणें भाग पडे ! असा हा चातुर्मास्यातल्या क्षुद्र दैवतांचा महिमा आहे ! तो वर्णन करण्यास ब्राह्मण हरिदासादिवाय कोण समर्थ आहे ! पण तुकारामानीं मात्र त्यांचें खरें मर्म बरोबर अचूक ओळखलें आहे.

चातुर्मास्याचा हा दुसरा महिना केवळ सुखवस्तूंची सावलींतल्या लोकांतच दिसतो. खेड्यांतील श्रमजीवी बहुजनसमाजाला गूळ मिळतच नाहीं, मिळाला तरी त्याची चट नाहीं. त्यांना तो समाज तारावर तग राहून, शहरांतील सुखवस्तूंची लोकांचे सण आणि व्रतें साजरीं करण्याकरितां तूप, तांदूळ, गहूं, गूळ हे पदार्थ विपुल पुरविण्याच्या कामीं चार महिने सारखा रानांत खपत असतो. ऐतखाऊ लोक दिवसा हा सासटधर्म आचरून, रात्रीं गावांत राहून कथाकीर्तनें, गोंधळ, जागरणें, पोथीपारायणें, ध्यान

आपल्या मोठ्या हुद्द्यांवर असतात. पण तुकाराम आपल्या कीर्तनांत कोणत्या स्वार्थी प्रौढी मिरवितात तें पाहा !

> सोडवीन ब्याळ महाराज्या हातीं ॥
> मुक्ता आत्मस्थिति सांडवीन ॥ १ ॥
> ब्रह्मभूत काया होत असे कीर्तनीं ॥
> भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥
> तीर्थ भ्रामकासी आणीन आळस ॥
> कडू स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
> सांडवीन तपोनिधा अभिमान ॥
> यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
> भक्ति भाग्य प्रेमा साधीन पुरुषार्थ ॥
> ब्रह्मीचा जो अर्थ निज ठेवा ॥ ५ ॥
> धन्य म्हणवीन येह लोकीं लोकां ॥
> भाग्य आम्हीं तुका देखियला ॥ ६ ॥

पण ही सर्व प्रौढी रा. भावे यांच्यासारख्या सारस्वतभक्ताला काय होय ! त्यांनीं आपल्या 'महाराष्ट्र सारस्वताच्या' नव्या आवृत्तीच्या ३५८।३५९ पानावर तुकाराम आणि रामदास यांच्या ध्येयांची तुलना करून १२ कलमांत तुकारामांची निंदा व रामदासाची स्तुति केली आहे, ती त्यांच्याच शब्दांत अशी आहे.

१ तुकाराम संसारांत गुरफटला : रामदास विरक्त !
२ तु. संकटें डोळ्यांनें सांगतो : रा. ब्रह्म वार्डीत नाहीं !
३ तुकारामाला मेवटीं काळजी बायकोची : रामदासाला शिवाजीची !
४ तु. अडाणी : रा. आचार्य !
५ तु. राजकारण नाहीं : रा. मुत्सद्दी !
६ तु. लंगोटीची आवड : रा. गादवाचा तिरस्कार !
७ तु. पंढरीपलीकडे गेला नाहीं : रा. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत ११०० मठ स्थापिले !
८ तु. दैववादी खुळसट : रा. प्रयत्नशाली वीर !
९ तु. परंपरेंत रुतलेला : रा. नव्या वाटा पाडिल्या !
१० तु. शिष्यावर दात नसे रा. स्वरमरांत साधन करी !
११ तु. जगाला उपदेश : रा. महाराष्ट्रापुढें जग अल्प !
१२ तु. रानातला टाळकुट्या : रा. चें ध्येय " महाराष्ट्रानें आनंदवनांत सिंहासनावर बसून चौंडाळ बडवावें "

असल्या सत्यशोधापुढें भागवतधर्मानें काय रडावें! वरील अभंगांतील कुठें तुकोबारायाची प्रौढी, कुठें असलें हें इतिहाससंशोधन! जुन्या खेडवळ ब्राह्मणांची चातुर्मास्यांत चंगळ, तर नवीन नागर ब्राह्मणांची शहरांतून नित्य दिवाळी! तुकाराम प्रत्यक्ष ब्राह्मज्ञान्यालाहि लाळ घोटावयाला लावीत आहेत, तर हे भटजी आजकालच्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचा कोळसा उगाळून त्याचा टिळा प्रत्यक्ष तुकारामांच्याच कपाळाला लावूं पाहात आहेत! म्हणूनच आपल्या अनुयायांस अगदीं शेवटला उपदेश खालील अभंगाचे द्वारा करून तुकाराम हा हतभागी देश सोडून गेले!

ऐका ऐका भाविक जन। कोण कोण व्हाल ते॥
तार्किकांचा टाका संग। पांडुरंग स्मरा हो॥
नका शोधूं मतांतरें। तुम्हीं खरें बुडाल॥
कलीमध्यें दास तुका। जातो लोकां सांगत॥ १॥

# १६

## कौलिकता हाच आत्मीय शिक्षणाचा पाया

वर्धा शिक्षण परिषदेंत त्याचा विचार व योजना झाली ते केवळ पोटार्थी शिक्षण होय. तें महत्त्वाचें नाहीं असे नाहीं, पण पोट म्हणजेच मनुष्य नव्हे. पोट भरलें कीं सर्व संपलें असें नसून, उलट पोट भरल्यावर मानवी जीवित सुरू होतें त्याचा आज विचार करणें कर्तव्य आहे. श्री खिस्तांनीं वर्णिलेल्या दहा धन्यावस्था ( Beautitudes ) उद्बोधनाचे वेळीं वाचण्यांत आल्या त्यांचें संपादन म्हणजे आत्मीय शिक्षण होय. ते प्राचीनकाळीं गुरुकुलांतून देण्यांत येत होतें असे सांगतात. त्या कुलांची कौलिकता कोणत्या दर्जाची होती हे पाहूं. हीं कुलें निबिड अरण्यात असत. आजच्यासारखीं गर्दीचीं शहरें प्राचीनकाळीं मुळीं नव्हतीच. जीं त्या वेळीं होतीं, त्यांच्या उपाधीपासूनहि हीं ऋषिकुलें दूर असत. ह्या कुलांत ऋषीबरोबर त्याची पत्नी किंबहुना पत्न्याहि असत. त्याची सेवा शिष्यांना अगदीं घरच्याप्रमाणें करावी लागे. ह्या घरोब्याचा मोठा इष्ट परिणाम निरनिराळ्या ठिकाणांहून आलेल्या शागिर्दांवर कळत न कळतांहि घडत असे. शिक्षण देणें हें खरोखरी आईबापांचेंच काम. अगदीं प्राचीन काळीं आईबापच हें करीत असले पाहिजेत. पुढें जसजशी समाजाची घटना विकीर्ण होत चालली, तसतसा श्रमविभाग अवश्य होऊन, आईबापांची जागा शिक्षणापुरती गुरु व त्याच्या पत्नीकडे गेली. तरी शाळांचें घरगुती स्वरूप कायमच राहिलें. मात्र एक व्यंग राहिलें, तें हें कीं शिष्यवर्गांत मुलींना स्थान मिळेनासें झालें. त्या आईबापाकडेच राहून, चूल, मूल, दूध-दुभतें, झाडणलोटणें वगैरे हस्त व्यवसायांत वाकब होत असल्या तरी विचार-व्यवसायाला त्या मुकल्या. इतक्या कीं, पुरुषांप्रमाणें विज्ञानांत व अध्यात्मांत स्त्रियांना गतीच नाहीं; व ब्राह्मणादि

वरिष्ठ वर्गाच्या स्त्रियांहि जातीनें अथवा वर्णानें शूद्रच असा समज व्हावयाचा. स्त्रियो वैश्या तथा शूद्राः स्तेपि यांति परां गतिम्। हा गीतेचा उदारभावहि गीतेपूर्वीचा अनुदार भावच प्रकट करितो. गीतेचा हा उदारभावदेखील ट्रंमन राणीच्या जाहीरनाम्याप्रमाणें पोकळ आशीर्वादच ठरला. कारण मनुस्मृतीकारांनीं अधिकृत हातांनीं तोंडहि फाडून घेतल्या; आणि होतां होतां ही पूर्वींची गुरुकुलेंहि बंद झालीं. शेवटीं वैचारिक शिक्षण म्हणजे केवळ ब्राह्मणांचाच मिरासी हक्क झाला. क्षत्रियांना त्यांत दर्पिपणा आणि वैश्यांना अव्यवस्थेमुळे व्यर्थपणा वाटूं लागला! एकूण अध्यात्म म्हणजे केवळ पोट भरण्याचा धंदा झाला. आणि त्या शिक्षणाचें दिवाळें वाजलें!

पाश्चात्य देशांत मध्ययुगांत ऑक्सफर्ड, केंब्रिज, सालामांका वगैरे गुरुकुलें निघालीं. पण तीं सन्याशांनीं काढलीं होतीं. त्यांत स्त्रियांना शिष्य म्हणूनच नव्हे तर गुरुपत्नी म्हणूनहि शिरकाव नव्हता. गाईला आत्मा नाहीं. स्त्री म्हणजे एक मानवी गाय हाच समज तिकडेहि होता. ह्या शतकाचे आरंभीं हें प्रवचन करणारा ऑक्सफर्ड येथें शिकत होता. तेव्हां स्त्रियांचीं कॉलेजेस् ऊर्फ हॉल्स होते. पण त्यांना पदव्या मिळणें अशक्य होतें. त्यांना पास झालेल्यांना पदव्या मिळाव्यात असा विचार थोड्या दिवसांपूर्वीं पुढें आला होता तेव्हां पुरुष विद्यार्थ्यांनीं इतका गिल्ला केला कीं कॉलेजच्या खिडक्यांना एकहि तावदान राहिलें नाहीं, असें कळलें. पास झालेल्या विद्यार्थिनींच्या मन आघात जणूं ह्या वक्त्यानें पाहिल्या! ऑक्सफर्डमध्यें अंशतः तरी तेव्हां शिक्षणांत कौलिकता दिसली. पदव्यांत असहकार असला तरी प्रत्यक्ष शिक्षणात कांहीं अंशीं सहशिक्षण होत होतें. अध्यापक गृहस्थाश्रमी होते. इतकेंच नव्हे तर त्यांच्या पत्नींच्या व सर्व कुटुंबाच्या सहवासाचा इष्ट परिणाम तरुण विद्यार्थ्यांवर घडत असलेला स्पष्ट दिसला. फार काय, वर्षांतून दोनदां सुटी सुरू होण्यापूर्वीं, वार्षिक पदवीदान समारंभाचे वेळीं आणि Eight's week म्हणजे आठदिवस नदीवरील बोटींच्या शर्यतीचे वेळीं ऑक्सफर्ड शहरीं विद्यार्थ्यांच्या स्त्री नातलगांचा मोठा सामाजिक मेळा भरविण्यांत येत असतो. त्या वेळीं तरुणतरुणींचा गोड मिलाफ फार फलदायक होतो, ह्यांत संशय नाहीं. ह्या बाबतींत युनिटेरिअन् मँचेस्टर कॉलेजांतील सामाजिक जीवित केवळ आदर्शभूत आहे. कॉलेजचे विद्यार्थी फार तर १५–२० च असतात. त्यांना अध्यापक ५–७! त्यांच्या बायका, बहिणी, मुली ह्या सर्वांशीं तेथील प्रौढ विद्यार्थ्यांचा हमेशा संबंध येतो. अध्यापकांचे घरीं पाळीपाळीनें सर्व विद्यार्थ्यांना चहाचें अगत्याचें आमंत्रण असतें. दर रविवारीं कॉलेजचे देवळांत जाहीर उपासना असते. शिवाय प्रत्येक टर्ममध्यें एक सामाजिक संमेलन असतेंच. ह्यामुळें शाळा म्हणजे मुदतीचा कैदखाना नसून मुशारून वाढविलेलें कुटुंब हा अनुभव विद्यार्थ्यांना वरचेवर येतो. ह्यामुळेंच येथील विद्यार्थी भावी पालकपणाच्या जबाबदार वृत्तीला पात्र होतात. तें असो.

आमचेकडे काय चाललें आहे ? आमची कॉलेजें म्हणजे विद्यार्थ्यांचीं खिल्लारें. वसतीगृहें म्हणजे घोड्यांच्या पागा. प्रोफेसरांच्या बायका असतात. पण, त्यांच्या गोठ्यांत गाईहि असतात. विद्यार्थ्यांपासून दोन्ही सारख्याच दूर. विद्यार्थिनी वसतीगृहें एका कोपऱ्यांत तुरुंग बंगल्यासारखीं त्याच आवारांत असतात. पण त्यांच्या रस्त्यावर टकटून विद्यार्थ्यांना येण्याजाण्याला सक्त मनाई आहे अशा ठळक पाट्या लटकत असतात. जणूं इतरांना मोकळीच ! मग विचाऱ्यांना घरोबा कोठून मिळणार ? दुधाची तहान ताकावर भागविण्याकरितां हे कमनशिबी प्राणी – मुलें मुली – रेस्टॉरंट व सिनेमांत घुसतात. मग नवमतवाद बोकाळतो ! त्याचें कारण "उच्च" शिक्षणाचा पाया शुद्ध नाहीं हेंच. आई जेऊं घालीत नाहीं, बाप भीक मागूं देत नाहीं, अशी अनवस्था होते. फुकट्या उपदेशानें पोट कसें भरणार ? ह्याला उपाय काय ? उपाय उघड व सोपा आहे. पुरुषविद्यार्थ्यांबरोबरच स्त्रीविद्यार्थ्यांचें शिक्षण झालें पाहिजे. तें हल्लीं कसेंबसें अंशतः चाललें आहे. मनापासून व पूर्णपणें, प्रवाहानें नव्हे; जाणून-बुजून जबाबदारपूर्वक चाललें पाहिजे. सहशिक्षण ही शिक्षणशास्त्राची आवश्यक शर्तच आहे. येथें टाळाटाळी काय उपयोगाची ? आईबापांच्या घरीं ज्या साहचर्यानें मुलां-मुलींना मायेपणा येतो, तोच अति कुशलतेनें, दक्षतेनें, विशेषतः सहानुभूतीनें अध्यापकांनीं आपल्या संस्थांतून आणिला पाहिजे. पण मायेपणा मातृपितृपणाशिवाय कसा येणार ? मायेशिवाय रड नाहीं. आळाशिवाय कढ नाहीं. पुरुषांचें शिक्षण पुरुष चालवितात. तसेंच स्त्रियांचें शिक्षण चालविण्याकरितां कांहीं स्त्रिया एम्. ए., बी. टी. टी. डी. चे झगे घालून दिमाखानें पुढें येत आहेत. फार ठीक. पण हा अर्धवटपणा पूर्वीं एकपक्षी होता तो आतां दोहोंपक्षीं झाला. दोन निम्मे एक गणितांत होतो तसा शिक्षणांत कसा होईल ! आंकडे निर्जीव व मानीव आहेत, तसे मानवी आहेत. नव्हत तेथें दोन अंक म्हणजे एक पूर्ण अंक ऊर्फ घटक तयार होतो. म्हणून सहाध्ययनाबरोबर सहाध्यापन आवश्यक आहे.

शिक्षकाची पत्नी म्हणजे शिकलेली बी. टी. पाहिजे असें नव्हे. ती नसलेलीच बरी. ती सहानुभूतीची स्त्री असली कीं पुरे. वकिलीच्या धंद्याला वकिलीण, डॉक्टरीच्या धंद्याला डॉक्टरीण पाहिजे असें नाहीं. पण शिक्षकाला त्याच्या पत्नीच्या साहचर्याची आवश्यकता आहे. शिक्षण कौलिकच पाहिजे. एरवीं शिक्षणाला हल्लींप्रमाणें गिरणीचें स्वरूप येतें. आम्ही खातों ते तांदूळहि हातानें सडावेत, नाहींतर त्यांतील कस व गोडी जाते, असें गांधी म्हणतात पण विद्यार्थ्यांची गोडी व कस पार पिळून निघत आहे. ती वाचविणारा गांधी कधीं येणार ? विश्वविद्यालयांतून मातृभाषेचें माध्यम पाहिजे असें इतर ओरडतात. पाहिजे हें खरेंच. पण जेथें माताच नाहीं, तेथें नुसता भाषेचा कोण अट्टाहास ! मातेनें भाषा येईल, कीं भाषेनें माता येईल ? शाळा म्हणजे कुटुंब

होईल, त्या दिवशींच राष्ट्र म्हणजे बृहत् कुटुंब, तेव्हांच स्वराज्याची पोकळ वडबड थांबेल !

हे शिक्षणावरील विशेष आणि मूलभूत विचार आज प्रकट करण्याचें कारण कीं येथें पुणें शहरांतील तीन निरनिराळ्या वसतीगृहांतील पुरुष विद्यार्थी, आणि प्रार्थना-समाजाच्या मताचीं चार निरनिराळीं कौटुंबिक उपासनामंडळें सर्व दिवसभर धर्म-साधनासाठीं जमली आहेत. पुरुषविद्यार्थ्यांप्रमाणें तितकींच स्त्रीविद्यार्थ्यांच्या वसतीगृहाची सोय अद्यापि कोणी करीत नाहीं हे मोठें दुर्दैव. आणि जरी तशी सोय झाली तरी त्यांचा सहयोग होण्याचे दिवस अजून आले नाहींत. अशीं सहवसतीगृहें झालीं तरी, त्यांच्यावर दिवसरात्र देखरेख करणारे गुरु व गुरुपत्नीचें दांपत्य आपल्या प्रेम-पंखाखालीं आत्मीय शिक्षणाचें काम करूं लागल्याशिवाय धर्मशिक्षणाच्या वल्गना ज्या अलीकडे चालल्या आहेत त्या अगदीं व्यर्थ आहेत. असे कधीं होईल तेव्हां होवो; तूर्त हीं गृहें व हीं उपासनामंडळें ह्यांचा परस्पर परिचय व्हावा, स्नेह वाढावा, आणि सर्वांचें एक जिवंत जागृत आत्मियकुल बनावें, ह्या पवित्र हेतूनें आजचें हें संमेलन भरविण्यांत आलें आहे. लहानथोर स्त्रीपुरुष आज जवळ जवळ २०० चा जमाव ह्या (फर्ग्युसन कॉलेजजवळील) टेकडीवर उघड्या हवेंत जमला, ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. विश्वधर्माचा हा विजय आहे. तिसरे प्रहरीं संगत–सभा होईल त्यांत कांहीं तरी निश्चय करून पुढील वर्षी सहकार्य सुरू व्हावें, म्हणजे बरें.

# १७

## पूर्व बंगाल्यांतील अस्पृश्य वर्गाच्या उच्च शिक्षणाची प्रगति

भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळाची स्थापना झाल्यावर मला आपल्या ब्राह्म समाजाच्या सफरीवर बंगाल्यांत सन १९०८ चे सुमारास एकदां जावें लागलें. अर्थात मला तेथें ठिकठिकाणीं "अस्पृश्यांच्या" आपत्तीबद्दल व्याख्यानें द्यावीं लागलीं. तेथील ब्राह्म समाजांतील कांहीं सभासदांनीं लोच इकडील आपल्या मिशनच्या धर्तीवर तिकडे शाळा काढल्या. प्रथम प्रथम ह्या कामाचा आमच्या मिशनचा संबंध होता. पण तिकडील कार्याचा अंतर्भाव स्वतरच ब्राह्म समाजाच्या इतर सामाजिक कामांत करावा लागला; त्यामुळे आमच्या ह्या अखिल भारतीय मंडळाशीं या कामाचा दसरा संबंध आम्हांला तोडावा लागला. तरी पण मी जेव्हां जेव्हा बंगाल्यांत जाई तेव्हा तेव्हां तें काम मुद्दाम पाहून येई. इ. स. १९२३ साली मी बंगाल्यात गेल्यावेळीं जेसोर आणि खुलना जिल्ह्यांतील आमच्या कांहीं हायस्कुलांत राहून तीं नीट तपासून आलों होतों. गेल्या वर्षी ऑगस्ट महिन्यांत साधारण ब्राह्म समाजानें 'ब्राह्म समाज हिंदुस्थानांत स्थापन होऊन १०० वर्षें पूर्ण झालीं' म्हणून बंगाल्यांत विशेषतः कलकत्त्यांत एक अपूर्व महोत्सव केला. त्या निमित्तानें पूर्व आणि उत्तर बंगाल्यांत एक मोठें प्रचारक दळ काढण्यांत आलें होतें. तें काम मजकडे आलें म्हणून मी विशेषतः ज्या जिल्ह्यांतून "नामशूद्र" नांवाच्या अस्पृश्य वर्गाच्या शाळा व इतर प्रागतिक कामें चालली होतीं तेथं हें दळ नेलें. त्या वेळीं आज सुमारें २० वर्षें चाललेल्या ह्या शिक्षणविषयक कामाची प्रगति झाली आहे, हें मला प्रत्यक्ष पाहावयास मिळालें.

मुंबईकडील आणि बंगालकडील कामांत हा एक विशेष फरक आहे कीं, मुंबईकडे आमच्या सर्व कामें ह्या मिशनकडूनच प्रत्यक्ष होतात. पुणें शाखेंतच मात्र कमिटींत व प्रत्यक्ष काम करणारांत " अस्पृश्य " वर्गाच्या सभासदांची बहुसंख्या आहे. अलीकडे तर त्यांचीच सत्ता चालू आहे. तरी अद्यापि इकडील मिशनमध्यें प्रत्यक्ष "अस्पृश्य" वर्गाच्या होतकरू पुढाऱ्यांनीं म्हणण्यासारखें लक्ष पोचविलेलें किंवा अंग मोडून काम करीत असल्याचें दिसत नाहीं. बंगाल्यांत उलट प्रकार आढळतो. पूर्वीपासूनच तिकडील सर्व शाळा आणि इतर कामें "अस्पृश्य" वर्गानींच काढल्या व चालविलेल्या आणि ब्राह्मसमाजानें त्यांना तसें करण्यास प्रेरणा व साह्य केलें. ह्या फरकाचें कारण हेंच कीं, तिकडील नामशूद्रांची स्थिति इकडील मांगांहून पुष्कळच उच्च दर्जाची पूर्वीपासूनच होती. डोम, पोड, हाडी वगैरे इतर त्यांचबरोबरीच अवनत वर्गाची स्थिति नामशूद्रांपेक्षांच नव्हे तर आमच्या महारमांगांहून अद्यापि किती तरी अधिक खालावलेली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत तिल्लव, तिय्या, एजवा नांवांच्या अस्पृश्यांची स्थिति ज्याप्रमाणें इतर 'अस्पृश्यांहून' पुष्कळ सुधारलेली आहे, त्याचप्रमाणें बंगालच्या नामशूद्रांचा प्रकार आहे. इकडील तिल्लव, तिय्या वगैरे परय्या, चिरुमा वगैरेंना जसें अद्यापि शिवून घेत नाहींत च इतर वरिष्ठ वर्गांप्रमाणेंच ह्या गरिबांना निर्दयपणानेंच वागवितात, त्याचप्रमाणें नामशूद्रहि हा भेद पाळतात. फार काय आम्हीं मुंबई इलाख्यांत जेव्हां प्रथम कामाला सुरुवात केली, तेव्हां चांभार, ढोर, वगैरेंनीं स्वतः वरिष्ठ समजून आमच्या मिशनचा फायदा घेण्यास बरेच आढेवेढे घेतले. बहुतेक महारच शाळांतून व बोर्डिंगांतून येत. आणि तेहि मांग, भंगी ह्यांच्याशीं समानतेनें वागण्यास कां कूं करीत. अजून तरी मिशनकडे सर्व 'अस्पृश्यांचें' पूर्ण लक्ष न लागण्याच्या अनेक कारणांपैकीं, ह्या अस्पृश्य वर्गांतील आपसांतील जातिभेदच एक मुख्य कारण आहे, हें मिशनबाहेर राहून नीट ध्यानांत धरणें शक्य नाहीं. असो.

हा प्रांतिक जातिभेदाचा फरक कसाहि असो, बंगाल्यांत विशेषतः पूर्व बंगाल्यांत आज नामशूद्रांच्या उच्च शिक्षणाची जी झपाट्यानें प्रगति चालली आहे, त्याचीं दुसरीं कारणें म्हणजे बंगाल प्रांताचें शिक्षण खातें व कलकत्ता युनिव्हर्सिटीचें लोकमतवादी धोरण हीं दोन मुख्य होत. शिक्षणाचे दृष्टीनें, मग तें प्राथमिक असो वा उच्च असो, बंगाल आणि मद्रास हे दोन्ही प्रांत मुंबईच्या किती तरी पुढें आहेत. त्यातल्या त्यांत मुंबई युनिव्हर्सिटी ही स्त्री शूद्रांच्या बाबतींत तरी फार ओढग्रस्त आणि मागासलेली आहे. उच्च शिक्षण महाग आणि दुर्मिळ करण्यांत तिचा हातखंडा ! अस्पृश्यांना व स्त्रियांनाच काय पण जंगली जाती, गुन्हेगार जाती, किंबहुना आंधळे, बहिरे, मुके ह्यांनाहि ब्राह्मणादिक कुशाग्र बुद्धीच्या पुरुषाबरोबर एकाच जात्यांत भरडण्याची ह्या युनिव्हर्सिटीला खोड लागली आहे. ती जाईपर्यंत " अस्पृश्याचीं " निराळीं हायस्कुलें इकडे निघणें शक्य नाहीं.

मद्रासमध्यें स्त्रियांकरितां वेगळीं कॉलेजें आहेत. काहीं तर स्त्रियांनींच चालविलीं

आहेत. मद्रासेकडे पडदा नाहीं, तसेंच बंगल्यांत जातिभेद तीव्र नाहीं. पूर्वी बौद्ध धर्म आणि आतां वैष्णव, व अलीकडे ब्राह्म समाजाच्या जोराचा परिणाम तेथें झाला असल्या-मुळें दक्षिणेकडील भयानक अस्पृश्यतेच्या गोष्टी बंगाल्यांतील नामशूद्रांनाहि अरेबियन नाइट्सप्रमाणेंच सहज विश्वासार्ह वाटत नाहींत. अशा अनेक कारणांमुळें, विशेषतः पूर्व बंगाल्यांतील नामशूद्रांनी, आता शिक्षणांतच नव्हे तर इतर बाबतींतहि आपलें पाऊल सारखें पुढें चालविलें आहे. त्यांत नामशूद्र हाच तिकडील कुणबी वर्ग मुसल्मानांच्या पूर्वी आणि मुसल्मान रिआसतींतहि त्यांचीं लष्करांत फार भरती होत असे. आतांहि हिंदु-मुसल्मानांच्या मारामारींत नेमळे आणि चळवळे हे दोन्ही प्रकारचे बंगाली नाम-शूद्रांनाच शरण येतात. मुसल्मान तर ह्यांच्या कधींच वाटेला जात नाहींत. हे नामशूद्र थोड्याच शतकांपूर्वी बौद्ध क्षत्रिय होते. ही सर्व पूर्वपीठिका आठविल्यास खालील कोष्टकांतील आंकडे पाहून आश्चर्य वाटण्याचें कारण उरणार नाहीं.

पूर्व बंगाल्यांतील नामशूद्रांचें उच्च शिक्षण [ हायस्कूल ]

| नंबर | स्थापनेचें वर्ष | ठिकाण | जिल्हा | मुलींची शाळा आहे कीं नाहीं | विद्यार्थ्यांची संख्या | शिक्षकांची संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १९१८ | मशीहाद्या | जेसोर | आहे | १५० | १० | पाहिले. |
| २ | १९२६ | सचीडाहा | खुलना | ,, | १५० | १० | १० मोफत |
| ३ | १९२८ | ,, ,, | ,, | नाहीं | ७० | ७ | पाहिलें. |
| ४ | १९११ | गोपिनाथपूर | फरीदपूर | ,, | १७० | ११ | |
| ५ | १९२८ | बोच्टाली | ,, | ,, | १०० | ९ | |
| ६ | १९२१ | मलिखाली | बरीसाल | ,, | १२५ | १० | |
| ७ | १९२१ | दिगिर जात | ,, | ,, | १०० | १० | |
| ८ | १९२४ | श्रीरामकाटी | ,, | ,, | १०० | ९ | |
| ९ | १९२२ | चदकाटी | ,, | ,, | २०० | ११ | |
| १० | १९२१ | कुरीआना | ,, | आहे | १५० | १० | पाहिले. |
| ११ | १९२४ | आगाइलझा | ,, | नाहीं | २०० | ११ | |
| १२ | १९२५ | श्रीमनकाठी | ,, | आहे | १२५ | ९ | |
| १३ | १९२६ | औराकुनिया | ,, | नाहीं | १०० | ९ | |

ह्या आंकड्यांत मुलींची संख्या दिलेली नाहीं. शिवाय सचिडाहा शाळेंत फ्री बोर्डिंग ४० मुलांचें आहे, तसें सर्वत्र नसलें तरी ह्या सर्व खेड्यांतून जेवण व राहण्याची सोय स्वस्तच असते.

ह्या तेरा हायस्कुलांची माहिती केवळ पूर्व बंगाल्यांतील चार जिल्ह्यांतील आहे. ह्याहून अधिक शाळा व मिडल स्कूल्स किती तरी आहेत. ही सर्व निव्वळ नामशूद्रांनीं आपल्या हिमतीवरच चालविलीं आहेत! पैकीं चार ठिकाणीं तर मी स्वतः जाऊन राहिलों आहे. अर्थात् यांना 'आमच्याकडे 'हाय स्कूलें' म्हणजे उंच शाळा कोणीच म्हणणार नाहीं. पऱ्यांची वावरांतून एक पडळ बांधली आणि सुमारें शंभर मुलें जमविलीं, कीं झाली हायस्कूलची तयारी! ३० पासून ६०–७० पर्यंत पगारावर ८–१० मास्तर स्वजातीयांतून सहज मिळतात. त्यांत तीन चार तरी ग्रॅज्युएट असतातच. एलएल. बी. चा अभ्यास करणारा एखादा पोक्त अनुभवी हेडमास्तर होतो. आसपासचीं ५–१० खेड्यांतून अर्धवट इंग्रजी शिकलेलीं मुलें जमतात. कोणी जागा, कोणी पत्रा, कोणी लांकडें, कोणी टेकलें देऊन कमिटीचे सभासद होतात. सल्लामसलत, पैशाची जुजबी मदत आणि देखरेख करण्यास ब्राह्म समाज तयार आहेच. मॅट्रिकची परीक्षा पास झाली कीं, त्याला प्रवेश द्यावा; ह्यापेक्षां युनिव्हर्सिटी अगर विद्याखातें उगीच त्याच्या मागें कांहीं भगभग लावीत नाहीं. आमचेकडे हायस्कूल म्हटलें कीं, निदान एक लाखाची काळ्या दगडांची उंच इमारत पाहिजेच. अर्थात हेडमास्तरनें क्लासांत तरी बूट, पाटलोण, आणि झिळीमिळ्याची कोर्कीचें प्रदर्शन केलेंच पाहिजे. ह्या बहिरंगाप्रमाणेंच शिक्षणाचा आंतील साज सजवावा लागतो. अलीकडे तर अमुक एवढी लॅबोरेटरी आणि तमुक तेवढी लायब्ररी दाखविल्याशिवाय युनिव्हर्सिटीकडून हायस्कूललाच प्रवेश मिळत नाहीं. मग विद्यार्थ्यांना कोण पुसतो? विद्यार्थ्यांसाठीं विद्यालय नसून विद्यालयासाठींच जेथें विद्यार्थी जमतात, तेथें विद्यालयांची इज्जत आणि विद्यार्थ्यांच्या पालकांची ऐपत ह्यांमध्यें ऐहिक कोणताच संबंध नसल्यास काय नवल!

निव्वळ शिक्षणाच्या खोल दृष्टीनेंच पाहूं गेल्यास बंगाल्यांतील अशा हायस्कुलांतील शिक्षण फार कमी दर्जाचें दिसतें हें मला कबूल केलें पाहिजे. पण एक लाखाच्या उंच इमारतींतले शिक्षण ह्या एक हजार रुपयांच्या झोपडीपेक्षां शंभर पटीनें अधिक असेंहि खास नाहीं. शिक्षणाचा उपकरणांशीं संबंध कमी आणि शिक्षकांच्या दर्जाशीं आणि त्यांच्यांत व शिष्यांत जी सहानुभूति असणार तिच्याशीं अत्यंत जास्त. ही दुसरी मिळकत म्हणजे सहानुभूति मला ह्या शाळांतून विपुल दिसली. आमच्या इकडच्या हायस्कुलच्या राजमहालांत एखादें भोकरवाडींतलें पोरगें गेलें तर पहिल्या दिवशीं तें भेदरून जातें. टिकून राहिलेंच तर सहामाही परीक्षेच्या कोऱ्या कागदांचाहि खर्च त्याला न झेपल्यामुळें त्याला हा नाद सोडावा लागतो व शिष्य-शिक्षक नातें कसें सांगावें नितकें अधिक चरें.

वीस वर्षांतील ही प्रगति पाहून मला सर्व बाजूंनीं समाधानच झालें, असें म्हणवत नाहीं तरी संख्येच्या व इतर दृष्टीनीं बाजूनीं नामशूद्र ग्रॅज्युएट सामान्य बंगाली ग्रॅज्युएटसारखाच दिसतो, हे खरें. असें शेंकडों तरी ग्रॅज्युएट आमच्या इकडे मराठ्यांत

आढळतात. तसेंच तिकडे नामशूद्रांत आढळतात. पण आमच्या इकडे शिवाजी मराठा हायस्कूल हें एकच एक साऱ्या इलाख्यांत मराठ्यांनीं चालविलेलें तर तिकडे चारच जिल्ह्यांत १२ हायस्कुलें मला दिसलीं. आमच्या ह्या हायस्कुलांत सर्व शिक्षक मराठे नाहींत. ते कधीं मिळतील तें सांगवत नाहीं. पण तिकडील शाळेंत बहुतेक सर्व नामशूद्र ! ! एकंदरींत इकडील मराठ्यांपेक्षां उच्च शिक्षणांत तिकडील नामशूद्रांची स्थिति बरी म्हणविते आणि ही सर्व धांव गेल्या वीस वर्षांत त्यांनीं मारली हें विशेष !

# महाराज शिवाजी आणि महात्मा गांधीजी

गेल्या तीन शतकांत आमच्या ह्या हतभागी हिंदुस्थानांत दोन लोकोत्तर पुरुष निर्माण झाले, ह्यावरून जगाच्या इतिहासप्रभावळींत ठेवण्यासारखीं पुरुषरत्नें पैदा करण्याची आमच्या देशाची शक्ति नष्ट झाली नाहीं, हें आम्हीं निरभिमानपणें व केवळ आध्यात्मिक दृष्टीनेंहि म्हणूं शकतो. हीं रत्नें म्हणजे पुण्यश्लोक श्रीशिवाजीमहाराज आणि पूज्यपादारविंद महात्मा गांधीजी हींच होत! ह्या दोघांच्या चरित्रांची तुल्ना, आम्हीं त्यांचे व्यक्तिविषयक गोडवे म्हणून करीत नाहीं तर त्यांच्या मननीय चरित्रांत इतिहासाची पुनरावृत्ति तर झालेली दिसत आहेच पण मानवी समाजाच्या इतिहासांत विशेषतः राजकारणांत अलीकडे आशाजनक युगांतर होऊं घातलें आहे, आणि त्यांत आमचा जुनापुराणा देश पुढाकार घेत आहे अशा श्रद्धाळु समजुतीनेंच आम्ही ही तुल्ना करण्याचें धाडस करीत आहों. ह्यांत कांहीं दोष घडत असेल तर त्याबद्दल आम्ही पूर्ण जबाबदार आहों. नुकतेच प्रिन्सिपॉल गो. चि. भाटे ह्यांनीं श्रीशिवाजी आणि नेपोलियन यांच्यामध्यें 'नवयुग' मासिकांत ओझरती तुल्ना केली आहे; पण तिच्यांत आम्हाला विशेष आध्यात्मिक दृष्टि दिसली नाहीं. असें म्हणण्यांत रा. भाटे यांच्या उलट समजा तरी आक्षेप घेण्याचा आमचा उद्देश मुळींच नाहीं. मात्र दोन दुभागी चरित्रांसंबंधीं आपला अभिप्राय व्यक्त करतांना त्यांनून श्रीशिवाजीचें चरित्र बाजवीपेक्षां जास्त उठावदार वठविण्यांत आलें आहे, असा जो ध्वनि रा. भाटे यांनीं काढला आहे तो सर्वसम्मत होईलच हें कांहीं सांगवत नाहीं. प्रो. जदुनाथ सरकार सोमाडी ऐतिहासिक उपकरणांना बळी पडले ही जशी शंका रा. भाटे यांना आली तशीच स्वतः भाटेसाहेबहि आपल्याच जड तर्कजाळ्या बळी पडले नसतील

पद्धतीवरून ! अशी थंडी कोणास आल्यास ते रागावणार नाहींत अशी उमेद आहे. आम्ही स्वतः श्रीशिवाजींचे किंवा गांधीजींचे पूजक मुळींच नाहीं. अवतारवादापासून रा. माटे ह्यांच्यापेक्षांहि चार पावलें जास्त दूर आम्ही आहों. तथापि आज जी आम्हीं अलमर्जीनें तुलना करीत आहों ती केवळ टीकात्मक नसून त्यांना आम्ही थोर समजतों त्यांच्याच करितां तर त्यांच्या मानवी थोरपणासंबंधीं श्रद्धेनेंच आम्हीं करीत आहों हेंहि आम्हांस कबूल करणें भाग आहे. नेपोलियन जगज्जेता होता म्हणून श्रीशिवाजी हा त्याच्यासारखा जगज्जेता होता असें म्हणण्यांत आम्ही महाराजाला, नीट ओळखलें असें आम्हांला तरी कधींच वाटणार नाहीं. ज्या मनुष्यानें स्वतःला जिंकलें नाहीं, त्यानें आणखी दहा जग जिंकलीं तरी त्याचें आम्हांला काय ? -असल्या बहिर्मुख जगज्जेत्यांनीं मानवी इतिहासाला आजपर्यंत जे काळें फासलें तेवढेंच पुरें आहे. त्याची वडेजावी करणें ही अत्यंत घातुक मूर्तिपूजा ! प्रश्न हा आहे कीं श्रीशिवाजींनें स्वतः आपल्यास जिंकिलें होतें कीं नाहीं ? आम्हांस वाटतें त्यांच्यांत आत्मजय होता. म्हणूनच त्यांना इतर जय मिळाले इतकेंच नव्हे तर रा. माटे ह्यांनींच सिद्ध केल्या-प्रमाणें आज परकीय किंबहुना स्वकीय इतिहासकारावरहि महाराज दिग्विजय मिळवूं लागले आहेत, म्हणूनच तर आम्हीं त्यांना पुण्यश्लोक म्हटलें आहे ! महात्मा गांधी सत्याग्रही व संयमी आहेत पण त्यांना आपल्या कामगिरींत अद्यापि यश यावयाचें आहे. श्रीशिवाजींच्या तें यश येऊन आज अडीचशें वर्षे झालीं. ( त्यांच्या मागील दिवसांना तें घालवून आज शंभर वर्षे झालीं, ह्याबद्दल रा. माटेहि हळहळत आहेत हा भाग वेगळा. )

महात्मा गांधी परकीयांचे किंबहुना कोणाचेहि द्वेष्टे नाहींत. पण महाराजहि नव्हते. त्यांना त्या वेळची राज्यपद्धति उलथून पाडावयाची होती, ती कोणाची भीड न ठेवता, प्रत्यक्ष आपल्या गुरूची किंवा बापाची तमा न ठेवता त्यांनीं पाडिली. तेव्हा कोटें भारंभार दक्षिणा घेऊन देवब्राह्मणांनीं त्यांना पुष्कळ आशीर्वाद दिले ! ( कांहींतर अद्यापि द्यावयाला तयार नाहींत हाहि भाग वेगळाच ! ) पुष्कळ वेळां मुसलमानी दुश्मन त्यांचे हातीं लागले असतां त्यांना जिवानिशीं सोडलें, व आपल्या कार्याला लावलें. उलटपक्षीं आपले जातिबंधु म्हणविणाऱ्या हरामखोर धेडांना तार्किकाची तमा न धरता चिरून काढलें, इतकेंच नव्हे तर स्वीकृत सत्कृत्याला जेव्हां आपल्या स्वत त्या पोटचा गोळा युवराज संभाजी आड जाऊं लागला, तेव्हां त्यालाहि दूर कारागृहात ठेवलें. तो त्यांच्या मरणापर्यंत तेथेंच खितपत होता. पण नेपोलियननें इजिप्तमध्यें काय केलें? तर पांच हजार मुसलमान बंदी शरण आले तेव्हां त्यांना पोसावें कोणीं म्हणून त्यांची अक्षरशः कत्तल केली ! पूर्व ती पूर्वच व पश्चिम ती पश्चिमच ! ! तुलना करितांना घाई होऊं नये. उपमेय समानधर्मी असणें आवश्यक असतें. नाहीं तर लाडगा आणि शास्त्रवैद्य ह्यांमध्यें तुलना होऊन जावयाची एखादे वेळीं ! कोणी बाळ विद्यार्थी शंका सहज घेतील

कीं गांधीजी अनत्याचारी आणि शिवाजींची तरवार तर सदाहि रक्तानें मथथलेली. येथें साधर्म्य थोडें राहिलें! पण महाराज हे दंडधारी क्षत्रिय होते. केवळ अत्याचारी चळवळे नव्हते. गनीम मुसल्या शब्दांनीं पराभूत होत असता, तर दंड हा शब्द व्यवहारांतहि निर्माण झाला नसता. अत्याचार हा नैतिक असतो, शारीरिक नसतो, हें तत्त्व आतां महानुभविहीन परकीय इतिहासकारांनींहि महाराजांच्या बाबतींत लागू केलें आहे. स्वकीय धूर्तांनीं महाराजांची तरवार ब्राह्मणांना लागली असेल अशी शंका काढून त्यांना प्रायश्चित्त दिलें व पैसा उकळला, त्याला आमचा काय इलाज! गांधीजींचा अनत्याचार व महाराजांचा गीताप्रणीत क्षात्रधर्म ह्यांतील तादात्म्य ज्या बाळांना अद्यापि समजलें नसेल त्यांसाठीं आमची तुलना मुळींच नाहीं. कोणी विचारतील, काय हो, गांधीजींनीं हिमालयाएवढ्या चुका केल्या, नेहमीं नामुष्कीची हार खाल्ली, ल्हान-मवाळांना छळ मोकळा आणि आतां तर गुन्हेगाराप्रमाणें तुरुंगांत पडले. उलट श्रीशिवाजींनीं जें म्हटलें तें करून दाखविलें व शेवटीं त्यांच्या उलट असलेल्या महाराष्ट्रीय ब्राह्मणांनीं देखील त्यांच्यावर स्वराज्याचा अभिषेक केला, हें काय, कधीं कांहीं पत्ताच नाहीं ना! त्याला उत्तर इतकेंच कीं, श्रीशिवाजी होऊन गेले व महात्मा गांधीजींना होऊं घातलें आहे!

येथवर जी आम्हीं तुलना केली त्यावरून महाराज आणि महात्माजी ह्यांच्यामध्यें स्वतःचे विशेष गुण नव्हते व तज्जन्य भिन्नता नव्हती असें आमचें मुळींच तात्पर्य नाहीं; उलट हें उघड आहे कीं, जुन्या संस्कृतींतले महाराज हे पुण्यश्लोक नृपावळींतले नृपवर होते, तर महात्माजी हे नव्या संस्कृतींतले प्रजापक्षाचे अखिल जगाला भूषणभूत अद्वितीय पुढारी आहेत हें सत्य महात्माजींना शिक्षा ठोठावताना न्यायाधिशालाहि कबूल करावें लागलें. ह्यावरून ब्रिटिश-न्यायदेवता पूर्ण आंधळी नसून तिलाहि दिसत असावें अशी शंका घेण्यास जागा आहे. ह्या दोन विभूतींमध्यें संस्कृतिभेदान्वयें पुष्कळच भिन्नता पाहणारांनाहि दिसेल. उदाहरणार्थ, एक वृत्तीनें क्षत्रिय तर दुसरा बनिया; एक स्वराज्यवादी तर दुसरा प्रजावादी; एक राजकार्यधुरंधर तर दुसरा वाङ्मय विभूति; एक पूर्व युगाच्या मावळतीवर तळपणारा सूर्य तर दुसरा नवयुगाच्या उगवतीवर डोकावणारा अरुण. पण असे उपाधिभेद कितीहि दिसले तरी ज्या सत्य विभूति असतात त्या संस्कृतजन्य गुणदोषांच्या दगांआड फार वेळ लपून राहात नाहींत आणि इतिहासज्ञांच्या दुर्बिणीच्या शक्तीला असले तत्काळ विरघळणारे दगहि अडथळा मुळींच करू शकत नाहींत.

कोणी आमच्यावर विभूतिपूजेच्या अतिरेकाचा आक्षेप आणतील तर आम्ही हेंहि येथें नमूद करीत आहों कीं विभूति झाले तरी हे दोघेहि मानवकोटींतलेच आहेत. ह्यांच्या महात्म्याप्रमाणेंच ह्यांचें लाघवहि इतिहासज्ञांच्या दुर्बिणीच्या आवाक्याबाहेरची गोष्ट नाहीं. महाराजांनीं दिल्लीहून परत आल्यावर जो राज्याभिषेकाचा समारंभ

केल्या, क्षुद्र दैवतें आणि विप्रवर्गाची आराधना केली किंबहुना आपल्या कार्यारंभीं आपल्या अंगांत देवी येते असा इतरांचा अथवा स्वतःचाहि भास करून दिला किंवा घेतला, ह्या व अशा इतर बाबी महाराजांच्या लोकसंग्रही लाघवाच्याच होत. त्यांना जें अपूर्व यश लाभलें तें लाभलें नसतें तर ह्याच क्षुद्र बाबी त्यांना जाचकहि झाल्या असत्या. कांहीं अंशीं त्या यशाला ह्या कारणीभूतहि झाल्या असतील. नाहीं कोणी म्हणावें? पण त्या भूषणावह किंवा आवश्यक होत्या असें मत सर्वसंमत होणार नाहीं. इतर पक्षीं गांधीजींना अहमदाबादच्या कॉंग्रेसचा सर्वाधिकारी कसा नडला, त्यांचे वर्णाश्रमधर्मासंबंधीं विचार किती पारदर्शक होते, त्यांचा वेळीं अवेळीं जो बालिश जय-जयकार झाला त्यानें त्याच्या मनाला त्रास आणि कार्याला बाधा कशी झाली वगैरे गोष्टी किंचित् खोल पाहणाराला तेव्हांच दिसण्यासारख्या आहेत. महात्म्यांचें हें लाघव कोंदणा-प्रमाणें कित्येक वेळां शोभून जातें. तरी बऱ्याच वेळां बाधकहि होतें. त्याच्या वेदना कशा असतात हें महात्माच जाणोत; आमच्यासारख्यांनीं त्याची विवक्षणा काय करावी!

असो. आम्हांला ह्या तुलनेनें इतिहासाची पुनरावृत्ति कशी होते तें दाखवावयाची होती. शिवाय युगांतरहि कसें होत आहे हें सांगावयाचें होतें. पण हा विषय चालू समाजविकासाचा व राजकारण परिणतीचा आहे. तो भावनामय आणि अननुभूत असल्यामुळें त्याची आगाऊ चर्चा कदाचित अनाठायीच होईल. सर्व राष्ट्रास जितेंद्रिय करणें, त्याच्याकरवीं अनत्याचारी असहकार्य ह्या दोन निषेधांनीं दूषित झालेल्या विधींचा उत्कट यशस्वी करून दाखविणें हें चालू नवयुगाचें मुख्य लक्षण आहे खरें. पण त्याचा श्रीशिवाजीमहाराजांच्या चरित्राशीं तादृश संबंध नाहीं. तुरुंगांत असोत किंवा राष्ट्रीय सभेंत असोत, महात्मा गांधी तो विधि यशस्वी करून दाखवितील अशी नूतन आमची श्रद्धा आहे.

# १९

# महात्मा फुले व केशवचंद्र सेन

## साम्य

( १ ) दोघेहि जन्मत: ब्राह्मणेतर होते. पण ह्या मुद्द्यास आता प्रमाणें त्यांच्या काळीं महत्त्व आलें नव्हतें. दोघेहि ब्राह्मण कुळांत जन्मले असते तरी त्यांनीं आपलें कार्य तसेंच रचावें असतें व दोघांनाहि कांहीं उदारमनवादी ब्राह्मण गृहस्थांचें साह्य होतें, इतकेंच नव्हे तर तेव्हा-प्रमाणेंच हल्लींहि पुष्कळ अनुदार ब्राह्मणेतरांचा विरोधहि चालू आहे. ह्यावरून दोघांची दृष्टि जातीच्या उपाधीपासून मुक्त असून, त्यांची कृति भावी इतिहासांत चिरकाल जागा व्यापील, ह्यांत संशय नाहीं. केशवाविषयीं तर प्रश्नच नाहीं, पण जोतीरावांनीहि आपल्या "सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकांत पान १२ वर "अन्नदान" ह्या प्रकरणांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, "एकंदर सर्व मानवांपैकीं जो कोणी आपल्या कुटुंबाचें पालण करून जगाच्या कल्याणासाठीं सतत झटत आहे तो आर्य भट भिक्षुक असो अथवा अमेरिकें-तील **इंडियन** असो, अथवा ज्याला तुम्ही नीच मानितां असा एकादा **महार** असो तो मात्र अन्नदान घेण्यास पात्र आहे, आणि तशालाच अन्नदान केल्यानें निर्मिकास अर्पिलें जाणार आहे.'

( २ ) दोघेहि भ्रष्ट हिंदु धर्मावर व अन्यायी हिंदु वरिष्ठ वर्गावर रुसलेले जबर दस्त बंडखोर होते. त्यांच्यामध्यें इतर मत धर्मांविषयीं पूर्ण सहानुभूति व योग्य आदर होता, तरी त्यांना भुरळी न पडून दोघांनीहि कधींच धर्मांतर न करतां केवळ सार्वत्रिक सत्य धर्माची ध्वजा उभारून तिच्याखालीं येण्यास सर्व धर्मीयांस सारखेंच व सतत आवाहन केलें.

( ३ ) परकीय मिशनऱ्यांशीं जसा, तसाच ब्रिटिश सरकाराशीं व नोकरशाहीशींहि दोघांचा व्हाणा आदराचा पण उदात्त स्वातंत्र्याचा होता. केशवाच्या भेटीचे व सल्ल्याचे व्हाइसरॉय व गव्हर्नरहि नेहमी भुकेलेले असत. त्यांच्या कलकत्त्यांतील ( टाउन हॉल-मध्यें होणाऱ्या ) एका वार्षिक व्याख्यानाच्या गर्दीत शिरून एक तत्कालीन गव्हर्नर साधारण माणसाप्रमाणें त्यांचें भाषण एकदा ऐकून गेले ! मुंबई सरकारनें जोतीबाचाहि एक मौल्यवान शालजोडी देऊन सत्कार केला. पण दोघांना केव्हांहि सरकारी नोकरीचा किंवा किताबाचा, किंबहुना चालू भाडोत्री राजकारणाचा मोह पडला नाहीं. दोघेहि मिशनरी व सरकारी कावे ओळखून होते.

( ४ ) तरी आपल्या देशोद्धाराच्या कठीण संग्रामात त्यांनीं निष्कपटी ख्रिस्ती मिशनऱ्यांचें व उदारधि सरकारी सत्ताधाऱ्यांचें साह्य घेण्याचें नाकारण्याचा तोरा दोघां-नींहि कधीं मिरविला नाहीं.

( ५ ) दोघेहि स्त्री-शूद्रांचे कर्ते, यशस्वी व कनवाळू कैवारी होते. ब्राह्म धर्मा-सारख्या उदार चळवळींत स्त्रियांचा प्रवेश केवळ केशवाच्याच कर्तृत्वामुळें प्रथम झाला. राममोहन रॉय यांनीं जरी सतीची चाल बंद केली तरी ब्रह्मोपासनेंत पुरुषाबरोबर स्त्रियांना आणून बसविण्याचें धैर्य त्याला किंवा त्याच्यामागून आलेल्या महर्षि देवेंद्र-नाथ ठाकूर ह्यांनाहि झालें नाहीं. तें कार्य बंगाल्यांत केशवानें स्वतःची पत्नी खानदानी अभेद्य पडद्यात अगदीं कोवळ्या वयात असतांहि तिच्या माहेराची कडेकोट बंदोबस्ताची कोंडी बेगुमान आत्मविश्वासानें फोडून साधिलें आणि ब्रह्मोपासनाच नव्हे तर अखिल धार्मिक जीवन सार्वत्रिक व संपूर्ण केलें. इकडे महाराष्ट्रांत तर जोतिबांनीं केशवाच्या पूर्वीं ८।१० वर्षें म्हणजे इ. स. १८५२ सालीं अस्पृश्यांच्या मुलांसाठींच नव्हे तर मुलींसाठींदेखील पहिली हिंदी शाळा स्वतःच्या खर्चानें व हिंमतीनें उघडली. शिक्षक मिळेनात म्हणून स्वतःच्या आज्ञांकित साध्वी पत्नीस स्वतः शिकवून चांभारांच्या मुलींस शिकवावयास बसविलें. ह्या भ्रष्टाकाराबद्दल ह्या दोघांहि सत्पुरुषांना त्यांच्या जातीनेच नव्हे तर आप्तांनीं व प्रत्यक्ष आईबापांनीं बाहेर घातलें. सारांश, बहुजनांच्या हिताचें एकहि कार्य दोघांच्या प्रयत्नक्षेत्रांत आल्यावाचून उरलें नाहीं.

( ६ ) पुढें जो देशांत राजकारणाचा व स्वदेशाभिमानाचा अखंड पेटणार होता, त्याची पूर्वभूमिका तयार करण्याचें कठीण आणि अपूर्व काम करण्यात दोघांचीं आयुष्यें खर्चीं पडलीं. धार्मिक व सामाजिक सुधारणेचा बळकट पाया दोघांनीं घातला म्हणूनच पुढं निरनिराळ्या देशहिताच्या विशिष्ट चळवळी करण्याचें काम त्यांच्या मागून येणाऱ्यांना सोपें किंबहुना शक्य झालें.

( ७ ) दोघे भावनामय, उदार, निष्कपटी, सरळ, सडेतोड, धोपटमार्गी, दाक्षिण्य-पूर्ण व प्रतिपक्षाला क्षमा करणारे होते. दोघेहि ईश्वरानें झपाटलेले, अनुयायांना ओढून

घेणारे, त्याच्यावर छाप बसविणारे. नवीन समाज किंबहुना नवयुग स्थापणारे आणि भविष्यवादी प्रवक्ते होते.

(८) दोघांमध्ये कांहीं समान दोषहि होते. पण ते अपरिहार्य व क्षम्य होते. दोघेहि हुल्लडखोर, केव्हा केव्हा स्वतःच्या उलट निष्कारण वैरी उत्पन्न करणारे व अनिर्बंधी होते. त्यामुळे त्यांचे अनुयायांनाहि ते प्रसंगविशेषीं असह्य झाले. सर्व धर्मांची सांगड घालून कांहीं नवीन विधि व व्रतें प्रचारात आणण्याचा उर्मट प्रयत्न केशवाने 'नवविधान' ह्या नांवानें केला. जोतिबानेहि आपली परिस्थिति, सामर्थ्य, उपकरणें ह्यांच्यापलीकडची कांहीं कार्यसिद्धि करावी, असा हव्यास धरिला. पण ह्या दोषांमुळे दोघांच्या मनाच्या मोठेपणाचीच साक्ष पटते.

(९) दोघांनाहि ह्या सात्त्विक महत्त्वाकांक्षेमुळे प्रतिपक्षाचा व स्वकीयांचा तीव्र छळ सोसावा लागला व त्यांचे अंतकाळीं फार हाल झाले.

(१०) दोघेहि मरेपर्यंत निकरानें लढले. म्हणून दोघेहि अपूर्व धर्मवीर होते, ह्यांत शंका नाहीं.

वर साम्य दाखविलें. त्याप्रमाणेंच ह्या दोघांमध्ये भेदहि आहेत.

## भेद

(१) केशव इ. स. १८३८ त जन्मून १८८४ त वारला. तो सेन नावाच्या त्या अगदी खानदानी कुळात जन्मला तें क्षत्रिय आणि वैश्य ह्यामधील एक थोर व कुलीन घराणें आहे. त्याचा संबंध एके काळीं बंगालचे राजे असलेले सेन घराणे त्याच्याशीं असण्याचा संभव आहे. एकूण जगिक दृष्टीनें केशव हा कुलीन आणि गर्भश्रीमंत होता. जोतिबा इ. स. १८२७ त जन्मून १८९० साली वारला. तो एक अत्यंत गरीब माळी जातीच्या घराण्यात जन्मला आत्मिक दृष्ट्या ह्या भेदाला मुळींच महत्त्व नाहीं.

(२) केशवाला जरी विश्वविद्यालयाची इंग्रजी पदवी नव्हती तरी आधुनिक "सुशिक्षण" म्हणून गाजणाऱ्या संस्कृतीची त्यावर पूर्ण कृपा होती. जोतिबाचें व लक्ष्मीचें उगे वाकडें होतें इतकें वाकडें नसलें तरी सरस्वतीचें त्याच्याशीं सख्यहि पण नव्हतें. त्याला गरजेपुरतें मराठी व थोडेसें इंग्रजी येत होतें. पण जोतिबा बहुश्रुत होता, तरी धार्मिक ज्ञानाचा त्याच्यावर म्हणण्यासारखा संस्कार नव्हता. अशा त्याच्या प्रचारांत आडदांडपणा व उचित प्रसंगीं मर्यादेचा [illegible] विचारसंयम व अपूर्व [illegible] दिसत. [illegible] नसल्यामुळे, जोतिबाला त्या दैवाची लाभ नव्हती. केशवाच्या प्रचारात [illegible] जो आढळतो, तो जोतिबाच्या ठायीं, ह्या महात्म्याचें [illegible].

( ३ ) वरील भेदामुळें ह्या दोघांच्या कार्यक्षेत्रांत व कार्याच्या विस्तारांत फारकत झाली व दोघेंहि एकदेशीय वर्ते पुरुष ठरले, हा मुद्दा विशेष ध्यानांत घेण्यासारखा आहे. केशवाचें क्षेत्र आधुनिक शिक्षणामध्यें अर्धवट होरपळून निघालेल्या हतभागी त्रैवर्णिकांपुरतेंच ठरलें, त्याचप्रमाणें जोतींचें क्षेत्र ज्यांना उरलेल्या ईश्वराच्या दृष्टीनें भाग्यवान् पण जगाच्या दृष्टीनें शूद्र व अतिशूद्रांमध्येंच ठरलें. "शूद्रादि अतिशूद्र" हें वर्गीकरण स्वतः जोती महात्म्याचें; तें केवळ शाब्दिक नसून तीच त्यांच्या कार्याची अनुल्लंघनीय मर्यादा होती. अशा रीतीनें दोघेंहि एकदेशीय झाल्यानें, ब्राह्म समाज आणि सत्य समाज ह्या दोन्ही संस्थांचें ध्येय व कार्य तंतोतंत एक असूनहि हे दोन्ही समाज अजूनमुद्दां तुटक तुटक नांदत आहेत ! किंबहुना एकमेकास नुसती तोंडओळखहि नाहीं, असें म्हणण्यांत अतिशोक्ति मुळींच नाहीं ! ! ही एक ईश्वरी लीलाच ! ! !

( ४ ) आधुनिक संस्कृतीच्या लाटेवर बसून केशवानें नुसत्या हिंदुस्थानांतच नव्हे तर सार्‍या जगांत जेथें जेथें ही भरीव अथवा पोकळ संस्कृति शिरूं शकेल तेथें तेथें आपली सत्यधर्माची सुवार्ता गाजविली. पण जोती बिचारा आपल्या भीमथडी तट्टावर बसून महाराष्ट्राच्या एका कोपर्‍यात आपला सार्वजनिक सत्यधर्माचा टक साळी, माळी, तेली, तांबोळी किंबहुना त्यांच्याहूनहि खालील जातींचे जे महारमांग ह्यांच्यापुढें वाजवीत असे· इकडे लहुजी मांग हा जोतीचा गुरु, तर तिकडे जगविख्यात पंडितशिरोभूषण राममोहन राय हे केशवाचे आजेगुरु होते. केशव इंग्लंडांत व त्याचे शिष्य ब्रह्मदेश, अमेरिका, जपान, सिंहलद्वीप, अरबस्थान वगैरे देशांत संचार करून आले. जोती पुण्याच्या बाहेर गेला असेल नसेल; त्याचे शिष्यहि दक्षिण महाराष्ट्र किंवा कोंकणात त्याच्या वेळीं गेले असल्याचा पुरावा नाहीं·

( ५ ) केशवाला जिवतपणींच त्याच्या कार्यांत यशाचा वाटा मिळावयाचा तो मिळाला. इतकेंच नव्हे तर शेवटीं त्याच्या यशाला किंचित् ओहोटी लागून त्याला निराशेचा चटका थोडाफार बसला. जोतीचें आयुष्य समग्र अपयशातच गेलें· केशवाप्रमाणे शिष्यांची प्रभावळ जोतीभोंवती जमली होती, तरी त्याचा मगदूर कमी ठरून जोतीनें पेरलेलें झाड त्याच्या नजरेंत भरेल इतके भुईवर उगवलें नाहीं. पण त्याचेमागून तें आता महाराष्ट्रांत जीव धरून कदाचित् बाहेरहि आपल्या शाखा पसरील अशा आशा करण्यास जागा आहे. तथापि ब्राह्म समाज व सत्य समाज हे असेच ह्यापुढेंहि सवता सुभा करीत राहतील, तर त्यांच्या आशा सर्व फोल. जोतिबाची काय कथा तर केशवाचेंहि नांव भावी ज्ञानकोशात धुंडाळावें लागेल. आजकालच्या ज्ञानकोशांत ह्या दोघांची नांवें चमकत नसलीं तर तो दोष ह्या दोघांचाहि नसून तो सर्वांशी ज्ञानकोशाचा व कांहीं अशीं ह्या दोन्ही समाजाच्या अर्धवट व अपात्र अनुयायींचाच म्हणणें भाग आहे.

( ६ ) दोघांच्या शिक्षणांत व परिस्थितींतच नव्हे तर, स्वभावांत व प्रयत्नांतहि मोठा भेद आहे. केशव बंगाली वैष्णव कुळांत जन्मला व वाढला असल्यानें त्याच्या·

वेदांतील उतारे देणाऱ्या जोतिबाला, महर्षि देवेंद्रनाथ टाकुरांनीं इ. स. १८५० सालीं वेदांचें शाब्दिक प्रामाण्य उघड झुगारून दिलें व ब्राह्मधर्म म्हणजे केवळ सार्वजनिक सत्यधर्म आहे ही राममोहन रायांनीं २० वर्षांपूर्वी दिलेली साक्ष खरी केली. ह्या गोष्टी कशा माहीत नव्हत्या, आणि ह्या सत्यधर्माची द्वाही प्रतापचंद्र मजुमदार व त्यांचा प्रतापि गुरु केशव युरोप अमेरिकेंत गाजवून कैक वेळां परत स्वदेशीं आले तरी ह्याची कुणकुणहि जोतिबाला कशी कळली नाहीं, हे आश्चर्य आहे! कोणत्या देवानें अगर दैवानें केशव आणि जोतिबा ह्यांच्यामध्यें हा आडपडदा सोडला होता, हें जाणणें फार कठीण नाहीं. हिंदुस्थानचे मूठभर "सुशिक्षित" पुढारी आणि खंडवजा अफाट बहुजनसमाज त्यांच्यामध्यें हा दुर्दैवी पडदा अद्यापि लोंबत आहेच ना! पहिल्याची भाषा दुसऱ्याला समजत नाहीं, व दुसऱ्याची कळ पहिल्याच्या काळजाला झोंबत नाहीं. आतां कोणी कोणाच्या वंशाला जावें, म्हणजे हा भेदक पडदा नाहींसा होईल!

# २०

## ब्रम्हानंद केशवचंद्र सेन :
## त्यांचे विश्वधर्म विकासांतील स्थान

आजचा विषय केवळ केशवचंद्र सेन असा नाहीं, कारण सेन या विषयावर आज वर्षभर चहूंकडे भाषणें व लेखांचा वर्षाव चालला आहे. 'सुबोध पत्रिके'नें तर अमूल्य काम केलें आहे. विश्वधर्म विकास हाहि विषय आजचा नव्हे. तो सनातन आहे. आजच्या तास दीड तासात तो मावणारा नव्हे. म्हणून ह्या दोन विषयांची मर्यादा परस्परावर घालून तो आटोपशीर करण्यांत येणार आहे. तरी सेनपेक्षां विश्वधर्मांचें महत्त्व जास्त असल्यानें त्याला जागा व वेळ जास्त घ्यावी लागत आहे, ह्याबद्दल माफी असावी.

> सुविशाल मिदं विश्वं पवित्रं ब्रह्म-मंदिरम् ।
> चेतः सुनिर्मलं तीर्थं सत्यं शास्त्रमनश्वरम् ।
> विश्वासो धर्म मूलंहि प्रीति परमसाधनम् ।
> स्वार्थं नाशस्तु वैराग्यं ब्राह्मैरेवं प्रकीर्त्यते ॥

ह्या बीजमंत्रांत केशवाचें हृदय व सर्व कार्यांची घोषणा होत आहे. केशवाच्या प्रेरणेनें त्यांचे शिष्य गौरगोविंद राय ह्यांनीं हें सूत्र रचिलें आहे. पण ह्यात नवीन काय आहे ? राममोहन रायांनी प्रथम ब्राह्म मंदिराची स्थापना केली, त्याच्या ट्रस्ट-डीडमध्यें हाच भावार्थ आहे. वैष्णव व ख्रिस्ती धर्मांचे तात्पर्य हेंच आहे. फार काय प्राचीन वैदिक उपासनेचे शेवटीं मंत्रपुष्पांजलीचा जयघोष होतो, तोहि असाच आहे :—

मध्यें कोमल व सर्वसंग्राहक भावनांची दैवी संपदा परंपरागतच होती. तो स्वतः मोठा रसिक भक्त होता, आणि धंदा विधायक घटनाचतुर होता. इकडे आमचा प्रिय जोती म्हणजे सह्याद्रीच्या रुक्ष घाटमाथ्यावरच्या कांटेरी रानातील एक रानफळ होतें म्हणून त्याचें आयुष्य आपल्या बोथट विळ्या खुरप्यांनीं खंडणमंडणाचें जंगल तोडण्यांत, खडकाळ व रेताळ जमीन खणण्यांत व खुरट झालेल्या कडाक्याचें पीक कोळपण्यांतच घालवावें लागलें. केशवानें मध्यमार्गाप्रमाणें चहूंकडून सत्यसंचय उदार सहानुभूतीनें जोरावर केला. ख्रिस्ती, मुसलमान, बौद्ध, वैदिक इत्यादि निरनिराळ्या धार्मिक संस्कृतींचे अमृतबिंदु गोळा करण्याच्या कामावर निरनिराळे अधिकारी शिष्यांची योजना केशवानें चतुराईनें केली, व आपल्या "नवविधान"रूपी सर्वसंग्राहक सत्यमंदिराची उभारणी करून दाखविली. परंतु जोतिबानें शिक्षणाच्या अभावीं बाहेरून मध न गोळा करितां केवळ आपल्याच अंतःप्रेरणेनें कोळ्याप्रमाणें आपल्याच रुक्ष पोटांतून सार्वजनिक सत्यधर्माचे तंतु बाहेर काढून, त्याचें जाळें विणून सर्व बहुजनसमाजाला आवरण्याचा हव्यास धरिला. ह्यात कोण मोठा, कोण लहान, कोण खरा, कोण खोटा, हें न ठरवितां दोघेहि धाडसी आणि यशस्वी बंडखोर होते, येवढें तरी त्यांच्या शत्रूंना कबूल करण्याची लाज कां वाटावी, हें कळत नाहीं.

(७) सूफी भक्त, ख्रिस्ती साधु, बौद्ध श्रमण वगैरे सर्व रसिकांपुढें केशव दंडायमान लीन होत असे; तसेंच त्यानें हिंदु संस्कृतीला चैतन्य देव आणि समकालीन स्वामी रामकृष्ण परमहंस वेदान्ती ह्यांचें शिष्यत्व पत्करिलें. ह्या लीनपणामुळें त्यानें आर्य समाजाचे संस्थापक स्वामी दयानंद आणि नवीन वेदान्ताचे जगजाहीर पुरस्कर्ते स्वामी विवेकानंद ह्यांवरहि आपली छाप बसविली, व त्यांना मार्ग दाखविले. इकडे आमच्या फटकळ जोतिबाला ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकारामासारख्या संतांचीदेखील कदर ओळखतां आली नाहीं. मग त्यानें ब्राह्म समाज आणि प्रार्थना समाजाच्या शुद्ध हेतूंचा अमंत्र विपर्यास केला, ह्यात सूज्ञांना काय वाईट वाटून घ्यावयाचें आहे बरें ? केशव सकळ संतांना, सर्व धर्मग्रंथांना उरांशीं धरतात. पण जोतिबा आपल्या सत्यधर्म पुस्तकां-तील १०५ पानावर खालील कर्कश विधान करीत आहेत !

" अज्ञानी शूद्र अतिशूद्राच्या करपटींतून धूर्त आर्य मराठ्यांची मुलें जेव्हां शाळांनीं विद्वान झालीं, तेव्हां त्यांच्या पूर्वजांनीं बाह्यात्कारी धर्मसंबंधीं परतु आंतून शुद्ध राजकीय रचिलेल्या ब्रह्मजालावर केवळ झांकण घालण्याकरितां कपटानें आपला बचाव करण्याकरितां, आपल्या टाळ्यावर सातडी ओढून मोठ्या धोरणानें त्यांनीं **ब्राह्म समाज व प्रार्थना समाज** उभारले आहेत; व त्यांनी त्या समाजांत एकंदर सर्व ख्रिस्ती धर्मांचें उष्टें माष्टें चोरून हरून गोळा केलें आणि त्यांनीं आपल्या कल्पित ब्रह्मांडाच्या पुढें ठोंठें झाडून बाकीच्या अज्ञानी शूद्रादि अतिशूद्राच्या मनात पुन. एक तऱ्हेचा ब्रह्मघोळ करण्याची धडपड सुरू केली आहे. "

ह्या वरील अडाणी उद्धाराबद्दल जोतिरावाला काय नावें ठेवावींत ? त्याचें हृदय उपाशी जनतेच्या वेदनेनें हैराण झालें होतें. डॉ. केतकरांसारखे महापंडित आपल्या क्वचित् स्थळीं विचारी ज्ञानकोशांत, ब्राह्म समाज केवळ "धर्मनाशक व राष्ट्रनाशक आहे," तो पसरणें "इष्ट नाहीं" अशीं विधानें आजहि प्रसिद्ध करीत आहेत; तर मग अडाणी जोतिरावानें एकाद्या परकीय मिशनऱ्याचें ऐकून वरील बेजबाबदार वाक्य आपल्या पवित्र पुस्तकांत राहूं दिलें, तर तिकडे कानाडोळा करण्यांतच अधिक धार्मिकपणा आहे. पण त्यांतल्या त्यांत ब्राह्म समाज उठल्या सुटल्या "सुशिक्षित" म्हणविणाऱ्यां-चींच चटुकें काळजी वाहत आहे; व तो आपलीं गोड गाणीं शहरांतच म्हणून स्वर्गास पोंचूं पाहतो. ही गोष्टहि अगदीं खोटी नाहीं. अडाणी जनतेच्या केवाऱ्यांच्या प्रामाणिक आसुडांचे फटके आणि "सुशिक्षितांचे" अप्रामाणिक आक्षेप, ह्या दोन्ही दिव्यांतून बंगाल्यांतील ब्राह्म समाज आणि इकडील प्रार्थना समाज सुरक्षित बाहेर पडून ते स्वतःचे डोळे उघडतील तेव्हांच त्यांना केशव आणि जोतिबा ह्या दोघांचीं कार्यें कशीं केवळ एकदेशीय झालीं, हें दिसेल. आणि तेव्हांच ह्या समाजांना जगण्याची आशा प्राप्त होईल. अशिक्षित व असंघटित सत्यशोधकांची गोष्ट तर दूरच राहो.

(८) केशवाला राजा राममोहन राय आणि महर्षि देवेंद्रनाथ टाकूर ह्या दोन महापुरुषांनीं दोन पिढींत मेहनत करून तयार केलेली आदि ब्राह्म समाजाची भूमिका आयतीच तयार मिळाली. त्या भूमिकेंत पेरण्याचें व पुढें तोडण्याचें काम केशवानें केलें व त्यांत त्याला यशहि आलें. इकडेहि जोतिबाला हीच भूमिका सहज मिळाली असती. केशवच्या श्रमानेंच नव्हे तर त्याच्या पूर्वीपासून काहीं महाराष्ट्रीय सुशिक्षितांनीं सन १८४० पासून मुंबई शहरीं परमहंस समाज नांवाची एक संस्था काढून समाजजागृतीचें अप्रकट काम चालविलें होतें. केशवानें असल्या बहिर्मुख प्रयत्नांत आध्यात्मिक भक्तीची फुंकर मारिली; तेव्हा मुंबई, पुणें, सातारा, नगर वगैरे अनेक ठिकाणीं प्रार्थना समाज इ. स. १८६७ पासून १८७४ च्या आंत स्थापन झाले. आणि त्यांत जोतिबाहि उघड जात येत होता. रानडे, भांडारकर ह्या अध्वर्यूंची दाट ओळख आणि गोखले, वाळवे-करांसारख्या प्रार्थना समाजिस्टांचें तर जिव्हाळ्याचें सख्य असूनहि, जोतिबानें तुसडेपणानें प्रार्थना समाजाशीं असहकारच पत्करलें. ह्यांत तत्कालीन रहस्य व परकीयाची काहीं तरी कारवाई ह्यांचा वास येत आहे. तें कसेंहि असो, ही पूर्वभूमिका सोडून जोतिबानीं नवा सुभा करून सन १८७३ मध्यें 'सत्यशोधक समाज' नांवाचा वेगळा समाज काढिला. असल्याच मात्र असें वाटत नाहीं. ह्याचें कारण एक तर प्रार्थना समाजाचें इंग्रजी भाषेंतच म्हणून विचार अडाणी जोतिबाला समजले नसतील, शिवाय जोतिबाच्या सामाजिक दृष्टीनें धरलेल्या "शूद्रादि अतिशूद्रांच्या" वेदनांचा चटका प्रार्थना समाजांतील मंडळींना कधीं लागला नसावा. कारण काहींहि असो, केशव आणि जोती [illegible] एकमेकाचा पायरी [illegible], कर्नल ली ग्रँड जेकब व सर [illegible] जोन्स [illegible] उंबरठा [illegible], असें आपल्या पुस्तकांत [illegible] मांडून आपलें

> ॐ स्वस्ति साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं
> पारमेष्ट्यं राज्यं महाराज्य माधिपत्यमयम् ।
> समंतपर्या ईस्यात् सार्वभौमः सार्वायुषः आंतादा
> परार्धात पृथिव्यै समुद्र पर्यंताया एकराळिति ।
> तदप्येषश्लोकोऽभिगीतो मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्य वसन् गृहे ।
> आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद इति ॥

ह्यात तर विश्वधर्माची केवळ उपासनाच नव्हे तर एकांतिक राजाचा (देवाचा) हा स्तोम आहे! आणि हा घोष सर्व देवांनीं मिळून पृथ्वीला परिवेष्टणाऱ्या वायुदेवतेच्या घरीं बसून गावयाचा आहे. ह्यांत किती आदर्श व किती काव्य आहे! असें असून ह्या धर्माचे पुढे किती तुकडे व कशी अवनति झाली! तेंच आज पाहावयाचें आहे. त्यांतच पुनः विकासाचे वळसे काय दिसतात तें पाहावयाचें आहे.

ह्या मंत्रपुष्पाचा सनातन देवाची पूजा हा मीं केलेला अर्थ चुकला असला तर कोणी भोजकुलोत्पन्न सार्वभौम सम्राटाचा स्तोम असावा जसा हिटलरचा गौरव होत आहे.

ह्या वैदिक प्रार्थनेला अनुसरून ख्रिस्तानें प्रार्थना केली —

Our father in heaven Thy Kingdom come.
Thy will be done on earth as it is in heaven.

अंतराळांतल्या एक राजा तुझें स्वराज्य पृथ्वीवर येवो. महमुद पैगंबरानेंहि हेंच एक राज्य आळविलें. गौतमबुद्धानें जो नैतिक साम्राज्याचा दिग्विजय केला त्याची सर तर कोणालाच येत नाहीं; ह्यापूर्वी व नंतरहि आंतरराष्ट्रीय पुष्कळ चलन वलणें झालीं, पण ह्या सर्व गत गोष्टी झाल्या. मध्य युगीन काळोखांत सर्व स्वप्नवत झालें. गेल्या पांच शतकांत विश्वामित्रानें पुनः जणू एक नवीनच सृष्टि निर्माण केली आहे. ह्या आधुनिक विकासांत केशवचंद्राचें स्थान कोठें आहे तें पाहूं या.

पंधराव्या शतकाच्या अखेरीस युरोपांत एका प्रचंड दिग्विजयाच्या चळवळीस सुरवात झाली. ती म्हणजे जलमार्गानें प्रवास करून नवीन जगाचा शोध लावणें, विशेषत भरतभूमीचा मार्ग हुडकून काढणें ही होय. ह्या वेळीं इंग्लंड किंवा फ्रान्स देशाची आरमारी शक्ति उदयास आली नव्हती. ह्या बाबतींत पहिला प्रयत्न पोर्तुगाल देशाचा होता. कोलंबसानें अमेरिका शोधून काढण्याच्याहि पूर्वी इ. स. १४८६ चे सुमारास पोर्तुगालच्या बार्थोलेम्यू डायास ह्या धाडशी पुरुषानें आफ्रिकेचा पश्चिम किनारा जवळजवळ १००० मैल लांब शोधून काढला व ह्या खंडाचें अत्यंत दक्षिणेकडचें टोंक गांठलें. त्यानंतर इ. स. १४९८ सालीं ह्या केप ऑफ गुड होपास वळसा घालून वास्को ड गामा ह्यानें हिंदुस्थानच्या नैर्ऋत्य कोपऱ्यांत असलेलें कालीकत हें प्रमुख बंदर गाठलें. ह्यापुढें युरोपांतील धाडशी पुरुषांना नवीन मुलूख शोधून काढण्याचें व्यसनच लागलें. शेवटीं १५७७ मध्यें फ्रॅन्सिस डेक नांवाच्या इंग्रज दर्यावर्दीनें अटलांटिक मार्गानें निघून

दक्षिण अमेरिकेस व नंतर केप ऑफ गुड होपलाहि वळसा घालून परत इंग्लंड गांठण्याचा दिग्विजय केला. ह्याप्रमाणें जुन्या जगाइतक्याच एका मोठ्या नवीन जगाची भर पडली. पुराणांत अमृताचा शोध करण्यासाठीं देवदानवांनीं समुद्रमंथन केलें त्याहूनहि हें मंथनाचें दिव्य अधिक परिणामीं झालें आहे. पोर्तुगाल, स्पेन, डच, फ्रेंच, इंग्रज राष्ट्रांच्या धाडशी पुरुषांची व मंडळ्यांची ह्या मंथनांतून निघालेलें एक अलभ्य रत्न भरतभू ह्या लक्ष्मीचा अभिलाष धरून हिंदी महासागरात घिरट्या घालण्याची रीघच लागली. शेवटीं ही लक्ष्मी इंग्लंडरूपी विष्णूनें एकट्यानेंच पळविली!

पहिल्या टोळ्या चांचे, लुटारू, चाटमान्याच्या, नंतर व्यापारी मंडळ्यांच्या, नंतर मिशनऱ्यांच्या, शेवटीं साम्राज्यप्रसारक मुत्सद्द्यांच्या घिरट्या, असा ह्या आंतरराष्ट्रीय घटनेंत क्रम लागतो. चाजाराच्या अगोदर उचल्याची तयारी, ही म्हण ह्या विशाल राज्यग्रयत्नांतहि खरी ठरते. स. १५९९ त ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना झाली. लवकरच इतर राष्ट्रांच्या कंपन्या निघाल्या, त्याबरोबर इतर राष्ट्रांच्या सनदशीर कंपन्याच नव्हत तर इतर लहानमोठ्या बेसनदशीर, बेजबाबदार चळवळ्यांचा सुळसुळाट सारखा चालू होता, त्यांना "इंटरलोपर्स" हें नांव मिळालें होतें. हल्लीं अमेरिकेंत जसें सनदशीर सरकाराबरोबरच गुन्हेगारांचें एक दुसऱ्या पॅरलल गव्हर्नमेंटचें राज्य चालू आहे तसाच ह्या इंटरलोपर्सचा गडबडगुंडा अगदीं सन १७७३ सालीं रेग्युलेशन ॲक्ट पास होऊन वॉरन हेस्टिंग्ज हा पहिला जबाबदार गव्हर्नर जनरल नेमला जाईपर्यंत चालू होता. त्याच सालीं, त्याच मुहूर्तावर उत्क्रांति क्षितिजावर **राममोहन राय** हा तारा उदय पावला. हा एक अपूर्व योगायोग आहे!

पंधराव्या शतकाचे शेवटीं नवीन जगाच्या शोधाच्या ऐहिक प्रकाशानें युरोपचे डोळे दिपून गेले आहेत, तांच ख्रिस्ती धर्मात सुधारणेची मोठी क्रांति घडून सोळाव्या शतकाच्या आरंभीं युरोपचे आध्यात्मिक डोळेहि चक्क उघडले, व रोमच्या पोपशाहीची (पापशाही) अंधारी रात्र संपून नवीन ख्रिस्ती धर्माचा उदय झाला. या नव्या ख्रिस्ती धर्माचें राजकारण कांहीं असो, सर्वांमागून निघावयाचें; अखेरीस शिखर गाठून सर्वांवर शिरोमणी व्हावयाचें. १७९२ च्या ऑक्टोबर महिन्यांत नॉर्थ्यांप्टन शहरीं बॅपटिस्ट पथानें हिंदुस्थानासाठीं पहिलें मिशन काढलें. त्या वेळीं त्यांनी पुंजी अवघी १३ पौंड २ शिलिंग ६ पेन्स होती, पण ईस्ट इंडिया कंपनीची मूळ पुंजी ३०,००० पौंडांची होती. जान टामस व बुइल्यम केरी हे दोनच प्रचारक लाभले. दोघेहि अर्धवटच होते. टॉमस हा उधळ्या व शिवाळखोर, आणि केरी हा आपदग्रस्त, अशी ही जोडी अजब होती. ईस्ट इंडिया कंपनीला अशा मिशनचें मोठें वावडेंच होतें. त्याचे पुरावे पण त्या काळीं मिशनऱ्यांची कंपनीला स्वाद नको होती! त्यात मिशिन आत्मा शिरत येतो.

मिशनिराच्या "सुधारलेल्या" ख्रिस्ती मिशनर्नी धोरणें परस्परांशी तिनी

विघातक होतीं व सर्वच मिळून त्यांच्या धर्मापासून किती दूर होतीं ह्याचें एकच उदाहरण पुढें दिलें आहे.

## सिंहलद्वीपांतील डच मिशनच्या प्रचारपद्धतीचा मासला

" फिलॉनेट नांवाचे सरकारी धर्मोपदेशक केव्हां केव्हां दोनशें तीनशें अर्भकांना व लहान मुलांना आपल्या जिल्ह्यांतील दौऱ्यांवर बाप्तिस्मा देत असत व वाटेनें जाणाऱ्या कोणाहि वाटसरांना स्पॉन्सर्स किंवा गॉडफादर्स म्हणून धेत असत. ह्या दत्तक पित्यांना ख्रिस्ती धर्माची कसली गंधवार्ताहि नसे. ह्या प्रांतांतील बहुतेक सर्व बौद्ध भिक्षूंवर, त्यांच्या लहानपणीं ह्या नाटकी बाप्तिस्म्याचा प्रयोग घडलेला असे. " ( हा प्रयोग अलीकडच्या बॉय स्काउट्स व गर्लगाईड्सप्रमाणेंच करण्यांत येत असे म्हणावयाचें. ) " मूर्तिपूजेसंबंधानें ब्रिटिश सरकारचें धोरण डच सरकारच्या अगदीं उलट असे. डच ही पूजा उखडून टाकीत तर ब्रिटिश प्रथम तिची गय करीत व पुढें तिला पाठिंबा देत असत...सन १८१५ त जेव्हां कॅंडीचें राज्य ब्रिटिश सत्तेखालीं आलें तेव्हां असें उघड धोरण जाहीर करण्यांत आलें कीं बुद्धाचा धर्म हा अभंग आहे. त्याचे विधी-संस्कार, आचार्य, व देवस्थानें हीं सरकारी खर्चानें सरक्षिलीं जातील. " History of Missions by Rev. W. Brown Vol. I Page 17-18. मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टननें आपल्या Rise of the British Power in the East ह्या पुस्तकांत म्हटलें आहे कीं, " पूर्वखंडांत पोर्तुगीज, डच, फ्रेंच राष्ट्रांच्या प्रसाराला अखेरीस मागें टाकून इंग्रजांनेंच सर्वांवर जय मिळविला, तो त्या सर्वांच्या अपात्रतेमुळें व ब्रिटिशांच्या पात्रतेमुळें. " ही पात्रता म्हणजे ही सचिवाधुपणाचीच अपूर्व कारागिरी होय ! असो.

सन १७७३ पर्यंत चांचे, लुटारू, ह्यांच्याशीं व्यापारी मंडळ्यांनीं सहकार्य करून व नंतर चांच्यांना बंदोबस्त झाल्यावर ख्रिस्ती धर्मप्रचारकांशीं लागेबांधे राखून, ब्रिटिश मुत्सद्यांनीं पूर्वखंडात विशेषतः ह्या भरतभूमींत विश्वधर्मघटनेचा पाया जाणून किंवा नेणून घातला आहे. कोणी म्हणेल, धर्मघटनेच्या पवित्र कार्यात चांचे, भामटे, सचिवाधूंचा संपर्क का लावतां ? " लंडे गुंडे हिरसे तट्टू ह्यांची संगत धरूं नको " असें लावणीकार सांगोत बिचारे. पण इतिहासकाराला असें सोवळें नेसून चालावयाचें नाहीं. त्याला सगळ्याचाच परामर्श घ्यावा लागतो. प्लाटेन नावाच्या समुद्रावरील एका वाटमाऱ्यानें तर मादागास्कर बेटावर आपली राजरोस वसाहत स्थापिली होती. त्याचीं सात आठ ल्हाऊ गलबतें होतीं. सन १७१९ मध्यें तर त्यानें मलबार किनाऱ्यावर हल्ला चढवून, गोव्याचा व्हाइसरॉय त्या वेळीं स्वदेशीं परत जात असता त्याला गिरफदार केलें; व कंपनीच्या जहाजांना पिटाळून लावलें. शेवटीं त्याचा बंदोबस्त झाल्यावर तो मराठा

सरदार आंग्रे ह्यांच्या आश्रयाला राहिला पण त्यानें आपला सनातन धंदा सोडला नाहीं. ( एल्फिन्स्टनः सदर पान ७५ भाग २ ) ह्या प्लॅटन गुंडापासून, सुधारक लॉर्ड बेंटिकपर्यंत, सिरामपूरच्या ख्रिस्ती प्रचारापासून तों ब्राह्मसमाज, रामकृष्ण मिशनच्या वगैरे थोर पुरुषांपर्यंत सर्वांनींच धर्मक्रांतीची तळी उचलण्याला आपापल्या परीनें हात लावला आहे. मग पक्षपात कां ?

विश्वधर्माचें जगड्व्याल सत्कार्य, आदर्शवादी साधुसंत आणि वास्तववादी मोठे मोठे जग जिंकणारे अलकंदर, चेंगिजखान इ.आणि त्यांचे गुंड भैरव ह्या सर्वांच्याच कृतीचें फळ आहे. जीवनशास्त्रांत नानाप्रकारच्या वनस्पतींचे फुलाफळांच्या गर्भाधान संस्कारांत जीवित पराग वाहून नेण्याचें कार्य म्हशींचे केस, डुकराचे दांत, भुंग्याचे पाय, हरिणाचीं शिंगें हीं बिनबोभाट करीत असतात. मोठ्या राजसूययज्ञांत महान् अध्वर्यु व ऋत्विजांबरोबर, समिधा आणण्याचें काबाडकष्ट कोळ्या कातकऱ्यांवर पडतात. एखादा व्हाइसरॉय एखाद्या मोठ्या संस्थानिकाकडे पाहुणा आला तर शिकारीच्या सोहोळ्यांत रान तोडणारे व हाकें ह्यांची कामगिरी विसरून चालत नाहीं. तसेंच विश्वधर्माचे निरीक्षणांत इतिहासकाराला गीतेंत सांगितलेली समदृष्टि ठेवावी लागते. ह्या दृष्टीनेंच पुनः आपली सोंवळी ओढू या.

सन १७७३ च्या रेग्युलेशन ॲक्टमुळें बेबंदशाही मिटून सुरळीत राज्ययंत्र चालूं झालें. सन १७८३ त हिंदुस्थानांतील रणभूमीवर फ्रेंचांचा कायमचा पाडाव होऊन ब्रिटिश अजातशत्रू झाले. ह्या दुसऱ्या कोणी युरोपियनांना त्यांना हेवादावा उरला नाहीं असें व्हर्सायच्या तहानें ठरलें. पुढच्या लढाया ब्रिटिशांना हिंदुस्थानांतल्या राजवटींशीं निर्वेधपणें करावयाला वेळ मिळाला इतकेंच नव्हे, तर हिंदुस्थानांतील राज्यकारभार-यंत्र नवीन घडवून समाजरचनेंत पुनर्घटना करावयाला अपूर्व संधि मिळाली म्हणून हा संधिकाळ महत्त्वाचा ठरतो. ह्या कामीं राममोहनाचें अवतारकार्य सुरू झालें. तें ३० वर्षें चाललें. हे सन १८०३ मध्यें सरकारी नोकरी सोडून स्वतंत्र सार्वजनिक सेवा करून ब्रिटिशसत्तेशीं विधायक सहकार्य करूं लागले. ते १८३३ मध्ये इंग्लंडांत ब्रिस्टल शहरीं वारले. ह्या अवतारकार्याचा तपशील सांगण्याचें हें स्थळ नव्हे व वेळहि नाहीं. ह्या पुढचा टप्पा १८३३ पासून सन १८५८ पर्यंतचा २५ वर्षांचा काळ, देवेंद्रनाथ टाकूरचा होय. तोहि लवकरच नजरेवेगळा केला पाहिजे राममोहनानें ब्राह्मसमाजाचा नुसता पाया रेखाटला. ठाकूर महर्षींनें त्यांत रंग भरून ओटाहि भरून काढला. बेंटिकनें समाजसुधारणा केली. मेकॉलेनें शिक्षणाचे आराखडे बांधले; आणि डलहौसीनें बहुतेक सर्व एतद्देशीय रियासतीवर वरवंटा फिरवून भरतभूमींत ब्रिटिशसत्ता जवळ जवळ एकजिनसी केली. ह्यानंतर विकास नाटकाचा पडदा पाडून थोडा वेळ १८५७ च्या बंडाची नाट्यछटा दाखविण्यांत आली. पुनः पडदा उघडला, तों अकस्मात आमचे चरित्रनायक ब्रह्मानंद केशवचंद्र सेन सज्ज होऊन पुढें उभे राहतात.

केशवचा काळ १८५८ पासून १८८३ अखेर सदर्‍या २५ वर्षांचा आहे. कोठें धर्मविकासाचें अनंत कार्य! कोठें केशवचंद्राचीं हीं २५ वर्षे! गेल्या ५ शतकांतील कार्यांत केशव लहानगा भासतो. इ. स. १५५६ सालीं जिनीव्हाहूनहि पहिलें प्रॉटेस्टंट ख्रिस्त मिशन ब्राझिल देशास निघालें म्हणून वर सांगितलेंच आहे. त्याचवर्षी हिंदुस्थानच्या सरहद्दीवर महात्मा अकबर जन्मला. पूर्व व पश्चिमेला जोडणारा तो एक दिव्य सांखळीचा अपूर्व दुवाच होता. अबुल फजल ह्या विद्वान् मित्राच्या साहाय्यानें अकबरानें ह्या आधुनिक काळांत धर्माला पहिला उजाळा दिला. केशवच्या प्रवर्तक ( Apostalic ) दरबाराप्रमाणें अकबर हा हिंदु, मुसल्मान, पार्शी, ख्रिस्ती, बौद्ध, यहुदी वगैरे सर्व तऱ्हांची दर शुक्रवारीं एक उलेमा भरवीत असे. त्यानें विश्वधर्माची एक प्रत्यक्ष स्थापनाच केली ( दिने इलाही ). पण ती टिकली नाहीं. भयंकर प्रतिक्रिया मात्र घडली. अबुल फजलच मारला गेला. औरंगजेबाच्या दुराग्रहानें १५० वर्षांचें मोगलांचें राज्यहि धुळीस मिळालें त्या धुळींतून ब्रिटिशांची सत्ता उभी राहिली. पुन: पूर्व आणि पश्चिमेचें सघर्षण कितीतरी मोठ्या प्रमाणावर चालू झालें. त्यांतून राममोहनाचें सर्वधर्मसमन्वयाचें कार्य नांवारूपास आलें. ब्राह्मसमाज १८२८ मध्यें उघडला जाऊन प्रसिद्ध ट्रस्ट-डीड १८३० त प्रथम मंदिरप्रवेशाचे वेळीं घोषित झालें. राममोहनाचा अस्सल वारसा केशवचंद्रानें १८५८ मध्यें उचलला.

राममोहन राय महापंडित होता, तसाच शतक्रतूहि होता. सर्व कांहीं होता, पण त्याला वेळ पुरला नाहीं. अकालीं वारला. केशवचंद्र पंडित नव्हता. त्याचें बळ प्रेरणा व प्रार्थना ह्यांतच होतें. तेंच खरें धार्मिक बळ. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे केशव म्हणून एक प्रेरणेचा ज्वालामुखी पर्वतच होऊन गेला. तो २५ वर्षे टिकला हीच मोठी गोष्ट. जेथे ख्रिस्त ३ वर्षांत पडद्याआड झाला, तेथें केशव २५ वर्षे काळोखाशीं झगडत होता. ह्याचें कारण काळ त्याला अनुकूल होता. विश्वधर्माचा चार भरून तयार होता. केशवनें नुसती यशाची गोळाबेरीज केली. प्रेरणा जे एका क्षणार्धांत व प्रार्थना ५ मिनिटांत चमत्कार घडवितें तें शब्दपांडित्य आणि वाहपटना सबंध १०० वर्षांतहि घडवू शकत नाहीं हें ब्राह्मसमाजाच्या इतिहासावरून उघड होतें.

केशवनें कल्पिलेला धर्मसंघ अदृश्य होता ( Invisible Church ). ह्या अदृश्य संघावर त्याची अमोघ इंग्रजी वैजयंती वाहूं लागली, म्हणजे दृश्य संघाचे डोळ्यांपुढें तारे चमकूं लागत! तरुणांची, वृद्धांची, स्त्रियांची, मुलांची, मित्रांची, शत्रूंची त्याच्या वाक्यज्ञात आहुति होत असे. महर्षी देवेंद्रनाथ टाकूरचें व केशवचें फार दिवस पटण्यासारखें नव्हतें. त्याचें कोणाशी पटले? शेवटीं त्याने १८६५ त स्वतंत्र भारतवर्षीय ब्राह्मसमाज काढला. त्याच्यापेक्षां कितीतरी मोठा, बुद्धीचा खंदक राजा राममोहन राय ३० वर्षे सारखा शोध, युक्तिवाद आणि आर्जव करून मस्तिष्क रोगानें वारला. उलट केशवानें हुकूम करावा, इतरांनीं ऐकावें हा क्रम होता, तोपर्यंत ब्राह्म-

समाजाची ऊर्फ दृढ विश्वधर्माची स्थापना व वाढ झाली. जेव्हां हा क्रम ढिला पडला तेव्हां सर्वच जणूं थंडावलें. त्याच्या चरित्राच्या शेवटीं " नवविधान " मताची घोषणा झाली ( १८७७ ). पण त्याचें कार्य अगोदरच संपलें होतें. असलें कार्य कधीं रेंगाळत नाहीं.

राममोहनाच्या महत्कार्याचीं दोन मुख्य अंगें होतीं. पहिलें धर्मसमन्वय, दुसरें भारतीय लोकसमाजाची पुनर्घटना. दोन्हींला केशवनें स्पष्ट मूर्त स्वरूप दिलें. पहिल्याचें कार्य वरिष्ठ वर्गांत अद्याप चाललें आहे. दुसऱ्याचा परिणाम बहुजनसमाजावर घडत आहे. ह्यांतच केशवाचें वैशिष्ट्य आहे. केशवचाच वारस हल्लीं महात्मा गांधीकडे आला आहे. त्याच्या ब्राह्मसमाजाला कॉंग्रेस हें नांव पडलें आहे.

भरतभूमि ही पुरातन काळापासून सर्व जाणत्या जगाची आध्यात्मिक माता होऊन राहिली आहे. १५ व्या शतकापासून जडवादी पाश्चात्य जगाचें लक्ष ह्या पुण्य-भूमीकडे लागलें. राममोहन राय व केशवचंद्र आणि त्याचे अनुयायी प्रतापचंद्र मुजुमदार व विवेकानंद वगैरे जे इंग्लंड-अमेरिकेला गेले, ते शिकण्यासाठीं नसून शिकविण्यासाठींच गेले असें म्हणण्यांत कांहीं आत्मश्लाघा नाहीं. त्यांचें स्वागत त्याच थाटानें झालेंहि. राममोहन रायला ब्रिटिश पार्लमेंटमध्यें ( Ambassador ) पौरस्त्य प्रतिनिधीची खुर्ची मिळाली. केशवचा सत्कार डॉ. मार्टिनो, मॅक्समूलर, जॉन स्टुअर्ट मिल, फ्रॅन्सिस न्यूमन, प्रधान ग्लॅडस्टन, मिस मेरी कार्पेंटर व प्रत्यक्ष महाराणी व्हिक्टोरिया ह्यांनी केला. तरी पण तो गर्वानें फुगून गेला नाहीं. तो मनानें गरीबच होता. वरून तो हुकमशहा दिसत होता तरी, अंतरांत फार लाजाळू होता. ह्यामुळेंच त्याची छाप वरिष्ठ वर्गावर तशीच जनतेवरहि पडली. त्यामुळें धर्मसमन्वयाचे धडे त्यानें भारतीय उच्च वर्णीयांना, पाश्चात्य पंडितांना व धर्माधिकाऱ्यांनाहि दिले, हें प्रो. मॅक्समूलरसारख्या जगविख्यात पंडितांनीहि कबूल केलें आहे. राममोहन हा तुलनात्मक धर्माध्ययनाचा आद्य प्रवर्तक अशी ज्यांनीं घोषणा केली त्या मॅक्समूलरनेच पाश्चात्य विद्यालयांतून ह्या शास्त्राची पुढें पूर्तता केली.

जी गोष्ट मॅक्समूलरनें विद्यालयाच्या ध्येयांत केली ती केशवानें लौकिक पूजेंत व सहानुभूतींत केली. त्याला त्यानें " नवविधान " हें नांव ठेविलें.

असा दिग्विजय संपादून सन १८७१ सालीं केशवचंद्र विलायतेहून परत आल्या-वर आपलें दुसरें कार्य जनता संपर्काचें ( Mass Contact ) त्यानें मोठ्या धडा-डीनें सुरू केलें. धर्मविषयाला ही नवीनच कलाटणी मिळाली म्हणावयाची. स्वस्त वाङ्मय, स्त्रीविमोचन, लौकिक शिक्षण, मद्यपानबंदी व अपंगांची सेवा ह्या पंचसूत्री समाज-सुधारणेचा पाया घातला. त्यावरच भावी राष्ट्रीय सुधारणेची इमारत आतां उभारत आहे. ह्यांत हिंदुस्थानचे व्हाइसरॉयसारखे बडे अधिकारीहि त्याचें सहकार्य मागत असत व स्वतः देत असत. ब्राह्मसमाज म्हणजे केवळ डोळे मिटून प्रार्थना करणारी मंडळी नव्हे,

हें राममोहनापासून नुकतेच दिवंगत झालेल्या श्री. कृष्णकुमार मित्रापर्यंत प्रत्येक ब्राह्मानें सिद्ध केलें आहे.

हें सर्व कशानें झालें ? धर्माचीं दोन अंगें, अंतःसाधन व बाह्यसेवा ह्या दोन्हीला केशवानें आपल्या आयुष्याचें सर्वस्वी अर्पण केलें होतें. उरी ठेवली नव्हती. अनासक्तीनें प्रपंच त्यानें केला, तो धर्मसाधनासाठीं समाजोन्नतीसाठीं केला. शेवटचा काळ जरी शारीरिक व मानसिक क्लेशांत गेला तरी सन १८८४ च्या जानेवारी ८ तारखेस त्यांचा जो अंत झाला तो अकालीं निधन मात्र म्हणतां येत नाहीं ! त्याचें कार्य संपलें होतें. पुढें मनूहि पालटला.

# २१

## अस्पृश्यांची शेतकी परिषद

**शेतकी प्रदर्शन :** चालू शेतकी प्रदर्शनाबद्दल लोक फार साशंक आहेत. कारण मन चिंती तें वैरी न चिंती. ह्यांत हिंदुस्थानचा किंवहुना शेतकऱ्याचा कांहीं फायदा नाहीं; हें इंग्रजी भांडवलशाहीचें एक डोहाळ जेवण आहे, अशी अफवा आहे. असाच खराच प्रकार असल्यास । अजि हौस जिजीची पुरवा । हर गर्भवतीच्या तुरवा ॥ ध्रु. ॥ सित छत्र निच्या शिरीं धरवा । सित चामर सुंदर फिरवा ॥ गज शिबिका थातुनि मिरवा । नव मत्य महोत्सव करवा ॥ पाचु हार चुडा हिरवा । हिरवा शालु, चेणिंत भरवा ॥ शृंगार थाटुनि धरवा । प्रिय सखिची ओटी भरवा ॥ १ ॥ ही खरेशास्त्रीकृत आरति प्रदर्शनअखेर म्हणून शेतकी कमिशनची ओटी भरणें अगदीं योग्य आहे. तें कसेंहि असो. चालू डोहाळ जेवणात "अस्पृश्यां"चा काय संबंध आहे हा एक मोठा प्रश्नच आहे. खानदेशांत एक म्हण आहे कीं राजाला मुलगा झाला तर, दासीला दहा घागरी पाणी जास्तच. यदाकदाचित् थोडासा फायदा शेतकऱ्यास झाला तरी, एकंदरींत भारतीय अस्पृश्य वर्ग शेतकरीपदाला अद्यापि पोचला नाहीं हे मी प्रतिज्ञेवर सांगतों.

इ. स. १९०१ सालच्या खानेसुमारीत म्हटलें आहे कीं हिंदुस्थानच्या एकंदर लोकसंख्येचे दोनतृतीयांश शेतकीवर अवलंबून आहेत; वरील संख्येचे शेकडा ५२ जमिनीचे मालक व कुणबी (वाहणारे) मिळून आहेत. पण अस्पृश्यांची गणना ह्या दोन्ही वर्गांत होत नाहीं. शेकडा १२ शेतकीवरचे मजूर आहेत. आणि अस्पृश्यांची गणना मजुरांतहि होत नसून, ती बिनमुदतीच्या जमिनीवरच्या गुलामांतच करण्यालायक आहे. एका मद्रास इलाख्यांतच सुमारें २ कोटी अस्पृश्य आहेत. त्यापैकी निदान एक

कोटी तरी ह्या गुलामगिरींत हल्लीं खितपत पडलेले मी माझ्या डोळ्यांनीं वारंवार पाहून येत आहे. केवळ शेतकीवर निर्वाह होतो येवढ्यावरून अस्पृश्यांना शेतकरी ही फुकटची पदवी बहाल करावयाची असल्यास तर गाय, बैल, म्हशी, रेडे, बकरे इत्यादींना शेतकरी कां म्हणूं नये? ह्या जनावरांना मराठे शेतकरी "लक्ष्मी" ह्या गोड नांवानें संबोधतात. निदान मद्रासकडच्या शेतावरच्या गुलामांना "लक्ष्मी" ऊर्फ Live Stock हें नांव देण्यांत मला कोणतीहि अतिशयोक्ति वाटत नाहीं. इतर इलाख्यांत अस्पृश्य समाज ही फार तर शेतीवरचा दिनमुदतबंदीचा मजूर असेल. त्याला शेतकरी म्हणणें हें त्याच्या दुःखावर डाग देण्याप्रमाणेंच कठोर अज्ञान आहे!

शेतकीचा प्रश्न अर्थशास्त्राचा आहे. अस्पृश्यतेचा प्रश्न हा सामाजिक, धार्मिक व विशेषतः राजकीय जुलमाचा आहे. एकवचनांत भारत मी म्हणतों कीं दुष्काळाचे दारांत नव्हे तर प्रत्यक्ष सामाजिक तुरुंगांतच आहे. मग कोणापुढें अर्थशास्त्राच्या गप्पा सांगितल्यास ते म्हणतील कीं आम्हाला मॉस्कच्या मैदानात सोडा म्हणजे तुमच्यापेक्षांहि अर्थशास्त्रावर अधिक लांब व्याख्यानें आम्ही झोडूं. हें खोटें काय! मद्रासेकडे तामिळ नाड, तेलंगणांत असे कितीतरी जिल्हे मी दाखवून देईन कीं त्यांत पारिआंना जमीनदार तर नव्हेच पण लहानसान कुणबीहि होणें शक्यच नाहीं. इ. स. १८४४ चे सुमारास लॉर्ड एलनबरोचे कारकीर्दीत हिंदुस्थानांत नामधारी कायद्यानें गुलामगिरी बंद केली. पण इ. स. १९१८ सालीं मी मलबारांत प्रवास करीत असतां कालीकत येथील माझ्या एका जमीनदार मित्रानें सांगितलें कीं त्याच्या इस्टेटीवर शेंकडों "अस्पृश्य" वंशपरंपरागत दास ऊर्फ लक्ष्मी होते. आपल्या इस्टेटीवर काम नसतांना तो त्यांना गुरांप्रमाणें दुसऱ्याच्या शेतात भाड्यानें पाठवीत असे! जमिनीबरोबर दासांची विक्री होते. ते पळून दुसऱ्या मालकाकडे आल्यास मलबारातील ब्रिटिश कोर्टात दावा लावून ओरोब्रीप्रमाणें त्याला पकडून नव्या इस्टेटीवर डांबतां येते! अशा मद्रासी आंग्रोब्रीवाल हल्लीं चालूं असलेल्या डोहाळ जेवणांतील उद्यावळीची तरी आशा करतां येईल काय? वरील सालीच मद्रासेंत तंजावर जिल्ह्यांत मी दौऱ्यावर असतांना कांहीं पारिआंना सरकारकडून जमीन वाहण्याचा हक्क सवलतीनें देण्यांत आला होता. कळ्ळर (ह्याचा अर्थ द्राविड भाषेत चोर असा आहे.) नांवाचा ब्राह्मणेतर जमीनदारांचा एक वर्ग तिकडे आहे. त्याचा व पारिआंचा ह्या नवीन हक्काच्या सवलतीने धनघोर तंटा लागला होता. लॉर्ड पेंटलंड हे त्या वेळीं गव्हर्नर होते त्यांच्या अनुमतीनें ह्या तंट्याचें इंगित स्वतः निरखण्यास मी गेलों. तेव्हां तेथील एका स्वराज्यवादी ब्राह्मण वकिलानें जमीनदारांचा पक्ष घेऊन मला अगा स्नेहाचा सल्ला दिला कीं मी ह्या भानगडींत न पडतां जीव घेऊन सुखरूपानें स्वदेशीं जावें.

ह्यावरून अस्पृश्यांनीं शेतकीत लक्ष घालूं नये, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. मुद्दा हा आहे कीं जेथे जमीन वाहण्याचा तात्त्विक हक्क अस्पृश्यांना नाहीं, तेथें वरिष्ठांचें प्रशंसेचे स्थान दाखवून काय उपयोग? चार् मद्रासेंत कांहीं धारवाडी व

सिंधी बनावटें ठेविली आहेत असें ऐकतों. त्याप्रमाणेंच कांहीं मलबारांतील विरमा व व त्रिचनापल्लीकडचे पळव्ल आणिले असते तर ते औताचे कामीं किती उपयोगी आहेत हे पाहण्यासाठीं आमच्या पुणें मिशनच्या सर्व सभासदांना मीं सुचविलें असतें. असो. केवळ शेतकीच्या दृष्टीनें पाहतां बंगाल्यात, मध्यप्रांतांत व महाराष्ट्रांत अस्पृश्यांची स्थिति इतर कांहीं प्रांतापेक्षां थोडी बरी आहे. पण येथेंहि त्यांना शेतीवर इतर स्पृश्य मजुरांबरोबर मजुरी व श्रीनें मिळेलच अशी कोणी खातरजमा देईल ? एखादा इलेक्शन-साठीं उभा असलेला उमेदवार देईल. पण त्यावर अस्पृश्यांनीं विश्वास ठेवण्याचें कारण नाहीं. न जाणो, नवीन शेतकी कमिशनच्या पुकळ्या शिफारशीवरून साम्राज्य सरकार मजुरी वाढविण्याचा एखादा कायदाहि पास करील. पण ज्या इंग्रजांना आपल्या घरच्या मजुरांची करुणा येत नाहीं त्यांनीं इकडील मजुरांना डोक्यावर घेऊन थोडा वेळ नाचल्यानें शेती सुधारेल काय ? कीं अस्पृश्यता कमी होईल ?

" अस्पृश्य " वर्गाच्या शेतकी परिषदेंत अस्पृश्यता ही प्रधान आणि शेतकी ही गौण गोष्ट आहे ही वरील मुद्द्याची गोष्ट आपल्या ध्यानात आणण्याचा मी थोडक्यात प्रयत्न केला आहे. जमिनीच्या मालकी हक्काला किंवा वाहतुकीला महाराष्ट्रांत तरी कायदेशीर प्रतिबंध नाही. अडचण आहे ती दारिद्र्याची व धंदेवाईक सवलतीची. इ. स. १९१४ सालीं सातारा जिल्ह्यांत मांग लोकांची वसाहत करण्यासाठीं मुंबई सरकारनें आमच्या मिशनला एक हजार एकर पडिक जमीन लागवडीस देण्याचें कबूल केलें होतें. पण जमीन शोधण्यासाठीं मी आणि खुद्द डॉ. मॅन त्या जिल्ह्यांत शेंकडो मैल हिंडलों. मराठ्याच्या शिवेची जमीन मराठ्यानें किंवा ब्राह्मणाच्या शिवेची जमीन ब्राह्मणानेंच आपल्याकडे दाबून ठेवावी किंवा त्याच्याकडेच असावी हे सरकारी वसुलाचे दृष्टीनें किती माहजिरु होतें हें व्यावहारिक शहाणपण मी तेव्हां शिकलों ! कायद्यांतलें व परोपकारांतलें पुस्तकी शहाणपण जमीनशिवारांत वावरताना फारसें उपयोगी पडत नाहीं. ही गोष्ट शेतकी कमिशनच्या परकीय सभासदांना समजणार नाहीं, व स्वकीय पांढरपेशांना सांगून आम्हीं आपला वेळहि घालवूं नये हेंच बरें. सदाशिव पेठेंत मांगाला घर माडयानें मिळण्याला हल्ली कायद्याची आडकाठी नसली तरी तें मिळणार नाहीं. तशीच शेतांत खोंवल्या वशिल्याच्या मालकाच्या हद्दीशं महारामांगाला सवलतीनें जमीन मिळावयाची नाहीं. ती पडिक झाली म्हणून काय झालें ? अस्पृश्य जात निव्वळहूनहि किती तरी अधिक काळ पडिक आहे !

अस्पृश्य शेतकऱ्याची गोष्ट राहोच पण हिंदुस्थानातील अगदीं अस्सल क्षत्रिय शेतकऱ्यांनाहि चांगले दिवस यावयाचे, आसल्यास ते असल्या शेतकी कमिशनमुळें न येतां, सक्तीच्या शिक्षणामुळेंच येणार. मग त्यासाठीं कर बसविण्यापर्यंत हिंदी पुढाऱ्यांनीं निर्भीड झालें पाहिजे; हें आतां शाळेतील मुलांनाहि कळूं लागलें आहे. पण हें काळ्या गोऱ्या नोकरशाहीच्या मात्र गळीं कधीं उतरेल तें उतरो. मला तर वाटतें कीं, हिंदुस्थानासारख्या मागासलेल्या व दुहीनें सडलेल्या देशांत शेतकऱ्यांच्या भरभराटीचा

प्रश्न केवळ अर्थशास्त्राच्या पोकळ तत्त्वांवर किंवा प्रदर्शनाच्या परकीय मदतीवर अवलंबून नसून तो सामाजिक शिक्षणावर व हितसंबंधीयांच्या सद्भावांवर जास्त अवलंबून आहे. ही जर प्रत्यक्ष स्पृश्यांची स्थिति मग अस्पृश्यांची कोण वाट!

परवां रॉयल कमिशनपुढें भारतीय शिक्षणमंत्र्यांची जी साक्ष झाली तिच्यांत त्यांनी शेतकऱ्यांच्या दृष्टीनेंहि सक्तीच्या शिक्षणाची किती आवश्यकता आहे हें निर्भीडपणें सांगितलें. शेतकीत अधिक पैसा खर्च करून व दुप्पट पैशांचा रास योग्य वेळीं करून आपला फायदा करून घ्यावयाचा असेल तर हिंदी शेतकऱ्यांची हल्लींची मनोरचनाच बदलली पाहिजे. ती सक्तीचे शिक्षणाशिवाय होणें नाहीं. अस्पृश्य वर्गासंबंधीं तर ही गोष्ट अधिकच खरी आहे. ह्या दुर्दैवी वर्गावर आज हजारों वर्षे अस्पृश्यतेचा मूढ मार पडत आली आहे. त्यामुळें त्यांना स्वतःचें असें मनच उरलें नाहीं. मुंग्याशाच्या समानी जशी सोंडीपासून तयारी, तशी अस्पृश्यांच्या उन्नतीची त्यांच्या मनापासून तयारी करावयाची आहे. वरवर पाहतां असें दिसतें कीं शेतकऱ्यांची मुलें लिहावयास शिकलीं म्हणजे त्यांचें लक्ष शेतकीवरून उडतें. पहिल्या पिढींत असें होणार हें जाणूनच शिक्षणाचा मोहरा तसाच चालविला पाहिजे. फार दिवस हाडीमांसीं खिळलेल्या रोगांचीं लक्षणें अशीं उलटीं असणारच. त्यांतूनच उपाय करणाऱ्यांनीं चिकाटीनें मार्ग काढणें आवश्यक आहे. ह्यांचा विशेष विचार आपल्या शिक्षण परिषदेंत होईल अशी मला आशा आहे.

शेवटीं पुन्हा एकदां आठवण करून देतों कीं महाराष्ट्रांत अस्पृश्यांची जमीनमालकीसंबंधीं स्थिति इतर प्रांतांतल्यापेक्षां किंचित बरी आहे. मराठे आणि महार हे दूरचे चुलत बंधु असल्यासारखे आहेत. त्यांत महारांना थोरल्या घरचे हें नांव आहे. पण तेवढ्यावरून इतर अस्पृश्यांचे मूळ कसी दर्जाचें असें मुळींच माझें म्हणणें नाहीं. अस्पृश्य हेच महाराष्ट्र ऊर्फ दंडकारण्याचे मूळ मालक. मराठे हे केवळ उपरे. मूळ मालक तो आज केवळ पहिल्या नंबरचा बलुतेदार झाला आहे! जमिनीच्या शिवेचा तंटा लागल्यास महारांचा निकाल पूर्वीं शेवटला समजत असत. कोंकणांत अद्यापि गावकरी महारांना पागोटें बांधून त्यांच्या मूळ हक्काची दरसाल आठवण करून देत असतात. म्हणून तुम्ही सर्वांनी आपल्यांत दुभेद एकी करून जमिनीवरील आपली गेलेली सत्ता पुनः मिळविली पाहिजे. ह्या कामीं ब्रिटिश सरकारची झाली तर मदतच होईल. प्राचीन परंपरेचें महत्त्व हें सरकार जाणतें; आमचेकडे जशीं तुळशीचीं लग्नं होतात तसाच एक चमत्कारिक विधि मद्रासकडील तामिळ देशांत अद्यापि रूढ आहे. त्यात भूदेवींचे गळ्यात लग्नाची ताळी बांधावयाची असते; ती बांधण्याचा हक्क गांवच्या परियाचाच असतो यावरून तोच पूर्वीचा बळीराजा पृथ्वीपति हें उघड होतें. परंतु नुसती परंपरेची पोथी वाचून सरकार वळेल असें नाहीं. सरकार म्हणजे कांहीं धर्मादाय खातें नव्हे. तें बिनहिशेबी व्यवहार कधीं करणार नाहीं. सरकारजवळ अजूनहि पडिक जमीन पुष्कळ

पडली आहे. उत्तर हिंदुस्थानांतील शिंदे, होळकर इत्यादि संस्थानिकांजवळ तर अशा जमिनींचे अफाट प्रदेश पडले आहेत. चालू धामधुमीची संधि साधून पाश्चात्य भांडवलवाल्यांनीं चहा कॉफीचे विपारी मळे लावून आपले हातपाय पसरल्यावर तुम्ही तेथें मुदतबंदी मजूर म्हणून जाणार काय ? लहान लहान प्रमाणावर ह्या जमिनीचे तुकडे नांगराखालीं आणून तुम्ही स्वतंत्र रयत झाल्यास तुमचा, सरकारचा व सर्व देशाचाहि फायदाच होणार आहे. हा विषय तुमच्या पुढाऱ्यांनीं शेतकी कमिशन येथें आल्यावर त्याच्यापुढें अवश्य ठेवण्यासारखा आहे.

माझ्या व इतर सहकाऱ्यांच्या हातून आजवर जे अल्पस्वल्प प्रयत्न तुमच्यासाठीं झाले आहेत त्यांत म्हणण्यासारखें यश आलें नसलें तरी अनुभव आले आहेत, त्यांची किंमत कमी नाहीं. ते तुम्हांस सादर करण्यास आम्ही सदैव तयार आहों. आतां तुमचें मिशन सर्वस्वीं तुम्हांवर तुमच्याच मागणीवरून सोपविण्यांत आलें आहे. त्यांत तुम्हांला अत्यंत कष्ट पडत आहेत हें मी जाणून आहे. परंतु ह्या व्यायामाचा तुम्हांला अति फायदाच झाल्याचें आढळून येईल. शेतीमध्यें ज्या निरनिराळ्या खतांचा उपयोग होतो, त्या सर्वांत निढळाच्या घामाचें खत अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें ठरतें. ह्यांत वसूर उपयोगी नाहीं. हल्लीं ज्या फुकट सवलती मिळविण्याच्या शर्यती चहूंकडे चालू आहेत त्यांच्यांत तुम्ही सामील होऊं नका. अशा सवलती मिळारयांचें न मिळाल्यांचेपेक्षांहि अधिक नुकसान झाल्याचें योग्य वेळीं आढळल्याशिवाय राहात नाहीं. अर्थात तुमच्या दुर्बल स्थितीमुळें विशेषतः ती स्थिति इतरांच्या अन्यायामुळें आली असल्यानें तुम्हांला कांहीं सवलती सढळ हातानीं देणें न्याय्यच नव्हे तर अत्यंत आवश्यकहि आहे. पण ह्याहि सवलती तुम्ही कर्जाऊच म्हणून घेण्यांत आपला बाणेदारपणा दाखवाल अशी मी आशा करतों.

# २२

## मुंबई इलाखा शेतकरी परिषद, पुणें

गेल्या आठवड्यांत मी बंगालच्या फिरतीवर निघालों होतों. कलकत्त्यास ब्राह्मसमाजाची शतसांवत्सरी असल्याने मला तिकडे जाण्याची निकड लागली होती; पण इतक्यांत मी मुंबईंत असतांना ह्या परिषदेच्या स्वागताध्यक्षाकडून मला जरूरीची तार आली आणि पकडवॉरंटानें धरून आणून मला या स्थानीं बसविण्यांत आलें आहे. रंजल्या-गांजलेल्यांची सेवा म्हणजेच ब्राह्मसमाजाचा धर्म. दलित अस्पृश्यांची आजपर्यंत यथाशक्ति ब्राह्मसमाजानें सेवा केली. आता शेतकरी वर्ग दलित होऊं लागला आहे. अस्पृश्यांची अस्पृश्यता तिकडे कमी होऊं लागली आहे, तर इकडे सरकारनें दुसरा एक दलित वर्ग मोठ्या प्रमाणात निर्माण करण्याचा चंग बांधला आहे. हें काम धार्मिकच समजून मीं पत्करलें आहे.

आपल्यापुढें आज दोन कामें आहेत : १ इलाख्याची परिषद व २ आम्ही सर्वांनीं मिळून आपलें गाऱ्हाणें व निश्चित मत कळविण्याकरिता कौन्सिल-हॉलमध्यें व्यवस्थित-पणें जाऊन परत येणें. हें सर्व आजचे आजच व्हावयाचें आहे. आणि येवढ्या मोठ्या जमावाची नीट आवराआवर होऊन कार्यभाग निर्विघ्न पार पाडावयाचा असेल तर आम्हांपैकीं प्रत्येक लहानमोठ्यानें शांततेनें, शिस्तीनें व सहनशीलतेनें वागणें अत्यंत आवश्यक आहे. तशी मी आपल्यास कळकळीची विनंति करतों, आणि आजचें बिकट कार्य यशस्वी कराल अशी उमेद बाळगतों. परिषदेचें कामहि थोडक्यांत आटोपावयाचें

आहे. लांबलचक भाषणें, गहन विचार, आणि खटाटोपी वाद ह्यांची आजच्या परिषदेस जरूरी नाहीं, आणि त्यांस अवकाशहि नाहीं. बुद्धीची मगजमारी आणि वाणीचा विलास ह्या गोष्टी शेतकऱ्यांच्या आटोक्याबाहेरच्या आहेत. तथापि त्यांचें हित त्यांना त्यांच्या हितचिंतकांपेक्षां अधिक स्पष्ट आणि झटपट कळतें. आणि तें आज निर्णायकपणें व व्यवस्थितपणें सरकारास आणि योग्य अधिकाऱ्यांस स्वतः कळविण्याकरितां शेतकरी येथें जमले आहेत.

सुधारलेली म्हणविणारीं कांहीं थोडीं राष्ट्रें वगळल्यास जगावर कोठेंहि व केव्हांहि शेतकऱ्यांची स्थिति म्हणजे मागासलेली व केवळ दीनवाणी अशीच आढळून येते. परवां मीं एक सत्यशोधकी जलसा पाहिला. त्यात तमाशांतल्या अगदीं शिकून निघालेल्या बाळा पाटलानें खालील टाहो फोडला :—

"शेतकऱ्यांचा कुणी न्हाई वाली।
मुलाबाळांची—माझ्या बाळांची।
दशा कशी झाली! ॥ शेतकरी—ई—ई—अ!!"

हा हंबरडा ऐकून माझे काळीज जणूं छातीचें कपाट फोडून बाहेर उडून जातें की काय असें मला झालें! जगांतील एका अत्यंत बुद्धिवान्, संपत्तिवान् आणि पराक्रमी जातीच्या लोकांचें ह्या देशावर आज १०० वर वर्षें राज्य असून देशांतील $\frac{९}{१०}$ जनतेची ही केविलवाणी स्थिति असावी, आणि दकडे ह्या राज्यकर्त्यांच्या टेकडीवरील हवाशीर' राजवाड्यांत नानारंग तमाशे ह्यांची शोंद उडावी! धिक्कार असो ह्या राजनीतीला! डामडौल आणि ऐषआरामाचे बाबतीत इंग्रज-नवाबांनीं मोगल बादशहावरहि ताण केली अशी ओरड आमचे पुढारी आज कैक वर्षें करून करून थकले; आतां रॉलिन्सन नांवाच्या त्यांच्यांतल्याच एका नबाबाच्या हृदयाला पाझर फुटून त्यानें ह्या डामडौलाचा स्पष्ट निषेध इंग्लंडच्या लोकांपुढें केला आहे असें ऐकतो. तथापि हिंदुस्थानचे आम्ही ट्रस्टी आहोंत, अशा बाता इंग्लंडातले आणि येथें आलेले अधिकारी मारीत आहेत. ट्रस्टींचा हिंदुस्थानाला हा एक मोठा रोगच जडला आहे म्हणावयाचा. देवा! आमच्या ट्रस्टी-रोगापासून आमची लवकर मुक्तता कर अशी प्रार्थना करावयाची पाळी सर्व देशाला – विशेषतः शेतकऱ्याना – आज आली आहे. परंतु ह्या ट्रस्टींचे एकेक नवे नवेच विळखे आमचे गळ्याभोंवतीं बसत आहेत. ह्या ट्रस्टी-रोगानें आम्ही गेलीं शंभर वर्षें हैराण झालो असतां, गेल्या दहा वर्षांत मैत्री-रोग म्हणून एक नवीनच व्याधी ह्या भल्या ट्रस्टी-मंडळानें सुधारणेच्या नावाखालीं निर्माण केली आहे ती आम्हांला बेजार करीत आहे; आणि तेहि आमच्या सुधारणेच्या नांवाखालीं! परकीय ट्रस्टी आणि स्वकीय मैत्री ह्यांचा मिलाफ झाल्यामुळें आतां कांहीं धडगत नाहीं अशी हवालदील अवस्था झाली आहे. नोकरशाहीची पोलादी चौकट आधीच काय कमी बळकट होती? तिलाच तेल रोगण लावून ठाकठीक ठेवण्यास आम्ही आमचे प्रतिनिधी म्हणून निवडून पाठ-

विलेल्या भरंवशाच्या पुढाऱ्यांनीं मंत्रि-पदावरून सज्ज व्हावें, ही कोण आपत्ति! अशा स्थितींत शेतकऱ्यांना आकाश फाटल्यामारखें झाले असल्यास काय नवल!

हा देश म्हणजे शेतकऱ्यांचा. शेंकडा ८० हून जास्त लोकांचा निर्वाह केवळ शेतीवर चालतो. सिंध व मुंबई शहर ह्याशिवाय मुंबई इलाख्याची वट लोकसंख्या १,२१,७५,२०३ असून त्यांपैकीं शेतकरी व शेतकींचे मजूर ९९,७४,७४३ आहेत. *अज्ञान, दारिद्र्य आणि असहाय्यतेच्या गाळांत देशाचा $\frac{८३}{१००}$ भाग रुतला असतां* आम्ही थोडी शिकलेली दुबळी मडळी स्वराज्याच्या काय गप्पा मारीत बसलों आहोंत! इंग्रजी अमदानींत गिरण्या, गोद्या वगैरे मोठ्या भांडवलाचे धंदे सुरू झाल्यानें खेड्यांतील कसदार तरुणांचा ओघ शहराकडे वळला आहे. खेड्यांत आणि कसब्यांत लहान लहान भांडवलाचे मारवाडी, ब्राह्मणादि, पांढरपेशा जातीचे लोक अडाणी शेतकऱ्यांस *आपल्या सावकारी जाळ्यांत गुंतवून त्यांच्या जमिनींचे आपण न-कर्ते मालक होऊन* बसले आहेत. आणि शेतकरी वर्ग आपल्याच शेतावर खंडदार होण्याचीहि ऐपत न उरल्यामुळें मजूर बनत चालला आहे. सतत फसविला गेल्यामुळें त्याची स्वतःचीहि परंपरागत दानत आणि नीति बिघडून तो गावगुंड बनूं लागला आहे. मी गेल्या फेब्रुवारी महिन्याच्या सुमारास ऐन हंगामाच्या दिवसांत सांगली, जमखंडी संस्थानांतील *कृष्णातटाकावरील गांवें आणि खेड्यांतून एक महिना हिंडत होतो.* हा भाग पिकांविषयीं प्रसिद्ध आहे. परंतु खेडींच्या खेडी शेतकरी मालकांच्या ताब्यांतून स्वतः शेती न करणाऱ्या उपटसुंळ लोकांच्या ताब्यांत गेलेली पाहून माझें काळीज फाटलें. संस्थानांत शेतकऱ्यांच्या संरक्षणार्थ कायदे नाहींत. व्याजाची दामदुप्पटच नव्हे तर पांच सहापट झाली तरी नवीन दस्तऐवज करून ब्राह्मण मारवाडी सावकारांनी सबंध गांवचे गांव बळकावलेले मी प्रत्यक्ष पाहिले. कुलकर्णी, कारकून, मामलेदार, न्यायाधीश आणि शेवटीं स्वतः संस्थानचे मालक हे सर्व एकाच जातीचे. मग कोणाचा हात कोण धरणार? परंतु इकडे ब्रिटिश इलाख्यांत तरी स्थिति कितीशी बरी आहे? परवां मुलकी खात्यांतील *माझ्या एका बड्या अधिकारी मित्रानें पिकाची आणेवारी ठरविण्यांत कमिशनरापासून* तो खालीं भागकारकुनापर्यंत किती कठोर अन्यायाचा गोंधळ गाजत असतो, ह्याविषयीं अगदीं स्वानुभवानें वर्णन केलें, तें मला खरेंच वाटेना. तथापि सत्य त्याहूनहि काळेंकुट्ट असावें अशी भीति वाटते.

ह्याच्या उलट युरोप वगैरेंतील स्थिति पाहा. ह्या शतकाच्या आरंभीची दोन वर्षें *माझीं युरोपांत गेलीं. इंग्लंड हा मोठ्या जमीनदाराचा देश आहे. त्याच्या जमिनी कुळें* वाहतात. व्यापाराइतकें शेतीकडे इंग्रजांचें लक्ष नाहीं; तरी कुणबावा फार सुखी आणि संतुष्ट आहे. फ्रान्संत शेतीचा देखावा तर अगदीं पाहण्यालायक आहे. पेझंट प्रोप्रायटर्स म्हणजे लहान प्रमाणावर स्वतःची *शेती करणाऱ्यांची संख्या तेथें मोठी आहे.* त्यांचीं शेतें म्हणजे नमुनेदार बागाच मला दिसल्या. अर्थशास्त्र्याच नव्हे तर सौंदर्या-

च्या दृष्टीनेंहि फ्रेंच लोकांचे कृषिकर्म वाखाणण्यासारखें आहे. सावेपणा आणि सुखसमृद्धि मला हॉलंडसारख्या लहानग्या राष्ट्रांतहि मोठी आल्हादकारक दिसली. समुद्राखालच्या ह्या चिमुकल्या देशांतील कष्टाळु आणि निरुपद्रवी कुणब्यांच्या मुखावरून, बादशाहीचा बडिवार मिरविणाऱ्या हिंदुस्थान सरकारचें सिमल्याचें चकचकीत आणि नव्या दिल्लीचें भगभगीत वैभव ओवाळून टाकावें असें वाटलें !

येथवर लिहिल्यावर मी एकाएकी तापानें आजारी पडलों. ठरावांतील मुख्य मुख्य विषयांवर बराच विचार करण्यासारखा आहे; परंतु त्याविषयींची लहान लहान टिपणें लिहून कार्य भागवून घ्यावें लागत आहे.

आजच्या परिषदेपुढें मुख्य चारच ठराव यावयाचे आहेत. पहिला विषय जमीनविभागणीचा कायदा हा आहे. अशा स्वरूपाचा कायदा सरकारनें केव्हांहि मागें कोठेंहि आणला नव्हता. याचें स्वरूप क्रांतिकारक आहे. हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांना आपली जमीन म्हणजे जीव कीं प्राण वाटते. त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांच्या जमिनीकडे कोणीहि – फार तर काय प्रत्यक्ष बादशहानेंहि वाकड्या डोळ्यांनीं पाहिलेलें खपणार नाहीं. जमिनीसाठीं पाठच्या भावाचा खून देखील करतील; मग इतराची वाट काय ! भाऊबंदकीच्या वांटण्यांमुळे जमिनीचे फार लहान लहान तुकडे झाले आहेत आणि त्याला कांहींतरी प्रतिबंध असावा ही गोष्ट खरी आहे; पण हें कार्य सरकारनें स्वतः आपल्याच हेक्यानें न करतां लोकसंस्थांच्या द्वारें शेतकऱ्यांची समजूत घालून हळूहळू करून घेणें अवश्य आहे. कांहीं ठिकाणीं टेबलाएवढे तुकडे पडले आहेत, असें नामदार सी. व्ही. मेथा म्हणतात. नामदारांचें टेबल मोठें राक्षसी असलें पाहिजे. मोठ्या प्रमाणावर शेती असणें एका दृष्टीनें फायद्याचें असलें, तरी लहान लहान प्रमाणावर शेती करणारे पुष्कळ शेतकरी असणें हेंहि दुसऱ्या राष्ट्रीय दृष्टीनें अधिक हितावह आहे. मुंबईचा चालू संप इतके महिने टिकला त्याचें रहस्य काय असावें यावर मुंबईच्या 'टाइम्स'नें एक चाणाक्ष लेख नुकताच लिहिला होता. त्यांत ते म्हणतात कीं, मुंबईत आलेल्या मजुरांची देशावर स्वतःचीं लहान लहान शेतें असतात. त्यामुळें त्यांना संपाची भीति वाटत नाहीं. उलट इंग्लंडमध्यें असा आधार नसल्यामुळें महराज्याच रस्त्यावर त्यांना दीनवाणें पडून राहावें लागतें. मग सरकारचा हेतु हिंदुस्थानांतील शेतकरी मजुरांना इंग्लंडांतल्याप्रमाणेंच असहाय्य करावयाचा आहे काय ? तुकडे एकत्र करून मोठ्या प्रमाणावर पैदास्त करणें ही पाश्चात्यांची आसुरी कल्पना आहे. परंतु उत्पन्नाप्रमाणेंच त्याची विभागणी सर्व लोकांमध्यें न्यायानें व्हावी हाहि अर्थशास्त्राचा एक अधिक महत्त्वाचा भाग आहे. विभागणीशिवाय उत्पन्न हा एक राष्ट्रीय घोटाळा होय.

हें बिल केवळ एकदेशी आहे. लहान तुकड्याच्या मालकाकडून जमिनी घेऊन शेजारच्या तुकड्याला जुळवून त्याचें ठरविक प्रमाण वाढविणें, हा एक भाग झाला. असें करण्यांत पुष्कळांना आपल्या लहान लहान तुकड्यास मुकावें लागणार आहे. त्यांना

पैशाच्या रूपानें मोबदला देण्याच्या बाबतींत अन्याय व फसवाफसवी होण्याचा संभव आहे. रोख पैसे आले तरी ते कर्जबाजारी शेतकऱ्यांजवळ फार दिवस राहणें शक्य नाहीं. मुंबई सरकारच्या जमीनमहसूल खात्याच्या गेल्या वर्षांच्या रिपोर्टावरून खालील आकडे घेतले आहेत. त्यांवरून लहानमोठया तुकड्यांच्या प्रमाणाची तुलनात्मक कल्पना होण्यासारखी आहे :

| | १९१६–१७ | १९२१–२२ | १९२६–२७ |
|---|---|---|---|
| ५ एकरांखालील तुकडे | ३४२०८९ | ३५०४२८ | ३७५३०२ |
| १०० ते ५०० एकरांचे तुकडे | १२९४६ | १२८६१ | ११४१६ |
| ५०० एकरांच्या वरचे तुकडे | ४२८ | ४६९ | ३१८ |

## मध्यभाग

*तुकडे एकत्र करण्यासाठीं जर लहान लहान शेतकऱ्यांची जमीन* घ्यावयाची, तर त्यांना मोबदला पैशानें न देतां मोठमोठ्या तुकड्यांच्या मालकांकडून कांहीं भाग घेऊन तो त्या लहान शेतकऱ्याला देण्याची कां व्यवस्था नसावी ? अशी दुहेरी व्यवस्था झाल्यास पैशाचा मोबदला कोणासहि द्यावा न लागून जमिनींची नुसती अदलाबदल मात्र होणार आहे. असें करण्यांत अडचण जास्त येईल खरें; पण न्यायहि जास्त होईल. परंतु कोणतेंहि सरकार श्रीमंत लोकांचें मिंधेंच असणार. थोड्याशा लोकांच्या असंतोषापेक्षा पुष्कळांशा गरीबांवर जुलूम करणें सरकारला सोयीचें वाटत आहे. पण याचा परिणाम हानिकारक झाल्याशिवाय राहणार नाहीं. ह्या दुहेरी व्यवस्थेची सूचना केवळ काल्पनिक आहे असें नाहीं. इन्टर-नॅशनल इयर-बुक ऑफ ॲग्रिकल्चरल लेजिस्लेशन म्हणजे शेतकी कायद्याचें आंतरराष्ट्रीय एक वार्षिक-बुक सुमारें १००० पानांचें रोम येथें दरवर्षी प्रसिद्ध होत असतें. १९२६ च्या या पुस्तकांत स्वीडन आणि पोलंड या देशांत जमिनींची फेरव्यवस्था करण्याचे कायदे झालेले दिले आहेत. त्यांत ज्याप्रमाणें विभागलेल्या भागांचे एकीकरण करण्यासंबंधीं नियम आहेत, त्याचप्रमाणें मोठमोठ्या तुकड्यांची कांहीं विशिष्ट प्रकारच्या शेतकऱ्यांच्या फायद्यासाठीं विभागणी करण्याचेहि नियम आहेत. मात्र अशी व्यवस्था मालकाच्या समर्तीनें आणि तडजोडीनें होत असते. याच पुस्तकांत ज्यानमध्यें जमिनींचे लहान लहान तुकडे नवीन करण्याबद्दल व जुने असतील ते राखून ठेवण्याबद्दलहि कायदे झालेले आढळतात. तात्पर्य हें कीं, सामुदायिक हिताच्या दृष्टीनें लहान तुकड्यांच्या एकीकरणाप्रमाणेंच मोठ्या तुकड्यांची विभागणी हितावह ठरणार. परन्तु ही सर्व व्यवस्था मालकांच्या समतीनें करणें जरी अतिशय कठीण असलें तरी आवश्यक आहे. म्हणून सरकारनें हें काम आपण न करता परस्पर सहाय्यकारी मंडळ्या, लोकल बोर्डें आणि ग्रामपंचायतींच्या द्वारां कां करूं नये ?

साराबाढीचें जें दुसरें बिल आणलें आहे तें तर उघड उघड अन्यायानें व जुलमानें आहे. हल्लींचाच मारा देण्याचा त्राण शेतकरी लोकांत उरला नाहीं. त्यांत आणखी जबर भर करावयाची म्हणजे सरकारच्या निष्ठुरपणाची कमालच आहे. बॅकबे डेव्हलपमेंट, सक्कर बॅरेज, असलीं अत्यंत खर्चाचीं कामें काढल्यामुळें आणि तीं अत्यंत अंदाधुंदीनें चालविल्यामुळें मुंबई सरकारचें जवळ जवळ दिवाळें निघालें आहे! नोकरशाहीची तर नाचक्की झाली आहे! अशा वेळीं कोणीकडून तरी पैसा उकळण्याची सरकारला घाई झालेली असणार. म्हणून त्यानें गरीब व मुक्या प्रजेवर जुलूम करण्याचें धाडस चालविलें आहे. उपाशी मरणाऱ्या पोटाला तुडवून उपवास पाळला देण्याप्रमाणें हें सरकारचें कृत्य निंद्य आहे. म्हणून हें बिल तर विचारात सुद्धां घेण्याच्या लायकीचें नाहीं. विभागणी बिल हें रयतेच्या फायद्यासाठीं नसून पुढें वाढविला जाणारा सारा अधिक सोप्या रीतीनें वसूल केला जावा, म्हणून शेतकऱ्यांची संख्या कमी करण्याची सरकारची इच्छा आहे अशी कोणी साहजिक शंका घेईल. जमीन विभागणी व सारा-वाढ हीं जुळीं बिलें एकाच वेळीं निर्माण होतात, यावरून ही शंका जास्त दृढावते. जमीन-विभागणीचा विषय बराच जुना आहे हें खरें आहे. मि० कीटिंगसाहेब व दिवाणबहादुर गोडबोले यांनीं हा विषय पुढें आणलाच होता; पण त्या वेळेस सरकारला रयतेचा कळवळा आला नाहीं. आतां त्याचें दिवाळें निघून पैशाची हाव सुटली म्हणून रयतेची करुणा करण्याचें मिष करून त्यांनीं हें जोडबिल पुढें आणलें आहे. परंतु सरकारच्या दुर्दैवानें काळ फिरला आहे. मुकामुकी रयत त्यांना वश होण्याचे दिवस जात चालले. अप्रियतेची कमाल झाली असतां अशाच वेळीं हीं घातुक बिलें पुढें आणण्यापूर्वी सरकारनें विचार करावयास पाहिजे होता. सुधारणेचा दुसरा हप्ता प्रजेच्या पदरीं पडण्याची वेळ जवळ आली आहे. त्याचें काय होतें हें पाहून लोकांमध्यें आपल्या सद्हेतूंविषयीं अधिक विश्वास उत्पन्न करून मग असलीं बिलें सरकारनें आणणें अधिक शहाणपणाचें होईल.

जमिनीचे हक्कसंबंध हे फार पुरातन आणि पवित्र विषय आहेत. लोकांच्या धर्म-समजुतींत हात न घालण्याचा तिऱ्हाईतपणा जसा सरकारनें पाळला आहे तसाच जमिनीच्या हक्कासंबंधांतहि त्यांनी पाळावयास पाहिजे आहे. पण जेव्हां पैशाचा संबंध येतो तेव्हां सरकारचा तिऱ्हाईतपणा डळमळूं लागतो.. मासा, बिळें तोंपर्यंत बगळ्याचें ध्यान आणि पैसा दिसे तोंपर्यंत ब्रिटिश सरकारचा तिऱ्हाईतपणा! म्हणून केवळ फायद्या-तोट्याच्या दृष्टीनें नव्हे तर तत्त्वाच्या दृष्टीनें प्रजेनें सरकारला या बाबतींत मोठ्या जोराचा विरोध करणें अवश्य आहे.

बार्डोलीनें आपलें नांव इतिहासांत अजरामर केलें आहे. पण बार्डोलीचें रणकंदन कितीहि घोर असलें तरी पुढें जें याहूनहि मोठें रणकंदन माजणार आहे, त्याचा हा ओनामा आहे. आणि त्याचें श्रेय ब्रिटिश नोकरशाहीलाच आहे. तिनें जर

आपला असाच हट्ट कायम ठेवला, इजर्नीचें शिवाच्च असेंच चुगत राहिलें तर लवकरच मुंबई इलाखा म्हणजे मोठी आइर्लंडी बनेल. मग हल्लीं ज्याप्रमाणें मुंबईचे गव्हर्नर सिमल्यास गेले, तसे सिमल्याचे व्हाइसरॉय लंडनला जाऊनहि, भावी होम-कुंड शांत होणार नाहीं.

मुंबईचे गव्हर्नर सिमल्यास गेले, एवढ्याचवरून प्रजेला किंचित् आशा वाटूं लागली होती; परंतु *त्यात साहेबांनीं परवां कौन्सिलांतील आपल्या भाषणांतून जी* गर्जना केली त्यावरून नोकरशाहीची पोलादी चौकट किती कठीण आहे, हेंच त्यांनी उघड केलें. अशी निराशा करावयाची होती, तर त्यांनीं सिमल्यास जावयास नको होतें. सिमल्यास जाण्याचा भारी खर्च तरी वांचला असता. ब्रिटिश लष्करशाहीचें बळ हिंदुस्थानांतील शहरवासी सुशिक्षित दुबळ्यांना वेळोवेळीं माहीत झालेलेंच आहे. तें आतां यापुढें स्वेच्छाराज्यांतील उपासमारीनें गांजलेल्या कुणब्यांपुढें दाखविण्यांत येणार आहे काय? वल्लभभाईंचा सत्याग्रह आणखी वर्षभर जरी टिकला तरी तो अनत्याचारी असल्यामुळें नोकरशाहीच्या सुर्चीतील एखाद्या ढेकणाच्या जिवाल्राहि अपाय होणार नाहीं. परंतु गव्हर्नरसाहेबांच्या हुंकारांतील अर्थ खरोखर इष्टोत्पत्तीस येणार असेल, तर वाटलेल्या साऱ्यावरील हक्कच काय, पण रयतेला आपला जीवहि सोडावा लागेल असें दुश्चिन्ह दिसत आहे. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं अलीकडे जे सत्याग्रह करावे लागले ते सर्व अनत्याचारी होते. स्वतः आपल्यावर अत्याचार होत असतांनाहि एका महात्म्याचे बोलावर विश्वास ठेवून प्रजा अनत्याचारी सत्याग्रह करते हें सरकारास खपेना. मग काय, प्रजेनें महात्म्याचें न ऐकून अत्याचार करावा अशी त्याची इच्छा आहे? खोट्या लढाईची हूल उठवून सरकारनें सरहद्दीवर फितखाऊ लष्कर सज्ज केलें आहे त्याला कांहीं काम मिळावें म्हणून देशांत खोट्या अशांततेची हूल उठवून लष्कराचें समर्थन करण्याची ही एक नवी युक्ति काय?

एकीकडे धमकावणी तर दुसरीकडे भुलवणी सुरू झाली आहे. शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपॉल रा० ब० पी. सी. पाटील यांच्या सहीचें एक हस्तपत्रक नुकतेंच बाहेर आलें आहे. पाटीलसाहेब एक मराठ्यांचे लोकप्रिय पुढारी आहेत. म्हणून त्यांच्या हस्त-पत्रकाच्या हजारो प्रती शेतकऱ्यांमध्यें फुकट वाटण्यांत येत आहेत असें ऐकतों; पण सुदैवानें सक्तीचें शिक्षण अद्याप सुरू न झाल्यामुळें पाटीलसाहेबांचीं हस्तपत्रकें रद्दींत जाण्याचा संभव आहे! निबे व अँडरसन यांमधला शाब्दिक वाद जसा शहराचे वेशी-पलीकडे गेला नाहीं तसाच ह्या हस्तपत्रकांचीं भेंडोळीं खेड्यापर्यंत पोहोंचूनहि निरुपयोगी ठरतील. जेथें जगावें कीं मरावें हा प्रश्न आहे तेथें मराठी कुणब्यांना ह्या मोठ्या राव-बहादुरांचीहि भीड पडेल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. मात्र नोकराच्या हातून साप मारण्याची इंग्रजबहादुरांची युक्ति ध्यानांत घेण्यासारखी आहे.

बार्डोलीस वल्लभभाईंकडून एक दुसरें असह्य पाप (!) घडलें आहे. तें त्यांच्याकडून

प्रत्यक्ष घडलें असो किंवा त्यांच्या चळवळीमुळें घडलें असो, त्यामुळें वाढलेल्या साऱ्या-पेक्षा अधिक नुकसान झालें आहे. तें पाप म्हणजे बार्डोलीच्या शेतकऱ्यांमध्यें जागृति आणि एकी झाली; इतकेंच नव्हे तर बार्डोलीतल्या दारुड्याचीहि जागृति आणि एकी होऊन ताडीच्या गुत्त्यांचा लिलाव घेण्यास एकहि मनुष्य पुढें आला नाहीं आणि दारूच्या गुत्त्यांची तीव्र स्थिति होण्याचा संभव आहे. इंग्रज सरकारच्या महसुलाचीं काळीच्या (शेतीच्या) उत्पन्नाच्या खालोखाल लालीचें (दारूचें) उत्पन्न आहे. आणि हीं दोन्ही उत्पन्नें बहुजनसमाजांतूनच त्यांना मिळतात. अशा वेळीं त्याचे डोळे उघडणें म्हणजे इंग्रजांचे डोळे मिटण्याची पाळी येईल अशी खोटी धास्ती नोकरशाहीनें घेतली आहे. म्हणून नोकरशाहीच्या आरोळ्यांवर विश्वास न टाकतां ब्रिटिश पार्लमेंटनें बहुजन-समाजास अधिक अनुकूल आणि जबाबदार अशी कांहीतरी नवीन घटना करावी; नाहीं तर वेळोवेळीं अशा वावटळी उठून हिंदुस्थानांतील भौतिक आणि नैतिक शांतीचाहि भंग होईल.

मागील अनुभवांवरून पाहतांना ब्रिटिश नोकरशाही आपलाच हेका चालवून हीं दोन्ही बिलें कदाचित् पास करून घेईल अशी भीति आहे. त्याला उपाय काय करावा ?

याचा विचार आजच्याच सभेंत झाला पाहिजे. आज जो जिल्ह्यापाड्यांतून आलेल्या शेतकऱ्यांचा जमाव जमला आहे आणि सर्व पुढाऱ्यांचा त्यांना एकमतानें पाठिंबा आहे, या सर्व प्रयत्नांची जर आजच समाप्ती होईल तर हा सर्व प्रकार म्हणजे एक वाऱ्याची लाट उठून ओसरून गेल्याप्रमाणें होईल. तसें न व्हावें म्हणून आजच्या ठरावानुरूप अखेर पूर्ण न्याय मिळेल व असल्या वावटळी पुन्हा कधीं उठणार नाहींत अशी तरतूद करण्यासाठीं एक कायमची कमिटी या परिषदेनें नेमावी अशी माझी आग्रहाची विनंति आहे. बार्डोलीप्रमाणें महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांतहि निरडक तालुके शोधून वेळ पडल्यास सत्याग्रहाची मेढ रोवावी लागेल. 'सत्याग्रह म्हणजे नुसता तोंडचा शब्द नव्हे. ती कृति आहे आणि तिच्यासाठीं अगणित आहुत्या द्याव्या लागतील. दुर्दैवानें हा सत्याग्रह करावाच लागला तर तो महात्मा गांधी यांच्या सल्ल्यानें आणि त्यांच्या प्रत्यक्ष नेतृत्वाखालींच पूर्ण सुरक्षितपणाचें होईल. सत्याग्रहाची महात्मा गांधींची दृष्टि आणि भगवद्गीतेंतील क्षत्रिय कर्मयोग यांत फरक आहे. हिंदु राष्ट्रानें काळवेळ ओळखून हल्लीं तरी गीतेपेक्षां गांधींचेच अनुयायी बनणें हितावह होईल. म्हणजे सत्याग्रह हा पूर्ण अनत्याचारीच ठेवावा लागेल. गीता हे एक पुरातन ध्येय आणि महात्मा हा आजकालचा चालता बोलता साधुश्रेष्ठ एक ऋषि ! त्यांच्यात हेळसांड सर्वांनीं आपसांतील भेद विसरून झटावें हें बरें.

# २३

## प्रांतिक सामाजिक परिषद, सातारा

या परिषदेचें अध्यक्षस्थान देऊन आपण जो माझा बहुमान केला त्याबद्दल मी जरी आपला फार आभारी असलों तरी या मानाकरितां स्वभावप्रवृत्तीमुळें मी अयोग्य व असमर्थ असताहि आपण त्याकरितां माझीच निवड कां करावी असा प्रश्न माझ्यापुढें उभा राहिल्याशिवाय राहात नाहीं. मी विद्वान नाहीं किंवा व्यवहारांत मोठा धूर्तहि नाहीं, यामुळें राष्ट्रोद्धाराच्या कार्यांतील गाजावाजा न करता येण्यासारखा जो भाग, म्हणजे ब्राह्मसमाजाच्या मतांचा पुरस्कार व अस्पृश्य वर्गांची सेवा, तोच मीं स्वीकारला आहे. हल्लीं अस्पृश्योद्धाराबद्दल जरी पुष्कळ गाजावाजा केला जात असला तरी या कार्याची खरी कळ राष्ट्राच्या अंतःकरणास जाऊन झोंबलेली नाहीं असें म्हणणें मला भाग आहे. यामुळें आपण माझ्यापेक्षां अधिक लोकप्रिय व अर्थात अधिक वजनदार अशा पुढाऱ्यास हा मान दिला असता तर बरें झालें असतें. आपली सूचना मला फार उशीरां व अत्यंत अनपेक्षित रीतीनें आली; व ती विनंति नसून सत्कार्यप्रीत्यर्थ करण्यांत आलेली आज्ञा आहे, आणि जर मीं ती नाकारली तर माझ्या हातून कर्तव्यच्युति होईल असें मला वाटलें. हें अध्यक्षपद स्वीकारण्यांत माझ्याकडून जो अतिक्रम झाला आहे त्याबद्दल यांकडे पाहून आपण क्षमा करावी अशी माझी विनंति आहे.

## समाजसुधारणा यशस्वी कां होत नाहीं ?

गेल्या आठवड्यांत ज्या वेळीं आपल्या स्वागत मंडळाकडून मला विनंति करण्यांत आली त्या वेळीं माझी प्रकृति बरीच अस्वस्थ होती; यामुळें मी मोठें भाषण करीन अशी अपेक्षा आपण करूं नये. शिवाय समाजसुधारणेच्या विषयावर मोठें वक्तृत्वपूर्ण भाषण करण्याची आवश्यकता आहे असें कोठेंहि व केव्हांहि घडलेलें नाहीं. परिषदांमधून आपण भाषणें करण्यापलीकडे आपणांस कांहीं करतां येत नाहीं हें खरें, परन्तु भाषणें, चर्चा किंवा ठराव यांच्या पाठीमागें कांहीं तरी भरीव असण्याचें परिषद हें एक दृश्य चिन्ह आहे हेंहि तितकेंच खरें आहे. आणि हें कांहीं तरी म्हणजे प्रत्यक्ष कृति हें होय. आपण हल्लीं प्रगतीच्या युगांत आहोंत; आणि कशाहि अडचणींच्या काळांतून चिकाटीनें व शांतपणें मार्ग काढणाऱ्या, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक व विशेषतः धार्मिक संस्था यांच्या योगानेंच राष्ट्राच्या प्रगतीस खरें सामर्थ्य प्राप्त होत असतें. आमच्या परिषदा या प्रकारच्या संस्थांच्या केवळ मखलाशीस अशा असावयास पाहिजेत; अशा संस्था जर अस्तित्वांत नसतील तर नुसत्या परिषदा नसलेल्याच बऱ्या. पाठीमागें विधायक कार्य करणाऱ्या संस्था नसतांना भरविल्या जाणाऱ्या परिषदा ह्या नुसत्या आवाज करणाऱ्या घटामारख्या किंवा पर्जन्यविरहीत वावटळीसारख्या विफळ होऊन त्यांच्या योगानें सार्वजनिक शांततेचा मात्र भंग होत असतो ! ज्याप्रमाणें एखाद्या यंत्रांत फाजील ताण पडूं नये म्हणून यांत्रिक योजना केलेली असते त्याप्रमाणें राष्ट्रीय सद्-सद्विवेक बुद्धीवर पडणारा ताण कमी करण्याचा आभास उत्पन्न करण्याचें काम अशा प्रकारच्या परिषदा आजहि करीत असतात. कोणी म्हणतात कीं राष्ट्रीय सदसद्विवेक बुद्धि निर्माण करण्याचें कार्य अशा परिषदांकडून होत असतें. कांहीं काळपर्यंत तसें कदाचित् होत असेल. परंतु हल्लीं मात्र अशा तऱ्हेची सदसद्विवेक बुद्धि निर्माण होण्या-ऐवजीं तिची तीव्रता कमी करण्याचें व ती अजिबात नाहींसे करण्याचें कार्य अशा परिषदांकडून होत आहे.

त्याखेरीज निरनिराळ्या परिषदांतून व राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांतून, इतकेंच नव्हे तर ज्यांचें अस्तित्व केवळ मतदाराच्या सतुष्टपणावर अवलंबून आहे अशा कायदे कौन्सिलांतून सुद्धा इतके ठराव एकमतानें मंजूर होत असतां व त्यांचा वारंवार पुनरुच्चार केला जात असतांहि ते जितक्या लीलेनें पास होतात तितक्याच लीलेनें विसरलेहि जातात या गोष्टीची सगनी लावतांच येणार नाहीं. उदाहरणार्थ, सक्तीचें प्राथमिक शिक्षण व सार्वजनिक जागांमधून अस्पृश्यतेचें उच्चाटण या दोन बाबतींकडेंच पाहा, म्हणजे एखादा कायदा अगर वटहुकूम करून तो धूळ खात पडूं देणें हें प्रत्यक्ष दुष्कृत्य करण्याहूनहि कसें वाईट आहे हें दिसून येईल. कारण, दुष्कृत्यामुळें निदान विरोध तरी उत्पन्न होतो परन्तु असल्या विफल कायद्यामुळें अगर हुकुमामुळें दुसऱ्या

अंतःकरणांत वाटणाऱ्या संवेदना नष्ट होण्याचें कार्य मात्र हमखास घडतें. जर सतत तीन वर्षे करतां येईल तरच तरी निदान प्रत्यक्ष कार्य आपणापुढें आंखतां येण्याजोगें आहे असें जर आपणांस सिद्ध करतां येण्याजोगें असेल तरच आपण परिषदेची बैठक भरविण्याच्या भरीस पडावें, एरवीं परिषद भरवून नयेत हें इष्ट आहे. आणि जर समाजसुधारणेस लोकप्रियता व वजन कशामुळें प्राप्त होणार असेल तर तें यामुळेंच होईल असें माझें नम्र मत आहे.

## सामाजिक सुधारणेचा व्यापक अर्थ

सामाजिक सुधारणेच्या कार्याचें पाऊल जितक्या जोरानें पुढें पडावयास पाहिजे तितकें न पडण्याचें दुसरें कारण असें कीं सामाजिक सुधारणा या शब्दाची व्याप्ति अद्यापहि अगदीं मर्यादित समजली जाते हें होय. सामाजिक सुधारणा म्हणजे जुन्या कर्मठ धार्मिक भावना व जुन्या रूढी यांचेविरुद्ध चाललेला झगडा आहे एवढें सांगितल्यानें त्या शब्दांची निम्मीअर्धीहि व्याप्ति सांगितल्यासारखें होत नाहीं. अफाट हिंदु समाजाच्या सामाजिक पुनर्घटनेच्या विस्तृत प्रश्नांपैकीं बराच मोठा भाग धार्मिक भावना अगर सामाजिक दुर्जविरोधांच्या भावना यांशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नसलेला असा आहे. त्याचें आर्थिक दृष्ट्या आणि इतर दृष्टीनेंहि महत्त्व आहे. पाश्चात्य देशांमध्यें सामाजिक प्रश्नाचा व्यापक दृष्टीनेंच विचार करण्यांत येतो. आणि त्यामुळेंच त्या देशांतून सामाजिक सुधारणेस फारसा विरोधहि होत नाहीं; आणि सर्व देशाची सहानुभूति व साहाय्य थोडक्याच अवधींत कोणत्याहि सामाजिक सुधारणेच्या कार्यास मिळू शकतें. उलटपक्षीं आमच्या देशांत मात्र गेल्या दोन पिढ्यांमध्यें सामाजिक सुधारणा म्हणजे एका बाजूस इंग्रजी शिक्षण मिळालेले सुबुद्ध व उत्साही पण विशिष्ट कार्यक्षेत्र व धोरण ठरवून अनुयायांना निश्चित दिशा लावण्यास समर्थ नसलेले थोडेसे सुशिक्षित व दुसऱ्या बाजूस बहुतेक सर्व देश ( विशिष्ट वर्ग व बहुजनसमाजसुद्धां ) यांच्यामधील असमान झगडा असा अर्थ होऊन बसलेला आहे आणि हा बहुजनसमाज ज्याना राष्ट्रीय हिताची व्यापक दृष्टि नाहीं अशा शास्त्री-पंडितांच्या धोरणानें केव्हां केव्हां चालत असला तरी वस्तुतः *कार्यविन्मुखता व शिथिलता यांचाच पगडा पुष्कळ वेळा त्यांच्या मनावर बसलेला* असतो, व त्या योगानेंच आमचें राष्ट्र मागासलेलें राहिलेलें आहे. याकरितां सामाजिक सुधारणा या शब्दाच्या अर्थाची व तिच्या कार्यक्षेत्राची व्याप्ति वाढविण्याची वेळ *आलेली आहे. अशा तऱ्हेची व्याप्ति वाढविण्याच्या कार्यास सुरवात झालेली आहे* हें नमूद करण्यास मला संतोष वाटतो. कांहीं थोड्या दिवसापूर्वी आमच्यामधील सार्वजनिक कार्यकर्त्यांमध्यें 'सामाजिक सुधारणा आधीं कीं राजकीय सुधारणा आधीं' असा एक *अर्थशून्य वाद चालू होता; जणूं कांहीं या दोन महत्त्वाच्या व परस्परमिश्र अंगांपैकीं प्रथम*

एकाचा परिपोष करतां येऊन नंतर दुसऱ्याचा करतां येणेंच शक्य आहे! परंतु कालांतरानें ही वृत्ति आतां पालटली असून कट्टर राजकीय सुधारणावादी व कर्मठ व रूढ धार्मिक मतांचे कट्टे अभिमानी हेहि थोड्याफार स्वखुषीनें सामाजिक सुधारणेच्या कार्यांची उपासना करण्यांत गढून गेलेले दिसत आहेत; त्याचप्रमाणें समाजसुधारक म्हणविणारे लोकहि जुन्या कर्मठ वृत्तीच्या विचारांची कोंडी कशी फोडावी एवढ्यापुरतीच पहिली संकुचित वृत्ति न ठेवतां खेडेगांवांतील आरोग्यसंवर्धन, शहरांतील मजूर वर्गाची सुधारणा, शिशुसंगोपन, वगैरे समाजसुधारणेच्या इतर बाबींचा अगत्यानें पुरस्कार करूं लागलेले आहेत.

## ध्येयात्मक प्रयत्नांतील ऐक्य

परंतु समाजसुधारणेचें कार्य आमच्या देशांत जे इतक्या सावकाशीनें व अल्पप्रमाणांत प्रगति करीत आहे, त्याच्या आणखी एका कारणाचा, (व माझ्यामतें सर्वांत महत्त्वाच्या अशा कारणाचा) अद्यापहि उल्लेख करावयाचा आहे. आणि तें म्हणजे शुद्ध सामाजिक सुधारणेचें म्हणविलें जाणारें कार्य अद्यापहि बुद्धिपुरस्सर धर्मापासून अलिप्त ठेविलें आहे हें होय. कै. आगरकरांसारखे जुन्या परंपरेंतील समाजसुधारक या कार्याची उभारणी अद्यापहि उपयुक्ततावाद, युक्तिवाद, भूतदया वगैरे दुसऱ्या कोणत्याहि तत्त्वावर करण्यास तयार असतात; पण धार्मिक मनोवृत्तीच्या पायावर मात्र उभारण्यास तयार नाहींत. त्यांना एक तर अशा प्रकारच्या धार्मिक मनोवृत्ति नसतात किंवा असल्या तरीहि त्यांचा उपयोग करण्याची त्यांची प्रवृत्ति नसते आणि अशा तऱ्हेची ही धर्मविन्मुख प्रवृत्ति समाजसुधारकांमध्यें असावी ही अगदीं दुर्दैवाची गोष्ट आहे इतके तरी निदान म्हटल्यावाचून माझ्याच्यानें राहवत नाहीं. या धार्मिक औदासिन्यामध्यें हल्लींच्या काळच्या परिस्थितीचा आपणास दुजोरा आहे अशी कदाचित् त्यांची समजूत दिसते. फ्रान्सांतील मोठ्या राज्यक्रांतींतील प्रमुख पुढारी धर्मविन्मुखवृत्तीचे होते, तसेंच रशियन राज्यक्रांतींतील पुढारीहि असेच धर्मविन्मुखवृत्तीचे होते, इतकें कीं त्यांतील कांहीजणांना तर धर्मासंबंधीं वावडें होतें. युरोप व अमेरिका खंडांमध्यें सामाजिक सुधारणा (Socialism) म्हणून जें कार्यतंत्र उद्भविलें आहे त्यानें पुरस्कर्ते ज्या तत्त्वावर काम करतात त्यांत धार्मिक वृत्तीचा अंशहि नाहीं. आणि अगदीं जवळचें उदाहरण घेऊनच बोलायचें म्हटलें तर केवळ धार्मिक बाबतींतील तटस्थवृत्तीमुळेंच इंग्रज लोकांना हिंदुस्थानांत पाय रोवतां येऊन आपलें वर्चस्व राखतां आलें. त्याचप्रमाणें केवळ हिंदुस्थानांतीलच नव्हे तर सर्व सुधारलेल्या देशांतील सार्वजनिक शिक्षणपद्धति मुख्यतः धार्मिक तटस्थवृत्तीच्या पायावरच उभारलेली आहे. अशा प्रकारच्या परिस्थितीमध्यें वावरल्यामुळेंच आजकालच्या सर्वसाधारण समाजसुधारकांना आपल्या धोरणांत व

वृत्तीस दुजारा अमच्यासारखे वाटतें हें खरें. पण उलटपक्षीं ज्या हिंदु धर्माची त्याच्या शुद्धतेबद्दल, सनातनत्वाबद्दल व संग्राहकत्वाबद्दल पूर्वीच्या काळीं इतकी ख्याति होती त्याच्याच आजकालच्या लाकडी सांपळ्यांत हल्लीं समाजसुधारकांचा समावेश करण्याइतकी व्यापकता व संग्राहकवृत्ति नसल्यामुळेंच त्यांची अशा प्रकारची मनोवृत्ति होण्यास मदत होत आहे. परंतु सामाजिक सुधारणा व राजकीय सुधारणा यांच्यामध्ये साहचर्य नाहीं हें म्हणणें जसें पोकळ व अर्थशून्य आहे असें वर सांगितलें त्याचप्रमाणे समाजसुधारणा व धर्माच्या आद्य तत्त्वांचें आचरण यांजमध्ये साहचर्य नाहीं असें म्हणणेंहि तितकेंच भ्रामक आहे असें माझें ठाम मत आहे; मग आपण त्याला किती मान द्यावयाचा असेल तो द्या. वस्तुतः आमच्यासारख्या भावनामय लोकांच्या बाबतींत तर अशा तऱ्हेच्या भ्रामकपणास मुळींच जागा नाहीं. सर्व प्रकारच्या भावनामय चळवळी या आध्यात्मिक चळवळी असतात; आपण कोठूनहि सुरवात करा, शेवटीं एकाच उगमापाशीं जाऊन पोहोंचतो; आणि तो उगम म्हणजे आध्यात्मिक होय. मी ब्राह्मो समाजाच्या तत्त्वावरील आपल्या अलीकडील व्याख्यानांत महात्मा गांधी यांना हिंदुस्थानांतील नवयुगाचे जनक जे राजा राममोहन राय त्यांचे नवीन अवतार म्हणून संबोधीत असतों. करितां आपण राजा राममोहन राय व महात्मा गांधी यांचें चारित्र्य व कार्य यांकडे दृष्टि द्या म्हणजे माझ्या विधानांतील भावार्थ आपल्या बरोबर लक्षांत येईल. राजा राममोहन राय यांनी धर्मापासून सुरवात करून शेवटीं व्यवहार्य धर्माचें सार जें उच्च राजकारण त्यामध्ये आपल्या कार्यक्षेत्राचा शेवट केला; उलटपक्षीं महात्मा गांधींनीं प्रथम राजकारणाच्या प्रवाहांत उडी घातली पण शेवटीं ते प्रस्तुत काळांतील जो उच्चतम धर्म त्याच्या कटेस लागलेले आहेत. ध्येयात्मक प्रयत्नांचें अशा प्रकारचें ऐक्य आहे. या ऐक्याच्या योगानें आमच्या सुधारकांची सुधारणा होऊन व त्यांच्या ध्येयास अधिक उत्कटता प्राप्त होऊन शक्य तितक्या लवकर त्यांच्या प्रयत्नांना यशाचें सुमधुर फल लाभो एवढीच माझी प्रार्थना आहे!

## तपशिलाचें वर्गीकरण

वरीलप्रमाणे व्यापक विचारसरणीची मांडणी झाल्यावर आपणापुढील कार्याच्या महत्त्वाच्या व तातडीच्या तपशिलाकडे आपण दृष्टि वळवूं या. खुलाशाच्या सोयीसरिता व त्याचें महत्त्व योग्य रीतीनें अजमावतां यावें म्हणून सदर तपशिलाच्या बाबींचें खालीलप्रमाणें वर्गीकरण तर्कशास्त्रदृष्ट्या करतां येईल. पहिला आणि विशेष अगत्याचा वर्ग म्हटला म्हणजे पुनर्घटनेच्या बाबींचा होय. त्यामध्यें अस्पृश्यतानिवारण, ब्राह्मणेतरांचा असंतोष, हिंदुमुसलमानांचें ऐक्य व हिंदु संघटन यांचा समावेश होतो. या बाबी निरनिराळ्या व परस्पर भिन्न आहेत असा पुष्कळ लोकांचा एक भ्रामसमज आहे.

वस्तुतः बृहत् हिंदु समाजास जडलेल्या एकाच अंतर्गत रोगाची हीं भिन्न भिन्न लक्षणें आहेत; किंबहुना, जरी त्यांच्या तीव्रतेच्या निरनिराळ्या परी असल्या तरी त्यांच्या योगानें त्या रोगाचें जुनाट स्वरूपच व्यक्त होत असतें हें निश्चित आहे. हिंदु समाजाच्या अंतरक्रियामध्यें एकसारखा बिघाड होण्याची अशी एक हट्टी प्रवृत्ति दिसून येते कीं त्याच्या योगानें केव्हां केव्हा नकळतहि एक प्रकारचा कृत्रिम ताठरपणा एकसारखा चालू राहिलेला असतो. हिंदुस्थानची ही व्याधि अशी कांहीं विचित्र आहे की कोणाहि समाजशास्त्रवेत्त्याला तिचें निदानहि करतां आलें नाहीं. मग उपाययोजना करणें तर दूरच राहिलें! श्रीशंकराचार्यांच्या अद्वैतवादासारखीं मोठमोठीं ध्येयेंच काय पण भगवान-बुद्धाच्या भूतान्वेषी प्रयत्नांनासुद्धां या व्याधीनें दाद दिलेली नाहीं. भरतखंडामध्यें जीं हीं बेकीचीं व फुटीचीं बीजें रुजली आहेत त्यांचा खुलासा वर्णवैचित्र्य, धर्मवैचित्र्य किंवा संस्कृतीभिन्नता यांच्या योगानें समाधानकारक रीतीनें करतां येत नाहीं. कारण हिंदुस्थान-च्या पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे असणाऱ्या कितीतरी देशांत अशा तऱ्हेचें वैचित्र्य दिसून येत असतें, परंतु हिंदुस्थानप्रमाणें त्या देशात अस्वाभाविक असे सामाजिक भेद किंवा पोटभेद आपल्या कल्पनातीत संख्याधिक्याच्या योगानें कोणास घाबरून सोडीत नाहींत. काल्पनिक भेद काढून त्यांना केवळ खासगी व्यवहारांतच नव्हे तर सार्वजनिक व्यवहारां-मध्येंसुद्धां उच्च दर्जाचें राजकारण व चारित्र्याचें पावित्र्य यांच्या वर स्थान देण्याची जी हिंदी जनतेच्या मनोवृत्तींना स्वयंस्फुरित संवय आहे, तीच हिंदुस्थानला विशिष्ट असलेली अशी मानसिक व्याधि होय. या व्याधीचें प्रत्यक्ष व महत्त्वाचें लक्षण म्हणजे सांप्रदायिक अस्पृश्यता हें होय.

## सांप्रदायिक अस्पृश्यता

या विशिष्ट प्रकारच्या अन्यायाला जे बळी पडलेले आहेत, त्यांच्यामध्यें याबद्दलची जी जाणीव व जागृति उत्पन्न व्हावयास पाहिजे, ती उत्पन्न करण्याचें प्राथमिक काम बहुतेक यापूर्वीच होऊन चुकलें आहे. आतां आम्हांस सोडवावयाचा बिकट प्रश्न विचारप्रांतांतला नसून तो इच्छाप्रांतांतला आहे. आतां यापुढें या प्रश्नाचा आणखी ऊहापोह व्हावयास पाहिजे असा त्याला प्रकार नाहीं. पण आमच्या विचाराचें प्रत्यक्ष कृतींत रूपांतर कसें व्हावें हाच काय तो प्रश्न आहे. यासंबंधींचे आमचे विचार जरीहि पूर्णत्वास पोंचले, तथापि त्यांच्या योगानें आमच्या हातून प्रत्यक्ष कृति घडण्यास जी इच्छाशक्ति अवश्य आहे, ती आमच्यांत प्रादुर्भूत होईल असें म्हणवत नाहीं. या-संबंधानें विचार करता अत्यंत दुर्दैवाची गोष्ट ही कीं लाला लजपतराय यांच्यासारख्या प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं भरलेल्या हिंदु सभेनेंहि हा प्रश्न निर्णयाकरतां अजूनहि शास्त्री-पंडितांकडे सोपविण्यांत यावा. या प्रश्नाच्या निर्णयाला जर कोणी अगदीं

नालायक असेल, तर ते हे शास्त्री-पंडितच होत. यांच्या अंगचा मोठा गुण म्हटला म्हणजे यांची विद्वत्ता. पण हा प्रश्न तर पडला अत्यंत निकडीच्या व्यवहारांतला. तेथें नुसती विद्वत्ता काय कामाची ? शिवाय अशा प्रश्नांचा निर्णय करण्यास जी निःपक्षपात बुद्धि असावयास पाहिजे ती त्यांच्या अंगीं असणें शक्य नाहीं. त्यांच्या पोथिंयांच्या पसंतीवर त्यांची सारी भिस्त असणार. दुसरें सांप्रतचीं कायदेकानूनचीं पुस्तकें वेगळीं व ज्यांच्यावर या शास्त्रीपंडितांची सारी मदार ते स्मृत्यादि ग्रंथ वेगळे. हे स्मृत्यादि ग्रंथ म्हटले म्हणजे त्या प्राचीन काळीं जे जे प्रघात अथवा रूढी प्रचारांत असतां त्यांच्या नोंदीचीं पुस्तकें अथवा पोथ्या. त्यांचा अर्वाचीन कालच्या गुंतागुंतीच्या प्रश्नांच्या उलगड्यास उपयोग होण्याचा संभव बहुतेक थोडाच असणार. शेवटची मुद्द्याची गोष्ट ही कीं, या दुर्दैवी अस्पृश्य वर्गाविषयीं यांना बिलकूल सहानभूति नसून उलट आपले अभिप्राय त्यांना प्रतिकूल असल्याचें त्यांनीं स्पष्टपणें बोलूनहि दाखविलें आहे. अर्वाचीन कालचीं न्यायासनें निःपक्षपाती म्हणतात, पण तेथेंहि पाहावें तों न्यायाधिशाचा कल अनुकूल असल्याची शंका आल्यामुळें खटला वर्ग केल्याचीं उदाहरणें घडून आलेली आहेत. मी विचारतों कीं हा अस्पृश्यांचा प्रश्न जर शास्त्री-पंडितांकडे सोंपवावयाचा तर, पतितपरावर्तन, हिंदुमुसलमानांतील एकी, हिंदूंची संघटना इत्यादि प्रश्नहि त्यांच्याकडेच निर्णयाकरितां कां सोपवूं नयेत ? आपला इतका छळ होत असूनहि आपल्याला आदि हिंदु म्हणवून हिंदु धर्माविषयीं जे आपला आवलेपणा जे जाहीर करीत आहेत, त्यांना निदान ख्रिस्ती वगैरे अन्यधर्माचा आश्रय करणाऱ्यांच्या बरोबरीनें वागविणें हें आपलें कर्तव्य आहे, इतकेंहि हिंदु सभेला वाटूं नये काय ? धर्मांतर केलेले आणि हिंदु आणि आपणास अद्याप हिंदु म्हणविणारे आदि हिंदु यांच्या बाबतींत असा भेदाभेद कां करावा ? तात्पर्य, या सर्व प्रकारचें मूळ शोधूं गेल्यास, त्या बाबतींत आमच्या अंतःकरणांत उत्कट इच्छेचा पूर्ण अभाव आहे हेंच कबूल करावें लागेल.

गुलामांचा व्यापार, सतीची अमानुष चाल वगैरे बंद करण्याच्या कामीं जसें कायद्याचें साह्य मिळालें, तसेंच याहि बाबतींत मिळवूं म्हटलें, तर तेंहि मनु बहुतेक पालटल्यासारखा दिसतो. इतकेंच नाहीं, तर वायकोम येथें घडलेला प्रकार मनांत आणतां कायद्याकडून नको त्या पक्षालाच साह्य मिळूं पाहात आहे. अशा स्थितींत अन्यायाला नाहक बळी पडत असलेला हा अस्पृश्यवर्ग व त्याचे प्रतिपक्षी यांच्यांतील लढा, ' बळी तो कान पिळी ' या न्यायानुसार नुसत्या परस्परांच्या बाहुबलाच्या उणे-अधिकपणावरच निकालांत लावण्याचा प्रसंग आम्हीं येऊं देणार काय ?

### ब्राह्मणेतरांचा प्रश्न

या प्रश्नाचा विचार करतांना ब्राह्मणेतर पक्षाचे मद्रासचे प्रसिद्ध पुढारी व नायक सर त्यागराज चेट्टीआर यांच्या निधनानें कधींहि न भरून येणारें त्या पक्षाचें जे नुकसान झालें आहे,

त्याचा प्रथम निर्देश करणें हें माझें दुःखद कर्तव्य होय. हा ब्राह्मणेतरांचा प्रश्न कित्येकांना जसा अगदीं नवीन वाटतो, तसा तो मला वाटत नाहीं. हिंदुस्थानच्या इतिहासांत या ब्राह्मणेतरांचें अस्तित्व ब्राह्मणांइतकेंच प्राचीन आहे. यांत कांहीं नवीन असलें तर तें इतकेंच कीं, आतां ब्राह्मणेतरांनी ब्राह्मणांविरुद्ध जशी जूट झालेली दिसते, तशी ती पूर्वी नसे. बाकी ब्राह्मणेतरांच्या ब्राह्मणांविरुद्ध तक्रारी या वास्तविक नवीन नसून जुन्याच आहेत. ही जूट सर्व हिंदुस्थानभर अधिकाधिक पसरतच जात आहे, हें लपवून ठेवण्यांतहि मला हंशील दिसत नाहीं. याला जबाबदार कोण? हा प्रश्न कांहींसा उद्वेगकारी असून तो विचारण्याचा माझ्या मतें कालहि निघून गेलेला आहे. मला वाटतें कीं, ध्वनि आणि प्रतिध्वनि यांचा जो परस्पर संबंध असतो, तोच हिंदु समाजांत ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांच्यांत आहे. या बाबतींत ब्राह्मण वर्ग जोंपर्यंत पूर्वीसारखाच ताठ राहील, तोंपर्यंत ब्राह्मणेतर वर्गानें तेवढा आपला ताठा सोडावा, हे म्हणणें व्यर्थ आहे. मध्यस्थ अथवा तटस्थ या नात्यानें ब्राह्मणांनीं सार्वजनिक कामांतून काढता पाय घ्यावा असें मीं म्हणूंहि नये व तसें म्हणण्याचा मला अधिकारहि नाहीं. परंतु राजकीय महत्त्वाकांक्षेच्या पटांगणात आपल्या ब्राह्मणेतर खेळाडूंचें स्वागत करण्यास या स्वयंनिर्णयाच्या मनूंत ब्राह्मणांनी पुढें येणें इष्ट नाहीं काय? असें मला त्यांना विचारण्यास हरकत दिसत नाहीं. खऱ्या व अंतिम एकीच्या मार्गांत अशा प्रकारचें बहुविधत्व म्हणजे एखादें संकटच मानलें पाहिजे असें नाहीं. परंतु सामाजिक परिषदेच्या या अध्यक्षपीठावरून या प्रश्नांच्या राजकीय स्वरूपासंबंधानें मला याहून अधिक बोलण्याचें कारण नाहीं. या प्रश्नाला जशी राजकीय बाजू आहे, त्याचप्रमाणें विशेषतः या महाराष्ट्र प्रांतांत सामाजिक अथवा थोडीफार धार्मिक बाजूहि आहे, व तिच्या प्रीत्यर्थ खटपट करणारी अशी सत्यशोधक समाज नांवाची एक संस्थाहि स्थापित झालेली आहे. महाराष्ट्रांतील सुशिक्षित वर्गाकडून प्रथम जशी या संस्थेची निंदा होत असे, त्याचप्रमाणें आताहि त्या संस्थेबद्दल आपला एकमार्गला गैरसमज होऊं देणारे पुष्कळ गृहस्थ असावेत ही मोठी शोचनीय गोष्ट होय. या संस्थेचे आद्य प्रस्थापक जोतीराव फुले हे मोठ्या उदार अतःकरणाचे असून त्यांना त्यांच्या अनुयायांकडूनच नव्हे तर त्यांच्यावर निष्कारण टीकेची झोड उठविणाऱ्या त्यांच्या टीकाकारांकडूनहि अधिक साह्य मिळावयास पाहिजे होतें. माळी जातींतल्या एका सन्मान्य कुळांत यांचा जन्म झाला असून अस्पृश्यांचाहि प्रश्न यांनीच प्रथम आग्रहानें पुढें आणला याबद्दल ब्राह्मणेतरांना भूषण वाटलें पाहिजे. त्यांनीं स्थापलेला सत्यशोधक समाज हा वास्तविक सर्वस्वी ब्राह्मणाच्या विरुद्ध नसून भिक्षुक वर्गाविरुद्ध असे. परंतु भिक्षुक वर्गाच्या अन्याय्य मागण्याचाहि जेव्हां जेव्हां ब्राह्मण गृहस्थ वर्गाकडूनहि पुरस्कार होऊं लागला, तेव्हां मात्र ज्ञान व शिस्त यांना पारखा असणारा ब्राह्मणेतर पक्ष चिडून जाऊन 'आघातात्प्रत्याघात' म्हणतात त्या न्यायानें फारच जोराचा प्रतिकार करूं लागला. या सत्यशोधक चळवळीचे पुरस्कर्ते म्हणजे मराठे व तत्सदृश जातींचे लोक होत. गनिमी कावा हा त्यांचा नेहमींचा मार्ग, ही गोष्ट जर

ब्राह्मणांनीं लक्षांत घेतली असती तर हल्लीं महाराष्ट्रांत ब्राह्मण व मराठे यांच्यांत जी दुही माजून राहिल्याचें मी ऐकतो, ती उत्पन्न झाली नसती. असे आहे तथापि महाराष्ट्राचें खरें हितचिंतक व त्याचा लौकिक राहावा असें इच्छिणारे जे जे कोणी असतील, त्या सर्वांची अशी मनःपूर्वक इच्छा असावी कीं या दोन्ही पक्षांच्या पुढाऱ्यांनीं शक्य ते ते उपाय योजून होईल तितकें लवकर पूर्वीचा सलोखा उभयपक्षांत नांदेल, अशी व्यवस्था घडवून आणणें अवश्य आहे. परंतु ही इच्छा नुसती मनांतल्या मनांत राहू देण्यांत अर्थ नाहीं. एका पक्षीं आमच्या मराठा बांधवांनीं प्रथम करावयाची गोष्ट ही आहे कीं, या सत्यशोधक समाजाची निस्तेज झालेली घडी जोरानें नीट बसेल अशी व्यवस्था त्यांनीं घडवून आणली पाहिजे. असें झालें म्हणजे वाटेल त्या बेजबाबदार वेड्यापिराला ही संस्था म्हणजे सर्व ब्राह्मण वर्गाचा गळा उतरण्याचें एक हत्यार म्हणून हल्लीं त्याचा जसा उपयोग करून घेतां येतो, त्याला अवसर राहणार नाहीं. दुसऱ्या पक्षीं जबाबदार ब्राह्मण पुढाऱ्यांचेंहि हें कर्तव्य आहे कीं, सर्व हिंदु जनतेच्या कल्याणाचा विचार दृष्टीपुढें ठेवून भिक्षुक वर्गातील लोकांकडून निःशंकपणें धर्माच्या नांवावर अडाणी लोकांवर जो जुलूम होत असतो, त्याला योग्य आळा बसेल अशी त्यांनीं तजवीज केली पाहिजे. प्रो. लट्टे यांचें जोशी बिल कौन्सिल ऑफ स्टेटकडून फेटाळलें गेलें, ही वास्तविक मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय. तें पास होतें, तर एक महत्त्वाची सुधारणा घडून आली असती. आमचा जन्म अमुक कुलांत झाला म्हणून आम्हाला अमुक हक्क मिळाले पाहिजे, असें म्हणण्याचे दिवस आतां राहिले नाहींत. प्रत्येक समाजसुधारकाचें हें अवश्य कर्तव्य आहे कीं ज्यांच्यामुळें जातीजातींत वैमनस्य उत्पन्न होण्याचा अथवा हिंदु संघटनाच्या मार्गांत विघ्न येण्याचा संभव आहे, अशा सर्व जन्मजात हक्कांना मूठमाती मिळेल, निदान त्या हक्कांचें स्वरूप तरी पुष्कळच बदलेल, असे त्यानें प्रयत्न केले पाहिजेत.

## हिंदु संघटनेचा प्रश्न

हिंदु संघटने विषयीं असें म्हणणें भाग पडतें कीं, ब्राह्मण, मराठे, लिंगायत, वगैरे हिंदूंतल्या मोठ-मोठ्या लोकांत नांदेल व एकी होईल अशाबद्दल आमच्या हातून जर कांहीएक प्रयत्न होत नाहींत; इतकेंच नाहीं तर ब्राह्मण काय अथवा ब्राह्मणेतर काय, दोहोंतहि जर अस्पृश्यांची अस्पृश्यता तशीच कायम राहिली पाहिजे. असें जोरानें प्रतिपादन करणारे गृहस्थ अद्याप दृष्टीस पडत आहेत, तर हिंदुमुसल्मानांत एकी घडून यावी म्हणून महात्मा गांधींचे जे मनःपूर्वक प्रयत्न चालू आहेत, ते यशस्वी होण्याची आशा करणें हें किती तरी धाष्ट्र्याचें होणार आहे. निजामशाहींतील हिंदुमुसल्मानांत दिलजमाई व्हावी व त्यांच्यांत बंधुभाव उत्पन्न व्हावा, एतदर्थ वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार

होणें हें ज्या वेळीं आमचें कर्तव्य होतें, त्याच वेळीं सर्व हिंदूंची संघटना करूं पाहणाऱ्या हिंदु सभेच्या पुढाऱ्यांनींच तेथील आदि हिंदूंची मनें दुखावतील असें आचरण केलें असल्याचें जें वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालें आहे, तें खरें असल्यास, ही गोष्ट किती तरी नाउमेद करणारी आहे ! आणि त्यांतहि या अस्पृश्यवर्गाला आपल्या गोटांत सामील करून घेण्याचे मुसलमानांकडून कसोशीचे प्रयत्न होत असतां असले प्रकार घडावेत, ही तर आमच्या कमनशिबाची कमालच समजली पाहिजे.

सामाजिक सुधारणेच्या इतर बाजूंचा नुसता उल्लेख करण्यापलीकडे मला येथे कांहीं करतां येत नाहीं. स्त्री-दास्य-विमोचनासंबंधानें जरी सांप्रत बरेंच कार्य घडत आहे व त्यापैकीं बराच भाग त्यांच्या स्वतःकडूनच होत आहे, तथापि आमचें ध्येय अद्यापि दृष्टीच्या टप्प्यांत आलेलें नाहीं. श्रीमति सरोजिनी नायडू यांच्या जन्मभूमींतली एखादी सामान्य स्त्री घेतली, तर तिला स्वायत्तता प्राप्त झाली आहे असें म्हणतां येत नाहीं; पुष्कळ ठिकाणीं मोठ्या जनसमुदायादेखत तिची पशुप्रमाणें खुशाल विक्री होत असून ती थांबवण्याचें सामर्थ्य कायद्यांतहि नाहीं अथवा लोकमतांतहि नाहीं. लाखो शेत-कऱ्यांची अथवा तसल्याच उत्पादक वर्गांची स्थिति पाहिली तर ती हृदयविदारी असल्याचें दिसून येतें. सहकारी पतपेढ्यांच्या साहाय्यानें बऱ्याच ठिकाणीं जरी मौल्यवान कामगिरी होत असली, तथापि पुष्कळ ठिकाणीं त्यांची स्थिति निराशाजनक असल्याचेंहि दिसून येतें. या दुःस्थितीचें बीज पाहूं जातां त्यांचें गाढ अज्ञान व त्यांची विलक्षण पुराणप्रियता यातच आहे. खेड्यांतून काय अथवा शहरांतून काय मजुरीवर आपली उपजीविका करणारा जो मोठा मजूरवर्ग आहे, त्यांच्याकडे आमच्या पुढाऱ्यांचें पुरेसें लक्ष पोंहोंचलेलें नाहीं, असें म्हणावें लागतें. राजकीय अथवा इतर चळवळी करणारे लोक कधीं कधीं मोठमोठ्या शहरांतून त्यांच्या गोठी घेतात हें खरें, परंतु त्यांनें करण्यांत त्यांचें कायमचें कल्याण व्हावें हा हेतू नसून त्या चळवळीच्या पुरस्कर्त्यांना आपले स्वतःचे हेतू साधावयाचे असतात, महात्मा गांधी यांच्याजवळ त्यांना देण्यास चरख्याच्या मंत्राशिवाय दुसरें कांहीं असल्याचें दिसत नाहीं. मुंबईच्या समाज सेवा संघाकडून जी कांहीं कामगिरी होत आहे, त्याबद्दल त्यांचे खरोखर आभार मानले पाहिजेत. मुंबईबाहेर त्यांना अद्याप कांहीं करतां आलेलें नाहीं. भरतखंड हें खेड्यांचा फारच मोठा समुदाय व त्यांतील जनता यांनींच बनलेलें आहे. आणि या अफाट लोकसमुदायाची पुनर्रचना करण्याचा बिकट प्रश्न विचारांत घेतां, नुसत्या त्याच्या शिवेपर्यंतहि समाजसुधारणेचा पल्ला पोंहोंचलेला नाहीं. आतांपर्यंतचा समाजसुधारक हा पाश्चात्य अनुकरणानेंच अस्तित्वांत आलेला आहे. आतांपर्यंतचें त्याचें कार्य मोठमोठ्या शहरांपर्यंत मर्यादित असून, तें पुस्तकांच्या चेंडूंतच झालेलें आहे. त्याची माहिती म्हणजे वर्तमानपत्रें व मासिकें यांतून जी काय मिळेल त्याच्यापलीकडे गेलेली नाहीं. त्याची काम करण्याची जागा म्हणजे नियतकालीं भरणाऱ्या परिषदा अथवा कौन्सिलच्या बैठकी यांत होत. जोंपर्यंत स्थिति जैशीच राहील, तोंपर्यंत बहुजनसमाजावर या प्रयत्नांचा म्हणण्यासारखा परिणाम

घडल्याची आशा नाहीं. या समाजसुधारकांनीं आदर्शांत केलेलें काम असहीं अंतःकरणाच्या कळकळीनें केलें असून त्यासाठीं त्यांना पुष्कळदां स्वार्थत्यागहि करावा लागला आहे यांत संशय नाहीं. परन्तु समाजस्थिति त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेली नाहीं अथवा तिचा प्रत्यक्ष अनुभवहि त्यांना घडलेला नाहीं. खरा सुधारक निपजावयाचा तो या सामान्य जनते-मधूनच निपजावयाचा आहे. तथापि आपण आदर्शांत आपल्या शक्तिनुसार जें अल्प काम केलें आहे व पुढेंहि करीत राहूं त्यांतूनच वर सांगितलेला सुधारक निपजावयाचा आहे; व तो लवकर निपजणें हेंहि आपल्या अल्प परिश्रमामुळेंच होणारें आहे ही देखील थोडक्या समाधानाची गोष्ट आहे असें म्हणतां येणार नाहीं.

# २४

## संस्थानी शेतकरी परिषद, तेरदळ

### पहिल्या अधिवेशनाचें महत्त्व

कोणत्याच कारणांमुळें ह्या पहिल्या अधिवेशनाचें महत्त्व किती ध्यानांत घेण्यासारखें आहे, हें भावी इतिहासकार ठरवितील. पण तुमच्याहि ध्यानांत हें महत्त्व भरावें म्हणून अशा चाईतहि खालील परिस्थितीजनक कांहीं कारणांचा थोडक्यात विचार करतो.

### शेतकऱ्याची हीन स्थिति

साधारणपणें पाहतांना जगात कोठेंहि गेलें तरी शेतकरी, म्हणजे प्रत्यक्ष शेतांत पोटासाठीं रात्रंदिन खपणारा रयत, हा अनादि-कालापासून कंगाल दिसून येत आहे. ह्याचीं उघड कारणें म्हणजे त्याचा साधेपणा, भोळेपणा व अडाणीपणा हींच होत. ह्या व्यक्तिगत कारणांत, संघटनेचा अभाव ह्या सामुदायिक कारणाचा भरीकरून सुधारलेल्या ऊर्फ यांत्रिक युगांत भर पडल्यामुळें शेतकरी हा एक कायमच्या गुलामांचा वर्ग बनला आहे. निसर्गानुसिद्धा तो सावलीत राहणाऱ्या सोंडकऱ्याल्यांकडे कसा गहाण पडला आहे हे सद्य अग्नहि, सोंडकऱ्याल्या मात्र तें कबूल नाहीं, आणि स्वतः शेतकऱ्यालाहि

स्वतःची गुलामगिरी जाणवत नाहीं, हें मोठें दुर्भाग्य! अशा ह्या निर्दीवाद दुर्गतीमुळें शेतकऱ्यांनी ज्ञानतहि विरक्त झाल्यी आहे. त्यांच्यातला रामराज्यांतला साधेपणा व मरळपणा टिकणें अशक्य होत आहे. मग त्यांनीं पावलें थोडीं पडू लागल्यामुळें तीं अधिक गोतांतच शिरतात; आणि त्यांच्या मानगुटीवर अदळपट धारण करून बसलेल्या मोठ्यालशाहीला तर हीच स्थिति पाहिजे असते. ह्यांतच पुढें शेतकऱ्यांच्या व्यसनांची, फायदेकेरेतल्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अन्यायांची, वकिलांच्या कपटनीतीची वगैरे अनेक कारणांची भर पडून शेतकरी हल्लीं सुधारलेल्या नरकयातना भोगीत आहे ह्यांत काय आश्चर्य!

## संस्थानी कारभाराची अवनति

इतर ठिकाणच्या शेतकऱ्यांची ही शोचनीय स्थिति, तर हिंदुस्थानांतल्या आमच्या स्वतःला स्वतंत्र समजणाऱ्या संस्थानांतील शेतकऱ्याकडे पाहिलें तर गहिंवर आल्यावांचून राहात नाहीं. राजा परका असला तर त्याचा जुलूम परकेपणाच्या सबबीवर तरी एक वेळ सहन होईल. पण राजा आणि त्याची प्रभावळ स्वतःच्या धर्माची, जातीची, हितसंबंधाची – फार काय तर हाडामांसाच्या सोयेरमुतकाच्याहि संबंधाची असून, जेथें जुलूम परकियांपेक्षां जास्त होतो, तेथें बोलणाऱ्यांनीं बोलावें काय आणि ऐकणाऱ्यानें ऐकावें काय! सगळीं संस्थानें आणि तेथील सगळेच लहानथोर अधिकारी सारखेच नतद्रष्ट आणि निढावलेले असतात, असें कोण म्हणेल? पण ह्या बाबतींत अपवाद किती नियम किती हें पाहिल्यावर ज्या मानवाची छाती फाटत नाहीं तो एक पशु किंवा मुतकच असला पाहिजे. असो, नुसते संस्थानिकांवरच उठल्या बसल्या तोंडसुख घेणें साहजिक असलें तरी, योग्य होणार नाहीं. पुष्कळ वेळां आमचे वरून आढ्य दिसणारे संस्थानिक आपल्या बड्या बड्या अधिकाऱ्यांसह निराळ्याच एका अदृश्य सासुरवासात गुरफटलेले असतात. तरी पण संस्थानिक माहेरीं असला काय, सासरीं असला काय त्याचें सुखदुःख गरीब शेतकऱ्याला समजत नाहीं. त्यामुळें तो आपल्या धन्याला नांवें ठेवण्यापेक्षा आपल्या दैवालाच नांवें ठेवीत, पशुप्रमाणें संतुष्ट स्थितींत राहतो. पण असला विपारी संतोष परिणामीं हितकर ठरेल काय?

## जागतिक मंदी

दोन प्रकारच्या वरील कठीण परिस्थितींत गेल्या १।२ दोन वर्षांत अखिल जगालाच एक भयंकर क्षयरोग लागल्याचें अचानक उघडकीला आलें आहे. तो म्हणजे, आजकालचे शेतांत

निपजणाऱ्या मालाचे झपाट्यानें खालीं बसणारे बाजारभाव. पण ही मंदी व्यापाऱ्यांना, राज्यकारभाऱ्यांना, पगारी नोकरांना, किंबहुना मजुरांना जितकी भोंवते, त्याहून अनेकपटीनें जास्त ह्या असहाय्य व असंघटित शेतकऱ्यालाच भोंवते. ह्याचें एकच कारण हें कीं वरील सर्व वर्गांच्या हातीं नाणीं खेळत असतात. आणि नाण्यांचा मक्ता राज्यकारभाऱ्यांनीं आपल्याच हातीं ठेवलेला असतो. शेतांत सर्व कांहीं पिकलें तरी नाणीं आणि नोटा जोवर पिकत नाहींत, तोंवर शेतकऱ्यांचे हाल असेच चालणार! नाणीं पाडण्याचा मक्ता किंवा सोन्याचें परिमाण इतर धान्यांशीं ठरविण्याचा मक्ता आमच्या संस्थानिकांना नसल्यामुळें त्यांनीं ही अडचण जाणून शेतसारा धान्याच्या रूपानें घेण्याची योजना आंखणें जरूर आहे. ह्या बाबतींत कायमची तरमबंदीची योजना आड येणार हें आम्ही जाणून आहों. पण शेतकऱ्याकडून साऱ्याचा आकार नाण्याच्या कृत्रिम रूपानें घ्यावा किंवा धान्याच्या स्वाभाविक रूपानें घ्यावा, हें ठरविण्याच्या बाबतींत कोणताहि संस्थानिक, किंबहुना लावणीनें शेत देणारा खातेदारहि साम्राज्य सरकारशीं कोणत्याहि तहाच्या अटीनें बांधला नाहीं. ह्याची जाणीवहि शेतकऱ्यावर पोसले जाणाऱ्या ह्या संस्थानिकांनीं व त्यांच्या राज्यांत नांदणाऱ्या खातेदारांनीं ठेवायास नको काय? पण आजकालच्या नाण्याच्या धांदलींत ही जाणीव राखणें शेतकऱ्या-शिवाय इतर कोणासच फायद्याचें नाहीं. आणि स्वतः शेतकऱ्यांस हें अर्थशास्त्राचें कोडे समजायास अजून किती नवे जन्म घ्यावयाला पाहिजेत, तें हरीच जाणे! तरमबंदी एकदां ठरली की ती पुढेंच धांवणार. आगगाडीचें एंजिनहि मागें धांवतें. पण तरमबंदी कधीं पोटें मागें हटली आहे काय? प्रत्यक्ष शेतकऱ्यांचेच सरकार होईपर्यंत तें शक्यच नाहीं. नुसती आणेवारी मागें न हटविणारीं अधाशी व मतलबी सरकारें, तरमबंदी कशाची मागें हटवतील? जावें त्यांच्या वंशा, तेव्हांच कळे. बजेटाचीं तोंडें मिळवण्याचा वगैरे अनेक प्रश्न राज्यकर्त्यांपुढें जसे आहेत तसेच शेतकऱ्यांच्या घरींहि आहेत. पण अर्थशास्त्राचा नेमका फायदा मात्र श्रीमंतांना, सत्ताधाऱ्यांना, व त्यांच्या पुढें पुढें करणाऱ्या पोशाखी सुशिक्षितांना, आणि तोट्याचा वारसदार मात्र एकटा अडाणी शेतकरीच! ह्या शेतकऱ्यांचा अडाणीपणा कमी करून त्यांनीं नवीन आशा व नवीन जोम धरून आपला सर्व जगाला पोसणारा हा पवित्र शेतीचा धंदा करावा, म्हणून कांहीं स्वार्थत्यागी, बिनपगाराचे सुशिक्षित व फरारी माणसें पुढें आलीं, कीं कोणतेंहि सरकारच नव्हे तर खातेदार, जमीनदार अथवा सावकार ह्यांचेंहि धाबे दणाणतें. चळवळ राजकारणापासून कितीहि दूर ठेविली व नुसत्या अर्थशास्त्राची गुजागुंजी ज्यांच्या कशी भोंवते हेंहि मोकळपणें सांगणाऱ्यांना, ते उपद्व्यापि राजद्रोही आहेत अशी हूल राज्य-कर्त्यांकडून नव्हे तर त्यांचे गाथीशार सुगासीन मांडवलदार व नोकरशाही ह्यांच्या-कडूनहि उठविण्यांत येते. त्यांच्या आवर्तांत मतलबी अडचणींची भर पडून विराधुंद होतात. एरवीं रडतो त्याहून गातवट जोरानें सातपुर्तींहि रडं लागतो. मग ह्या गोंधळांत बिचारा निष्क्रिय व बेवारशी शेतकरी अगदीं गागरून जातो. त्याला शत्रु,

मित्र कोंहीच कळेनासे होतें. अशा बेफाम परिस्थितींत जर अडाणी शेतकरी कोंडलेल्या मांजराप्रमाणें कोंडणाऱ्यांचाच कंठ फोडण्यास धांवूं लागला, तर त्याची जबाबदारी कोणावर येरे. तसें होऊं नये म्हणूनच ही परिषद आहे.

## चळवळीचा कोंडमारा

ब्रिटिश इलाख्यांतील चळवळीला कसें स्वरूप आलें आहे व तिला दडपण्यासाठीं कसे निकराचे उपाय योजले जात आहेत हें सांगण्याचें हें स्थळ मुळींच नव्हे. ब्रिटिश सरकार अखेर स्वातंत्र्य-प्रिय असल्यामुळें तें चळवळ झाल्यावरच ती दडपण्याचे उपाय योजते पण आमचे कांहीं संस्थानिक पाहावे तर ह्या परकीय सरकारापेक्षाहि अधिक शहाणे होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारे दिसतात ! प्रजेमध्यें विशेषतः खेड्यांतील जनावरवजा कुणब्यांमध्यें पुढें दहा वर्षांतहि कधीं कांहींच चळवळ होऊं नये अशा प्रकारची दूरदृष्टि कांहीं संस्थानिकांची माझ्याच संचारांत मला प्रत्यक्ष अनुभवास येऊं लागली आहे. नांवें सांगण्याची जरूर नाही. जरूरच पडल्यास त्यांची त्यांनाच मी अतिनम्रपणानें कळवीन, त्याची येथे वाच्यता नको. कोंडमाऱ्याचे दिवस गेले. आता वातावरणाला गवसणी घालणें शुद्ध वेडेपणाचें ठरेल. हजारो वर्षें आपल्या बायकांना पडद्यांत डांबणाऱ्या तुर्कस्थानांत केमालपाशांनीं ह्या पडद्याच्या फाडून चिंधड्या केल्या ! आमचेकडे पाहावें, तर कांहीं सुशील आणि प्रजाहितैषि संस्थानी राज्यकर्त्यांनीं व त्यांच्या सुशिक्षित सल्लागारांनीं, नव्या जुलमी कायद्याच्या चिध्या गोळा करून त्याची वाकळ तयार करून तिच्याआड मुक्या शेतकऱ्यांना लपविण्याचा प्रयत्न चालविला आहे, त्याला काय म्हणावें ? विनाशकाले विपरित बुद्धि म्हणावें, दुसरें काय ? अशा स्थितींतहि सांगली दरबारनें ह्या परिषदेच्या कार्यांत नसतीं विघ्नें आणली नाहींत याबद्दल परिषद त्यांची आभारी आहे. खरें पाहिलें असता सर्व संस्थानांच्या दरबारांनीं आपापले योग्य अधिकारी प्रतिनिधि म्हणून पाठविले असते तरी परिषदेनें त्यांचा आभारपूर्वक स्वीकारच केला असता किंवा करील. दिवस सहकार्याचे आहेत. दडपशाहीचे नाहींत. सहकार्य करील तोच टिकेल. अत्याचार व दडपशाही हीं दोहोंपक्षीं नरकाचीच द्वारें ठरणार ह्यांत काय संशय ! संशयात्मा विनश्यति ! !

येथवर शेतकऱ्याच्या हीनस्थितीचा विचार झाला. एका दृष्टीनें पाहतां हिंदुस्थानांतल्या — विशेषतः हिंदी संस्थानांतल्या शेतकऱ्यांची स्थिति अस्पृश्य वर्गाहून अधिक कींव येण्यासारखी झाली आहे. कारण ब्रिटिश मुलखांतील अस्पृश्य वर्गाची निदान थोडी तरी जागृति झाली आहे. पण संस्थानांतील शेतकरी वर्गाची तेवढीहि जागृति झाली नाहीं; मग उन्नतीचा मार्ग तर दूरच ! हिंदुस्थानांतील अस्पृश्य वर्गाची हलाखी पाहून मोठी चीड येते. पण संस्थानांतील शेतकऱ्यांची स्थिति निराशाजनक होत चालली आहे.

चीड येण्यापुरती तरी थोडी आशा दिसावयाला पाहिजे ना? म्हणून अलीकडे अस्पृश्यां-इतकी तरी जागृति शेतकऱ्यांत व्हावी म्हणून कांहीं समाजसेवकांचें लक्ष विशेषतः खेड्यां-तील कुणब्यांची स्थिति सुधारणेकडे व ग्रामसंघटनेकडे लागलें आहे. पुण्यांतील म्युनिसि-पालिटीचे चीफ ऑफिसर रा. आप्पासाहेब भागवत, श्री. बाबुकाका कानिटकर, सातारा येथील शाहू छत्रपति बोर्डिंगचे चालक श्री. भाऊसाहेब पाटील, माझे मित्र प्रसिद्ध गोसेवक शेख नजमुद्दीन कमरुद्दीन, भोर संस्थानांतील कारागृहांत अद्यापि विश्रांति घेणारे रा. शेटे व पोतनीस हीं उदाहरणें प्रमुख आहेत. संस्थानांत अशींच उदाहरणें जास्त आढळावीत हा ह्या परिषदेच्या हेतु आहे. आपले आजचे साधुवृत्तीचे स्वागताध्यक्ष माझे बाळमित्र श्री. विष्णुपंत ऊर्फ अप्पासाहेब देशपांडे ह्यांनी अविश्रांत श्रम करून ही परिषद घडवून आणिली; ह्या गोष्टीचा अभिमान सांगलीकरांनाच नव्हे, तर इतरहि संस्थानचे राजे व प्रजा म्हणविणारे यांना असावयास पाहिजे. कांहीं संस्थानात अलीकडे प्रजापरिषदा होऊं लागल्या आहेत हें मोठें सुचिन्ह होय. पण संस्थानातील प्रजा शेंकडा ९५ हूनहि जास्त शेतकरीच असल्यानें प्रजापरिषदांचे कामहि त्याच प्रमाणांत खेड्यांतच होणें जरूर आहे. महात्मा गांधींचा उदय होईपर्यंत आमच्या कॉंग्रेसचेंहि लक्ष खेड्यांतील लोकांकडे लागलें नव्हतें. इतकेंच नव्हे तर शहरांत राहणाऱ्या मजुरांकडे व अस्पृश्य वर्गाकडे प्रत्यक्ष कॉंग्रेसचाच वानाडोळा व प्रसंगविशेषीं विरोधहि होता. महात्माजींनीं उलथापालथ केली, तेव्हां कोठें ब्रिटिश सिंह जागा झाला आहे! आतां संस्थानातील कार्यकर्त्यांना जागे करावयाचें असल्यास संस्थानी प्रजापरिषदांनीं आपल्या राजांचाच नव्हे तर राज-धानींतील महाजनांनाहि नाद सोडून, सरळ खेड्यांतील कुणब्याकडे जावें. येरवीं त्याच्या चळवळीला ना बूड ना पाया अशी स्थिति होईल.

## परिषदेचें सहकार्य

परिषदेंत विषय मुख्य चारच आहेत : १ सरकारी साऱ्याची काट, सूट, निदान तहकुबी. २ जमीनदारांच्या खंडाची तीच वाट. ३ सावकाराच्या व्याजाचाहि तोच न्याय. ह्या तीन्ही विषयांवर बहुंकडे आतां ज्या परिषदा होत आहेत त्यांतून तपशीलवार विचार व ठराव होत आहेत. स्वतः मी तर माझ्या अनेक संचारांत ह्या विषयाचा कीस पाडून थकलों आहे. काल विषयनियामक सभेंत ह्याचा बारकाईनें खल झाला आहे. आज ठरावावर विद्वान पुढाऱ्यांचीं भाषणें होतील. मला एवढेंच स्पष्ट सांगावयाचें आहे कीं ह्या तीन्ही विषयांत सरकार, जमीनदार आणि व्याजबट्टा करणारे सावकार ह्यांचे परस्परांशीं शेतकऱ्याच्या हिताला अनुकूल असें प्रामाणिक आणि न्यायार्थत्यागी सहकार्य झाल्या-शिवाय नुसत्या ह्या परिषदेंतील ठरावानें काहीच हातीं लागणार नाहीं. मला कष्टानें येथें सांगावें लागत आहे कीं वरील तीन्ही मंडळवर्गांचें जें आजपर्यंत सहकार्य

झालें आहे व अद्यापि चालले आहे ते गरीब शेतकऱ्याला प्रतिकूलच भासत आहे. सरकार आपल्या सान्याची वसुली वेळ पडेल तर, जशी सर्गीन रोखून घेते, तशीच खातेदारांचा खर्च आणि सावकारांच्या व्याजावरील व्याजाचे हुकूमनामें कायद्याच्या शाब्दिक जोरावर उभारणी करून देत आहे. हें सहकार्य नव्हे. केवळ अनाचार !

## बोल्शेव्हिझमचा बागुलबोवा

येथें जमलेल्या पांढरपेशी पुढाऱ्यांना माझें येथवर भाषण ऐकून, मी कोणी एक नुकताच रशियांतून आलेला बोल्शेव्हिक आहे काय अशी भीति अथवा शंका येण्याचा संभव आहे. माझ्या संचारांत माझ्या कित्येक प्रेमळ मित्रांनीं ही शंका मला निर्भीड प्रश्न करून फेडून घेतली आहे. मी आपल्यास स्पष्ट विचारतो कीं मी जर बोल्शेव्हिक असतोंच तर तुमच्यांशीं विचार विनिमय करायला आणि तुमच्या सहकार्याची अतिशय नम्र याचना करावयाला आलों असतों काय ? खोटी धास्ती घेऊ नका. बोल्शेव्हिकांचा मार्ग आणि उपाय आमच्याहून अगदीं भिन्न आहेत. ते भांडवलदारांशीं विचारविनिमय किंवा सहकार्य करण्यांत आपला वेळ गमावीत नाहींत. आम्हांला तर अद्यापि भांडवलदार व त्यांच्याच दाबाखालीं असलेले इतर पांढरपेशी ह्यांच्यात उदार व विवेकी साह्यानें खेड्यांतल्या मुक्या, भोळ्या पण कष्टाळू जनतेला जागे करावयाचें आहे. तेव्हां पांढरपेशांनो, कृपा करून, तुम्ही आमच्या कार्याविषयीं विनाकारण गैरसमजूत करून घेऊं नका. समजून उमजून तुम्ही खोटी हूल उठवाल असे आम्ही समजत नाहीं. अशा अप्रामाणिक हुल्लडखोर माणसाना येथपर्यंत येण्याची देखील तसदी घ्यावयाला नको. त्यांचें कार्य येथें न येतां व आमचें म्हणणें न ऐकताहि करतां येईल ! त्यांचेकडे जसें आम्ही लक्ष देत नाहीं तसेंच तुम्हीहि दुर्लक्षच करा.

## संघटना

शेवटचें आणि खरें काम शेतकऱ्यांची संघटना करणें हेंच आहे. ह्या घटनेचे सभासद केवळ शेतकरीच पाहिजेत. पण त्यांच्यात हिंदु–मुसलमान, ब्राह्मण–ब्राह्मणेतर, स्पृश्य–अस्पृश्य किंबहुना संस्थानिक–खालसांतले हे व इतर आगंतुक भेद असावयाचेच. ह्या भेदामुळेच जर लंडन येथें गेलेल्या शेकडों शहाण्यांच्या वाटोळ्या परिषदेची इतकी शोभा झाली, तर आमच्या कार्यांत नीच विघ्नें येणार नाहींत कशावरून ? येथेंच तुमची शेतकऱ्यांना फार जरूरी भासणार. शिवाय द्रव्याची मदत तुम्हांकडूनच पाहिजे. शेतकऱ्यांजवळ द्रव्य कोठून येणार ? तें तर सर्व तुम्हांजवळ येऊन चुकलें आहे. फूल नाहीं फुलाची पाकळी, तरी परत

करुन पडलेल्या शेतकऱ्याला पुनः त्याच्या पायावर उभा करा. तरी राजा उभा राहील तरच स्वराज्याची आशा. येरवीं सर्वच गप्पा.

परवां महात्मा गांधी मुंबई बंदरांत उतरल्यावर वेल्फेअर ऑफ इंडिया लीग नांवाच्या एका संस्थेनें महात्म्यांचें एक व्याख्यान करवून त्याच्याशीं विचारविनिमय केला, असें ऐकतों. महात्माजींनीं त्यांना शेवटीं कॉंग्रेसनें चालविलेल्या धर्मयुद्धाबद्दल एकच निर्वाणीचें वाक्य सांगितलें तें 'टाइम्स ऑफ इंडियां'त पुढीलप्रमाणें आहे :

" To you (The League) the Welfare of India is a matter of leasure. For the Congress it is a matter for which it exists ! "

ह्या लीगला हिंदुस्थानचें कल्याण करणें ही फावल्या वेळची गोष्ट आहे. पण कॉंग्रेस केवळ त्याचसाठीं जगते. हाच गांधींचा रोकडा संदेश, पांढरपेशांना मी नम्रपणें शेतकरी बंधूंच्या वतीनें आज येथें देत आहे. शेतकऱ्यांची संघटना जरी तुमचें फावल्या वेळचें काम आहे, तरी त्या घटनेवरच शेतकऱ्यांचे व पर्यायानें तुम्हां आम्हां सर्वांचें जीवित अवलंबून आहे. येरवीं आम्हीं सर्व मृतप्रायच आहों!!

## २५

# अखिल भोर संस्थान प्रजापरिषद

भोर संस्थान प्रजापरिषदेच्या ह्या ८ व्या अधिवेशनाचा तुम्हीं मला अध्यक्ष निवडलें ह्याबद्दल मी आपले मनःपूर्वक प्रथम आभार मानणें हा आवश्यक उपचार आहे. ते मी मानतों. वस्तुतः अशा मामुली परिषदांवरून माझा विश्वास उडाला आहे. खरें हित थोड्याशा पडद्याआड राहून सतत झिजून काम करणाऱ्या व्यक्तींच्या पुण्याईवरच अवलंबून असतें. वर्षभर ती पुण्याई घडत नसेल, तर अशा परिषदा व्यर्थ ठरतात; इतकेंच नव्हे तर त्या पुष्कळदा विचारवंतांस दुःसह वाटतात. माझ्या ह्या अनुभवामुळें मीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें धाडस एकदम केलें नाहीं. पण ह्या संस्थानातील गेल्या १० वर्षांच्या चळवळीचें मीं जेव्हां कारणापुरतें अध्ययन केलें, तेव्हां मला असें दिसून आलें कीं, ह्या परिषद्‌रूपी दर्शनी पडद्यामागे एक चित्तवेधक आणि आदर्शपूर्ण दिव्य घडत आहे. शेलार्थ पाटील, पोतनीस बंधु, गुभे, वाळिंबे, साने, आदिकरून संस्थानवासी सद्‌गृहस्थांनीं हातीं कंकण बांधून जो हा प्रजापक्षाचा राजसूययज्ञ आरंभला आहे, त्याला आतां १० वर्षांनीं चांगलें दृश्य स्वरूप प्राप्त झालें आहे. इतर पुष्कळ परिषदांप्रमाणें आगीवांचून नुसता धुराचा डोंबाळा नसून ही परिषद म्हणजे सह्याद्रींतील एक ज्वालामुखी आहे, आणि निव्वळ १० वर्षांच्या भूतकाळाहूनहि भविष्यकाल नुसत्या भोर संस्थानालाच काय तर महाराष्ट्रालाहि चांगला हालवून जागें करील असें मला चिन्ह दिसत आहे. अशा मुहूर्ताला कोण मराठा स्वस्थ बसेल! ह्या विचारानें मी आपल्या सेवेस येथें आभारपूर्वक हजर झालों आहें.

## इतिहास

महाराष्ट्रांत भौगोलिक धरणीकंप मागें झाले नाहींत; किंबहुना महाराष्ट्राचें उंच पठार हें एक जगांतील अति स्थिर व प्राचीन भूमिभाग आहे असें भूगर्भशास्त्री म्हणतात; पण अखबारनवीस निराळीच गोष्ट सांगतात. ते म्हणतात, महाराष्ट्रांत ऐतिहासिक भूकंप फार झाले आहेत, आणि ते होण्यापूर्वी सह्याद्रीचें कोणतें ना कोणतें तरी एक शिखर पेट घेतें. हल्लीं प्रचंडगड, राजगड, विचित्रगड शिखरांनीं पेट घेतला आहे. महाराष्ट्रांतील मराठ्यांत दोन भिन्न वर्ग ( वंश नसल्यास ) आहेत. ते वर्ग म्हणे (१) नेते मराठे व (२) अनुयायी कुणबी. पहिला वर्ग हिंमतवान्, हिकमतवान्, खोल दिलाचा व स्वतंत्र बाण्याचा आहे; तर दुसरा वर्ग शरीराचा सोशिक, मनाचा मोकळा, हाडाचा इमानी आणि जीवाचा करारी आहे. स्वराज्य ह्या दोन्हीं वर्गांची रोजची भाकर आहे. सणावाराची पोळी नव्हे. दोघेहि खेड्यांत किंबहुना रानांत जन्मून तेथेंच वाढून तेथेंच मरणारे आहेत. ह्यांची संस्कृति नागरिक मुळींच नव्हे. किंबहुना केवळ नागरिक संस्कृति त्यांना बाधते म्हटलें तरी चालेल. खेड्यांतलें स्वाभाविक स्वराज्य त्यांचें कोणी हिरावूं शकत नाहीं. अनेक धर्मांचीं व संस्कृतींचीं साम्राज्यें वावटळीप्रमाणें ह्यांच्यावरील वातावरणांतून गर्जना करीत आलीं व गेलीं. खालीं जमिनीवर ह्यांच्या स्वराज्याचा संसार तसाच चालू आहे. जमीनमहसुलाची रयतवारी पद्धत, आणि धर्म, जात, वंश आणि धंदा कोणाचा कांहींहि असो, गांवगाड्यामध्यें सर्वांचा समाईक हक्क जर अद्यापि कोठें पुरातन कालापासून चालत असलेला दिसत असेल तर ह्याच हल्लींच्या महाराष्ट्रांत. कोंकणपट्टी मात्र ह्या नियमास अपवाद आहे. म्हणून ह्या दृष्टीनें ती पट्टी ऐतिहासिक महाराष्ट्राचा भाग नव्हे – घाटांचा देशावरला महाराष्ट्र ह्याची रयतवारी ऊर्फ स्वराज्य ही प्रकृतीच आहे. नुसतें भावी आदर्श नव्हे.

बुद्धपूर्वकालांत हिमालयाच्या पायथ्याशीं शल्ल, मल्ल, लिच्छवी, वज्जी, रट्ट इत्यादि कुळें अथवा वसाहती केवळ स्वराज्यसुखांत राहात होत्या. त्यांचें शासन लोक-सत्तात्मकपद्धतीचें ( Limited Monarchy ) होतें, हें पाली वाङ्मयावरून उघड दिसतें. साले, माले, लेचे, पेचे असें ह्यांच्या नावांचे भाषाविषयक नव्हे तर पोकळ नागरिक संस्कृतिवाल्यांनीं, गुणवाचकहि अपभ्रंश बनविले असतील, पण साळी, माळी, मराठे हे हल्लींचे क्षत्रिय अथवा शेतकरी हे त्या हिमालयांतून खालीं दक्षिणेंत उतरलेल्या स्वराज्य-शाली राष्ट्राचे आजचे अस्सल वंशज आहेत, असें मी तरी समजतों. स्वराज्याचे पायीं ह्या मराठ्यांनीं गेल्या २॥ हजार वर्षांत पुष्कळ लहानमोठ्या फटकी केल्या आहेत. त्यांतलीच एक शेवटची फटकट ह्या परिषदेची चळवळ होय !

स्वराज्यासाठीं फटकट करणें मराठ्यांची उपजत बुद्धीच आहे. " स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे " ही शाब्दिक म्हण लो. टिळकांनीं रूढ केली; पण राहणीची

ऱ्दी निदान अर्डीच हजार वर्षे महाराष्ट्रांतील मराठ्याची कुलीन आहे ! तिचा इतिहास आहे !!

मावळे म्हणजे केवळ पश्चिमेकडचे असा नुसता शब्दार्थ झाला, पण स्वतंत्र पाहण्यानें आपल्या मालकीची जमीन स्वतः वाहणारा साधासुधा मराठा असा ध्वन्यर्थ आहे. मावळ्याचा हा बहाणा श्रीशिवरायापूर्वी हजारों वर्षांचा जुना आहे. शिवाजीनें हा बहाण्याला उत्पन्न केलें नसून उलट ह्या बहाण्यानें शिवाजीला उत्पन्न केलें. इतर आधुनिक क्रमश्रमल नागरिक बहाण्यानें शिवाजीला नुसतें नामशेष केलें मात्र. शेटे, पोतनीस, वाळिंबे हे आजचे मावळे होत. त्यांनी जात विचारूं नका, प्रकृति विचारा. ती प्रकृति स्वराज्यशील आहे. त्यांनीं चालविलेल्या परिषदेची बैठक जरी आजची आटपीच असली तरी त्याची प्रकृति भुगर्भांतल्या आगीप्रमाणें पुरातन आहे. ती आग ब्रिटिशामारख्या जगात टोईजड झालेल्या घेंडालाहि युद्ध करील. मग सचीवासारख्या आजकालच्या चिमुकल्या सचीशीं ती युद्ध करणार नाहीं म्हणजे काय ?

## चालू स्थिति

भोरच्या सचीवशाहीची दौलत गेल्या सालच्या वार्षिक रिपोर्टांत दाखल केल्याप्रमाणें अवघी सात लाखांची. मुंबईतील कांहीं मोठे गिरणीवाले ह्यांच्यापेक्षां सातीनें अधिक श्रीमंत आहेत. संस्थानची यट्ट लोकसंख्या १३०,४२०. नुसत्या पुणें शहराची, अधिक भरेल. क्षेत्रफळ ९२५ चौरस मैल. पुणें जिल्ह्याचें ५३५० चौ. मैल आहे. पुण्याचे कलेक्टर तेच भोरचे अधिराजे. हें भोरचें थोडक्यांत वैभव आहे. तरी ह्या लहानशा राजवटीबद्दल आम्हाला फार आदर वाटतो. शं कीं अव्वल मराठेशाहीच्या किल्ल्याची ही गादी म्हणजे एक तेजस्वी बुरुज होता. पण ही गतगोष्ट झाली. १० वर्षांपूर्वी भोरशाही म्हणजे बेबंदशाही असा लौकिक झाला होता. पण मादधर आणि हिरडा हीं दोन जुल्माचीं प्रकरणें आम्हां परस्थांच्या कानांवर वेळोवेळीं आलीं आहेत. प्रत्यक्ष यजमानांबद्दल त्यांच्या प्रजेंत बेदिली उत्पन्न करण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं. परंतु त्यांचे सारथीदार नोकरशाही, हिची कार्यक्षमता पाहूं गेल्यास ती मात्र मुळींच दिसून येत नाहीं. नुसता वार्षिक रिपोर्ट *लिहिण्याबद्दल ह्या परिषदेच्या पहिल्या अध्यक्षास खालील उद्गार काढावा लागला :* " जर हा असा पुढील सालीं पाठवाल तर त्या रिपोर्टच्या प्रती छापून त्या पायाखालीं तुडवून टाकूं असें सांगणें स्पष्ट आहे. " ह्या मीनीनें पुढील सालचे रिपोर्ट प्रजेस वाचावयासच *मिळेनात असें ऐकतों. गेल्या सालच्या रिपोर्टांतील जमाखर्चांत* वट उत्पन्न ७ लाखांचे दाखविलें आहे. त्यांपैकीं ७० हजार खासगी खर्चाकडे लागतें, अशी कबुली आहे. पण शिवाय १३ हजार दिल्लीला जाण्याबद्दल, ५ हजार नवीन बंगल्यासाठीं, ८ हजार पाहुण्यांसाठीं वगैरे खर्चाचे आंकडे आहेतच. *शिवाय गुप्त खर्चाचा बोजा दौलतीवर*

पडत असेल तर तो निराळाच. परवांच्या एका 'केसरी 'च्या अंकांत मिरजकरानें आपल्या खासगी खर्चाचा आंकडा ८४ हजार म्हणून प्रसिद्ध केला असतांना तेथील चित्रगुप्तानें तो खरोखरी २ लाखांवर जात आहे अशी ओरड केली आहे. भोरच्या चित्रगुप्ताला ह्या प्रकरणीं न विचारणेंच बरें. एकंदरींत संस्थानांत प्रजेच्या आरोग्यासाठीं सारे ९३४ रु. ८ आ. ३ पै. असा खर्च दाखविला आहे. पण खाशांच्या एका ॲपेंडिसयाइटिस् ऑपरेशनवर ४॥ हजारांचा खर्च दाखविण्यांत आला आहे. ५ हजारांची एक मोटार तर ३॥ हजारांचा डिलिव्हरी खर्च. हा डिलिव्हरी खर्च मोटारचा किंवा राजवाड्यांतील एखाद्या बाळंतपणाचा कळत नाहीं. संस्थानचा वट पब्लिक वर्क्सचा खर्च ६१ हजार रुपयांचा आहे. नवीन बंगल्यावर ह्यासाठीं ५ हजार खर्च झाला आहे. या न्यायानें प्रजेच्या गरजा आणि खाशांच्या गरजा आणि त्यांचा गुजारा कसा होतो यांचें प्रमाण कळतें. उघड जमाखर्च जर असा अनागोंदीचा आहे, तर गुप्त कारभार किती असह्य असेल हे चित्रगुप्तच जाणें. जावें त्यांच्या जन्मा तेव्हांच कळे. तरी ही स्थिति १० वर्षांपूर्वींपेक्षां कितीतरी बरी असें म्हणतात. कारण हल्लीं तेथें प्रजेतर्फे एक कौन्सिल आहे असें ऐकतों. लग्नटक्का, घरपण, म्हैसपट्टी, पाटदाम, वगैरे हास्यास्पद कर बंद झाले आहेत. अशल्या क्षुद्र सुधारणांबद्दलहि आम्ही श्रीमंतांचे आभारी आहोंत. हल्लींचे यजमान हे खुल्या दिलाचे आणि बहुश्रुत आहेत. ते नुकतीच विलायतची यात्रा करुन आले आहेत. भावी सुधारणाकालांत ते याहून मोठ्या व टिकाऊ सुधारणा करतील अशी आशा आहे. त्यांच्या पत्नी ह्या सुशिक्षित, सुशील व अनेक भाषा जाणणाऱ्या होत्या. त्या नुकत्याच महाबळेश्वरीं स्वर्गवासी झाल्या; हें दुष्ट वर्तमान ऐकून त्यांच्या प्रजेप्रमाणेंच आम्हीहि फार दिलगीर आहोत. हल्लींचे युवराज हे मोठे विद्वान्, मनमिळाऊ व लोकरक्षीय आहेत असें ऐकतों. एकंदरींत ह्या राजघराण्यानें मराठेशाहींतील आपला बोलबाला तर राहो पण नुसतें आपलें अस्तित्वहि टिकवावयाचें असेल तरी चालू काळचीं चिन्हें ओळखावयास त्यानें लवकर शिकलें पाहिजे. राजा म्हणजे विष्णूचा अवतार नसून प्रजेचा एक वतनदार नोकर ही व्याख्या आधुनिक युरोपांतल्या मोठमोठ्या बादशहांनीं विसरल्यामुळें ते गेल्या ५।१० वर्षांत नामशेष झाले; तसें आमच्या जहागीरदारांनीं होऊं नये असें आम्ही इच्छितों.

ह्याल्याप्रमाणेंच प्रजेलाहि आणि तिच्या पुढाऱ्यांना नम्रपणानें आम्ही एक इशारा देऊं इच्छितों. राज्यकर्त्यांना नावें ठेवणें फार सोपें आहे परंतु त्यांच्या प्रत्येक पापाची जबाबदारी पर्यायानें पाहतां राज्य करवून घेणाऱ्या प्रजेकडे येते, हें आम्ही नेहमीं विसरतों. मनुष्य बैलाला पाठळ करतो, पण सिंहाला भितो. याच न्यायानें शास्त्राहि शहाण्या प्रजेचा नोकर आणि मूर्खांचा मात्र राजा होतो. यथा राजा तथा प्रजा हें खरें नसून यथा प्रजा तथा राजा हेंच खरें. बाहेरची तर गोष्ट दूर राहो, ब्रिटिशांनीं जिंकलेल्या हिंदुस्थानांतहि वरील व्यस्त प्रमाण गेल्या वर्षांपासून अनुभवास

येऊं लागलें आहे! मग तेच प्रमाण ब्रिटिशांनीं न जिंकलेल्या नामधारी संस्थानीं स्वराज्यांत कां अनुभवास येऊं नये बरें?

आक्टोबर १० वर्षांत जी मोर-संस्थानात चळवळ झाली तिचा पहिला हप्ता आतां संपला. अखिल भारतीय साम्राज्यांत पुढील वर्षी जी शासनघटना होणार आहे तिच्यांतून चिमुकलें मोर संस्थानच एकीकडे वगळलेलें कसें राहील? हें शक्य नाहीं. अधिपतींच्या सदिच्छेनें म्हणा किंवा प्रजेच्या चळवळीनें म्हणा संस्थानची राज्यपद्धतीहि बदलणारच. हल्लीं जें नामधारी कौन्सिल आहे तें पुढें लोकनियुक्त सभासदांचें एक सत्ताधारी संस्था होईल व जिल्हा दिवाणापासून पट्टेवाल्या हुजऱ्यापर्यंत सर्व नोकरशाहीच नव्हे तर प्रत्यक्ष श्रीमंत यजमानहि जबाबदार राहतील. आजचे लोकपुढारी शेख पाटील तुरुंगांत आहेत, ते न जाणों उद्यां ह्या सभेचे अध्यक्ष होतील. पोतनिसावर खटला चालू आहे, तर परवां त्यांना मानपत्रें मिळतील, ज्यांच्यावर आतां जुलूम होत आहे अशांना थोड्याबहुत दिवसांनीं मतदानाचा हक्क मिळेल. आणि त्यांनीं निवडून पाठविलेल्या प्रतिनिधींची मनधरणी संस्थानाधिपतींना करावी लागेल. एकीकडे प्रजेच्या प्रतिनिधींचा अंकुश आणि दुसरीकडे साम्राज्यसंघटनेचा ( Imperial Federation ) दाब अशा कात्रींत श्रीमंतांना ही कटकटीची पोळी नको, सुखाची भाकरी भली, असें होईल! जबाबदार राज्यपद्धति हे शब्द नुसते ऐकण्यासच बरे आहेत. हल्लींचे नम्र आणि स्वार्थत्यागी नेते,—पोतनीस-हे-शासनपद्धतीची घडी बदलल्यावर उद्यां तसेंच राहतील कशावरून? मजूरपक्षाच्या रॅम्से मॅक्डोनल्डला तो मजूर असे तोंपर्यंत चहांत घालावयाला साखर मिळत नव्हती पण प्रधान झाल्याबरोबर त्याची नजर फिरली! आमचे बोल व्यक्तिविषयक मुळींच नव्हेत. लोककल्याण म्हणजे नुसती सनदेची अदला-बदल नव्हे तर शीलाची व अंतःकरणाची पालट होय. ती पालट सावकाश घडत असते आणि ती घडवून आणण्याचें अधिक कठीण काम भावी शेट पोतनिसांवर अवलंबून आहे. ते कोणीहि असोत, हें काम करीत येवढेंच आमचें म्हणणें आहे.

हल्लींचेंच ब्रिटिश हिंदुस्थान घ्या. त्यात लोकनियुक्त कौन्सिलें थोड्या प्रमाणांत कां होईनात आहेतच. तेथील कारभार किती मिंधेपणाचा आहे! केवळ पगारासाठीं भुकेलेल्या नामधारी लोकमंत्र्याना परकीय नोकरशाही कशी बोटावर नाचविते! हें काय संस्थानिकांनो! तुमच्या नजरेस येत नसेल! त्यालखालच्या म्युनिसिपाल्टिया, लोकल बोर्डें, युनिव्हर्सिट्या, फार काय पण मोठमोठीं लोकांचीं हॉस्पिटलें, शाळा आणि वसतिगृहें, ह्यांत तर परकीय नोकरशाहीचा हात नसतो ना! मग तीं किनीदीं म्यच्या दीन दुबळ्या प्रजेच्या इच्छांना व गरजांना जबाबदार आहेत! नसल्यास कां नाहीत? कारण तेथें शीलाची अजाप आलटापालट झाली नाहीं. म्हणूनच महात्मा गांधींसारखे मोठमोठे शासनाचार्य कळवळ्यानें सांगत आहेत कीं, बाबांनो, तुमच्या सनदेची पालट करू नका. तर शीलाची नव्हे प्रत्यक्ष अंतःकरणाची पालट करा. तुमच्या वचनाची देवघेव करूं नका, तर प्रत्यक्ष हृदयाची करा. ह्या शीलपरिवर्तनकार्याला विधायक कार्य म्हणतात.

तुमच्या विक्षोभक कार्याने और घटकेचें स्वातंत्र्य मिळेलहि कदाचित्, पण तें कायमचें टिकवावयाचें झाल्यास अगोदर मध्यें आणि नंतर त्रिकालाबाधित विधायक कार्य चालू ठेवावें लागतें. तसेंच कार्य भोर संस्थानात पुढें चालू राहील अशी ह्या परिषदेची इच्छा आहे.

तें कार्य चालू असता आतापर्यंत उत्पन्न न झालेले नवीन प्रश्न अथवा अडचणी उत्पन्न होतील. उदाहरणार्थ, मी येथें एकाच प्रश्नाचा उल्लेख करतों. उत्तर हिंदुस्थानात जसे हिंदु-मुसल्मानवाद हा जातीय प्रश्न प्रत्येक कार्यारंभीं उदय पावतो, त्याप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानात त्याच्याच जोडीला ब्राह्मणब्राह्मणेतरवादाचा प्रश्न उभा राहतो. तो नुसते आम्ही डोळे झाकल्याने सुटणार नाही. आज १० वर्षें तुम्ही ह्या ब्राह्मणब्राह्मणेतर-वादापासून अलिप्त आहा ह्याबद्दल तुमचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. पण ह्यापुढची खातरजमा कोण घेईल? पुढील कार्य विधायक आहे, आणि विधायक कार्यांतच अशा प्रश्नाची नड फार येते. मोक्याचा विक्षोभक कार्यात ब्राह्मणब्राह्मणेतरवादच काय पण हिंदु-मुसल्मानवाद त्या वेळेपुरता पडद्याआड कसा जातो हे वेळोवेळीं कार्य-कर्त्यांच्या अनुभवास आले आहे. असहकारितेच्या पहिल्या सलामींत शौकतअल्ली सारखे कट्टे मुसल्मानहि महात्माजींच्या चरणीं लीन झाले. तसेंच गेल्या वर्षीच्या कायदेभंगाच्या रणसंग्रामात ब्राह्मणब्राह्मणेतर खांद्याला खांदा भिडवून लढले. पण विक्षोभाचा पहिला उमाळा ओसरल्यावर विधायक कार्याला हात घालतां न घालतां तेच हे वाद पूर्वीपेक्षाहि आपले अधिक उग्र स्वरूप प्रकट करतात असें आढळून येतें. भोरकरानो! सुधारणेच्या भावी घटनेंत तुम्हाला मतदानाचा हक्क मिळाल्यावर प्रतिनिधि निवडून देण्याची किंवा नियुक्त प्रतिनिधींना अधिकार आणि पगार मिळण्याची जेव्हा परीक्षेची वेळ येईल तेव्हा जर बहुजनसमाजाच्या कल्याणार्थ स्वतःच्या लोभाचा आणि स्वजाती-याच्या अभिमानाचा बळी देण्यास तुम्ही तयार व्हाल तरच ह्या जातीय प्रश्नाची काहींतरी सोडवणूक होईल. येरवीं ते तुमच्या बोकांडी बसल्यावाचून राहणार नाहींत.

दक्षिण हिंदुस्थानात जी थोडीं ल्हानमोठीं संस्थानें आहेत त्यांचे अधिपति ब्राह्मण किंवा मराठे आहेत. पण नोकरशाही मात्र सर्वत्र एकजात ब्राह्मणांचीच आहे. चळवळे लोक सुशिक्षित वर्गांतूनच येत असल्यामुळे ते ब्राह्मण ऊर्फ सुशिक्षित वर्गाचे असणार. खरी जनता म्हणजे शेतकरी वर्गाची, विशेषतः कामकरी वर्गाची. ती दाडांचः अक्षर-शत्रु, गेड्यात राहून उन्हात काम करणारी, जागी झाली तरी दुसऱ्याच्या पावलावर पाऊल टाकून अनुकरण करणारी, विक्षोभक कार्याला प्रसंगी अनुकूल होणारी, पण स्वत्य। विधायक कार्याची जबाबदारी न ओळखणारी व ओझें न सहन करणारी अशी आहे. ब्राह्मण अथवा सुशिक्षित वर्ग हा शहरात राहून सार्वजनिक म्हणून काम करणारा, मग मागून दुसरे त्याची अमलबजावणी करतील अशी वाट पाहणारा. नेतृत्वासाठीं स्वार्थत्याग करणारा पण अनुयायांचें बळ समर्थ नसलेला, मानलेल्या सुशिक्षणामुळें त्याच्या स्वतःच्या गरजा वाढलेल्या आहेत पण त्या पुरवण्यासाठीं आर्थिक आणि

शारीरिक संपत्ति नसलेला असा परावलंबी आहे. अशा अनेक कारणामुळे ब्राह्मण ब्राह्मणेतरवाद अथवा सुशिक्षित अशिक्षितवाद विधायक कार्यात सहजच उदय पावल्यास काय आश्चर्य ? ब्राह्मणेतरांतील सुशिक्षितांस मी ब्राह्मण समजतो तसेंच ब्राह्मणातील अशिक्षितांस मी ब्राह्मणेतर समजतो. ही माझी व्याख्या नीट लक्षात आणून माझ्या टीकाकारांनी माझ्या म्हणण्याविषयी विनाकारण गैरसमज करून घेऊ नये.

## भावी सुधारणा

ह्या परिषदेच्या गेल्या सात बैठकीत माझे मित्र श्री. न. चिं. केळकर ह्यांनी दोनदा, श्री अनंत विनायक पटवर्धन ह्यांनी दोनदा, श्री. ल. ब. भोपटकर, श्री. चिं. वि. वैद्य आणि श्री. गणपतराव अभ्यंकर एकेकदा असे पाचजणांनी अनुक्रमे अध्यक्षस्थान स्वीकारून आपल्या अमूल्य विचारांचा व अनुभवाचा फायदा दिला आहे. त्यात मी काय भर घालणार ? ही सर्व मंडळी संस्थानाबाहेरची होती, तशाच मीहि आहें. प्रत्यक्ष आतील जुलमाची झळ किंवा सामाधाल लरी ह्रीज सोसून काम करण्याची जबाबदारी आम्हांपैकी कोणासच नाहीं. ह्या परिषदेशिवाय सुधागड तालुका परिषद म्हणून एक निराळी परिषद भरत असते असें मी एकलें. इतकेंच नव्हे तर श्रीयुत गणेश भास्कर साने बी. ए. एलएल. बी. सुधागड तालुका सभेच्या ५ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष हे सद्‌गृहस्थ मला समक्ष भेटून, त्यांनी आपलें छापील भाषण मला दिलें, व कांहीं माहितीहि सांगितली. हे गृहस्थ ह्या संस्थानचीच प्रजा आहेत. ह्यांनी आपल्या भाषणात जी रडकथा गायली आहे ती हृदयविदारक आहे विशेषत सडका ह्या मथळयाखाली ह्यांनीं जो टाहो फोडला आहे, त्यामुळें तर सचीवशाहीच्या कीर्तिरूपी गालावर कायमचा डाग लागला आहे ! सचीवशाहीचा हा सावळागोंधळ पाहून मला एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसते, ती ही कीं अखिल भोर परिषदेस अध्यक्ष आणावयाचे ते बाहेरूनच आणणें आवश्यक आहे. कारण त्यांच्या तरी कण्हण्यानें भोरकराच्या मुक्या वेदनांना वाचा फुटेल, आणि महाराष्ट्राच्या पाठीचा कणा जो सह्याद्रि, त्याच्याच प्रत्यक्ष मणक्या मणक्यामधून जुलमी क्षयाचे जंतु कसे विनाभाट चरत आहेत, हें महाराष्ट्राला कळेल ! बाहेरच्यानें अध्यक्ष होण्याचें दुसरें एक कारण असें आहे कीं, संस्थानी मुलूख आणि खालसा मुलूख असे हिंदुस्थान देशाचे भेद ह्यापुढे उरणार नाहींत संस्थानी प्रजेस आता कॉंग्रेसचे सभासद होता येत. संस्थानात कॉंग्रेस कमिट्या काम करीत आहेत फार काय. गोलमेज म्हणून जें नवीन एक सत्र गल्या वर्षापासून पेट घेत आहे, त्यात होय नाही म्हणता म्हणता मोठमोठे हिज हायनेस आणि हिज एक्सालटेड हायनेसरूपी सर्प जाऊन आदळले आहेत, इतकच नव्हे, महात्मा गांधींसारखे अनत्याचारी आस्तिकहि ह्या सत्राच्या दारीं जाऊन भिडले आहेत ! ह्या उकट हद्दीतून कोण किती करपून निघल

की कचा निघेल किंवा शिजून निघेल हें पाहण्यास वेळ लागणार नाहीं. ह्या मंथनांतून फेडरल हिंदुस्थान नांवाचें जें एक पंधरावें रत्न बाहेर पडलें आहे, ती एक अशी अजब चीज आहे, कीं ती विष आहे कीं अमृत आहे हें कोडें मोठमोठ्या रसायनशास्त्रज्ञांनाहि अद्यापि कळेना ! तें कसेंहि असो, हिंदुस्थानाचा जवळ जवळ चौथा हिस्सा संस्थानी अमलाच्या अंधारी तळघरांत बेपत्ता खितपत पडला आहे. ही थोडचूक आजवर जरी हिंदी पुढाऱ्यांच्या डोळ्यांवर आली नव्हती, तरी आतां ती तशीच राहील असें मात्र घडणार नाहीं.

कराची येथील कॉंग्रेसचे वेळीं संस्थानी चळवळीचे पुढाऱ्यांनीं महात्मा गांधी यांचेकडे डेप्युटेशन नेलें, तरी कॉंग्रेसनें आपल्या उघड-ठरावाच्या रूपानें संस्थानी प्रजेची दाद घेतली नाहीं; ही गोष्ट माझ्या दृष्टीनें मोठी निराशेची झाली. त्याचप्रमाणें कॉंग्रेसच्या खालोखाल हिंदुस्थानांत जे प्रागतिक, हिंदुसभा, मुसलमान, ब्राह्मणेतर, जमीनदार, मजूर, शेतकरी वगैरे पक्ष आणि हितकारी उपपक्ष आहेत त्यांच्याकडूनहि अद्यापि ह्या संस्थानी तळघरांचा तळोद्धार त्यांचा तितका मुळींच घेण्यांत येत नाहीं, ही मोठी चीड येणारी गोष्ट आहे खास ! रहदारीचीं शिंगें म्हशीलाच जड झालीं, ह्या न्यायानें प्रत्यक्ष कॉंग्रेसलाच जर आपलें अंग आपल्यास सावरेनासें झालें आहे, तर तिच्यापेक्षां अधिक लहान व कमी सुसंघटित इतर पक्षांची काय कथा ? मला संस्थानी प्रजेचा म्हणून आतां एक निराळाच राष्ट्रीय पक्ष तातडतोब घडविण्यांत यावा असें वाटूं लागलें आहे. अखिल भारतीय संस्थानी प्रजापरिषद लवकरच भरविण्यांत येणार आहे, तिलाच मोरसारख्या इतर लहानसान परिषदांनीं मुळ्य होऊन जबाबदारीपूर्वक आपली बाजू संभाळावी हें इष्ट आहे. परवां पुण्यांत अखिल ब्राह्मणेतर पक्षामार्फत जेधे मॅन्शनमध्यें एक महत्त्वाची सभा भरली होती. तेव्हां अखिल भारतीय ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं आतां संस्थानी प्रजेसंबंधानें निदान आपलें धोरण तरी काय आहे हें बिनचूक भाषेत प्रसिद्ध करावें असा मीं आग्रह धरला. पण महात्माजींसारख्यांनीं ज्या हतभागी लोकांची निराशा केली, त्यांची दाद ब्राह्मणेतरांच्या मानलेल्या पुढाऱ्यांना कशी घेता येणार ? म्हणून त्यांनीं नकार दिल्यामुळें मला विशेष वाईट वाटलें नाहीं ! मला वाटतें, संस्थानी प्रजेनें आतां दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहात न बसतां आपली येथून पुढची वाट आपणच सुधारावी.

ह्या मार्गांत कांहीं अडचणी आहेत. त्यांचा थोडक्यांत उल्लेख करितों. कस्टमचें उत्पन्न संस्थानिक मार्गू लागले म्हणजे खालसांतले स्वराज्यवादी तोंडें कशीं वळवतील, हा एक कूट प्रश्नच आहेत. कस्टम म्हणजे जकातीच्या उत्पन्नाचें नवीन घबाड संस्थानिकांना मिळाल्यावर तें उत्पन्न प्रजेच्या आहारीं जाईल कीं त्याचा लय महाराजांचे नवे बंगले आणि नोकरशाहीचे वाढते पगारांतच होईल हें कोणी सांगावें ? शिवाय संस्थानें आणि खालसा ह्यांत दुसऱ्या अनेक गोष्टींसंबंधीं हेवादावा माजण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ.

धरून त्याच्या रक्ताने ताजमहाल २२ वर्षांत बांधला आणि तोच शहाजहान आता जगाच्या कोडकौतुकाला पात्र झाला आहे, त्याचप्रमाणें पतसर्चांवरहि आपल्या गरीब रयतेची जमीन निरुद्योगी करून खालसा मुलखाच्या कल्याणाकरिता बहाल करून साम्राज्य सरकारांकडून नऊ तोफांची सलामी मिळवून बसले आहेत! भाटघरचें कांपेन्सेशन प्रकरण पुन: विचाराकरिता निघाले व पुरेपुरे कॉपेन्सेशन खालसांतील प्रजेनें द्यावें असे ठरल्यास किती वाद माजेल! सध्या दक्षिणेंत अलीकडे पाऊस फार कमी पडत आहे. उद्या जर स्वराज्यांतील कॉंग्रेसनें ठरविलें कीं सह्याद्रीचा सर्व घाटमाथा दक्षिण हिंदुस्थानाच्या कल्याणाकरिता जंगल म्हणून राखून ठेवण्यात यावा, आणि भोरपासून खाली येट नावगोरच्या हद्दींतील घाटमाथ्यावरच्या सर्व शेतकऱ्यांची धरपकड करावी, मग काय हाहा कार उडेल!

असो, ह्या भावी अडचणी केवळ काल्पनिक आहेत. त्यांना भिऊन संस्थानी प्रजेनें खालसातल्या प्रजेशीं सहकार्य करण्याचें आता लांबणीवर टाकू नये. आणि उलट पक्षीं खालसातील पुढाऱ्यांनी आपल्याच कामात गुंतून—मग ती कितीहि अवजड असोत, संस्थानी प्रजेची इत पर हेटाळणीहि करू नये, येवढेंच मला सुचवावयाचें आहे.

स्थानिक अडचणी आणि गाऱ्हाणीं ह्यांना विचार टराव करताना ते ते वर्ग पुढें आणतीलच. संस्थानात तूर्त सनदशीर रातीनेच चळवळ व्हावी असें कॉंग्रेसचें व व्यक्तिश: महात्माजींचें धोरण आहे. तेंच योग्य आहे. कायदेभंगाचा जेथें जेथें प्रसंग संस्थानिक आपण होऊनच आपणावर ओढून घेतील तेथें कॉंग्रेसला अगर खालसातील पुढाऱ्यांना स्थानिक लढाईंत प्रत्यक्ष भाग घेता येणार नाहीं. पण त्यांची सहानुभूति मात्र अलबत प्रजेच्याच बाजूनें असणार हें उघड आहे. खालसातल्या कायदेभंगात काहीं संस्थानी प्रजेनें व्यक्तिश: भाग घेऊन खालसा प्रजेला ऋणी केलें, तसें खालसातील काहीं कर्मवीरांनी, संस्थानी प्रजेला कर्जफेड करावयाची असल्यास तें त्यांचें व्यक्तिश: पाहणें आहे. त्याचा प्रतिबंध कॉंग्रेसला तरी कसा करता येईल? पण असा प्रसंग न यावा म्हणून वेळीच समजूत घेऊन संस्थानिकांनी सनदशीर प्रयत्नात आपल्या प्रजेशीं आपण होऊन सहकार्य करावें, किंवा निदान त्या कामात सहकार्य करण्यास पुढें आलेल्या खालसातील पुढाऱ्यांशीं आडमूठपणें तडत बसू नये, एवढाच फार तर कॉंग्रेस दोहापक्षीं सल्ला देईल.

नुकतेंच, सर मनुभाई मेथा ह्यांनीं बिकानेरचें दिवाणपदावरून बोलताना, संस्थानी प्रजेला मूलभूत हक्क बहाल करण्यात संस्थानिकाच्या अस्तित्वाला मोठा धोका पोंचणार आहे, अशी हाकाटी केली आहे! दैवं यान्नृपतिविनश्यति. ज्या घाशीराम कोतवालानें पेशवाई बुडविली, त्याच कोटींतील सर मनुभाई हे एक आजकालचे घाशीराम दिसतात. अशा घाशीरामांपासून सचीवशाही तरी सुरक्षित राहो, अशी आमची ईश्वराजवळ प्रार्थना आहे.

# वाळवें तालुका शेतकरी परिषद, बोरगांव

## भांडवलशाहीचें भविष्य

माझ्या मतें शेतकरी म्हणजे तोच, कीं जो आपल्या कुटुंबाच्या व आश्रितांच्या पोषणाला, शिक्षणाला आणि योग्य त्या सुखसोयींना आवश्यक इतकीच, आणि आपल्या आप्तांकडून व आश्रितांकडून वाहवेल इतकीच जमीन बाळगतो आणि ती आपण स्वतः आपल्या आप्तांच्या व आश्रितांच्या श्रमानें योग्य रीतीनें खरोखर वाहतो. असें न करतां इतर जे जे म्हणून जमीन धारण करतात किंवा तिचेवर हक्क सांगतात ते ते सर्व केवळ भांडवलदार आणि म्हणून ते खऱ्या अर्थानें शेती करणारे शेतकरी नसून उलट त्या शेतकऱ्यांचे अगदीं शत्रूच नसले, तरी त्यांचे दावेदार आणि प्रतिस्पर्धी, असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. अर्थात, राष्ट्रानें जर कांहीं जमीन कोणा व्यक्तीस अगर समूहास कांहीं इतर राष्ट्र-कार्यांसाठीं तात्पुरती वापरावयास दिली असेल, तर तिचा धारण करणारा त्या वेळेपर्यंत शेतकऱ्यांचा प्रतिस्पर्धी म्हणतां येणार नाहीं. इतरास तरी दावेदार किंवा प्रतिस्पर्धी कां म्हणावयाचा, तर ह्या जमिनीवर जिवापाड मुलबाळांसह राबणारा एक, तर त्याच्यावरचा लोण्याचा गोळा सबंध गिळून उरलेल्या ताकासाठीं देखील हेवादावा करणारा भांडवलदार शेतकऱ्याच्या छातीवर कायमचा बसला असतो म्हणून हा भांडवलदार कोणत्याहि जातीचा, दर्जाचा, स्वकीय किंवा परकीय सरकार असो अथवा संस्थानिक असो, इनामदार असो किंवा खोत असो; हे सारे सारे शेतकऱ्यांचे दावेदार होत. ते बहुतकरून शेतकऱ्याचे हितशत्रू आणि कित्येकदां तर अगदीं उघड शत्रू असतात. प्राचीन राजे शेताच्या उत्पन्नाचा सहावा हिस्सा घेत; पण ते स्वतःहि शेतकरी

असत. त्या वेळीं शेती फार धोक्याची असे. म्हणून त्यांच्या संरक्षणाची आतांपेक्षां जास्त गरज असे. आतां धोका फार कमी; पण शेतकऱ्यांवर साऱ्याच्या रूपानेंच नव्हे तर इतर अनेक दृश्य व अदृश्य रूपानें कराचा बोजा भारी; आणि खेड्यांतून आणि जंगलांतून रोगराई, वनपशु इत्यादि अनेक संकटांतून बचाव करण्याची जबाबदारी आपणावर जवळ जवळ नाहींच असें अलीकडचे राजे वागतात. बाकीचे जमीनदार तर केवळ नांवाचा मालकी हक्क सांगून आपण खरे जमिनीचे मालक आणि शेतकरी म्हणजे केवळ पिढीजाद गुलाम अशा समजुतीनें राजाशीं सहकार्य करून राहिले आहेत.

## मालकी हक्क

सहजगत्या जमिनीच्या मालकी हक्काचा प्रश्न आपल्यापुढें येतो. खरे पाहतां जमिनीवर मालकी कोणाहि एका व्यक्तीची असणें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं. कारण ती कोणाहि एका व्यक्तीनें किंवा एका काळच्या व्यक्तिसमूहानेंहि केलेली नाहीं. जमीन सर्वांच्या सर्वकालीन समाईक हक्काची आहे. पण तिला धारण करण्याचा हक्क मात्र सर्व राष्ट्राच्या संमतीनें, जो वर सांगितल्याप्रमाणें वाहील त्याचाच आहे. मात्र ह्या हक्काबद्दल मोबदला म्हणून राष्ट्राच्या योगक्षेमाबद्दल राष्ट्राला त्यानें निवडून दिलेल्या प्रतिनिधींनीं ठरविलेला योग्य कर देण्यास शेतकरी कायमचा बांधलेला आहे, हें खरें. उलट हेंहि खरें आहे कीं राष्ट्राचा योगक्षेम म्हणजे इतरांप्रमाणें शेतकऱ्यांच्याहि योगक्षेमाची जबाबदारी राष्ट्रावर येते. राष्ट्र अथवा राष्ट्रानें नेमलेले अधिकारी जर शेतकऱ्यांच्या कल्याणाची टाळाटाळ करतील, तर पर्यायानेंच कर देण्याची टाळाटाळ करण्याला शेतकऱ्यांना राष्ट्रानेंच वाट दाखविल्याप्रमाणें होतें; अशा वेळीं स्वतःच्याच केवळ *हितासाठीं नव्हे, तर अखिल राष्ट्राच्या हिशेबाची* फेरतपासणी होऊन राष्ट्र आणि त्याचा मुख्य पोशिंदा शेतकरी यानें कांहीं काळ कर देण्याचें अडवून ठेवणें हा एक प्रकारें **शेतकऱ्यांचा आपद्धर्मच** होय. ही तहकुबी शेतकरी जर *सनदशीर आणि अनत्याचारी* मार्गानें करत असेल तर त्याला गुन्हेगार कसें म्हणतां येईल! सावकाराची अट सावकार न पाळील, तर कोर्टामार्फत हप्तेबंदी होऊन त्याचें व्याज बंद ठेवण्यात जर अन्याय होत नाहीं, तर पुष्कळ वेळां अर्ज करून नोटीसा देऊनहि, सरकार जर आपली जबाबदारी पाळण्यास चुकलें, तर त्याला ताळ्यावर आणण्याचा अधिकार एका शेतकऱ्याशिवाय काय इतर महाभिक्षुकांस किंवा शेटसावकारास असणार! अर्थात् अशा आणीबाणीच्या वेळीं करबंदी हा शेतकऱ्यांचा गुन्हा नसून उलट तो त्याचा **ईश्वरदत्त अधिकार** आहे. मात्र हा अधिकार शेतकऱ्यानें केवळ स्वार्थासाठीं, अत्याचारानें अगर गुंडगिरीनें अमलांत न आणतां, सनदशीर मार्गानें केवळ नाइलाज म्हणून पण निश्चयानें व आत्मसंयमी दक्षतेनें अमलांत आणावा.

म्हणजे जरी थोडा वेळ त्रास झाला तरी अखेरीस राष्ट्रदेव त्यावर प्रसन्न होईलच होईल! ह्याला इतिहास साक्ष आहे.

आतांपर्यंत शेतकरी कोण? जमिनीचा मालकी हक्क तात्त्विक दृष्टीनें अखेर कोणाचा! अखेर हक्क ज्या अखिल राष्ट्राचा, त्याला देखील पोसण्याची जबाबदारी शेतकऱ्यांच्या कष्टावर कशी अवलंबून आहे! म्हणून राष्ट्रालाहि सारा न देण्याचा हक्क शेतकऱ्यांस तशीच आपत्ति आल्यास कसा पोंचतो, इत्यादि तत्त्वांचा सामान्य विचार झाला. आतां आजपर्यंत सर्वत्र **शेतकऱ्यांची हलाखी** कशी होत आली आहे, आणि तिच्यावरून केवळ आत्मसंरक्षणाच्या दृष्टीनें पाहिलें, तरी शेतकऱ्यांस सारा अडकवून ठेवण्याचा हक्क कसा पोंचतो हें पाहूं. हिंदुस्थान काय, रशिया काय, कोठेंहि शेतकऱ्याची स्थिति अतिशय कंगालच आढळून येते. ही स्थिति पुरातन कालची आहे. कुणबी हा मूळचाच पिढीजाद गुलाम अलीकडे गिरण्यांतील कामकरी वर्गाची कांहीं अशी घटना होऊन तो मालवाल्यांशीं सामना देण्याला उभा आहे. ह्याचें कारण तो शहरांत असतो व सामना देण्यास तो मोकळा असतो. पण शेतकरी हा खेड्यांत राहणारा. त्यांचा संबंध अमुक एका निश्चित मालवाल्याशींच येतो असें नाहीं. शिवाय जमिनीशीं त्याचे हितसंबंध निगडित झाल्यामुळें तो मुलाबाळांसह बांधलेला असतो. अज्ञानामुळें व एकटेपणामुळें, शिवाय दूरदूरच्या खेड्यांत त्याचा गोतावळा पांगला असल्यामुळें गिरणी कामगाराप्रमाणें त्याची विजेच्या वेगानें घटना होणें अशक्य. हळू हळू ती झाली, तरी खेड्यांतल्या मेकडपणामुळें, सरकारचें ऊर्फ स्वरूप पाहिल्याबरोबर विजेच्या वेगानें गति लयाला मात्र गेल्याचे इतिहासांत असंख्य दाखले आहेत.

## आवर्पण, कीड मुंगी, भिकारबुणगे

सरकारचे आणि सावकाराचे वेजबाबदार तगादेदार, अशी एक कां दोन शेतकऱ्यावर पडणाऱ्या जुलमाला अनेक तोंडें आहेत. सरकारी साऱ्याचाच तेवढा बोजा शेतकऱ्यावर पडतो, असें मुळींच नाहीं. मिठाच्या आणि जकातीसारख्या प्रत्यक्ष कराचीच नव्हे, तर मोठ्या मालवाल्यांच्या मालावरील कराचीहि झळ अखेरीस खेड्यांतील शेतकऱ्याला भासते; प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष कराच्या रूपानें सरकार जो वसूल शेतकऱ्याकडून आपल्या खजिन्यांत खेचते, तो त्याच्या वहृ वसुलांच्या जवळ जवळ नऊदशांशाइतका असतो! पण खर्चाच्या बाजूनें मोबदला परत खेड्यांतल्या शेतकऱ्याला किती पोंचतो हें पाहू गेल्यास मात्र, नऊशतांशहि भरत नाहीं! तो सर्व खर्च शहरांत राहणारांच्या चोचल्यावर, सरहद्दीवरील सरदारांच्या वडेजावीवर, आणि टेकडीवरील **छोट्या व वड्या लाटांकरितांच** होत असतो. हा प्रकार हिंदुस्थानांतल्या वेदाद कुणब्यांचाच नव्हे तर जपान-अमेरिकेंतल्या लोकशाहींतल्या खेडवळाचा कमीअधिक मान नें असतोच. राजकीय मनशांची आल्या-

पाल्ट किती होऊनहि जर अखेर शेतकऱ्यांच्या पोराबाळांच्या हातीं खापरच येतें, तर मग अखेरचा उपाय म्हणून त्यांनीं करवंदीचें शस्त्र उगारले तर त्यांचा हात कोण तत्त्वज्ञानी अगर व्यवहारज्ञानी सरळपणानें धरूं शकेल बरें ?

ह्याच सातारा जिल्ह्यात १५ वर्षांपूर्वी मी हजेरीला कंटाळलेल्या मांग लोकांची एक वसाहत करण्याच्या हेतूनें, योग्य ठिकाण शोधण्यासाठीं वणवण हिंडत होतों. तासगांव तालुक्यांत गेलों तेथें अगदीं ओबडधोबड बैलगाडीच्याहि एका खेड्यातून दुसऱ्या खेड्यांत जाण्याला वाट मिळेना, अशीं पुष्कळ ठिकाणें दिसलीं. सबंध गांवठाण्यालाच पिण्यालायक पाणी मिळेना अशी स्थिति होती.

## मग महारामांगांचे काय हाल वर्णावेत !

माणसांना औषध घेण्याची संवय नव्हती; कारण तें कधीं मिळण्यासारखेंच नव्हतें; मग गुरांच्या दवाखान्याची गोष्ट कशाला ? ह्यापुढें शिक्षणाच्या, देवधर्माच्या आणि करमणुकीच्या साधनांचे विचार स्वतः माझ्याच डोक्यांत मेहनांत, मग तीं साधनें ह्या भिकार जिल्ह्यांत तेव्हां दिसली नाहींत हें निराळें कशाला सांगावयाला पाहिजे ? ह्याच वेळीं हिंदुस्थान सरकारचा दिल्लीची नवी राजधानी उठवून देण्याचा विचार चालला होता ! आज ह्यासाठीं १५ कोटी रु. खर्च पडले आहेत ! ह्या हिशोबाला काय म्हणावें ? संस्थानांतला प्रकार तर औरच !!

## सौम्य उपाय

वर जो करवंदीचा उपाय सांगितला तो निर्वाणीचा आहे. उठल्या सुटल्या त्याची वाच्यता पूर्वतयारीविना बाष्कळपणाचें आहे. ती तयारी करणें म्हणजेच सौम्य आणि कष्टाळूपणाचे उपाय होत. असा एकहि उपाय हिंदुस्थानांतल्या शेतकऱ्यांनीं बार्डोलीशिवाय इतर कोठें अजूनपर्यंत अंशतः देखील केला नाहीं, किंवा करण्यास त्यांना कोणीं इतर शहाण्यांनीं मदत केली नाहीं. पहिली गोष्ट तालुकानिहाय शेतकरी संघ निघाले पाहिजेत; इतकेंच नव्हे तर *तालुकानिहाय कामकरी संघहि निघाले पाहिजेत. आणि* ह्या जोडसंघाचें निरंतर सहकार्य चालले पाहिजे.

सातान्यांतील खेडवळ म्हणजे वर्षांतील सहा महिने शेतकरी आणि दुसरे सहा महिने गिरणींतील अथवा गोदींतील कामकरी किंवा मजूर असतो. सच कसे करावेत व *आपल्याच बळावर आणि पैशावर चालवावेत ह्याचा श्रीगणेशा आतां त्या खेडवळांना*

अगदींच नवा नाहीं. शेतकऱ्यांच्या व कामकऱ्यांच्या जोडसंघाच्या वर्तीभर घडणाऱ्या सहकार्याविना बहुजनसमाज पाठकुळीवर बसून, पुन्हा त्यांचेंच रक्त शोषणारी जी भांडवलशाही तिला आळा कधीं बसणार नाहीं. खेड्यांत राहून जमिनीवर श्रम करून कच्चा माल उत्पन्न करणारे शेतकरी आणि शहरांत राहून त्याचा पक्का नग उत्पन्न करणारे गिरण्या, गोद्या आणि आगगाड्यांवरचे कामकरी हेच खरे राष्ट्राचे धारक आणि चालक; पण त्यांना भांडवलदाराच्या बुद्धीचें आणि युक्तीचें साह्य पाहिजे. ही तात्त्विक गोष्टहि विसरून चालावयाचें नाहीं. हा भांडवलदार इंग्लंड, अमेरिकेतल्या-प्रमाणें सावकार तरी असेल किंवा हल्लींच्या रशियाप्रमाणें सरकारचे रुपानें तरी राहीलच. अजीबात नष्ट होईल हे शक्यच नाहीं. पण ह्यापैकीं **तो भांडवलासूर** कोणत्या का रुपानें राहिना तो शेतकऱ्यांच्या व कामकऱ्यांच्या मांडीखालील तट्टाप्रमाणें चालला पाहिजे. त्याची चंदी जर घर बसणाऱ्या शेतकरी कामकरी यांच्याच हातीं आहे तर त्याच्या ओठांतील लगामहि त्याच्या हातांत नको काय? **ज्याची चंदी त्याचाच लगाम** हें तत्त्व विसरल्याबरोबर मांडवलासूर तावडतोब बादशाह बनून साक्षात विष्णूचा अवतार म्हणवूं लागतो. पण उलट ज्या हातात चंदी त्याच हातीं लगाम आला, म्हणजे हाच भांडवलासूर उग्र रुप टाकून आपखुशानेंच अध्यक्षाचें गरीब रुप धारण करणारच. पण त्याचे अगोदर शेतकरी व कामकरी ह्या दोघांचे संयुक्त संघ ( Federal Union ) ठीक झाले पाहिजेत. ही **मांजराच्या गळ्यांत घाट** बांधावयाची ती शेतकऱ्यांनी आणि कामकऱ्यांनीच बांधली पाहिजे. त्यांनीं ह्यापुढें ह्या कठीण, पण स्वतःच्या कामाकरितां येरागबाळ्याच्या तोंडाकडे पाहात राहूं नये. संप आणि करबंदी हे दोन केवळ तात्पुरते आणि शेवटचे उपाय आहेत. पण ते मधून मधून केवळ हुलकावण्या दाखविण्यासाठीच योजावयाचे असतात. त्यांना कायमचा नाहीं. मांजराच्या गळ्यांत घाट बांधण्याची ज्यांनीं इतर सर्व तयारी केली असेल, त्यांनींच हे उग्र उपाय कांहीं काळ नाइलाजानें करावयाचे असतात. मिळून मुद्दा इतकाच कीं, वरील संयुक्त संघाची तयारी केल्याशिवाय, इतर सर्व चळवळी व्यर्थ आहेत. अशा संघाचीं सर्व तपशिलें ठरविण्याकरितां अशा परिषदा भरविणें अवश्य आहे.

## भविष्य

अनेक यंत्रांचा शोध लागून हल्लींच्या औद्योगिक क्रांतीच्या काळांत ह्या भांडवलासुराचा जन्म झाला आहे. हा चिरंजीव नाहीं. इतर प्राचीन असुराप्रमाणें हाहि आपल्या कर्मानें आणि इतरांच्या दर्शनानें मरणारा आहे. सार्वत्रिक शिक्षणाचा आणि सार्वत्रिक चाहतुकीचा जसजसा प्रसार होईल, तसतसें ह्या असुराचें आयुष्य गघुरात देणार. मजूर आणि

मालक हा भेदच नव्हे. तर खेडें आणि शहर हाहि भेद भविष्यकाळीं टिकणार नाहीं. अमेरिकेंत असें एक खेडें नाहीं कीं, जेथें वीज, मोटार, रेडिओ आणि हवाई ज्हाज ह्यांचा शिरकाव नाहीं. हा हरपोख्या मांडवलशाहीहि न्यू यॉर्क शहरापेक्षां दूरदूरच्या खेड्यांत रात्रीं निजावयास अधिक जातो. उलट खेड्यांतले कामकरीहि दिवसा शिक्षणासाठीं आणि कामासाठीं शहरांत राहून रात्रीं निजण्यास खेड्यांतच जातात. भावी शहरें किंवा खेडीं हीं दोन कधीं न भेटणाऱ्या मानवी मित्र वर्गांचीं भिन्न निवासस्थानें अशीं न राहतां सर्वांचींच दिवसा कामाचीं व रात्रीं विश्रांतीचीं ठिकाणें होतील. हें पुढील भविष्य अजमावून जर वरील संयुक्त संघ आपलें कार्य नेटानें आटोपतील तरच ह्या मांडवलासुराची आयुर्मर्यादा संपून तो अंतर्धान पावेल; आणि प्राचीन काळचें बळीचें राज्य पुनः बळीलाच मिळून पुनः घडी विघडेपर्यंत सर्व सुरळीत चालेल.

## २७

# चांदवड तालुका शेतकरी परिषद, वडनेर

### " शेतकऱ्याचा स्वयंनिर्णय "

आजची ही परिषद अगोदर तुमची, निदान तुमच्या तालुक्या पुरती तरी संघटना करून मग तुमच्यापैकीं कोणातरी पुढाऱ्यास अध्यक्ष नेमून मजसारख्या बाहेरच्यांना केवळ सल्लागार म्हणून बोलावलें असतें तर मीं नाकारलें नसतें. तसें न करता मला पुनः पुनः आग्रह करून आणिलें, म्हणून मीं नाइलाजानें आलों आहे. शेतकऱ्याची चळवळ ह्यापुढे बाहेरच्यावर कोणत्याहि कारणावरून अवलंबून चालणार नाहीं. इ. स. १९२८ च्या ऑगस्टमध्यें पुण्यास, मुंबई इलाख्याच्या शेतकऱ्यांची जमिनीच्या तुकडे बिलाला फक्त विरोध करण्याकरितां तातडीनें एक मोठी परिषद भरविण्यात आली. त्या वेळीं मीच अध्यक्ष होतो. त्यानंतर मी तावडतोब पश्चिम आणि पूर्व खानदेश, नाशिक, उमरावती, नागपूर येथे शेतकऱ्यांच्या सभा भरवून, शेतकऱ्यांच्या प्रश्नासंबंधी जागृति करण्याचा प्रयत्न केला. १९३० सालची हकीकत आपल्यास विदितच आहे. जुन्नर, खेड, हवेली, सासवड वगैरे तालुक्यांतून जवळ जवळ प्रत्येक खेड्यांतून आम्ही हिंडलो. त्यानंतर अहमदनगर व सातारा जिल्ह्यांत हिंडलो. विशेषतः सातारा जिल्ह्यांतील वाळवें तालुक्याची परिषद संघटनेच्या कार्यासाठीं आरगांवास भरविली. एकंदरीत महाराष्ट्रांतील ह्या सहा जिल्ह्यांतील परिस्थिति मला आतां प्रत्यक्ष अवगत आहे. शेतकऱ्यांत गेल्या दोन वर्षांत जरी अभूतपूर्व जागृति घडली आहे, तरी त्यांच्या संघटनेच्या कार्याला अजूनि म्हणावी तशी नुसती सुरुवातहि झाली नाहीं, असें मला स्वानुभवावरून आग्रह

कशानें म्हणावें लागत आहे. आणि ह्यापुढें तर दिवसेंदिवस हें कार्य अधिक कठीण, स्वार्थत्यागाचें व धाडसाचें होणार, ह्यात मला तर तिळमात्र शंका नाहीं.

## शेतकरी व सरकार

ह्या कामीं तुम्ही आतां सरकारच्या मदतीची मुळींच अपेक्षा करूं नका, इतकेच नव्हे तर तुमच्या संघटनेला सरकार आणि नोकरशाही संधि मिळेल तेथें कसून विरोधच करीत राहील हें तुम्ही गृहित धरून चालाल तरच बरें. परवां दिल्लीच्या मध्यवर्ति कायदेमंडळांत काय घडून आलें ! तुमच्या हलाखीची नुसती नोकशी करण्याचा ठरावहि नोकरशाहीनें पाडला घातला ! लॉर्ड आयर्विनसारखा सज्जन व्हाइसरॉय पुनः मिळणें दुरापास्त आहे ! येतांना त्यानें तुमच्या कल्याणाचा चंग बांधला असल्याबद्दल बहाणा केला. स्वतः त्याचीच आतां नामुष्की चालली आहे. मग त्याच्या बहाण्याची काय कथा ! हें असेच होणार. परकीय सरकारनें तुम्हांला काय म्हणून द्यावें ? आणि द्याल्याशिवाय कोणत्याहि सरकारनें कधीं कांहीच दिलें नाहीं, व देणार नाहीं. परकीय सरकारापेक्षां आमच्या संस्थानांतील स्वकीय सरकारांनीं तर अधिकच ताळ सोडला आहे. हे संस्थानिक पुनः आपलीच तुंबडी भरण्यासाठीं ह्या परकीय सरकारास शरण जात आहेत ! सुधारणेसाठीं नाणावलेलें म्हैसूरचें संस्थान, तेथील राजा अगदीं सच्छील ! मद्रास के पास पर्वताची यात्रा करून परत येतात न येतात तोंच, त्यांची राजधानी जें बंगळूर शहर त्यालगतच्याच खेड्यात काय प्रकार घडला ? उपासमाराच्या वेदना सहन न होऊन एका शेतकऱ्यानें आपल्या बायकोचा व दोन मुलांचा जीव घेऊन स्वतः पण आत्महत्या केली व चौघेहि स्वर्गा कैलासाला गेले ! पण तेथें तरी दाद लागेल काय ? अशी हलाखी किंबहुना त्याहिपेक्षां जास्तच हिंदुस्थानात सर्वत्र आहे.

## शेतकरी आणि भांडवलदार

पण खरें पाहतां परकीयांना शेतकऱ्यांनीं आपले हितशत्रु काय म्हणून म्हणावें ! शेतकऱ्यांचा हितशत्रु त्यांच्या शेजारीं त्यांच्या दाराशींच उभा आहे. तो खेड्यातला जमीनदार असो किंवा शहरांतला गिरणीवाला असो, सावकाराच्या रूपानें शेतकऱ्यांशीं झगडत आहे ! आणि उलट त्यांनाच सरकार आणि संस्थानिकांचें लष्कर व पोलीस मिळाले आहेत ! शेतकऱ्यांनीं जी संघटना करावी अशी मी ओरड करीत आहे ती सरकारविरुद्ध नव्हे, तर ह्या दाराशीं भिडलेल्या हितशत्रुविरुद्धच होय. या कामगारांनीं जी आपल्या स्वसंरक्षणासाठीं संघटना चालविली आहे ती सरकारविरुद्ध नव्हे. शेवटीं झाला तरी तो

श्रमजीवी कामगारच ना ? त्यांच्या तोंडांतील घास जर कोणी अगोदर ओढून घेत असेल तर तो भांडवलदार. सरकार ह्या भांडवलदाराच्याहि तोंडांतून घास काढून घेत असेल तर तें त्या भांडवलदाराचें पाहणें आहे. तुम्ही तुमच्यापुरतें पाहा. मी बोरगांवास बाळवें तालुक्याच्या शेतकऱ्यांस जें बजावलें तेंच तुम्हासहि पुनः बजावीत आहें. तें हें कीं तुम्ही आपली स्वत ची संघटना करा; इतकेंच नव्हे, तर शहरांतील कामगारांच्या संघटनेशीं खांद्याला खांदा लावून मिळून संघटना करा. शहरातल्या व खेड्यांतल्या श्रमजीवी लोकांमध्यें पुढें कदाचित परस्पर कलागती लावून देण्याचा प्रयत्न तुम्हां दोघांचे समानशत्रु कल्यावरून करणार नाहीत ? म्हणून अगोदरच सावध राहून ही जोडघटना साधणें अत्यावश्यक नाहीं काय ?

## शेतकरी आणि कॉंग्रेस

कॉंग्रेस जोपर्यंत महात्मा गांधी व पंडित जवाहरलाल वगैरेसारख्यांच्या मुठीत आहे तोंपर्यंत तरी, ती तुमच्या बाजूस राहील असा मला भरंवसा आहे. म्हणून तुम्हीहि तिला आपला पाठिंबा सरळ मनानें व सढळ हातानें द्याच. पण तुमच्यानें कॉंग्रेसला काय मदत होणार ? कॉंग्रेस तर सुशिक्षितांची आणि तुम्ही अक्षरशत्रु. कॉंग्रेस स्वतः श्रीमंतांच्या हातीं गेली आहे; आणि जाणें साहजिकच आहे. तुम्ही तर दरिद्री. मला एकदां वाटत होतें कीं, ही सारी कॉंग्रेसची चळवळ शेतकऱ्यानींच काबीज करावी. पण हल्लींच्या स्थितींतील हिंदी शेतकऱ्यांनीं कॉंग्रेस काबीज करणें जवळ जवळ ब्रिटिश राज्य काबीज करण्याइतकेंच अशक्य नाहीं काय ? कॉंग्रेस जोपर्यंत तुम्हाला अनुकूलच आहे तोपर्यंत तुम्हीहि तिच्या उलट जाण्याचें कारण काय ? आज कॉंग्रेसनेंहि तुमच्या संघटनेचें प्रत्यक्ष कार्य आपल्या शिरावर घेतलें नाहीं. याचें कारण कॉंग्रेसची तशी इच्छा नाहीं असें मुळींच नसून प्रस्तुतच्या हातघाईच्या लढाईत तिला तशी वेळ व सवडच नाहीं. म्हणून नुसत्या आशीर्वादावरच तुमची ती प्रामाणिकपणें समजूत करीत आहे. तुम्हीहि प्रामाणिकपणें तिचें हित चिंता, – तिच्याशीं प्रतारणा करण्यात तुमचें तिळमात्र हित नाहीं. पण मला सांगावयाची मुद्द्याची गोष्ट ती हीच कीं तुम्ही ह्यापुढें कोणावरहि – प्रत्यक्ष कॉंग्रेसवरहि, अवलंबून राहूं नका. हे सांगण्यांत मी कॉंग्रेसचा अपमान करीत नसून, केवळ तुम्हाला सावध करीत आहे. कॉंग्रेसचें कार्य बहुतांशीं आणि आतां तर सर्वांशीं राजकारणाचें आहे. मी तुम्हाला स्पष्ट बजावीत आहे कीं, तुमच्यापुढचें कार्य मुख्यतः राजकारणाचें नसून तें अर्थकारणाचें किंवा सामाजिक स्वरूपाचें आहे, हें मी स्वतः राजकारणाला भिऊन किंवा कोणाची भीड ठेवून सांगत आहे असा गैरसमज होऊं देऊं नका. उलट, मला असें उघड दिसत आहे कीं, शेतकऱ्यांना तुमच्या आर्थिक स्वातंत्र्यांतच परकीय सरकार काय किंवा स्वकीय सरकार काय, नोकरशाही काय

शिवा भावी सनदशीर स्वराज्य काय, कोणत्याहि मानवी वर्गाला वेढण घालण्याचें सामर्थ्य आहे, हें खरें नव्हे काय ! आणि हें स्वातंत्र्य, शेतकरी बंधूंनो, तुमच्या हातीं आयतेंच लाऊच्या पुड्याप्रमाणें कोंटून तरी आणून देण्याचें सामर्थ्य आजच्या कॉंग्रेसमध्येंहि नाहीं; इतरांना तर तशी इच्छाच नाहीं. मग आतां तुम्ही तुमचा स्वार्थ सुधारणें आवश्यक नाहीं काय ?

कॉंग्रेसविषयी आणखी एक गोष्ट निर्भीडपणानें मला येथें सांगणें जरूर आहे. कॉंग्रेस म्हणजे साऱ्या देशाच्या म्हणजे त्यांतील सर्व वर्गांच्या कल्याणासाठीं विचार करणारी व त्या विचाराची अंमलबजावणारी संस्था आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर ती आमची भावी पार्लमेंट आहे. पण अशी कोणती पार्लमेंट आजपर्यंत जगाच्या इतिहासांत झाली आहे कीं, जिनें आपल्या कक्षेंतल्या सर्वच वर्गांचें हित सारख्या प्रमाणांत साधलें आहे ? ही समदृष्टि मनुष्यमात्राच्या व्यवहारांत तरी जवळ जवळ अशक्य आहे. सर्व पार्लमेंटमधली राणी जी हल्लींची ब्रिटिश पार्लमेंट तिच्यादेखील आजवर जें साधलें नाहीं, तें आमच्या भावी पार्लमेंटला साधेल अशी अवास्तव आत्मस्तुति करणें हा माझा धर्म नाहीं. शेतकरी हा राष्ट्राचा एक विशिष्ट अर्थात सर्वांचा पोशिंदा म्हणून सर्वांत अत्यंत महत्त्वाचा व संख्येनें मोठा वर्ग आहे हें खरें. तथापि, इतर अल्पसंख्याक व परपुष्ट वर्गाइतकें वजन शेतकऱ्यांचें आजवर कोणत्याच पार्लमेंटवर पडलें नाहीं. मग अनेकांच्या वजनाखालीं सहज दडपून जाणाऱ्या आमच्या राष्ट्रीय सभेवर, शेतकरी बंधूंनो, तुमचें काय म्हणून वजन पडावें ? तरी कॉंग्रेसला तुमची कळकळ वाटते ही गोष्ट निःसंशय खरी आहे. पण ती कळकळ, पुढें ह्या देशांत भिन्न भिन्न वर्गांत स्पर्धा किंबहुना वैर माजल्यावर टिकेल, किंबहुना टिकली तरी तुम्हांला खरें आर्थिक स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय आयतेंच आणून देण्याइतकी परिणामकारी ठरेल असें समजणें म्हणजे निव्वळ दुधखुळेपणाचें लक्षण. सध्यां महात्मा गांधींसारख्या लोकोत्तर सत्पुरुषाच्या हातीं कॉंग्रेसचे सर्वाधिकार आहेत. हल्लींच्या लष्करी आणीबाणीच्या अवस्थेंत असें होणेंच इष्ट व जरूर आहे. पण अशा सर्वाधिकारी थोर पुरुषाला झालें तरी सर्वच पुढारलेल्या व मागासलेल्या लहानथोर वर्गांचें हित हांकेसरशीं साधणें शक्य आहे काय ?

## विधायक घटना

वरील सर्व विचारसरणी आपल्यापुढें मांडण्यांत माझा मुख्य मुद्दा हा आहे कीं, शेतकऱ्यांनो, तुम्ही राजकारण हा आपला दुय्यम उद्देश ठेवा आणि तुमची स्वतःची आर्थिक व सामाजिक ऊर्फ विधायक घटना करणें हाच मुख्य उद्देश ठेवा; व त्या कार्याला कोणाच्याहि वाट

न पाहतां आपल्याच पायांवर उभे राहून तावडतोब लागा. ह्या विधायक संघटनेचीं कांहीं ठोबळ अंगें आहेत, त्यांचा आतां खुलासा करतों.

## जमीनदार वर्ग

वाळवें तालुका परिषदेंत मीं शेतकऱ्याची स्पष्ट व्याख्या केली, ती अशी कीं, जो आपल्याला, व आपल्या आश्रितांना आवरेल इतकीच जमीन धारण करतो व ती वाहतो म्हणजे तिची स्वतः मशागत करून भरपूर उत्पन्न काढतो तोच शेतकरी, इतर कोणीहि नव्हे ! जमिनीची सात्त्विक मालकी सर्व राष्ट्राचीच असते. पण दुर्दैवानें राष्ट्राचा ताबा परकी सत्तेकडे गेल्यास ह्या तत्त्वास बाध येतो. अशा अपवादाचे वेळीं जमिनीची पूर्ण मालकी ती वाहणाऱ्या कुणब्याकडेच येते. ही हिरावून घेण्यासाठीं कोणीं कितीहि चतुराईनें कायदे केले तरी त्यांना न्यायाच्या दृष्टीनें शेतांतील एका काडीचीहि किंमत राहात नाहीं. अशी परकीय सत्ता देशांत आल्याबरोबर ती प्रथम आपल्या पोषणासाठीं कुणबी व आपण ह्यांच्या दरम्यान जमीनदार नांवाचा एक मध्यस्थ वर्ग निर्माण करते. ‘ना मला आणि ना तुला तर घाल कुत्र्याला ’ ह्या न्यायानें अशा आपत्तीच्या काळीं जमिनीची मालकी ह्या वर्गाच्या दाढेंत जाते. मग तो वर्ग इतका डोईजड होतो कीं ही सत्तादेखील कमीअधिक मानानें त्यांच्या आहारीं जाते, मग कुणब्याचे हाल काय विचारतां ?

## कुणब्यांची जूट

असा हा आपला विचार झाला. आपण कल्पना करूं कीं देशांत स्वराज्य झालें, जमिनींची तात्त्विक मालकी राष्ट्राला मिळाली; आणि वाहतुकीसाठीं जमीनधारणाचा हक्क श्रमजीवी कुणब्याकडे निर्विघ्नपणें आला, तरी दुसरी गोष्ट महत्त्वाची ही कीं, ह्या सर्व कुणब्यांनीं आपसांत आपली जूट व इतर जे श्रमजीवी खेड्यांतून नव्हेत तर शहरांतून राहात असतील त्यांच्याशीं कायमचें सहकार्य केलें पाहिजे व सहानुभूति राखली पाहिजे, शेतकरी श्रीमंत झाला की तोच जमीनदार बनतो, मग तो इतर गरीब शेतकऱ्यांशीं फटकून वागतो आणि इतर श्रीमंत सत्ताधाऱ्यांच्या पंक्तीस बसतो. म्हणून ही आपसांतील त्रुटीची फारच जरुरी आहे. अमेरिकेंतील शेतकऱ्यांचें उदाहरण पुढें दिलेंच आहे. तीं धोक्याची इशारत आहे. इतकेंच नव्हे तर सर्वांत मुख्य गोष्ट मला आज सांगावयाची आहे, ती ही कीं, शेतकऱ्यांनो, तुम्ही नेहमीं काबाडकष्ट करणारे नांगरे म्हणूनच काळ न कंठतां राष्ट्राच्या अर्थकारणांत तुम्ही आपला एक हात अर्थउत्पादनांत गुंतवून दुसरा हात त्या

उत्पन्न केलेल्या अर्थाची पुढें विल्हेवारी कशी चालली हें पाहून, ह्या अर्थगाड्याच्या बैलांची शिंग-दोरी खेंचण्याकरितां नेहमीं मोकळा ठेवणें जरूर आहे. हे जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत मागें गेलेल्या अनंत काळाप्रमाणें, पुढें येणाऱ्या अनंतकाळींहि तुम्ही भारवाही, केवळ शेपूट व शिंग नसणारीं जनावरें राहणार ह्यांत काय संशय! आणि ह्याबद्दल इतरांना उगाच वाईट वाटून तरी काय उपयोग!

## अमेरिकेंतले शेतकरी

अमेरिकेसारख्या देशांतील शेतकऱ्यांनीं केवळ जमिनीवरच नव्हे तर देशाच्या व्यापारावरहि आपला ताबा राखला आहे. ते कच्चा माल नुसता तयार करून दुसऱ्याचीच, केवळ तुमच्याप्रमाणें भर करीत नाहींत; तर तो कोठें कसा जातो हें पाहण्यासाठीं उतारपेठेवरहि आपला ताबा चालवितात. कच्च्या मालाची केव्हां किती किंमत असावी हें ठरविणें अमेरिकेत शेतकऱ्यानें आपले हातीं ठेविलें आहे. परवां दोन कोटी डॉलरचा( ३॥ रु. = १ डॉलर) कापूस अमेरिकेंतील शेतकऱ्यांनीं जाळून बाजारांत त्याची किंमत राखली असें मीं कोठेंसे वाचल्याचें आठवतें. ह्यालाच म्हणावें शेतकरी! इतर ते नुसते भारवाही!! पण अमेरिकेंतील शेतकरी हा केवळ कुणबी नसून तो एक प्रकारचा जमीनदार व मांडवलदार बनला आहे. खरे कष्ट तेथें तुमच्या आमच्यासारखे काळे शिद्दी लोकच करतात. म्हणून अमेरिकेचें उदाहरण तुम्हीं जसेंच्या तसेंच गिरवावें असें माझे म्हणणें नाहीं. आमची परिषद तालुक्यापुरतीच आहे म्हणून तुम्ही तालुक्याची तरी उतारपेठ आपल्या ताब्यांत घेण्याच्या मार्गास लागा. खरें पाहिलें तर अशी शेतकऱ्यांची संघटना सर्व देशभर होणें जरूर आहे.

## महाराष्ट्राचा गांवगाडा

हा व्यापारी पल्ला गांठणें ही कांहीं नुसती बोलण्याची गोष्ट नव्हे. त्याला शिक्षण, सवय, सहकार्य आणि कालावधि किती तरी पाहिजे. अखिल बहुजनसमाज, निदान खेड्यांतील सर्व गांवगाडा तरी मुळापासून दुरुस्त झाला पाहिजे. मी सांगतों ही गोष्ट हिंदुस्थानांत निदान महाराष्ट्रांत तरी नवी नाहीं. मी केवळ भविष्यपुराणहि रचीत नाहीं. परकीय सत्तेच्या धाडी वारंवार येऊन, शेवटीं अशा सरकारपरंपरेवर आधुनिक यांत्रिक युगाच्या आपत्तीनें कळस चढविल्यावर, आमच्यांतला पूर्वीचा गांवगाडा आतां जमीनदोस्त झाला आहे. पण तो कधी नव्हताच अशी आपली गैरसमज होऊं देऊं नका. महाराष्ट्रांत स्वराज्य वरचेवर उसळी मारून शेके धर करतें, ह्याचें कारण महाराष्ट्रांतली रयतवारी

जमीनधारणेची पद्धतच नव्हे, तर महाराष्ट्रांतील पूर्वीचा उतारपेठेवर ताबा ठेवणारा गांवगाडा हाच होय. महाराष्ट्राचा राजा महाराष्ट्राचा कुणबीच होता. वाणी व ब्राह्मण हे त्याचे आश्रित होते. महाराष्ट्रांतील मराठ्यांनीं ह्या वाण्याब्राह्मणांच्याच नव्हे, तर साळी-कोष्टी वगैरे चतुर कारागिरांच्याहि वसाहती आपल्या सोयीप्रमाणें वेळोवेळीं करविल्या आहेत. ह्याचा इतिहास अद्यापि लिहावयाचा आहे. ही गोष्ट थोरडा व पोकळ जातीचा अभिमान बाळगणाऱ्यांना मुळींच कळण्यासारखी नसून खऱ्या राष्ट्रोद्धारकांनीं शोधून काढून अमलांत आणावयाची आहे !

## सामाजिक व धार्मिक बाबी

वर उल्लेख केलेला गांवगाडा दुरुस्त करणें म्हणजेच शेतकऱ्यांची संघटना करणें होय. शिक्षण, व्यसनाची बंदी, वाहतुकीच्या साधनें, सामाजिक सुधारणा, खऱ्या व भरीव धर्माचरणाची जबाबदारी, वगैरें पुष्कळ गोष्टींचा मी वेळोवेळीं आजन्म टाहो फोडीत आलों आहें. ह्या सर्व तपशिलाच्या गोष्टी आतां लांबणीवर टाकणें राष्ट्रहिताला घातुक आहे व त्याचा विचार आजच्या सभेंत झाला पाहिजे. ह्या तपशिलाची अंमलबजावणी करण्यासाठीं तालुक्यातील म्युनिसिपालिट्या, बोर्डें व इतर स्थानिक संस्था प्रत्यक्षपणें, शेतकऱ्यांनो, तुमच्या हातीं आल्या पाहिजेत. चळवळे लोक अशा संस्थांतून जागा पटकावण्यापुरतेच तुम्हांला आपल्या नादीं लावतात, व आश्चर्य हें कीं, तुमच्यांतलेच पुढारी म्हणविणारे ह्या चळवळ्यांच्या नादीं लागून तुमचें नुकसान करतात. ह्या गोष्टी आतां शाळेंतल्या विद्यार्थ्यांलाहि कळू लागल्या आहेत.

## शेतकऱ्यांचा स्वयंनिर्णय

मला शेवटीं एवढेंच सुचवावयाचें आहे कीं, आर्थिक स्वातंत्र्य व आर्थिक स्वयंनिर्णय हें साधावयाचें असल्यास तुम्हांला राजकारण, सामाजिक सुधारणा, धार्मिक स्वातंत्र्य ह्या सर्वच गोष्टींकडे लक्ष पुरविलें पाहिजे. पण त्यांच्यासाठीं तुम्ही केवळ ह्या निरनिराळ्या प्रकारच्या चळवळी चालविणारे जे कोणी वरेवाईट पुढारी असतील त्यांच्यावरच विसंबून राहूं नका, इतकेंच नव्हे तर या कार्यासाठीं केवळ पुस्तकी शिक्षणाची वाट पाहूं नका. महात्मा गांधींसारख्या दूरदृष्ट्यांची ह्या शिक्षणावरूनच नव्हे तर अशा शाब्दिक सुशिक्षितांवरूनहि श्रद्धा पार उडाली आहे. अशा पोशाकी पंडितांना ह्या महात्म्याच्या पुढें पांच मिनिटें सरळ उभे राहण्याचीहि छाती होत नाहीं, पण तुम्ही अथवा तुमचे पुढारी म्हणविणारे कायदेमंडळाचे दलाल, अशाच पोशाकी पंडितांना

आपले प्रतिनिधि म्हणून सर्व प्रकारच्या दिखाऊ दरबारांत पाठवीत. अशाच मतलबी मांडवलदारांशीं सख्य करतां, अशाच स्वार्थी भट-भिक्षुकांचे पाय पूजतां, ह्याला काय म्हणावें ? “ ज्याचें त्यानें अनहित केलें तेथें कोणाचें काय वा गेलें ? ” असें तुकाराम रडले तें तुमच्यासारख्यांनाच पाहून रडले असावे.

असो. हल्लीं आमच्या देशांत केवळ राजकारणाच्याच हंडीला उतूं येऊं लागलें आहे. पोटापाण्याच्या गोष्टी, धंदाउदीम वगैरे आवश्यक गोष्टींकडेहि दुर्लक्ष होत आहे, मग सामाजिक सुधारणा व खऱ्या धर्माची चाड कोणासच नाहीं ह्यांत काय आश्चर्य ? पंढरपुरांतील देवाच्या मूर्तीला ब्राह्मणाच्या सकेशा विधवांनीं स्पर्श करून पूजनाचा अधिकार मिळाला किंवा मिळाल्यासारखाच आहे. पण तुमच्या जिल्ह्यांतील काँग्रेस कमिटी आणि मुख्य म्युनिसिपालिटी अस्पृश्यांना नुसते देवळांत घ्यावयास तरी तयार आहेत काय ? सातारा जिल्ह्यांतील एक शाळामास्तर माझे मित्र रा. कृष्णराव बागर हे बेळगांवच्या ‘ राष्ट्रवीर ’ पत्रांत लिहितात कीं, “ खेडेगांवांतील शाळांतून मराठे जातीचे पंच इतर जातींच्याच मुलींची भरती करून आपल्या जातीच्या मुलींना मात्र पडद्याबाहेर आणण्यास तयार नाहींत ! ” तुमच्या तालुक्यांतहि हाच प्रकार चालूं आहे काय ? शेतकऱ्यांचे प्रसिद्ध कैवारी माझे मित्र आमदार गुंजाळसाहेब मध्यवर्ती कायदेमंडळांत शारदा बिलाचा पास झालेला कायदा निदान कांहीं ब्राह्मणेतर जातींच्या मुलींना लागू करण्यांत येऊं नये, अशी सवलत मागत आहेत. गुंजाळसाहेबांना ह्या प्रतिगामी प्रयत्नांत पाठिंबा देऊन कांहीं जाती आपल्या मुलांचे विवाह बाळपणींच उरकण्यांत गुंतल्या आहेत असें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत आहे. शेतकऱ्यांनो, तुमचा काय बेत आहे ? इंग्लंडांत मजुरांचें राज्य झालें, रशियांत कुणब्यांचें राज्य झालें वगैरे गोष्टी तुम्ही दुरून तरी ऐकल्या असतीलच, पण तेथील मजूर आणि कुणबी तुम्हांसारखे अगदीं दुसऱ्यावर हात टेकून बसणारे खात्रीनें नाहींत, हें ध्यानांत ठेवा. आणि त्यांना पुढें आणणारे महात्मे इकडील कांहीं पुढाऱ्यांप्रमाणें शिळ्या कढीलाच पुनः ऊत आणून आपलें पोट भरण्यांतच पटाईत नाहींत. म्हणूनच तिकडची सुधारणा इकडे होण्यास वेळ लागत आहे. एरव्हीं काय तुम्ही आम्ही माणसें नव्हत ? तुम्हांस साह्य करण्यास पुष्कळ पुढें येतील. तुम्ही मात्र त्यांचें साह्य पारखून घ्या. पण अखेर तुमचे मित्र अथवा वैरी तुम्ही स्वतःच हें गीतावचन खरें ठरणार ! माझे कांहीं विचार तुम्हाला कोयनेलापेक्षांहि कडू लागतील, अशी मला भीति वाटते ! पण त्याचा परिणाम तरी गोड होवो.

# २८

## ब्रह्मदेशांतील बहिष्कृत वर्ग

ब्रह्मदेशाची यात्रा करण्याचें मनांत आणून मी जेव्हां गेल्या फेब्रुवारींत कलकत्त्याहून निघालों तेव्हां माझे मनांतील मुख्य उद्देश केवळ बौद्ध धर्माचें साधन प्रत्यक्ष पाहण्याचाच होता. हा निर्वेधपणानें साधावा म्हणून इतर माझे व्यवसाय कांहीं काळ तरी बाजूस ठेवावेत असें मला वाटत होतें. पण मी जेव्हां या विचित्र देशांत संचार करूं लागलों तेव्हां प्राचीन वस्तुशास्त्र, तुलनात्मक भाषाशास्त्र, मानववंशशास्त्र इत्यादि ज्या माझ्या आवडीच्या गोष्टी त्यांनीं मजवर एकदम हल्ला चालविला. ब्राह्मधर्माचा प्रचारक ह्या नात्यानें तुलनात्मक धर्मशास्त्राचें अवलोकन मला आजन्म करणें भाग आहे. वरील शास्त्रें तौलनिक धर्मशास्त्राच्या अगदीं हद्दीवरतीं व त्याशीं सजातीय असल्यानें त्यांच्या अध्ययनापासून विशेषतः इतक्या भिन्न परिस्थितींत आल्यावर स्वतः अलिप्त राहणें मला फार कठीण पडलें.

ब्रह्मदेशांत हिंदुस्थानांतला जातिभेद मुळींच नाहीं, ही गोष्ट अगदीं खरी आहे. तेवढ्यावरून येथें कोणत्याहि प्रकारचा बहिष्कृत वर्ग मुळींच नाहीं किंवा पूर्वी नव्हता असा माझा समज होता. इतकेंच नव्हे तर ह्या देशांत पुष्कळ वर्षें राहून बरोबर पाहणारांचाहि असाच समज असलेला मला दिसून आला. पण खरा प्रकार असा नसून अगदीं अलीकडच्या काळापर्यंत ह्या देशांत बहिष्कृत स्थितींत निदान एक हजार वर्षें तरी खितपत पडलेले चार पांच तरी मानववर्ग मला आढळले! श्वेयो ह्या टोपण नावाच्या एका इंग्रजानें लिहिलेल्या Burma-His Life Nations ह्या इंग्रजी ग्रंथांत मी जेव्हां ह्या बहिष्कृत दासवर्गांचें वर्णन वाचिलें तेव्हां मला त्याचें फारच आश्चर्य वाटलें आणि जातिभेद नसतांनाहि बहिष्कृत वर्ग असूं शकतो हें अमेरिकेंतील अत्यंत

सुधारलेल्या संयुक्त संस्थानांतील सामान्य लोकांचें तेथील निग्रोशीं जें वर्तन घडतें व दक्षिण आफ्रिकेंतील गोरकायांचें इतर वर्णियांशी जे वर्तन घडतें तें ज्यांनीं पाहिलें आहे त्यांना सहज पटण्यासारखें आहे.

गेल्या वर्षी भारत इतिहास संशोधक मंडळापुढें अस्पृश्यतेचें मूळ आणि तिचा हिंदुस्थानांतील विकास ह्या विषयावर मी माझा निबंध वाचला. तेव्हांपासून अधिकच ह्या विषयाचा मी शोध करीत आहे. ब्रह्मदेशांतील बहिष्कृत वर्गाची मला जी माहिती शोधान्तीं मिळाली व जी हल्लींची वस्तुस्थिति जागोजागीं जाऊन मी प्रत्यक्ष निरखिली तिच्यामुळें माझ्या स्वीकृत विषयावर अधिक प्रकाश पडणार आहे, म्हणून मी पुढील माहिती संक्षेपानें देतों.

ब्रह्मदेशांतील बहिष्कृत वर्गाचा उगम ब्रह्मदेशांतील गुलामगिरीच्या संस्थेंत आहे. ब्रिटिश राज्याची संस्थापना ब्रह्मदेशांत इ. स. १८८५ सालीं पूर्णपणें झाली. ह्या पूर्वीच्या स्वराज्यांत ह्या देशांत गुलामगिरीची संस्था होती. ती तेथें किती पुरातन होती हें ठरविण्याचीं निश्चित साधनें तूर्त उपलब्ध नाहींत. अनेक सामुग्री जमवून जी. ई. हार्वे आय. सी. एस. ह्यांनीं नुकताच एक ब्रह्मदेशाचा नमुनेदार आमूलाग्र इतिहास दिलेला आहे. त्यांत त्यांनी इसवी सनाच्या चालू सहस्रकाच्या आरंभीं सुरू झालेल्या पगान येथील राजघराण्यापासून विश्वसनीय इतिहास दिला आहे. हें घराणें अनिरुद्ध या नांवाच्या पराक्रमी थोर पुरुषानें स्थापिलें. ह्या घराण्यानें या देशांत जें मोठें मन्वंतर घडवून आणण्यासाठी अनेक राष्ट्रीय हिताचीं कामें केली, त्यांत देशांतील बौद्ध धर्माची सुधारणा करून मोठमोठीं बौद्ध देवस्थानें बांधिलीं हें एक काम होय. हीं देवळें बांधण्यासाठीं खेड्यांतून शेतकीवरील पुष्कळसा लोकांना जबरीनें धरून आणून गुलाम करून त्यांच्याकडून काम घेतलें. ह्याशिवाय, कायमच्या गुलामगिरीचें दुसरें एक कारण ब्रह्मदेशांत असें आहे. देवस्थानांत झाडलोट व इतर राखणदारीचीं कामें करणें हें गुलामांचेंच काम आहे. कित्येक भाविक लोक ही गुलामगिरी आदरानें पत्करीत असत. पण साधारणपणें राजाज्ञेनें ह्या जबरीचा गुरदंडणा खेड्यांतून धरून आणिलेल्या लोकांवर किंवा लढाईंत जिंकून आणिलेल्या लोकांवर लादण्यांत येत असे. हार्वे ह्यांनीं पान ३३१ वर एक इ. स. ११७९ चा शिलालेखाचा उतारा दिला आहे. त्यांत अभिनंदयू नांवाच्या एका श्रीमंत दरबारी गृहस्थानें एक मोठें देऊळ बांधून त्याच्या साफसफाईसाठीं स्वतःच्या, आपल्या बायकोच्या व मुलांना गुलाम म्हणून वाहिलें असा उल्लेख आहे.

अशा देवळीं गुलामांना व त्यांतल्या त्यांत लढाईंत जिंकून आणिलेल्या गुलामांवर वंशपरंपरेचा बहिष्कार पडत असे. त्यांच्याशीं इतर साधारण स्वतंत्र समाज मिळून मिसळून राहत असे. म्हणजे ब्रह्मदेशांत अनिर्भेद मुळींच नसला तरी स्वतंत्र आणि गुलाम असे दोन मुख्य सामाजिक भेद असत. परकासार्गीनीं ठेविलेल्या गुलामांना जरी समाजांत बरोबरीचा मुभा असली, तरी देवळी गुलामांना फारच हीन व

तिरस्करणीय समजण्यात येत असे त्याप्रमाणे गुलामगिरीतून ब्रह्मदेशातील बहिष्कृत वर्गांचा उगम झाला असावा. एकंदरीत ब्रह्मदेशातील हल्लींची धार्मिक संस्कृति व काहीं अंशीं घरगुती व सामाजिक संस्कृतीहि हिंदी संस्कृतीतून आली आहे असे दिसते. निदान काही वर्गांची ग्रामबहिष्कृतता तरी हिंदुस्तानातूनच गेली असावी असे म्हणण्यास हिंदी बौद्ध संस्कृतीचाच पुरावा नसून इतरहि असा पुरावा आहे की, हल्लींहि जे दोन स्थितीतले बहिष्कृत वर्ग तेथे आढळतात त्यांची सटाल, इनसडाल, तुनायाझा अशी जी नावें आहेत तीं हिंदी भाषेतून तिकडे गेली आहेत. तीं नावें चडाल, डोम चडाल, अशुभराजा ह्या हिंदी नावांचेच अपभ्रंश होत ह्यात संशय नाहीं. संस्कृत अथवा पाली भाषेतील शब्दांचे उच्चार ब्रह्मी लोक नीट न करता आल्यामुळे या भाषेतील च श, र ह्या अक्षरांच्या उच्चाराचा ब्रह्मी भाषेत अनुक्रमे स, त, य असा विपर्यास व्हावा असा ब्रह्मी अपभ्रंशाचा नियम आहे. त्याप्रमाणें ब्रह्मी बहिष्कृत वर्गांची नावे हल्लीं तेथे प्रचारात आहेत. अशुभराजा ह्यातील पहिल्या अचा लोप झाला व इतर नियमाःप्रमाणे तुनायाझा असे शेवटलें नाव सिद्ध झालें आहे.

ब्रह्मदेशात ब्रिटिश राज्य स्थापन होईपर्यंत खालील चार प्रकारचे बहिष्कृत हीन वर्ग आढळत असत.

(१) युद्धात जिंकलेले कैदी आणि त्यांचे वंशज यांना देवळांतील सेवेला वाहिलेले गुलाम करण्यात आलेले असे. ह्यांना फयाचून् हे नाव आहे. फया हा शब्द बुद्ध ह्या शब्दाचा चिनी भाषेतून आलेला अपभ्रंश आहे. बुद्ध–बुढ–बुर–पुर–फया अशी ही अपभ्रंश परंपरा आहे. फया हा शब्द ब्रह्मदेशात बुद्ध, त्याची मूर्ति, देऊळ आणि कोणी मोठा सन्माननीय माणूस ह्या सर्वांबद्दल उपयोजिला जातो. चून म्हणजे नोकर असा अर्थ आहे.

(२) स्मशानांतील मर्तिकादि अशुभ संस्कारांशीं संबंध असलेली, थडगी खणण्याची व तीं सांभाळण्याची वगैरे हीन काम करणारे ग्रामबाह्य वर्ग ह्यांना तुनायाझा (अशुभराजा) सडाल, इनसडाल अशीं नावें आहेत.

(३) केवळ भिक्षेवर निर्वाह करणारे महारोगी व इतर असाध्य रोगांनी पछाडलेले, हातपाय किंवा दुसरा एखादा महत्त्वाचा अवयव तुटून अपंग बनलेले ह्यांना केया असे नाव आहे. केया हे नाव आता तुनायाझानांहि लावण्यात येत. कारण, तेहि भीक मागतात. क = मदत, या=द्या (संबोधन) मला मदत करा असे म्हणत भीक मागणारे असा ह्या नावाचा मूळ अर्थ आहे.

(४) माफीचे भयंकर गुन्हेगार. अशा गुन्हेगारांना पूर्वी स्वराज्यात राजाच्या कृपेने किंवा इतर कारणांनी माफी मिळून, पहारेकरी, जेलरची, फांशी देण्याची वगैरे तिरस्कृत कामें आणि अधिकार मिळत असत. त्यांना पेंगेंन्पोलिस, न्याग, चोरमार, छडीदार अशीं नावें असत. अशा अधिकाऱ्यांचा जनतेमध्ये मोठा

दरारा असला तरी त्यांच्याविषयीं सर्वत्र तिरस्कार असून ते समाजबाह्य मानले जात.

ह्याशिवाय तु–इ–हो म्हणजे राजे लोकांचे हलालखोर म्हणून एक वर्ग पूर्वी असे; व ह्यांना एक लहान गांव मंडालेपासून १०–१२ मैलांवर आहे असें माझे ऐकण्यांत आलें. पण मला प्रत्यक्ष जाऊन पाहण्यास वेळ मिळाला नाही. ह्यांचा समावेश वरील दुसऱ्या वर्गांत मीं केला असता पण हल्लीं फारसे हे ग्रामबाह्य नाहींत असेंहि मीं ऐकलें.

वरील चारी बहिष्कृत वर्गांतील लोकांची हल्लींची संख्या हिंदुस्थानांतील बहिष्कृतांच्या मानानें फारच थोडी, म्हणजे साऱ्या ब्रह्मदेशांत ५-६ हजार असेल. ह्यांची स्थितीहि येथल्याइतकी करुणास्पद नाहीं. हें आपलें ठिकाण सोडून, धंदा सोडून व मूळ नांव बदलून सर्वसाधारण समाजांत छपून गेल्यास हल्लींच्या राज्यांत कोणी पर्वा करीत नाहींत. हे जरी आपल्या मूळ गांवींच बहिष्कृत स्थितींत राहिले तरी पूर्वी देखील, हिंदुस्थानांतल्याप्रमाणें ह्यांना अस्पृश्य मानण्यांत येत नसे; तरी पण ह्यांना गांवांत येण्याला व इतर धंदे करण्याला व लोकांत मिसळायला परवानगी नसे. म्हणून अजूनी हे मागसलेल्या विपन्नावस्थेंत पितपत पडलेले मीं प्रत्यक्ष गांवोगांवीं मुद्दाम जाऊन पाहिले. ब्रह्मदेशांत अस्पृश्यता नव्हती निदान हल्लीं नाहीं हें खरें असलें तरी देखील बहिष्कृतांचा व अंतःकृतांचा बेटीव्यवहार पूर्वी होत नसे व आताहि होत नाहीं. मग रोटीव्यवहार व बेटीव्यवहाराची गोष्टच नको. हल्लींदेखील कोणी उघडपणें आपलें मूळ वरील चार पांच प्रकारांपैकीं एकांत आहे असें सांगितलें तर त्यांच्याशीं ब्रह्मदेशांतील पुराणमतवादी बहुसंख्या नुसता भेटीव्यवहार करण्यासहि तयार नाहीं. म्हणजे गृह्य आणि सामाजिक प्रसंगीं समानतेनें बहिष्कृतास आमंत्रण करण्यास अंतःकृत वर्ग अद्यापि तयार नाहीं. ब्रह्मदेशांतील पुराणमतवाद हिंदुस्थानांतल्यापेक्षां कमी हटमूल आहे व जो आहे तो शास्त्यानें मावळत आहे, तरी पण तो मुळींच नव्हता किंवा नाहीं असें नाहीं म्हणून तेथील बहिष्कृत वर्ग हा एक संशोधनीय विषय आहे.

वरील चारी प्रकारच्या बहिष्कृतांचा इतिहास माझ्या अलग्या संशोधनांत जो आढळला तो संक्षेपानें पुढें देत आहे. ब्रह्मदेशाचा इतिहास अद्याप तयार व्हावयाचा आहे. साधनसामुग्री मुबलक आहे. ह्या साधनसामुग्रीचा भारतीय सामाजिक इतिहासाशीं निकट संबंध आहे आणि तो रंजक व तसाच बोधप्रदहि आहे.

**फयाचून** : ह्या नावाचा अर्थ देवळी गुलाम असा आहे. ब्रह्मदेशांतील देवस्थानें अत्यंत पवित्र मानलीं जातात. इतकीं कीं युरोपियनांना देखील पादत्राण घालून देवळांतच नव्हे तर भोंवतालच्या विस्तीर्ण आवारांतहि पाय टाकण्याची छाती होत नाहीं. असा शिरस्ता युरोपियनांनाहि मान्य पडलें म्हणून जोड्याविषयीं सरकारी ठराव आणि वटहुकूम मोठमोठ्या पाट्यांवर आवारापासून कांहीं अंतरावर जाहीर

केलेले आढळतात. देवळे पवित्र तरी देवळी अपवित्र हे मोठे कोडेच मला पडले. शोध करिता देवळीच नव्हत तर देवळात वाहिलेले इतर पदार्थ – फळे, फुले, सुगंधी पदार्थ व नैवेद्य सर्वच वस्तु मनुष्याना अग्राह्य आहेत. ह्या न्यायाने पयाचून म्हणून जो देवळी गुलामवर्ग तोहि पूर्वी अग्राह्य असला पाहिजे. तो कालांतरानें त्याज्य व नंतर अपवित्र मानला असणे अगदी संभवनीय आहे. ह्या गुलामवर्गात पूर्वी पुष्कळ धरून आणलेले राजकैदी असत. ह्याचे एक उदाहरण अत्यंत हृदयद्रावक पण अगदी इतिहासप्रसिद्ध आहे ते असें.

दक्षिण-ब्रह्मदेशात मोलमेन शहराचे उत्तरेस २०–२२ मैलावर क्विना याल्गत थट्न म्हणून एक इतिहासप्रसिद्ध प्राचीन राजधानीचा गाव आहे. तेथे इ. सन ११ व्या शतकाच्या मध्यसमयी मनुहा नावाचा तेलग राजा राज्य करीत होता. ह्या प्रदेशात द्राविड देशातून कांची येथून गेलेला "हीन यान" बौद्ध–धर्म जोरावर होता. उत्तरेकडे ऐरावती नदीचे काठी पगान येथे अनिरुद्ध नावाच्या ब्रह्मी जातीच्या राजाने जेव्हा पहिली ब्रह्मी बादशाही स्थापिली तेव्हा दक्षिणेंत थट्न येथें मनुहा राज्य करीत होता. अनिरुद्धाला उत्तरेकडील भ्रष्ट बौद्ध–धर्माची सुधारणा करावयाची होती. थट्नकडून नामांकित बौद्ध भिक्षू पगान येथे जाऊन अनिरुद्धाच्या राष्ट्रीय कार्यात मार्गदर्शक झाला. त्यानें थट्न येथे बौद्ध त्रिपिटक ग्रथाच्या प्रती आहेत त्या मिळवि ण्याचा अनिरुद्धास मंत्र दिला. सामोपचाराने मागून मनुहा त्रिपिटक देत नाही, म्हणून त्यावर रागावून अनिरुद्धाने मनुहाच्या राज्यावर मोठी चाल करून त्रिपिटकच नव्हे तर त्याचे अक्षरशः सर्वस्व हरण केले. म्हणजे त्याच्या राज्यातील सर्व मौल्यवान चिजा ऐन जिनशी आपल्या राज्यात नेल्या; इतकेच नव्हे तर प्रजाहि गुलाम म्हणून आपल्या राज्यात नेली. तेव्हापर्यंत दक्षिण ब्रह्मदेशातील संस्कृति दक्षिण हिंदुस्थानातील आंध्र आणि द्राविड देशातून दक्षिण ब्रह्मदेशात हीनयान बौद्ध संस्कृतीचे मार्गाने येत होती; ती ह्या बुद्धापुढे उत्तर ब्रह्मदेशात पसरू लागली. थट्नचे बौद्धग्रंथ, बौद्धभिक्षू, आचार्य आणि कारागीर नेले इतकेच नव्हे तर सर्व राजघराणे आणि दरबारहि गिरफदार करून पगान येथे नेण्यात आले. शेवटी त्या थट्न राजघराण्यासह सर्व नामांकित प्रजेला पगान येथे बांधलेल्या नवीन पगोडामध्ये बहिष्कृत देवळी गुलाम म्हणून कायमचे वंशपरंपरा नेमण्यात आलें. मी थट्न आणि पगान ही दुख्या समृद्धीची दोन्ही ठिकाणे शिल्पशास्त्र, समाजशास्त्र आणि धर्मशास्त्राच्या तिन्ही दृष्टीने निरखून पाहिली. दक्षिण ब्रह्मदेशात ब्रिटिशांचा अमल जसा इ. स. १८०० चे सुमारास बसला तसाच तो उत्तर ब्रह्मदेशात १८८० साली बसून सर्व ब्रह्मदेश नव्या अमलात आला. ह्या साठ वर्षांच्या अंतरामुळे मला दक्षिण देशात बहिष्कृत वर्ग कोठेच आढळला नाही. तो पाहण्यास मला उत्तरेकडे मनुहा पगानला जावें लागलें. पगान येथील बहिष्कृत वाड्यांत मनुहा राजाचे घराणे, वाडा, व त्याचे हृदयस्पर्शी स्मारक अद्यापि आहे. शेवटचा पुरुष ऊ मा ल्विन हा २६ वर्षे वयाचा पाणीदार तरुण व

त्याची खानदानी वृद्ध आई मीं डोळ्यांनीं पाहिली. त्यांचीं गाऱ्हाणीं ऐकलीं. त्याच ह्या ब्रह्मदेशांतील श्वेडॅगो नांवाच्या मोठ्या राष्ट्रीय पगोडाजवळ एक फयाचूनांचें एक वेगळें खेडें आहे. त्याचा धर्जी ऊर्फ पाटील म्हणून ब्रिटिश सरकारनें उ बा त्विनची नेमणूक केली आहे. कारण तो मोठ्या राजवंशांतील पिढीजाद फयाचून आहे.

फयाचून हे लोक लहानमोठ्या देवळांत दिवे, फुलें, माळा, उदबाड्या, मेणबत्त्या विकण्यासाठीं दुकानें मांडून बसलेले आढळतात. हा धंदा किफायतीचा असल्यानें अलीकडे फयाचून नसलेल्या इतर अंतःकृत लोकांनींहि अशीं दुकानें आहेत. उलट फयाचूनहि आपलें मूळ लपवून अंतःकृत वर्गांत सर्रास मिसळत आहेत. ह्यामुळें खरा फयाचून कोण हे ओळखून काढणें मोठें मुष्किलीचें काम आहे. विशेष तपशील निरीक्षण नं. ४ यांत पुढें दिला आहे.

**तुरायाझा :** ह्या नांवांतील मूळ शब्द वर सांगितल्याप्रमाणें अशुभराजा ह्यासंबंधीं मीं एक दंतकथा ठिकठिकाणीं ऐकली ती अशी :—'एकदां एका ब्रह्मी राजाची एक गर्भवती राणी अत्यवस्थ आजारी पडली. ती मेलीच असें समजून तिला स्मशानांत पाठविलें. थडग्यांत उतरवितांना ती जिवंत आहे असें आढळलें. स्मशानांत नेलेली राणी राजानें पुन्हा स्वीकारणें शक्यच नव्हतें. तिला थडगे खणणाऱ्या सडाला जानींच ठेवून दिलें व तिचे पोटीं पुढें जो राजपुत्र झाला त्याला अशुभराजा हें नाव पडलें. त्याला सडालांचें मुख्य पद मिळून, स्मशानांतील धार्मिक संस्कारांत बौद्ध फौंजींला ( भिक्षूला ) जी दक्षिणा मिळेल तितकीच ह्या राजवंशालाहि मिळावी असें राजशासन मिळालें'. ही दंतकथा मला पगाम येथील तुरायाझांच्या खेड्यांतील पाटलानें व मगाईन येथील एका सभ्य गृहस्थानेंहि स्वतंत्रपणें सांगितली. कथा खरी असो नसो, ब्रह्मी सडाला लोक राजवंशाशीं आपला संबंध कसा पोंचवितात हें ह्यावरून दिसतें. मलबारांतील पुल्यन, चिलमन ह्यांचाहि अन्य रीतीनें राजवंशाशीं कसा संबंध येतो हें मीं हिंदुस्थानांत पाहिलें तें मला स्मरलें. तुरायाझा हे बहिष्कृत असले तरी कधीं जित नव्हते असें त्यांचें म्हणणें आहे. हे सडालाहून—सडाला लोक मणीपूरच्या बाजूने हिंदु संस्कृतीच्या राजानें प्राचीन काळीं ब्रह्मदेशांत नेले असावेत. ह्याशिवाय माझा नाहीं दुसरा धावत नाहीं. अलीकडे दक्षिण हिंदुस्थानांतील लक्षावधी पारया, पुलया इत्यादि अस्पृश्य जनांचे लोक पोट भरण्यासाठीं ब्रह्मदेशांत अगदीं हीन धंदे करून राहिले आहेत ते मुळींच बहिष्कृत नाहींत. पण हे सडाला मात्र प्राचीन काळीं गेलेले असावेत तुरळक तुरळक आलेल्या जुन्या वतनाच्या वाटी धडगे खणण्याचें आपलें जुनें वतनच चालवीत आहेत; त्याअर्थी हे प्राचीन हिंदी संस्कृतीचें वतन प्राचीन हिंदी राजांनीच स्थापिलें असेल असें माझें मत आहे. विशेष तपशिलासाठीं पुढें निरीक्षण नंबर १ व ३ हीं पाहा.

**केवा :** पूर्वीप्रमाणें हे महारोगी, अपंग, बेवारशी भिकारी लोक असून मोठमोठ्या देवळांच्या वाटेवर याचना करीत बसलेले आढळतात. असे अपंग यांच्या

करात असल्याचे मी इतालियारख्या प्राचीन अमदानीतल्या रोम व इतर क्षेत्राच्या ठिकाणी युरोपात प्रत्यक्ष पाहिले. आमच्या हिंदुस्थानातल्या क्षेत्राच्या भिन्न याचा येथे उत्पत्ति करण्याची मुळी गरज नाही. हा वर्ग समाजबाह्य आहे ह्यात काहीच नवल नाही. मात्र अठराशेपासून ८१० मैलावर असलेल्या मंडाई नावाच्या खेड्या जवळ केलेली मी एक स्वतंत्र स्थानही वगाहतन पाहिली. ती मी पुढे विस्ताराने वर्णिली आहे.

चौथा वर्ग जो माफीच्या गुन्हेगारवर्गाचा तो हल्ली ब्रिटिश अमदानीत काढून आढळणे शक्य नाही. पूर्वीच्या स्वराज्यात 'राजा कालस्य कारणम्' हे तत्त्व जोरावर होते राजाची वैयक्तिक मर्जी मनावर घेतल्यावर न्यायाच्या जसा फर्मी तशाच सात खून करून आपली हुजारी दाखविणाराला माफी मिळून उलट शहर कोतवाली मिळविणाराची नाच उदाहरण पाहण्यासाठी गत्या मगोधमाला ब्रह्मदेशापर्यंत फार लांब जावयासहि नको. हल्लीच्या काठल्या लाकडदानुवर्ति ब्यूरॉक्रसीच्या सी. आय. डी. मध्ये असले पाणीदार माफीबहादर साथीत असल्यास मिळणार नाहीत अशी काण हमी घेईल ? मात्र पूर्वीच्या ब्रह्मी स्वराज्यात असा लोकांना दरबारात जरा वेतन मिळे तरी तेवढ्यावरून समाजात त्याला मान्यता न मिळता उलट बहिष्कार पडे असे ब्रह्मी लोकांच्या वाङ्मयात वाचिले आहे. पॅगन हे असा पोलीस व जेलर लोकांना नाव पडण्याचे कारण ह्याच्या गालावर ह्यानी पूर्वी केलेल्या गुन्ह्याचा कायमची निशाणी म्हणून एक गालावर ठिका मारलेला असे. अलीकडच्या काही गुन्हेगाराना पाश्चात्य सुधारलेल्या सान्याच्या तलवारा नजर करण्यात आल्या आहेत हा प्रयानल्यात एक फरक ध्यानात धरण्यासारखा आहे. एरवी पाणीदार गुन्हेगाराना उगाच शिक्षत मिळत न नाहत. आत प्रमाणेच पूर्वीहि काठ कोठ समाजकार्याला लावण्यात येत होत हे ह्या ब्रह्मदेशातील उदाहरणावरून उघड होत.

असो. येथपर्यंत मी ह्या चार पाच बहिष्कृत वर्गाचा उद्गम व वर्णन केले. ब्रह्मदेशात जाइपर्यंत व गेल्यावरहि कित्येक आठवडे येथ आमच्या देशातल्याप्रमाणे ग्रामबहिष्कृतवर्ग असेल अशी कल्पनाहि माझ्या मनाला शिवली नाही पण वर सांगितल्याप्रमाणे अकस्मात मी चहा असे वर्ग काही विवक्षित प्राचीन ठिकाणींच आढळण्यासारखे आहेत असे ऐकल्यावर मी त्याचा जारान शोध चालविला. पण दक्षिण ब्रह्मदेशातील पुराणमतवादी अशिक्षित ब्रह्मी लोकाकडून मला त्याची थोडीबहुत माहिती मिळाली. पण तीहि उडवाउडवीनेच मिळू लागली म्हणून उत्तर ब्रह्मदेशात बौद्धधर्माचे घर साधन पाहावयास गेलो असता वाटेत पाच खेड्यी मी ह्या निर निराळ्या वर्गाची वस्तुस्थिति प्रत्यक्ष घरोघर जाऊन निरीक्षण करण्याकरिता निवडून काढिली. यापैकी त ड डा. ह्या (हलालखार) वर्गाच मात्र प्रत्यक्ष पाहण्यास मला वेळ मिळाला नाही पण बाकीच्या चार ठिकाणी मात्र मी चांगल्या सुशिक्षित जाणत्या ब्रह्मी दुभाष्याला घेऊन घरोघरी फिरून ह्या निराळ्या वर्गातल्या वृद्ध आणि

वजनदार लोकांना भेटून त्यांनीं दिलेलीं उत्तरें व शिवाय प्रत्यक्ष स्थिति निरखून पाहून घातलेलीं सविस्तर टिपणें लिहिलीं आहेत तीं माझ्या रोजनिशीवरून येथें थोडक्यांत उतरून घेत आहे. प्रोम शहराजवळील गेझ्यांत मात्र माझी जी मदतर निराशा झाली ती पुढें लिहीत आहे.

येथें मला एक गोष्ट नमूद करणें अवश्य वाटत आहे कीं, ही ह्या बहिष्कृत वर्गाची स्थिति आतां अगदीं झपाट्यानें सुधारत आहे. आणखी १०।१५ वर्षांत मला दिसली तितकीं तरी ठिकाणें व कुटुंबें मी पाहिलेल्या स्थितींत पुढील संशोधकास आढळतील कीं नाहीं ह्याची मला जबर शंका वाटत आहे. फार तर काय आतां आतांहि ह्या बहिष्कृत वर्गांना त्यांच्या मूळ नांवानें संबोधण्याचें मोठें शिताफीचें व धैर्याचें काम आहे. ब्रह्मी लोकांचा स्वभाव अत्यंत चिडखोर, उतावळा व तामसी आहे. थोड्या कारणावरून ते वरंवळीला येऊन हातघाई करितात. त्यामुळें दुभाष्याचें काम करून ही नसती उठाठेव करण्यास मला शांत व समंजस माणसें मिळणेंहि बरेच वेळां मुष्किलीचें झालें व पुष्कळदां अर्ध्या दमाच्या दुभाष्यांनीं माझी ऐन वेळीं निराशा करून माझा बेत ढासळून टाकला. म्हणून माझा सर्व भार माझ्यावर किंवा वाटाड्यावरच न टाकतां अगोदर अनेक उपायांनीं खालील ठिकाणच्या लोकांचा विश्वास मला संपादावा लागला. ब्रह्मी लोक जितके उतावळे तितकेच भोळे व दिलदारहि आहेत. विश्वास बसल्यावर ते आपलें सर्व हितगुज—आपल्या उलट असलें तरी—मोकळ्या मनानें सांगतील, हा भरंवसा मला अंतःकृत्त आधुनिक सुशिक्षणानें अर्धवट भाजून निघालेल्या ब्रह्मी लोकांच्या समागमानें जो आला नाहीं, तो तेथील बहिष्कृतांच्या समागमांत आला. हिंदुस्थानांत काय किंवा कोठें काय वरिष्ठ म्हणून गाजणाऱ्यांपेक्षां त्यांनीं पायाखालीं तुडविलेल्या कनिष्ठ वर्गांतच त्या राष्ट्राच्या खऱ्या माणुसकीचीं व स्थानिक स्वभावाचीं लक्षणें सूक्ष्म संशोधकास जास्त आढळून येण्यासारखीं आहेत हें मी माझ्या निरनिराळ्या देशांतील आजन्म घेतलेल्या अनुभवांवरून म्हणूं शकतो !

## सगाईन

**निरीक्षण पहिलें** : सोमवार ता. १४ मार्च १९०७ चौथे प्रहरीं ४ वाजतां सगाईन शहरांतून सगाईन टेकडीकडे जाण्यासाठीं आम्ही उमाँगांचे मोटारींतून निघालों. ऐरावती नदीचे काठीं मंडालेपासून ८–१० मैलांवर हें शहर आहे. माझेबरोबर रा. भिडे व वृद्ध ब्रह्मी पेन्शनर गृहस्थ उ पो विन हे तुवायाझा ह्या लोकांची वस्ती दाखविण्यासाठीं होते. ह्या शहराच्या स्मशानाजवळ आम्ही मोटारींतून उतरलों. तेथे सुमारें २०–२५ तुवायाझा लोकांची लहान वस्ती होती. हे लोक स्मशानांतील थडगीं खणण्याचा धंदा व इतर मर्तिकासंबंधीं कामें करितात. हे लोक आपणास

फयाचून लोकांपेक्षां श्रेष्ठ समजतात, कारण फयाचून हे देवळी, साधारण गुलाम. पण तुवायाझा हे राजवंशांतील आहेत, कारण याझा हे यांच्या नांवांतील शेवटलें पद राजा या शब्दाचा अपभ्रंश आहे. तुवा हे शुम याचा अपभ्रंश आहे. पूर्वी हा शब्द अशुम असा होता, त्यांतील अ जाऊन शुम तुवा हा अपभ्रंश ठरला. याविषयीं खालील दंतकथा पुष्कळ ठिकाणीं मीं ऐकली : एक ब्रह्मी राजा होता. त्याची गर्भवती राणी वारली असें समजून स्मशानांत पाठविण्यांत आली. पण थडग्यांत पुरण्यापूर्वी ती जिवंत झाली. राजानें तिला परत न नेतां थडगें खणणाऱ्या चंडाल लोकांना तिला दिलें, व तिचे मुलास चंडालांचा राजा केला. मार्तिकविर्धात फोंजी भिक्षूला जितकी दक्षिणा मिळेल तितकीच ह्या राजवंशाल्याहि पुढें मिळावी असा नियम घालून दिला. तेव्हां-पासून हें नांव प्रचारांत आलें. ह्या राजवंशानें भिक्षेशिवाय दुसरा कोणताच धंदा करतां कामा नये ह्यामुळें ह्यांना कैचा ( मला मदत करा ) हें नांवहि पडलें. वस्ती एकंदरीत स्वच्छ व नीटनेटकी दिसली. तरुण मुलींना लिहितां वाचतां येत होतें. वस्तीच्या मध्यावरील झोंपडी चांगली बंगलीवजा होती. ती म्युनिसिपालिटीनें बांधिली आहे. येथील म्युनिसिपालिट्या हिंदुस्थानांतल्यापेक्षां चांगल्या किंवा ह्या विवक्षित स्थु. टींचे अत्यन्त हेंच उदाहरण आहेत याचा निर्णय करण्यास मला सुचलें नाहीं. या लोकांनीं वस्तींत आपलें स्वतःचें चांगलें देवस्थान उभारलें होतें. त्यांत म. गौतम बुद्धाच्या व नातांच्या ( भूत, यक्षांच्या ) पुष्कळ मूर्ति होत्या. फोंजी ( बौद्ध भिक्षू ) ह्यांच्याकडे जेवणाला, भिक्षेला व धार्मिक कृत्याला येत आहेत. तरी यांच्यांत विशेष महत्त्वाकांक्षा दिसली नाहीं. एकंदर स्थिति मागासलेली व करुणास्पद दिसली. माझे बरोबरीचे उ पो विन हे वृद्ध व श्रीमंत गृहस्थ असूनहि ह्या लोकांबरोबर उघडपणें बसून जेवण्यासहि आपण तयार आहों असें म्हणाले. ह्या लोकांना मीं विचारलें कीं, तुम्ही इतराप्रमाणें सुशिक्षण मिळवून मोठीं हुद्द्याचीं कामें कराल काय ? तेव्हां ह्या प्रश्नाचा अर्थच यांना कळला नाहीं. कारण हें कसें कळेल ? हें अशक्य कोटींतलें त्यांना वाटलें. एकंदर स्थिति अज्ञानाची, आत्मविश्वासाच्या अभावाची व अल्पसंतुष्टतेची दिसली. पुष्कळ अंशीं हिंदुस्थानांतहि हाच प्रकार आहे !

**निरीक्षण दुसरें :** इरावती मेंदाई नदीकिनाऱ्यावरील अमरपुरा शहराजवळ केवाचा गांव ता. १८ मार्च १९२७ रोजीं शुक्रवारीं सकाळीं पाहिला. इरावती किनाऱ्यापासून पूर्वेकडे एक मैलाच्या आंत मेंदाई नावाचा सुमारें २५० लोकवस्तीचा एक गांव आहे, त्याला लागून २-३ फर्लांगावर केवाची लहान वस्ती आहे. ह्या वस्तींत सुमारें ५-७ झोंपड्या व त्यांत सुमारें २०-२५ बायका व पुरुष पाहिले. सर्व कोष्ट्याचा धंदा करितात. गुजराथेंत व नागपूराकडे धेड लोक लुगडीं साडी विणतात पण हे येथें उत्तम रेशमी कापडहि विणतात. त्याऊन रिकून स्वतंत्र आहेत. ते केवा हें आपलें नांव सांगत नाहींत म्हणून माझ्या दुभाष्याला त्यांच्या स्वतःविषयीं ज्ञानी-दाचर माहिती विचारण्याचें धैर्य होईना. तथापि ते केवाच होते त्यांची त्यांना

खात्री होती. पुढें आम्ही मेंढाई गांवांत जाऊन चौकशी केली. मेंढाईचे लोकहि विणकराचा धंदा करीत होते. त्यांतील एका प्रमुख विणकराच्या घरीं गेलों. तो ब्रह्मी राष्ट्रीय शाळेंत थोड्याच दिवसांपूर्वी शिक्षक होता. हा मनुष्य उ. उत्तमाच्या राष्ट्रीय पंथाचा आहे. त्यानें सांगितलें कीं जवळच्या केवांशीं मेंढाई लोक संबंध ठेवीत नाहींत. तरी त्यांच्यांत व मेंढाईंच लोकांत कांहीं फरक नाहीं. रोटीबेटी किंवा भेटीव्यवहार होत नाहींत याचा अर्थ ते अस्पृश्य आहेत असें मुळींच नव्हे. ब्रह्मदेशांत, अस्पृश्यता अशी पूर्वीहि नव्हती, आतां मुळींच नाहीं. तरी पण ह्या बहिष्कृत लोकांना कोणी लग्नमुंजीत किंवा अशा सामाजिक प्रसंगीं भेटीव्यवहाराचें आमंत्रण करणार नाहीं. पूर्वी त्यांना गांवांत येण्याचीहि मनाई होती. भिक्षेपुरतें यावें पुनः बाहेर जावें; पण यांची स्थिति इतकी सुधारली आहे किंवा मनु पालटलों आहे कीं, त्यांना कोणीहि उघड आमंत्रण करीत नसलें तरी त्यांना दूर सर म्हणण्याची छाती कोणाचीहि नाहीं. फौंजींच्या शाळेंत त्यांचीं मुलें जाऊं शकत. पण सरकारी शाळेंत कोठें कोठें जाऊं शकणार नाहींत. त्यांच्याकडे फौंजी भिक्षेलाहि येत नसत, पण आतां येतांना मीच पाहिले. फार तर काय ग्रामबाध्यता आतां पुष्कळ ठिकाणीं नष्ट होत चालली आहे. धंद्यामुळें त्यांना पूर्वीच्या रिवाजाला चिकटून राहावें लागतें. स्थान व धंदा बदलला तर कोणी त्याचें मूळ विचारीत नाहीं. ते साधारण समाजांत मिसळून जातात. हिंदुस्थानच्या व ब्रह्मदेशाच्या बहिष्कारांत हा विशेष फरक आहे कीं, हिंदुस्थानांत ह्याला धार्मिक स्वरूप आलें असून ह्याला केवळ लौकिक व सामाजिक रूप आहे. हिंदूंतील ब्राह्मणादि वरिष्ठ वर्ग बहिष्कार कडकडून पाळतात. पण ब्रह्मदेशांत फौंजी ह्यांची भिक्षा आतां सर्रास उघडपणें घेतात व त्यांना आपल्या शाळांतून शिकवितात. मात्र त्यांना पूर्वी फौंजींची दीक्षा मिळण्यास अडचण पडे. कारण ती दीक्षा देण्यापूर्वी तो मनुष्य स्वतंत्र पुरुष असावयास पाहिजे, दास स्थितींत असून चालायचें नाहीं, असा नियम आहे. आतां हे लोक फौंजी होऊं शकतात. ह्यानंतर मिंढाई येथील नाटाचें देऊळ पाहिलें. बौद्ध धर्मापूर्वी ब्रह्मदेशांत नाट ऊर्फ नाग ऊर्फ भूतपूजा चालत असे. ग्यारीत व पुष्कळशा वरील वर्गांतहि अद्यापि चालू आहे. हीं नाथांचीं देवळें मी पुष्कळ ठिकाणीं पाहिलीं. ह्या देवळांत दोन मूर्ति आसनावर व एक घोड्यावर बसलेल्या पाहिल्या. हे पूर्वी मुसलमान बंधु होते. किनाऱ्यावर यांची नाव बुडाली तेव्हां ते ब्रह्मी राजाच्या आश्रयाला राहिले. ते मेल्यावर त्यांचीं हीं क्षुद्र देवळें झालीं. मुसलमानांशिवाय सर्व लोक त्यांना भजतात. वार्षिक यात्रा होते तेव्हां ह्या गांवासाठीं रेल्वेचें स्वतंत्र स्टेशन करावें लागतें. ह्या (मुसलमान) नाथांचीं नांवें येफिनी, अफिनले अशी आहेत. नाट नावाचा अर्थ भूतपिशाच असा आहे. कोणी प्रसिद्ध पुरुष अपघातानें मेला तर त्याचें देऊळ होतें व त्याला नाट म्हणतात.

**निरीक्षण तिसरें :** २६ मार्च रोजीं शनिवारीं सकाळीं ९ वाजतां पगानच्या दक्षिणेकडे एक मैलावर नदीकांठीं दोयरा नावाचें दुवायाशाचें एक स्वतंत्र खेडें आहे.

तें पगानच्या स्मशानालगतच आहे. मी प्रिन्सिपाल उसैन (लॅंकरस्कूलचे) यांच्यासह तेथे गेलों. गांवात सुमारें ७० घरें व लोकसंख्या आहे. ही तपासणी आम्ही तीन तासांवर धारकाईनें केली. गांव नदीकांठावर असल्यामुळें पाण्याची व पायखान्याची सोय नैसर्गिक आहे. म्यु. शहरांतच विशेष सोय नाहीं मग ह्यांना कोठून मिळणार? स्वतंत्र शाळा नाहीं, पण फौंजींच्या शाळांत मर्वांबरोबर शिकण्यास हरकत नाहीं. तेथे मुलामुलींचा भेद नाहीं, पण फौंजी मठांत मुलींना शिकतां येत नाहीं. येथें भिक्षुणींचा मठ नसल्यानें मुली घरीं शिकतात. २४ बायकांना लिहितां वाचतां येतें. ब्रिटिश राज्य होईपर्यंत ह्यांच्यावर कसलाहि कर नव्हता. कारण हे बहिष्कृतच होते. आतां कर आहेत, पण त्यांचा उपयोग मात्र त्यांच्या उन्नतीकडे होत नाहीं. हाच प्रकार हिंदुस्थानांत आहे. ब्रिटिश राज्याचा 'घेऊं जाणें, परि देऊं ना जाणें' हा भोळेपणा सर्वत्र प्रसिद्धच आहे! माझ्या समक्ष फौंजींना भिक्षा शिजलेल्या भाताचीच मिळाली. घडे करणें, टेप विणणें, वैद्यकी करणें, शिवाय सर्वमान्य भिक्षा मागणें इ. यांची हक्काची कामें आहेत. कित्येक घरांचीं दारें लागलेलीं होतीं; कारण पुरुष, बायका, मुलें भिक्षेस गेलीं होतीं. भिक्षेचे तांदूळ स्वस्त दरानें विकून रोख पैसा करितात. मग त्यांनीं इतर काबाडकष्ट कां करावेत? राहणी आमच्याकडील चांभारापेक्षां पुष्कळ बरी दिसली; तरी गांवांत घाणेरडेपणा, दारिद्र्याचे, टापटीप यांची मिसळ दिसली. सर्वसाधारण ब्रह्मदेशांत घरांभोंवतीं पुष्कळ जागा असतेच, त्यांत कुंड्यांतून गुफा लावून, फुलझाडें आणि मार्जारपाळा करण्याची चाल चहूंकडे आहे. ब्रह्मी लोक (बहिष्कृतांसह) फुलमाळेचे मोठे शोकी; ह्या महारवाड्यांतील कांहीं स्वच्छ आंगणें व फुलवेलीचे मंडप मला हिंदुस्थानांतील खेड्यांतील ब्राह्मणाच्या परसांत आढळतील कीं नाहीं, याची शंकाच आहे! तरी ह्या खेड्यात मला कुजलेल्या माशांची दुर्गंधी येत होती. अशा खेड्यांतून डुकरें कोठेच दिसलीं नाहींत, पण गावगुंड कुत्री मात्र ब्रह्मदेशांत वतनदाराप्रमाणें वावरत आहेत. जेथें जावें तेथें त्यांचें स्वागत आहेच! नंतर आम्ही खालील ७ घरें बारकाईनें पाहिलीं:—

१ लें घर—वृद्ध मालकीण बैलासाठीं सुर्नी काढण्या वळीत बसली होती. इतरांप्रमाणें सर्व घर ६ फूट उंच खांबावर बांधिलें होतें, ते सर्व लांकूड व बांबूचें होतें. पश्चिमाच्या घरांप्रमाणें हवेचा तोटा नव्हता. पुढें पडवी, बाजूस सैंपाकाची खोली, नंतर माजघर, त्याचे बाजूस निजावयाची खोली अशी प्रशस्त सोय होती. प्रत्येक खोली अदमासें १२–१० फूट लांबरुंद होती. स्वयंपाकाचीं भांडीं मातीचीं, माजघरात एक मोठा आरसा, भिंतीस पूर्वेकडच्या बाजूस बुद्धाचें चित्र, निजावयाच्या खोलीत मच्छरदाणी असें सामान होतें. भिंती व जमीन बांबूच्या कुडाच्याच होत्या. आई, मुलगा, सून अशीं तीन माणसें. पैकीं मुलगा व सून भीक मागावयास गेलीं होतीं! हे मध्यम प्रकारचें घर म्हणावयाचें.

२ रें घर—मालक तरुण व धडधाकट होता. धंदा भीक मागण्याचा.

३ रें घर — मालकाचें वय ७३ वर्षें, त्याच्या बायकोचें वय ७७ वर्षें, त्याना पहिला मुलगा वय ५५, बायको व तीन मुलें. दुसरा वय ४७, बायको व तीन मुलें. तिसरा वय ४०, बायको व दोन मुलें; अशा एकंदर गोळा माणसांचें हें कुटुंब होतें. म्हातान्याचा धंदा वैद्यकीचा, शिवाय भिक्षा ही आहेच. मधला मुलगा दुसरीकडे आपल्या बायकोच्या घरीं राहात होता. नवराबायकोंशिवाय सर्व माणसें भिक्षेला गेलीं होतीं, कारण सकाळची भिक्षेची वेळ. चमत्कार हा कीं, स्वतः भिक्षा मागणाऱ्या बहिष्कृतांच्या घरीं सर्वांस पूज्य व श्रेष्ठ मानिलेला फोंजीवर्ग सकाळीं भिक्षा मागायला येत होता. घराला स्वच्छ व प्रशस्त आंगण होतें. उजव्या बाजूस चांगला लतामंडप व व भोंवतालीं कुंड्यांतून फुलझाडें होतीं. मंडपांत एक लाकडी मंचक होता. बसावयाचीहि आरामशाटिका होती. डाव्या बाजूस स्वतंत्र स्वयंपाकाची जागा होती. हें पहिल्या प्रकारचें घर म्हणावयाचें.

४ थें घर — मालकाचें वय ५२. धंदा वैद्यकीचा, भिक्षा मागत नाहीं. घर दोन मजली व मजबूत लाकडी होतें. बायकोचें वय ४२. चार मुलें. कोणासहि लिहितां वाचतां येत नव्हतें.

५ वें घर — मुख्य मालकीण नवार विणीत बसली होती. नवराबायको, मुलें राहावयास एकच खोली. हें कनिष्ठ प्रकारचें घर.

६ वें घर — मालक तरुण ताजातवाना. धंदा वैद्यकीचा. बायको व तीन सुंदर मुलें. भिक्षा मागत नाहीं.

७ वें घर — हें सर्व खेड्यांत सुंदर होय. सागवानी लाकडाचें खांबावर बांधिलेलें, वॉर्निश केलेलें अगदीं पेटीसारखें! पण नवरा-बायकोचा धंदा केवळ भिक्षेचा! भिक्षेला गेल्यामुळे घर बंद होतें. प्रशस्त आंगणहि होतें. एक देवालय होतें, तें गांव-कऱ्यांनीं स्वतःच्या खर्चानें बांधिलेलें. पुढें सभामंडप होता. गाभाऱ्यांत उंच कट्ट्यावर १० लहानमोठ्या बुद्धाच्या मूर्ति होत्या, त्या सर्व सोनेरी वर्खानें मढविलेल्या होत्या, शिवाय दोन मूर्ति संगमरवरी दगडाच्या व सुंदर होत्या. चातुर्मास्यानंतर (नवबरच्या सुमारास) वार्षिक महोत्सव होतो. त्या वेळीं मागान गांवांतील सर्व लोक देवास नैवेद्य आणितात. त्यांत मांस, मासे वगैरे सर्व प्रकार असतात; पण देवळापुढें कधी मारला जात नाहीं. गावांत कॉलरा, देवी वगैरे आजार झाल्यास ह्यातील एका मूर्तीची छबिना शांति-प्रीत्यर्थ गांवांतून मिरविण्यात येतो. येणेंप्रमाणें "मरीआईचें काम बुद्धाला" आणि महारमांगाचे अधिकार ह्याला आहेत. हा सर्व हिंदु संस्कृतीचा परिणाम. फोंजी येऊन ह्या लोकांच्या मुलांचा उपनयन विधि ह्या सभामंडपांत करितात. हीं मुलें फोंजी च्या शाळेमध्यें इतरांबरोबर समान दर्जानें राहतात. फोंजींच्या मठांत भेदभाव नाहीं. ह्या लोकांतील भिक्षुणी इतर भिक्षुणींच्या मठांत राहू शकतात, अशी एक भिक्षुणी आतां आहे.

प्रिन्सिपॉल सेन यांनीं दुभाष्याचें काम उत्तम कौशल्यानें व धोरणानें केलें

म्हणून ह्या लोकांचा विश्वास आम्हांवर बसला. त्यांनीं आपला खरा वृत्तांत सांगितला. एरव्हीं उडवाउडवीच केली असती. आम्ही जाऊं तेथें स्त्रीपुरुषांचा घोळका जमत असे. नागडीं, उघडीं, शेंबडीं मुलें कांखेत व जात्याच्या खुंट्याएवढा मोठा चिरूट तोंडांत धरून धुराचे लोट हवेंत सोडीत बायका भोवताली जमत असत. प्रथम ज्यांनीं भुंकून हैराण केलं तींच कुत्रीं तपासणी चालली असतां पायाशीं स्वस्थ निजून राहात. जणुं काय, भुंकणारे वेगळेच होते.

नंतर मीं सभामंडपांत मंडळीस बसावयास सांगून ब्राह्मण समाज आणि डिप्रेस्ड क्लासेस मिशन ह्यावर सुमारें १५ मिनिटें व्याख्यान दिलें. तें प्रि. सेन यांनीं ब्रह्मी भाषेंत समजावून सांगितलें. मंडळींना तें आवडलें. असेंच मिशन ब्रह्मदेशांत काढावें, अशी त्यांनीं कळकळीची इच्छा दाखविली. प्रि. सेन ' आपण ह्या कामीं मदत करूं ' म्हणाले. वेळवाच्या टेंपल्यावर लाख मढवून सुंदर भांडीं करण्याच्या सरकारी शाळेचे ते प्रिन्सिपॉल आहेत, पण त्या शाळेंत ह्यांच्या मुलांना घेण्यास मात्र ते तयार नव्हते. कारण यांची शाळा निघून तीन वर्षें झाली, तरी ती अद्यापि प्रयोगाचे अवस्थेंत आहे. यांचीं मुलें आल्यास वरिष्ठ वर्गांचीं मुलें शाळा सोडतील ! ही त्यांना अद्यापि भीति आहे. ही सर्व तपासणी व आमचें मिशन प्रि. सेनच्या पत्नीला फार आवडलें. दोन प्रहरीं पत्ते खेळतांना तिनें जो पैसा जिंकला होता तो सर्व ह्या कामासाठीं घ्या, असें म्हणाली !

## न्यौंऊ

**निरीक्षण ४ थें :** ता. २० मार्च १९२७ रविवारीं सकाळीं ९ वाजतां आम्हीं न्यौंऊ पश्चिम येथें पोंचलों. श्वेझिगों पगोडा पाहिला. हा अनिरुद्धानें (इ. स. १०४४–१०७७) बांधण्यास सुरू करण्याचे पूर्वी त्याचा समजला गेलेला मुलगा कॅन्झिटा ह्या राजानें ( इ. स. १०८४–१११२ ) केली. अनिरुद्धानें थाट्टनच्या राजा मनुहा ह्याला युद्धांत जिंकून त्याच्या सगळ्या प्रजेला कैदी करून पगानला आणिलें. मनुहानें इ. स. १०५९ त " मनुहाचें देऊळ " म्हणून प्रसिद्ध असलेला पगोडा पगानमध्यें बांधिला. शेवटीं त्याला असें मोकळें ठेवणें इष्ट न वाटल्यामुळे, अनिरुद्धानें त्याच्या कुटुंबांतील सर्व माणसें व त्याचे सर्व लहानथोर चाकर व अनुयायी याना देवळी गुलाम करून त्यांचा सामाजिक दर्जा अत्यंत क्रूरपणानें अतिशय नीच करून टाकला. श्वेझिगों देवळाची झाडलोट करण्याचे कामावर इतरांप्रमाणें मनुहाची नेमणूक झाली. त्यापूर्वीहि देवळी गुलाम होतेच. मात्र मनुहाच्या वंशाला अशा देवळी गुलामांचें " राज्यपद " देऊन दुःखावर अपमानाचा डाग दिला. अशीं आतांपर्यंत श्वेतछत्र, पायांत सोन्याच्या कलाबूतचा जोडा, घराला सरळ उभा जिना इ. राजचिन्हें मात्र मनुहाच्या वंशजांस

अद्यापि कायम आहेत. मात्र त्यांना देवाचा नैवेद्य व देव्हाऱ्यावरच्या देणगीशिवाय उपजीविकेचें साधन दुसरें नव्हतें. हें त्यांना पूर्वी मुबलक मिळत असावें. एरव्हीं त्यांना अशा लवाजम्यानें कसें राहतां येईल.

अशा देवळी नोकरांना फयाचून–देऊळ-नोकर–अशी संज्ञा आहे. तुवायाझा आणि फयाचून हे एकमेकांस महाराष्ट्रांतील महारामांगांप्रमाणें कमी लेखितात. तुवायाझांचें म्हणणें आपण कधीं जिंकलेले गुलाम नव्हतों. फयाचुनांपैकीं मनुहाच्या खानदानी अनुयायांचें म्हणणें तर उघडपणेंच आपण श्रेष्ठ असून कोणतेंहि हलके काम आपण केलें नाही. पण ज्या अर्थी ते जिंकलेले गुलाम आहेत, त्या अर्थी श्रेणी त्यांच्याकडे तिरस्काराशिवाय पाहणार नाहींत. आम्हीं ह्या गांवीं या लोकांचा राजा म्हणा, पाटील म्हणा, जो होता, त्याची भेट घेतली. त्याचें नांव उवाल्विन (Ubalwin) वय २७. हल्लीं हा आपल्या बायकोचे घरीं राहतो. तिचा बाप खाऊन पिऊन सुखी व स्वतः स्वावलंबी दिसला. बायकोच्या माहेरचें मध्यम प्रकारचें दुकान व तिच्या बापाचा वैद्यकीचा धंदा आहे. घर दोन मजली व भोंवतालीं स्वच्छ अंगण, लव्हांडर, भोंवतालीं कुंड्यांतून फुलें दिसली. उ या दिवस आतां फयाचून गांवचा राजा अथवा धनी उर्फ पाटील झाला आहे. ह्यांनी सरकारी रजिस्टर काढून दाखविलें. त्यावरून ह्या फयाचून वाडींत ५०० घरें आहेत, असें आढळलें. लोकसंख्या सुमारें २००० असावी. ह्या गांवासाठी एक सरकारी प्राथमिक मोफत शाळा आहे. पण ह्या लोकांवरचा बहिष्कार पूर्वीप्रमाणें आतां कडक नाही. ह्यांच्या विहिरींतील पाणी वरचे वर्ग खुशाल पितात. उघड रोटीबेटी व भेटीव्यवहार मात्र अद्यापि होत नाहींत. त्यांच्या-पैकीं बरेच लोक दुसरीकडे खाऊन पिऊन सुखी आहेत, व ते बिनबोभाट वरच्या वर्गांत मिसळून जातात.

पुरावा म्हणून एक जिल्ह्याचा गांव आहे, तेथें एक गृहस्थ ४०।५० हजारांचे मालक आहेत. ते म्युनिसिपालिटीचे सभासद आहेत, घरीं स्वतःच्या मोटारी आहेत, लाखेची भांडी व इतर बरेच धंदे करितात. तुवायाझांप्रमाणें धडगी म्हणणें व भिक्षा मागणें हे ते करीत नाहींत. मात्र देवळांचे दारांतून फुलें, मेणबत्त्या, उदकाड्या, पंखे वगैरे विकणाऱ्या दुकानांची जी रांग असते, ती ह्यांच्या लोकांची. पण अलीकडे ही दुकानें वरील वर्गांचे गरीब लोकही घालूं लागल्यामुळें फयाचून कोण, हें ठरविणें फार कठीण झालें आहे. नंतर आम्हांला उ या दिवस यांनीं पगानचें रस्त्यानें पश्चिम बाजूकडील वाडींत असलेला आपला वंशपरंपरागत खास वाडा दाखविला. हा स्वतंत्रपणें आमच्याकडील लेण्यांतील एखाद्या श्रीमंत पाटलाप्रमाणें शोभण्यासारखा आहे. दरवाज्याच्या नैर्ऋत्य कोपऱ्याला लागून एक लाकडी मनोरा दिसला. तो मर्द घराण्याचा, ढोल वाडयाच्या नैर्ऋत्य कोपऱ्याला लागून एक लाकडी मनोरा दिसला. तो सर्व घराण्याचा, ढोल होता. त्यावर रखवालदार लोक रात्रीं पहारा करण्याची ही जागा. वाडा इतर घरा-प्रमाणें पायाच्या एका मजल्यावर उभा केला आहे. सर्व घर एकच मजली पण ऐसपैस प्रमाणें पायाच्या एका मजल्यावर उभा केला आहे. सर्व घर एकच मजली पण ऐसपैस व ऐसपैस दिसलें. पूर्वी ह्याला दोन जिने (एक समोर व दुसरा आडवळणाला

भिंतीला समांतर असे ) होते. समोरचा जिना पडल्यामुळें आतां दिसला नाहीं. ह्या समोरच्या जिन्याच्या पायऱ्या चढण्यास मात्र देशाच्या बादशहाशिवाय इतराला अधिकार नसे. सफाईदार सागवानी लाकडाचें सर्व काम होतें. खिडक्यांना विविध शिभन शरण् होतें. दरवाजे विशेष सफाईदार दिसले. दिवाणखाना, निजण्याच्या खोल्या, स्वयंपाकघर ही सर्व ऐसपैस, उंच व रुंद होतीं. एक मोठा रुंद लाकडी पलंग व त्यावर सुंदर मच्छरदाणी होती. घरांतील कट्यादि खानदानी थाटाच्या होत्या. एकंदरींत मोडकळीस आलेल्या इनामदाराचा दिसला, हें पाहून वाईट वाटलें.

उ बा खिन पाटलाची आई ६० वर्षांची वृद्ध आहे. तरी तिचें वय सुमारें ५० वर्षांचें दिसलें. चेहरा शांत प्रसन्न खानदानीचा दिसला. तिचे सर्व दांत स्वच्छ, बळकट, डोळे मोठे व पाणीदार दिसले. हिचा नवरा उ नान पाटील वारून आतां १८ वर्षें झालीं, असें तिनें सांगितलें. त्याच्या मागें तिच्या दोन मुलांना पाटीलकीची वस्त्रें मिळालीं. तेहि वारल्यामुळें सर्वांत लहान मुलगा उ बा खिनला आतां पाटीलकी मिळाली आहे. मी हिंदुस्थानांतील एक उदार ( ब्राह्म ) धर्माचा प्रचारक विशेषतः निकृष्ट वर्गाचा एक सेवक आहे, असें तिला सांगण्यांत आलें होतें, त्यामुळें ह्या देशांतील फुंगीपुढें जमिनीवर लवून त्रिवार नमस्कार करितात, तसा तिनेंहि मला नमस्कार केला. आमचें संभाषण चाललें असतां तिनें माझें काम व हकीगत ऐकून ताडलें. तसे तिचे पाणीदार डोळे दाबून ठेविलेल्या विरळ अश्रूंनें स्निग्ध झालेले दिसूं लागले. शेवटीं सरकारच्या सलूत काहीं तरी आपली दाद लावा, अशी सद्य विनंति केल्यावांचून तिला राहवेना. हें माझ्या हातून ह्या थोरल्या सफरीत आणि उतार वयांत कसें व्हावें, हें आठवून मीहि किंचित् गडबडलों. मी केवळ मनःपूर्वक आशीर्वाद देऊन माझें समाधान करून घेतलें.

दक्षिण ब्रह्मदेशांत मोलमेनच्या उत्तर जिल्ह्यांपैकीं थटून हें शहर इतिहासप्रसिद्ध आहे. ह्या स्थानीं दक्षिणेकडील सिंहली हीनयान बुद्ध धर्माची पहिली उठावणी झाली. येथें कांचीं येथूनहि बुद्ध धर्माची लाट आली. येथील राजे आंध्र देशांतील हिंदी क्षत्रिय कुळांतील असून तेलंग ह्या नांवानें एक हजार वर्षांपूर्वी त्यांचा दबदबा ब्र. पा. प्रदेशांत होता. पण इ. स. १०५० चे सुमारास पगानचा ब्रह्मी राजा अनिरुद्ध यानें थटूण राज्यावरून सफाईनें नांगर फिरवून ह्या क्षत्रियांना आतां अत्यंत हीन बनविलेलें प्रत्यक्ष पहाण्याची पाळी माझ्यावर आली ! ! इतिहासाची पुनरावृत्ति चहूंकडेच होते. आमच्या देशांत जे आज महार, मांग, पारिया, चिरुमा, नामशूद्र, ह्या अनेक नांवांच्या जाती आहेत, त्यांनींहि एके काळीं राज्यवैभव भोगिलें, असें माझ्या संशोधनांत आढळलें आहे. पण इतका अर्वाचीनचा उघड पुरावा मला आजवर मिळाला नव्हता, त्यामुळें मला संशोधनाच्या दृष्टीनें आनंद होत होता. शिवाय मानवी स्वभावांतील आनुवंशिक तिरस्काराच्या मागल्यादि प्रत्यक्ष पाहून दुःख होत होतें ! हे उघड सांगण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. मी वर्णन आहे हें मात्र पवित्र आहे, येवढेंच मला पुरें आहे.

**निरीक्षण ५ वें** : शुक्रवार ता. १ एप्रिल १९२७ रोजीं सायंकाळीं प्रोम येथील श्वेसानडो ह्या मुख्य पगोडाच्या बाजूस असलेला तुबायाझाचा गांव पाहिला. गांव गरीब लोकांचा दिसला. गांव दाखवावयास एक इंग्रजी जाणणारे ब्रह्मी गृहस्थ बरोबर होते परंतु ह्या खेड्यांत शिरून चौकशी करण्याचें त्यांना धैर्य झालें नाहीं. एखाद्याची खासगी चौकशी करण्याची ब्रह्मी लोकांस फार भीड व भीति वाटते, असें दिसतें. मोलमेडमध्यें मला ह्याच अनुभव आला. ह्या गृहस्थांनीं मला मुकाट्यानें गांवापासून दूर नेलें. मला ब्रह्मी येत नसल्यानें स्वतः चौकशी करितां आली नाहीं व हे गृहस्थ तर फारच भित्रे दिसले. नेव्हां मी पगोडा येथें गेलों. तेथें एका वृद्ध गृहस्थाजवळ थोडी चौकशी केली. " हे तुबायाझा आहेत " ह्या पलीकडे हे गृहस्थ कांहीं सांगूं शकले नाहींत.

येणेंप्रमाणें ब्रह्मदेशांतील मूळ बहिष्कृत वर्गाची हल्लींची स्थिति आहे. हिंदुस्थानांतून अलीकडे गेलेल्या अस्पृश्य जातींचे पुष्कळ लोक ब्रह्मदेशांत ठिकठिकाणीं पोटासाठीं अनेक हलकीं सलकीं व कावाडकष्टाचीं कामें करून आहेत. पण ते बहिष्कृत नाहींत.

# २१

# परिशिष्ट पहिले

## भागवतधर्म आणि महाराष्ट्रधर्म

### व्याख्यान पहिलें

पुणें येथें एकनाथषष्ठीनिमित्त रा. शिंदे ह्यांनीं वरील विषयाच्या प्रस्तावनेदाखल प्रवचन केलें, तेव्हां ठाण्याचे प. लो. वा. भावे ह्यांच्या महाराष्ट्र सारस्वत ह्या पुस्तकांतील एकनाथासंबंधीं प्रकरण वाचून भागवतधर्म व महाराष्ट्रधर्म हें कोडें किंचित उलगडण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. भागवतधर्माचा राजकारणाशीं उगाच संबंध लावून न्या. रानडे ह्यांनीं ही वावटळ उठविली होती. मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ह्या पुस्तकांत रानड्यांनीं ही देशाभिमानाची धूळ उठविली, आणि ती एकनाथांच्या भागवतधर्मावर व्याख्यानें देऊन त्यांनीं जी पसरविली ती महाराष्ट्राच्या चिदाकाशांत अद्याप उमळत आहे. महाराष्ट्रधर्म श्रीशिवरायांनीं स्थापिला, श्रीरामदासांनीं त्याचा प्रसार केला. पण निदान महिपतीच्या कालापर्यंत कोणाहि जीवन्मुक्त वारकऱ्यानें भागवतधर्माची परिणति राजकारणी महाराष्ट्रधर्मांत होते, अशी ग्वाही दिली नाहीं. ती त्याची दिशाच नव्हती. रा. भावे ह्यांचे उतारे वाचून दाखवून, रा. भावे ह्यांनीं भागवतधर्माची व महाराष्ट्रधर्माची सांगड घालून अव्यापार केला आहे, असें रा. शिंदे ह्यांनीं आपलें मत दिलें. भावे म्हणतात कीं "भागवतधर्म मऊ आहे. पण त्याच्यांत बुद्ध, जैन, महमदी वगैरेसारख्या धर्मांशीं झगडून त्यांना हटविण्याचें सामर्थ्य आहे." (पान २०६) पुढें ह्या दुग्धरसाचा उत्तम मेवा बनून, महमदी धर्मानें [illegible] पाडल्या असतां, एकनाथांनीं त्याचा रतीब महाराष्ट्राला लावला, आणि त्याला

आपल्या पाळण्यांना उभारा देऊन त्यांत हालचाल सुरू केली. पुढें ह्याचाच आणखी इतर रसायनांशीं मिलाफ करून श्रीसमर्थ रामदासांनीं **महाराष्ट्रधर्म** बनवला. ( पान २२७ ) उत्तरेकडून महंमदी वारें जोरानें वाहत होतें, तसे इतर दिशांनीहि **महाराष्ट्रधर्माला** *विघातक असे वारें वाहूं लागलें होतें. उत्तरेच्या पंथांतून निघालेला लिंगायत*-धर्म, कबीरपंथ, दादूपंथ वगैरेंनीं महाराष्ट्राच्या चातुर्वर्ण्यप्रमुख आचारांवर व विचारांवर मारगे आघात मांडले होते. *मानभावपंथानेंहि हातभार* पसरण्यास सुरुवात केली होती. स्वराज्य तर पूर्वीच लयास गेलें होतें व आता स्वधर्मालाहि राजयक्ष्मा लाग-ल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. स्वभाषाहि मालावत चालली होती. ( पान २४०–४१ ) वगैरे "स्व"ची आपत्ति दाखवून, त्यावर तोडगा म्हणून एकनाथांनीं आपला भागवतधर्म निरूपिला, असा रा. भावे यांना भाव आहे. हा भाव प्रत्यक्ष एकनाथांना तरी मान्य होईल की नाही, याविषयीं रा. शिंद्यांनी आपली शंका प्रदर्शित केली. भागवतधर्म ऐहिक व्यवहाराचें महत्त्व जाणत आहे; तो केवळ पारलौकिक अतिरेकांत कधींच रत नसतो. ऐहिक परोपकाराच्या सात्त्विक प्रेमाला भागवतधर्म कधीं कोठेंच पारखा नाही. उलट त्याला तो आत्मीच आहे. पण भावे सांगतात तसल्या "स्व"-च्या दुर्गंधीची भागवतधर्माला कधींच बाधा घडत नाहीं. हें पाहण्यास दूर जावयास नको. महाराष्ट्रधर्मी भावे आणि भागवतधर्मी महिपति यांचीं काव्यें एकमेकांजवळ ठेवून निरखून पाहिल्यास दोहोंची तफावत सामान्य माणसालाहि तत्काळ पटण्यासारखी आहे, अशी शिंदे ह्यांनीं साक्ष दिली.

आपण स्वतः महाराष्ट्रधर्माच्या उलट नसूनहि त्याची बाधा मात्र भागवतधर्माला घडूं देण्यास तयार नसल्याचें शिंद्यांनीं सांगितलें, इतकेंच नव्हे, तर *जसजसा ह्या* स्वाभिमानी महाराष्ट्रधर्माचा शाब्दिक सुकाळ झाला, तसतसा महाराष्ट्रांतूनच काय पण अखिल हिंदुस्थानांतूनहि भागवतधर्म आपला पाय मागे घेऊं लागला. श्रीएकनाथांनीं जी स्वदेशाची व स्वभाषेची सेवा केली ती स्वाभिमानाला जागा करण्यास केली नसून श्रीज्ञानदेवांनी कथन केलेला **विश्वात्मकभाव** जागा करण्यासाठींच केली. कोणाहि सामान्य वारकऱ्यास भागवतधर्माचें वर्म काय म्हणून विचारतां तो चटकन् उत्तर देतो कीं, "**कोणाहि जीवाचा न घडो मत्सर वर्म सर्वेश्वर पूजनाचें**" मग *श्रीएकनाथच, रा. भावे ह्यांच्या स्तुतीस मुकून, ह्या विश्वात्मक भागवतधर्माचें* आकाश आपल्या महाराष्ट्रधर्माच्या मुठींत दाबून ठेवूं पाहतील काय ? असो.

भागवतधर्माच्या आकाशाला हिंदु-मुसलमान, ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद, स्वपरदेशवाद, इहपरलोकवादाचीं ठिगळें कसल्याहि मोठ्या अगर चलाख हेतूनें चिकटवूं पाहणाऱ्याची निराशाच होणार. ज्या एकनाथ, तुकारामांसारख्यांनीं स्वतःला जिंकलें, त्यांनाहि हल्लीच्या *"स्वराज्यवादी" पक्षाला अनुकूल असें म्हणत देण्यास लावण्यानें एखाद्याची घटकाभर* करमणूक होईल, पण अध्यात्म मार्गांत तिळमात्रहि प्रगति होणार नाहीं, असें सांगून शेवटीं सर्वात्मक भावानें परमात्म्याची प्रार्थना करून रा. शिंद्यांनीं उपासना समाप्त केली.

## व्याख्यान दुसरें

'सनातन भागवतधर्माचा विकास' ह्यावर श्री. शिंदे ह्यांनी इ. स. १९२५ च्या पावसाळ्यात पुण्यांत एक व्याख्यान-मालिका गुंफली, तिच्या उत्तरार्धाची प्रस्तावना म्हणून ही दोन प्रवचनें झालीं. त्यांनीं सासवड येथें भागवत धर्माच्या चालू सहस्रकांतील हिंदुस्थानांतल्या इतिहासाचें अगदीं संक्षिप्त सिंहावलोकन केलें.

इ. स. च्या १२ व्या शतकांत वऱ्हाडकडे महानुभाव व दक्षिण हैदराबादकडे लिंगायत पंथाची स्थापना झाल्यावर तेराव्या शतकांत पंढरपूरच्या वारकरी संप्रदायाचा उदय झाला. त्यानंतर उत्तरेस वाराणशीस रामानंदी, पंजाबांत नानक आणि बंगाल्यात चैतन्य पंथाची प्रतिष्ठा झाली. वारकरी आणि महानुभाव पंथ लौकिक दृष्ट्या जितका अप्रिय तितकाच दुसरा म्हणजे वारकरी पंथ प्रिय आहे; हा एक मोठाच ऐतिहासिक चमत्कार कां घडला आहे, तें रा. शिंदे ह्यांनीं स्पष्ट करून सांगितलें. मूर्तिपूजा, जातिभेद, कर्मठ सोवळें वगैरे अधार्मिक गोष्टी दोन्ही पथांत प्रथम नव्हत्या, तरी पण मागाहून शिरल्या. इतकेंच नव्हे तर धार्मिक वाङ्मयाचा प्रसार मराठींत करण्याचा अग्रमान निःसंशय महानुभावांचा आहे. आणि त्या धर्माचा प्रसार बहुजनसमाजांत करण्याची अपूर्व कामगिरी तो पंथ आजहि करीत आहे, तरी तो अप्रिय आहे; ह्यावरून "जनरहित "करितां 'द्वेष्यते पार्थिवेंद्रैः' ह्या म्हणीच्या तात्पर्यानें म्हणजे शेंडजांचें राजकारण हेंच ह्या चमत्काराच्या तळाशीं असणें संभवनीय आहे, असें रा. शिंद्यांनीं अनुमान केलें.

तुकारामानंतर वारकरी पंथाची आत्मिक वाढ खुंटली. निळोबांनीं तुकोबाच्या कामगिरीला त्याची इच्छा नसतां सांप्रदायिक स्वरूप दिलें. ह्यावरून ही वाट खुंटलेली दिसते. पण ह्या सांप्रदायिकपणामुळेच ह्या वारकरी पथाचें व त्याचें उत्तरेकडील व पूर्वीच्या महानुभावांशीं व्यापारी मात्सर्य वाढून ते एकमेकांना उलट हेवादेवा करूं लागले असावेत, असा शिंद्यांनीं तर्क केला.

महिपतीनें आपला भक्तिविजय ग्रंथ पानिपतच्या लढाईनंतर इ. स. १७६२ सालीं (शके १६८४ वैशाख वद्य द्वादशीस) प्रवरेच्या दक्षिणेस ताहराबाद येथें प्रसिद्ध केला. महिपतीनें मूर्तिपूजा, वर्णाश्रमधर्म, कर्मठ सोवळेपणा, ब्राह्मण, संस्कृतचें बंड, धार्मिक मध्यस्थाचा जुलूम इत्यादि गोष्टींची उघडउघड निंदा हल्लींच्या सत्य-शोधकाहूनहि किती तरी अधिक स्पष्ट व फटकळ भाषेत केली आहे. त्यावरून तुकारामांच्याहि मागें १०० वर वर्षे खऱ्या भागवतधर्माची ज्योत अगदींच मावळलेली दिसत नाहीं. अशा प्रकारच्या ह्या भागवतधर्माचें मुख्य कार्य सांगतांना रा. शिंदे म्हणाले, "(१) धर्मभेद, (२) जातिभेद, (३) मूर्तिपूजा, (४) अतिवैराग्य, (५) अतिकर्म, (६) अतिज्ञान, (७) ग्रंथप्रामाण्य, (८) गुरुपूजा, (९)

राजकारण, (१०) तर्कवाद, (११) तात्पुरता हितवाद, ह्या ११ आद्य गोष्टींचा खऱ्या धर्माशीं घटस्फोट भागवतधर्मानेंच केला." हें शिंदे ह्यांनी महिपतीच्या ग्रंथांतील उतारे देऊन सिद्ध केलें. "ज्ञानदेवें घातला पाया। तुका झाला कळस॥" ही वारकरी म्हण कांहीं अंशी दुरुस्त करण्यासाठीं वारकरी पंथाचा महाराष्ट्रांतच नव्हे तर अखिल हिंदुस्थानांत प्रसार करण्याच्या कामीं श्रीनामदेवांनीं जो भाग उचलला तो श्रीज्ञानदेवांसच काय, पण प्रत्यक्ष श्रीतुकोबांनाहि उचलणें शक्य झालें नाहीं; म्हणूनच नामदेवांचें अवतारकृत्य श्रीतुकोबांनीं आटोपलें, हें महिपतीचें काव्यमय मत यथार्थ आहे, असें शिंदे ह्यांनीं आपलें मत दिलें.

आम्ही वैकुंठवासी। आलों ह्याचे
कारणासी। बोलीले जे ऋषी।
साच भावें वर्ताया॥

हा तुकारामांचा सात्त्विक दावा हल्लींचा वारकरी अगर तदनुषंगी कोणताहि पंथ किती सिद्ध करील आहे हा प्रश्न अलाहिदा आहे. मात्र हाच दावा हल्लींचे ब्राह्मसमाज, आर्यसमाज व सत्यशोधक समाज ह्यांचा आहे, असें शिंदे म्हणाले. अगोदरच्या उदार पंथांनीं हा दावा सिद्ध केला असता, तर हे नवीन समाज निघायाला अवकाशच उरला नसता. पण भागवतधर्माचें क्षेत्र सनातन व सार्वत्रिक असल्यानें, तें पूर्णपणें आक्रमण्याला हे नवे समाज अपुरे पडल्यास कोणी आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. जेथे श्रीचक्रधर महानुभाव, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, नानक, कबीर, चैतन्य, राममोहन राय, दयानंद, ज्योतिबा फुले अशांनीं हात टेकले, तेथें पूर्ण यशाचा चरा कोण वाहिल? अहंकाराचा नाश ह्यातच भक्तीचा विजय आहे. आणि तेथेच भागवतधर्माची ध्वजा फडकत आहे, असा निर्वाळा देऊन रा. शिंदे ह्यांनी सासवड येथील प्रवचन आटोपलें.

## ब्राम्ह समाज आणि बौद्ध धर्म

### व्याख्यान तिसरें

मूळ ब्राह्म समाज **राजा राममोहन रॉय** यांनीं कलकत्त्यास इ. स. १८२८ मार्चीं स्थापन केला. त्याचा शतसांवत्सरिक उत्सव सर्व हिंदुस्थानभर येत्या ऑगस्ट महिन्यापासून होणार आहे. ब्राह्म समाजाची स्थापना अनेक विघ्नांना तोंड देऊन राममोहननीं केली व ते लवकर विलायतेस सन १८३० मार्चीं गेले व तिकडेच वारले. ह्या निराश्रित अर्भकाची जोपासना पुढें महर्षि देवेंद्रनाथांनीं केली. तसेंच सन १८५८

साठीं पुढें ईश्वरचंद्र सेन ह्या अत्यंत प्रतिभाशाली तिसऱ्या पुढाऱ्याचा लाभ ह्या समाजास घडला.

ह्या वेळीं हिंदुस्थानांत अवघ्या १२ ठिकाणीं ब्राह्म समाजाच्या शाखा होत्या. त्या साधारण ब्राह्म समाज स्थापन झाल्या वर्षी म्हणजे १८७८ (मे महिन्याच्या १५ तारखेस) सालीं १२४ शाखा हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांतून व बाहेरून झाल्या. ह्या तिसऱ्या पुढाऱ्यानें केवळ संख्येच्या दृष्टीनेंच समाजाची अशी असामान्य वाढ केली असें नव्हे, तर त्यानेंच ह्या धार्मिक सुधारणेस हिंदुस्थानांत प्रत्यक्ष सामाजिक जीवनाचें स्वरूप दिलें. त्याच्या वेळीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांत इतरहि स्वामी रामकृष्ण, दयानंद सरस्वती, ईश्वरचंद्र विद्यासागर, म. ज्योतिबा फुले, न्या. रानडे, तेलंग इत्यादि धार्मिक व सामाजिक सुधारक होते. पण ते केवळ पुरुषांच्याच सभा करीत आणि त्यांच्याशींच वादविवाद करून सुधारणा घडवू पाहात, पण केशवचंद्रानें आबालवृद्धांना, बायकापुरुषांना, सुशिक्षितांना फार तर काय, पण स्वकीय परकीयांनाहि हालवून जागें केलें. व त्यांचा ब्राह्म समाज स्थापिला !

मग इतक्या प्रभावशाली पुढाऱ्याच्या उलट साधारण ब्राह्म समाज नांवाची अधिक विकसित स्वरूपाची ब्राह्म समाजाची तिसरी आवृत्ति का काढावी लागली ? हा मोठा चित्ताकर्षक प्रश्न आहे खरा ! कोणत्याहि चळवळीच्या आरंभी एकाच प्रेरित विभूतीचें प्राधान्य असतें. तसेंच ब्राह्म समाजाच्या पहिल्या ५० वर्षांत बहुतेक एकतंत्रीपणाच होता. मग त्या एकतंत्राचें अधिष्ठान राजा राममोहन राय असो, देवेंद्रनाथ असो, किंवा केशवचंद्र असो, एका धीरोदात्त व्यक्तीनें हालवावें, व इतरांनीं हालावें, असा प्रकार होता. पण ब्राह्म समाज ही प्रधानतः स्वातंत्र्यजनक संस्था होती. अर्थात ह्या ५० वर्षांत ब्राह्म समाजांतच नव्हे तर अखिल भारतांत धार्मिक सामाजिक

अन्यथा कसेंस् समर्थ केशवचंद्र झाले म्हणून काय झालें? प्रश्न केवळ ब्राह्म मताचाच नव्हता, तर त्याच्या अनुष्ठानाचा होता. शिवाय आनंदमोहन समाजाचें कार्य केवळ भावना आणि प्रेरणा ह्या दैवी तत्त्वांवरच चाललें होतें. सर्वांची मतें घेऊन युक्तायुक्ततेचा विचार करून एकाद्या कार्यपद्धतीची सनद अंमलांत आली नव्हती. त्यामुळें ह्या पक्षाला अयत नीत्र व कडू स्वरूप आलें. आणि शेवटीं स्वातंत्र्य तत्त्वाचें शरीर जे शनदर्शीरपणा त्याचाच विजय झाला. आणि कलकत्त्याच्या टौन हॉलमध्यें प्रचंड जाहीर सभा भरून केशवचंद्रांच्या विरुद्ध साधारण ब्राह्म समाजाची जोरदार स्थापना झाली! त्या गोष्टीला आज ५० वर्षें झालीं!

त्यानंतर ब्राह्म समाजांत स्त्रिया, तरुण, लहान मुलें, वृद्ध, विद्वान गृहस्थ आणि कामकरीवर्ग ह्या सर्वांचा समान दर्जानें कसा प्रातिनिधिक तत्त्वानें समावेश होऊं लागला आणि हिंदुस्थानभर ह्याच शाखेचा विस्तार केशवचंद्रांच्या नवविधान नांवाच्या शाखेहूनहि कसा अधिक झाला, ह्याचें सविस्तर वर्णन श्री. अण्णासाहेबांनीं केलें. नंतर ते म्हणाले कीं, ब्राह्म समाज व बौद्ध धर्म ह्यांत एक फरक ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. ब्राह्म धर्मांत मनुष्यजातीच्या सर्व धर्मपंथांचा समन्वय होतो, ही गोष्ट खोटी नाहीं. अर्थात् ब्राह्म धर्म म्हणून एक निराळा नवाच धर्म आहे, असें मुळींच नव्हे. पण बहुतेक जुने धर्म पंथ—विशेषतः बौद्ध धर्म हा व्यक्तिविशिष्ट स्वरूपाचा आहे. बौद्ध धर्माचाहि संघ प्रत्यक्ष सिद्धार्थांच्या काळापासून पुरातन आहे. तरी हा बौद्धसंघ म्हणजे केवळ भिक्षुसंघच म्हणजे केवळ संन्याशाचा संघच होता. गृहस्थाश्रमालाच मुळीं बौद्ध धर्मांत गौणस्थान आहे. मग धर्माच्या कौटुंबिक व सामाजिक स्वरूपाकडे ह्या धर्मांत दुर्लक्ष झाल्यास नवल काय? आदले दिवशीं प्रत्यक्ष धर्मानंद कोसंबी ह्यांनींच बौद्ध धर्माची अवनति का झाली, ह्याचीं कारणें सांगतांना स्पष्ट एक कारण असें सांगितलें कीं बौद्ध भिक्षू व प्रत्यक्ष गौतमबुद्धानेंहि जाति-भेदाच्या मुळावर कितीहि आघात केले तरी, बौद्ध गृहस्थाश्रमीयांनीं हिंदुस्थानांत तरी ह्या जातिभेदाचें निरसन करावें तितकें केलें नाहीं, म्हणून शेवटीं चार वर्णांच्या आता चार हजारावर जातींची आणि असंख्य पोटजातींची वजबजपुरी आज ह्या अभागी देशांत माजली आहे. ब्राह्म धर्माचें स्वरूप आणि कार्य ह्याचें उलट आहे. ह्या धर्मांत जगद्गुरु तर नाहींच पण उलट साध्या पुरोहिताचेंहि बंड नाहीं. ज्याचा तोच पुरोहित. धर्माच्या सर्व तत्त्वांना सामाजिक प्रत्यक्ष स्वरूप यावयाचें झाल्यास केशवचंद्रासारख्या प्रतिभाशाली गुरूलाहि केवळ त्यांच्या आसनावरून खालीं आणावें लागतें; इतकेंच नव्हे तर आपल्या घरांतील सासूबाई व आजीबाई, तरुण बाबू आणि लहान बेबी ह्यांचेंहि सहकार्य सामाजिक अनुष्ठानांत साधावें लागतें. हें शेवटचें काम अत्यंत कठीण आहे. आणि ह्याशिवाय तर कोणतीहि शुद्धि अथवा कर्मेंहि सघटन होणें केवळ अशक्य आहे. हा सामाजिक स्वर्ग जर कोणी गेल्या शतकांत ह्या पृथ्वीवर आणिला असेल, तर तो एका साधारण ब्राह्म समाजानेंच, ह्यात मुळींच

अतिशयोक्ति नाहीं.

बौद्ध धर्माविषयीं श्री. अण्णासाहेबांचा अलोट आदर आहे. आजकाल त्यांचें लक्ष्य बहुतेक बुद्धाच्या ध्येयाकडे गुंतलें आहे, असें त्यांनींच स्पष्ट सांगितलें. आणि ते म्हणाले कीं, ध्येय सामाजिक स्वरूपांत आणावयाचें झाल्यास, पंडित शिवनाथ-शास्त्री, विजयकृष्ण गोस्वामी, नवद्वीपचंद्रदास अशाच आधुनिक भिक्षूंची जरूरी आहे आणि त्यांना झालें तरी शहरातल्या अर्धवट सुशिक्षितापेक्षां बहुजनसमाजातल्या बायकामुलांचेंच साहाय्य संपादिलें पाहिजे. येरवीं जेथें बौद्ध धर्माची अवनति झाली तेथें नवशिक्या ब्राह्म समाजाची काय कथा ?

३०

# परिशिष्ट दुसरे

## Indian Civilization

### The Aryan Bias in the Consideration of the Question

I am very much interested in a somewhat academic controversy on the basis of Indian civilization that appears in the columns of *The Indian Social Reformer* The subject, *viz.*, the basis of Indian civilization is in the first place highly archaic and secondly too complicated, both from the racial as well as the cultural point of view The organic process of Indian civilization is one of the longest known historically Yet its beginnings are even now so shrouded in the midst of prehistoric occurrences that it is no wonder that some of the sceptically minded western scholars are still slow to grant it the high primordial pedigree for which it is now fairly bidding especially in the light of recent research in Sind and elsewhere in India

The point, however, most pertinent to my present purpose is that even those scholars, foreign as well as Indian, who are most open-minded have objective as well as subjective difficulties to

surmount before they can ever hope to reach and then demonstrate the bed-rock of Indian civilization. The objective difficulty consists mainly in the lack of deta, *viz*, of documentary evidence and of some fixed chronology as a guide to ascertain the sequence of that huge mass of tradition which is still available, recorded or otherwise. But the subjective difficulty which is my most relevant point at present consists of the bias which Herbert Spencer calls in his study of sociology by the name of " Educational bias " which first takes possession of the mind of the scholars or groups of scholars and through them of the men in the street. One of such time-honoured Idols of the Cave is the "Aryan bias" which is as ancient as the so-called " Aryan Invasion " of India.

The so-called " Aryan Supremacy " whatever its worth in the then political world had long survived under the name of the " Aryan Superiority " or sanctity among the vast and picturesque tracts and populations extending to the East and South-West of the great river Sindhu, which gives its name to these both as India, even after its great levellers Jainism, Shaivism, Buddhism and Mahomedanism had effected their respective influence. Though now no scholar worth the name claims this Aryan superiority in the racial estimates of the Indian population, it is also true that there have been very few if any scholars who have challenged with success the power of this Idol of the Cave in the cultural estimates that are now and then floated over this contented country.

Whatever sanctities, supposed or real, were attached to Aryanism in the world orthodox ethnology are also yet attached to Sanskritism in the world of Indian culture Though Aryanism may cease as a power in the Indian ethnology it does actually resurrect under the guise of Sanskritism and claims to be the basis and fountain-head of the cultural flow in this mid-Asian continent The renaissance of Sanskrit initiated by William Jones in the 18th century and completed by Max Muller and his disciples by the end of the 19th century is still the last prop upholding this Aryan bias I believe it was Max Muller who was more responsible than others for extending this Aryan bias from the world of Philology to that of Ethnology Though eminent Indian Census Reporters such as Risley, Gait and Grierson have partially succeeded in withstanding this bias in their Ethnological estimates of India they have not as yet, it is to be feared, attained the same success in their estimates

of the basis of Indian religions and languages. Dr. G. A. Grierson in his opening para of chapter VII on language of the Indian Census Report for 1901 (page 247) refers to the results of the linguistic survey inaugurated by the Government of India in the last decade of the 19th century as follows :

"The results have been surprising even to those who are aware of the former limits of our knowledge. The facts which have come to light have upset several theories hitherto accepted by all the scholars as certainly correct and have, even in the short space of time during which they have been available, suggested new theories, which as, as more facts appeared, have in their turn proved equally unfounded. Speculation regarding Indian languages must wait till the survey is concluded, and all the facts are presented in a convenient form. Till then even the classification adopted in the following pages must be taken as provisional."

Writing the chapter on language of the Indian Census Report of 1911 Mr. E. A Gait observes on page 322 : "For the purpose of the census, languages have been classified in accordance with the scheme kindly drawn up by Sir George Grierson. It follows very closely the scheme (also drawn up by him) which was adopted in 1901, but several modifications have been made in consequence of fresh facts discovered in the course of the linguistic survey."

These aforesaid modifications are, however, made only with regard to minor and technical details of the classification confessed by Dr. Sir George Grierson to be only provisional in 1901. Whereas not only the principle of admitting the 22 vernacular languages of North India, North Deccan under the Indo-Aryan group is still kept intact, ten more vernaculars are added to this group in the year 1911.

If one compares the Ethnological map of Sir H. H. Risley in his "Peoples of India" with the linguistic map of Sir G. Grierson facing page 289 and the religious map of Mr. Gait facing page 349 of the Indian Census Report of 1901, one can readily see that whereas Risley can claim only a very small portion of India, *viz.*, a part of the Rajputana and of the western Gangetic valley known in ancient times as the Madhyadesh, the cradle of the Aryan race in India, as Ethnologically Aryan, Grierson would claim a very considerably larger portion, *viz.*, practically the whole of India except the Madras Presidency as linguistically Aryan, while Mr. Gait goes still further and claims the whole of non-Mahomedan

and non-Christian India as religioulsy Aryan to all intents and purposes, not excluding even the depressed classes. They are merely as numerous as the Mahomedans and Christians put together. But just because they are still so much under the crushing thumb of Hinduism they are so readily looked upon as religiously Aryan slaves if not Aryan freemen. Thus Indian estimates, be they racial or cultural, depend upon the mercy of the census reporters. In ancient times, the hey-day of Aryanism, compilers of the several Smrities or Dharma Shastras enjoyed the monopoly of estimating the blood, good breeding and even the social as well as spiritual salvation of the people of India, *en masse*. The census reporter of the present day, practically, if not in orthodox theory which is still reserved for the old Smrities, holds that monopoly. For such is veritably the power of the Aryan bias. The scholars and savants of very high repute do not find it worth while to quarrel with this Idol of the Cave; how can one expect. "Mr. educationist" who does not care even to give out his identity, to go further and board the lion of Aryanism in its own den !

The basis of the Indian civilization is, I admit, a topic all too big for an article. I should myself therefore consider more than once before I would join issue on that topic, though it is now rapidly gathering round itself a halo of interest in these days of the non-Brahmin challenge and the political developments ensuing from it. All that I want to do in this present note is to point first to the abiding bias in favour of the Aryan race about whose real identity and organic achievements in history the true Ethnologist alone knows the besetting difficulties and to the prejudices against the vast non-Aryan masses and secondly to the obsession with the spirit of the Sanskrit literature beginning from the Vedas down to the latest Puranas to which the average scholar of Indian history and chronology is likely to be open even though without his knowing the same. Even so far as literature is concerned there is a considerable amount of old Tamil, Kanarese, Pali and Prakrit literature to counterbalance the aforesaid spirit of Sanskritism if only it could be studied free from the above bias But my point is that any existing literature howsoever old in itself, is all too inadequate a means to ascertain and estimate such an archaic and heterogenous subject as the basis of Indian civilization. The proper field for an unbiassed student of this subject is the ample reservoir

of folk lore and tradition still available among the higher classes, of items of their domestic details, the customs and manners, observed during the marriage and burial ceremonies, in choosing sites for houses and hamlets and building the superstructures, and of rights and perquisites which still obtain among these village communities which can be traced to non-Aryan origins or which at any rate are still fostered under the distnctly non-Aryan influences such as in Malabar, the Central Provinces, and Chhota Nagpur. In fact, paradoxical though it may appear to many orthodox eyes, the basis of our civilization if at all it is to be discovered at this late stage, has to be searched for, more in the customs and manners of the new depressed classes and even the wild tribes of India who are certainly nearer to the pristine conditions of Indian civilization than either in the too ideal or often too vitiated pictures that are drawn in the Sanskrit literature.

It has been said that in India, to disown Aryanism and Brahminism, is to disown civilization itself. It is a pity that not only Aryanism but even Brahminism is so readily taken to be coterminous with civilisation in India I am hardly left with any breath in me when I read this sweeping claim. All signs of civilization among Dravidians seem to be counterbalanced as assets of civilization by serpent worship and black magic is fathered so fatuitously and wholly on Dravidians only, forgetting comfortably that there were other people, not only Aryans but other non-Aryans than Dravidians who can claim a decent share of Indian black *magic and serpent worship equally* if not more than that of the Dravidians. I am inclined to cite here some of the evidence of not only customs and manners but also of more unmistakable memorials such as fortresses, temples and priestcraft, showing that the Holyas of South Canara and Pulayas of Travancore among other untouchables were once a ruling people, holding their sway over considerable territories. But if mightier vestiges of such Dravidians as Ravan and Bali of old, and of Mudaliars, Pillais and Nairs of the present day are not high enough in the eyes of our eminent educationists owing to their educational bias, just because these vestiges are tainted by a supposed serpent worship and black magic, I think I should keep all my humble evidences to myself till a more propitious time

—*V. R Shinde*

# टीपा

## १. भागवत धर्माचा विकास

हिंदुस्थानच्या पूर्वापार विस्तृत इतिहास लिहिण्याचा श्री. अण्णासाहेब शिंदे यांचा मानस होता. परंतु कामाच्या व्यापामुळें हें राहून गेलें. पुढें १९२५ सालीं त्यांना थोडीशी फुरसद मिळाल्यानतर हिंदुस्थानांतील धर्मांचा इतिहास लिहिण्याचा विचार पक्का केला. हा सर्व इतिहास लिहून पुरा होण्यापूर्वी त्या ग्रथाची विस्तृत प्रस्तावना लिहावी व तिच्यावरून मग " धर्मांचा इतिहास " लिहावा असें ठरविलें. त्याप्रमाणें १९२५ सालीं भागवत धर्माचा इतिहास ह्या विषयावर पांच सशोधक व्याख्यानें लिहून काढलीं. आणि तीं व्याख्यान रूपानें लोकासमोर ठेवलीं. पहिलें व्याख्यान पुणें येथें १७ जुलै १९२५ रोजी झालें.

दुसरें व्याख्यान पुणें येथील प्रार्थना समाज मंदिरांत २४ जुलै १९२५ रोजी झालें. तिसरें व्याख्यान २८ जुलै १९२५ रोजी प्रार्थना समाजात झालें. चौथें व्याख्यान प्रार्थना समाजांत १८ जुलै १९२५ रोजी झालें. पाचवें व्याख्यान प्रार्थना समाजांत ३१ ऑगस्ट १९२५ रोजीं झालें.

## २. मराठ्यांची पूर्वपीठिका अथवा रट्टवंशोत्पत्तीविषयीं शास्त्रीय विचार

मराठ्याची पूर्वपीठिका ह्या विषयावर रत्नाकर मासिकात तीन लेख प्रसिद्ध झाले. पहिला लेख मार्च १९२९ च्या अकात प्रसिद्ध झाला. दुसरा, मे १९२९ च्या अकात प्रसिद्ध झाला व तिसरा लेख मे १९३१ च्या रत्नाकर अंकात प्रसिद्ध झाला. तिसरा लेख प्रसिद्ध होण्यास विलंब झाला. कारण १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळीत कारावासाची शिक्षा झाल्यामुळे ते सहा महिने तुरुगांत होते.

## ३. अस्पृश्यांचें राजकारण

पुणें येथील ' वसंत व्याख्यान माले 'त झालेलें हें व्याख्यान आहे. या व्याख्यानाची हस्तलिखित प्रत अण्णासाहेब शिंदे यांच्या कागदपत्रात मिळाली. हें व्याख्यान प्रथमच प्रकाशित होत आहे.

## ४. महाराष्ट्राच्या उत्कर्षाचा एकमेव मार्ग

१९३५ च्या मार्चमध्यें किर्लोस्कर मासिकांत प्रसिद्ध झालेली मुलाखत. मुलाखतीच्या प्रारंभी सपादकांनीं प्रस्तावना दिली होती. त्या मूळ प्रस्तावनेसह येथें अण्णासाहेब शिंदे यांची मुलाखत पुढें दिली आहे. ही मुलाखत ३१ डिसेंबर १९६८ रोजीं ' तरुण महाराष्ट्र 'मध्ये पुनर्मुद्रित केली होती.

## ५. तत्त्वज्ञान आणि समाजशास्त्र

इ. स. १९३५ च्या डिसेंबरमध्ये बडोदें येथें महाराष्ट्र साहित्य संमेलन भरलें होतें. या संमेलनात वेगवेगळ्या विषयावरील चर्चेसाठी शाखा संमेलनेंहि भरली होती. या वेळीं ' तत्त्वज्ञान व समाजशास्त्र ' ह्या शाखासंमेलनाचे अध्यक्ष म्हणून अण्णासाहेब शिंदे यांची निवड झाली होती. या वेळी अध्यक्षपदावरून केलेलें भाषण.

६. महाराष्ट्र नानाशंकरशेटला कां विसरला ?

या विषयावर दोन लेखांक लिहिण्याचा अण्णासाहेबांचा मानस होता. पहिल्या लेखांत महाराष्ट्र नानाशंकरशेटला कां विसरला याची चर्चा करण्यापूर्वी ते विसरण्यास खरोखर पात्र आहेत का, असल्यास ते संस्मरणीय पुरुष कां आहेत याची चर्चा करण्याचा त्यांचा विचार होता. दुसऱ्या लेखांत ते जर संस्मरणीय होते तर मग महाराष्ट्र त्यांना कां विसरला याची चर्चा करण्याचा त्यांचा विचार होता. अण्णासाहेब शिंदे यांच्या घरच्या खासगी लेखसंग्रहात यांपैकी पहिलाच लेख मिळाला. दुसरा लेख मिळाला नाहीं. बहुधा तो लिहून पुरा झालेला नसावा असें वाटते. या लेखाची हस्तलिखित प्रत त्यांच्या लेखसंग्रहांत मिळाली. हा लेख प्रथमच प्रकाशित होत आहे.

७. दारूचा व्यापार : सरकार आणि बहुजनसमाज

हा लेख अण्णासाहेब शिंदे यांच्या खासगी लेखसंग्रहांत मिळाला. लेख त्यांच्याच हस्ताक्षरांत असून तो अप्रकाशित स्वरूपांत होता. लेखावरील निश्चित तारीख व वर्ष आढळत नाही.

८. कोंकणी व मराठी

विविधज्ञानविस्तारच्या १९२६ सालच्या जुलैमध्यें हा लेख प्रसिद्ध झाला.

९. कानडी आणि मराठी

श्री. रा. भि. जोशी यांनीं ' नवीन मराठी भाषेची घटना ' हे पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याला पुरवणी म्हणून ' कानडी मराठीचा परस्पर संबंध ' हा लेख प्रसिद्ध केला आहे. हा लेख केसरीनें चार लेखांकांत प्रसिद्ध केला. हे चार लेखांक अनुक्रमे ३० ऑक्टोबर, २० नोव्हेंबर, ४ डिसेंबर व १४ डिसेंबर १९२३ रोजीं प्रसिद्ध झाले आहेत.

१०. महाराष्ट्र विद्यापीठ व कर्नाटक

'विजयी मराठा' या साप्ताहिकामध्यें २९ मार्च १९२६ रोजीं प्रकाशित झालेला लेख.

११. राधामाधव विलासचंपू आणि रा. राजवाडे

जयराम पिंडे नांवाच्या कवीनें ' राधामाधव विलासचंपू ' नांवाचें काव्य लिहिलें आहे. हें काव्य शोधून काढण्याचें श्रेय इतिहासाचार्य राजवाडे यांच्याकडे जातें. हें काव्य प्रकाशित करीत असतांना श्री. राजवाडे यांनीं त्याला दोनशें पानांची विस्तृत प्रस्तावना लिहिलेली आहे. या काव्यामधून शहाजी महाराजांच्या कर्तृत्वावर प्रकाश फेकलेला आहे. परंतु या प्रस्तावनेच्या निमित्तानें शहाजीराजे यांच्या कार्याचें मूल्यमापन करीत असतांनाच इतरांवर त्यांनी टीका केली आहे. त्यामुळें या प्रस्तावनेला उत्तर देण्यासाठीं,अण्णासाहेब शिंदे यांनीं चार लेख १९२३ सालच्या 'विजयी मराठा'मधून प्रसिद्ध केले. हे लेख १९२३ च्या ऑगस्टमध्यें प्रसिद्ध झालेले आहेत. या लेखांबाबत अण्णासाहेब शिंदे लिहितात-' ह्याच प्रस्तावनेत राजवाड्यांनी जैन-लिंगायतांशीं भाऊबंदकी(?) केला म्हणून टीकात्मक लेखांची भाषा फार कडक झाली आहे. '

१२. पुणेरी पेशव्यांची राष्ट्रीय (!) कामगिरी

प्रो. जदुनाथ सरकार यांचे मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं केसरीच्या ४ नोव्हेंबर १९२४ च्या अंकात कांहीं विचार प्रसिद्ध झालेले आहेत. या लेखात प्रो. जदुनाथ सरकार यांनीं महत्त्वाचे विचार मांडले आहेत. अण्णासाहेब शिंदे यांनीं त्यांच्या विवेचनाला उत्तर म्हणून लेख 'विजयी मराठा 'मध्ये १ डिसेंबर, ८ डिसेंबर व १५ डिसेंबर १९२६ रोजीं तीन लेख लिहिले.

१३. मराठेतर कोण ?

'विजयी मराठा 'मध्यें १९२६ सालीं एप्रिलमध्यें प्रसिद्ध झालेला लेख.

१४. वेदोक्त कीं पुराणोक्त ?

'विजयी मराठा 'मध्यें १९२२ सालीं एप्रिलच्या सुमारास प्रसिद्ध झालेला लेख.

१५. चातुर्मास्य : तुकोबा व त्यांची टवाळी

'सुबोध पत्रिके 'मध्ये २९ ऑगस्ट १९२६ रोजी प्रकाशित झालेला लेख.

१६. कौलिकता हाच आत्मीय शिक्षणाचा पाया.

२ जानेवारी १९३८ रोजीं 'सुबोध पत्रिकेमध्यें प्रसिद्ध झालेला लेख.

१७. पूर्व बंगाल्यांतील अस्पृश्य वर्गाच्या उच्च शिक्षणाची प्रगति

तारीख मिळत नाहीं. हस्तलिखित साहित्यात मिळालेला लेख.

१८. महाराज शिवाजी आणि महात्मा गांधीजी

बडोदें येथील 'जागृति 'मध्यें प्रसिद्ध झालेला लेख. दिनांक ६ मे १९२२.

१९. महात्मा फुले व केशवचंद्र सेन

अण्णासाहेब शिंदे यांचें १२ डिसेंबर १९२६ रोजी श्रीशिवाजी हायस्कूलमध्यें झालेलें व्याख्यान. त्यांच्या या व्याख्यानाची छापील प्रत त्यांच्या संग्रहांत मिळाली. हें व्याख्यान लेखरूपानें प्रथमच प्रकाशित होत आहे. ब्रह्मानंद केशवचंद्र सेन हे ब्राह्मो समाजाचे थोर प्रवर्तक. त्यांचा जन्म १९ नोव्हेंबर १८३८ रोजीं झाला. महात्मा फुले हे महाराष्ट्रातील थोर समाजसुधारक व सत्यशोधक समाजाचे संस्थापक. त्यांचा मृत्यु २७ नोव्हेंबर १८९० रोजीं झाला. नोव्हेंबर महिन्यात या दोन थोर पुरुषांपैकीं एकाची जयंती व दुसऱ्याची पुण्यतिथी आली. या निमित्तानें अण्णासाहेब शिंदे यांनीं दोघांच्या जीवनकार्याचा तौलनिक अभ्यास करून हे व्याख्यान दिले.

२०. ब्रह्मानंद केशवचंद्र सेन : त्यांचें विश्वधर्मविकासांतील स्थान

मराठानकाल निश्चित पणे मिळत नाहीं. त्यांच्या संग्रहात प्रसिद्ध लेखाची प्रत मिळाली.

२१. अस्पृश्यांची शेतकी परिषद्

३० ऑक्टोबर १९२६ रोजीं पुणें येथें झालेल्या अस्पृश्यांच्या शेतकी परिषदे-पुढील अध्यक्षीय भाषण. हें भाषण अप्रकाशित स्वरूपात त्यांच्या लेखसंग्रहांत मिळालें.

२२. मुंबई इलाखा शेतकरी परिषद् : पुणें

१९२८ सालीं पुणें येथें झालेल्या वरील परिषदेपुढील अध्यक्षीय भाषण.

१९२८ च्या सुमारास मुंबई सरकारनें कौन्सिलमध्यें दोन बिलें आणलीं होतीं. एक सारावाढीचें व दुसरें तुकडे बंदीचें. हीं दोन्ही लोकांना अत्यंत अप्रिय होतीं. या वेळीं शेतकऱ्यांत मोठी जागृति निर्माण झाली होती. १९२८ च्या सुमारास गुजरातमध्यें सरदार वल्लभभाई पटेल यांनीं करबंदीची चळवळ करून फार मोठें यश मिळविलें होतें. त्यामुळें या काळांत शेतकऱ्यांमधील आत्मविश्वास वाढला होता. स्वाभाविकच महाराष्ट्रांतहि सारावाढी व तुकडे निरोधदल आंदोलन सुरू झालें होतें. त्यामुळें या वेळीं मुंबई इलाख्यांतील मराठी भाषिक शेतकऱ्यांची मोठी परिषद् रे मार्केटांत (सध्यांच्या महात्मा फुले मंडईत) भरलेली होती. या परिषदेस निरनिराळ्या जिल्ह्यांतून सुमारें पांच हजार शेतकरी आले होते. स्वागताध्यक्ष म्हणून श्री. बाबूराव जेधे यांचें प्रारंभी भाषण झालें होतें. या प्रसंगीं अध्यक्षीय भाषण जें झालें तें येथें लेखरूपानें दिलें आहे. त्यांच्या भाषणाची हस्तलिखित प्रत त्यांच्याच संग्रहांत मिळाली.

**२३. प्रांतिक सामाजिक परिषद् : सातारा**

१९२५ सालीं सातारा येथें झालेल्या परिषदेपुढील अध्यक्षीय भाषण.

**२४. संस्थानी शेतकरी परिषद् : तेरदळ**

तेरदळ (दक्षिण कोंकण) येथें भरलेल्या संस्थानी शेतकरी परिषदेच्या पहिल्या अधिवेशनापुढील अध्यक्षीय भाषण. हें भाषण ३ जानेवारी १९३२ रोजीं झालें.

**२५. अखिल भोर संस्थान प्रजापरिषद्.**

ही परिषद् मौजे पाथरशेत (तालुका प्रचंडगड) येथें ७ मे १९३१ रोजीं झाली. या परिषदेपुढील अध्यक्षीय भाषण.

**२६. वाळवें तालुका शेतकरी परिषद्, बोरगांव**

सातारा जिल्ह्यांतील वाळवें तालुक्याची शेतकरी परिषद् बोरगांव येथें ८ जून १९३२ रोजीं झाली. त्या वेळीं झालेलें अध्यक्षीय भाषण.

**२७. चांदवड तालुका शेतकरी परिषद्**

चांदवड तालुक्यांतील शेतकऱ्यांची परिषद् वडनेर येथें १९ सप्टेंबर १९३१ ला भरली होती. या परिषदेपुढील अध्यक्षीय भाषण.

**२८. ब्रह्मदेशांतील बहिष्कृत जमात.**

पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळासमोर ३१ मे १९२७ रोजीं वाचलेला निबंध २३-६-१९२७ च्या ज्ञानप्रकाशमध्यें प्रसिद्ध झाला.

**परिशिष्ट**

(१) Indian Civilization The Indian Daily Mail, January 21, 1925.

(२) भागवतधर्म आणि महाराष्ट्रधर्म एप्रिल १९३३ च्या पहिल्या आठवड्यांत मामवड येथें वारकरी पंथाच्या वतीनें नामदेव समाजोन्नति मंदिरांत थी. तुकारामांच्या पुण्यतिथीनिमित्त पहिलें व्याख्यान झालें होतें. दुसरें व्याख्यान पुणें येथें

श्रीशिवाजी मराठा शाळेंत झालें. या व्याख्यानाचा वृत्तान्त १७ जून १९२९ रोजीं विजयी मराठामध्यें प्रसिद्ध झाला. हा वृत्तान्त श्री. कर्मवीर शिंदे यांनीं नजरेखालून घातलेला असावा असें वाटतें.

## ब्राह्म समाज आणि बौद्ध धर्म

१९२८च्या एप्रिलमध्यें ब्राह्म समाजास ५० वर्षे पूर्ण होतात. या निमित्तानें ८ एप्रिल १९२८ रोजीं श्रीशिवाजी मराठा शाळेंत 'ब्राह्म समाजाची स्थापना कां व कशी झाली व त्याचें ५० वर्षांचें कार्य कसें घडलें' यावर व्याख्यान झालें. या व्याख्यानाचा सारांश विजयी मराठामध्यें २३ एप्रिल १९२८ रोजीं प्रसिद्ध झाला.

## परिशिष्ट तिसरें

## परिशिष्ट चौथे

**आइन्स्टाइन – अल्बर्ट आइन्स्टाइन : ( १८७९ ते १९५५ ).**

जर्मनीमधील प्रसिद्ध शास्त्रज्ञ. १९०५ साली सापेक्षतावादाच्या एका अंगावर संशोधन केल्याबद्दल पीएच्. डी. ही पदवी मिळाली. पुढें सापेक्षतावादाच्या सिद्धान्तावर व्यापक प्रमाणावर संशोधन केलें. या सिद्धान्तानें दिशा आणि काल या विषयींच्या परंपरागत कल्पनांमध्यें मूलगामी क्रांति झाली. १९२१ साली या संशोधनाबद्दल नोबेल पारितोषिक मिळालें. १९४१ साली अमेरिकेचें नागरिकत्व मिळविलें. विसाव्या शतकांतील थोर तत्त्वचिंतक व शास्त्रज्ञ.

**त्रि. ना. अत्रे : ( इ. स. १८७२ ते १९३३ ).**

अहमदनगर व पुणें येथें बी. ए., एल्‌एल्. बी. पर्यंत शिक्षण. पारनेर, कर्जत, जामनगर, जामखेड, सिन्नर इ. ठिकाणीं मामलेदार म्हणून नोकरी. पुढें खानदेशमध्यें सबजज्ज म्हणून काम केलें. कांहीं काळ दुष्काळविषयक अधिकारी म्हणून नेमणूक झाली होती. 'गांवगाडा' हे यांचें पुस्तक समाजशास्त्राच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचें आहे. मुंबई विद्यापीठानें हें पुस्तक पाठ्यपुस्तक म्हणून नेमले होतें.

**एल्फिन्स्टन माउन्ट स्टुअर्ट : ( १७८९ – १८५९ ).**

१७९६ सालीं ईस्ट इंडिया कंपनींत नोकरी. १८१० सालीं पुण्याचे रेसिडेन्सी-वर नेमणूक. यानतर अखेरपर्यंत पश्चिम हिंदुस्थानांतच. पेशवाईच्या अस्तानंतर मुंबई राज्याची शासनाची घडी बसविली. शासनांत, समाजव्यवस्थेंत बदल करतांना जुन्या परंपरा शक्यतो सांभाळून बदल करण्याकडे कल. The rise of the British Power in the East व History of Hindu and Mahommedan India. (1841) ही पुस्तकें प्रसिद्ध.

**महादेव शिवराम गोळे : ( १८५८ ते १९०७ ).**

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य. आगरकरांनंतर फर्ग्युसन कॉलेजचे १८९५ साली प्राचार्य झाले. ब्राह्मण आणि त्यांची विद्या ( १८९५ ), हिंदुधर्म आणि सुधारणा ( १८९८ ) हे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. सनातनी परंपरागत विचारांचें समर्थन करण्याकडे मनाचा कल.

**नारायण गोविंद चापेकर** : ( जन्म – ५ ऑगस्ट १८६९ ).

जन्मस्थळ – मुंबई. शिक्षण – बी. ए., एलएल्. बी. व्यवसाय – रिटायर्ड फर्स्ट क्लास सब जज. सन १९२५ मध्ये सेवानिवृत्त.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणें ह्या संस्थेचे कार्याध्यक्ष (सन १९२७–३७). आठ वर्षे महाराष्ट्र साहित्य पत्रिका संपादन. औंध संस्थानांत सरन्यायाधीश ( १९३१ – ४० ).

ग्रंथ व लेख – बदलापूर, गच्चीवरील गप्पा, समाजनियंत्रण, हिमालयांत, रजःकण, चापेकर, वैदिक निबंध, पेशवाईच्या सांवलींत, तर्पण, निवडक लेख, एडमण्ड बर्कचें चरित्र, जीवनकथा ( आत्मचरित्र ), चित्पावन, पैसा, साहित्यसमीक्षण. ह्या ग्रंथांखेरीज हिंदुधर्म, ग्रामोद्धार, ऋग्वेदांतील ऋषी इत्यादि अनेक विविध विषयांवर लेख.

'बदलापूर ( आमचा गांव ) : पांचशें पानांच्या ह्या ग्रंथांत पुणें–मुंबई रेल्वे लाइनवर मुंबईपासून ४२ मैलांवरील बदलापूर नामक एका खेडेगांवची आर्थिक, सामाजिक, धार्मिक व ऐतिहासिक पाहणी आहे. २३०० वस्तीच्या ह्या गांवांतील सुमारें २८ भिन्न पोटजातींचा सर्वंकष व सखोल अभ्यास प्रस्तुत ग्रंथांत आढळतो.

**गो. म. जोशी** : ( १८९५ )

संस्कृत, गणित, समाजशास्त्र, धर्मशास्त्र, ज्योतिष या विषयांचें व्यासंगी. हिंदूंच्या परपरागत समाजरचनेचे अभिमानी व पुरस्कर्ते. प्रसिद्ध ग्रंथ – ( १ ) हिंदूंचें समाजरचनाशास्त्र, ( २ ) धर्मशास्त्रविचार, ( ३ ) हिंदूंचें अर्थशास्त्र, ( ४ ) सनातन धर्माचें स्वरूप.

**लोकमान्य टिळक – बाळ गंगाधर टिळक** : ( १८५८ ते १९२० ).

भारतांतील राष्ट्रीय चळवळीचे एक प्रमुख शिल्पकार हिंदुस्थानांतील जहाल राष्ट्रवादाचे प्रवक्ते. राजकीय नेत्यांप्रमाणें तत्त्वचिंतक व संशोधक. त्याचे प्रसिद्ध ग्रंथ –

( १ ) गीतारहस्य १९१५.

( २ ) The Artic Home in the Vedas ( आर्यांचें मूळ वसतीस्थान ) ( १९०३ ).

( ३ ) The Orion ( वेदकाल निर्णय ) ( १८९३ ).

( ४ ) Vedic Chronology and Vedang Jyotish ( वेदांचा काल, निर्णय व वेदांग ज्योतिष ) ( १२५ ).

( ५ ) केसरींतील निवडक निबंध ४ खंड.

न्या. तेलंग – काशिनाथ त्र्यंबक तेलंग : ( १८५० ते १८९३ ).

मुंबई येथें हायकोर्टांत न्यायमूर्ति म्हणून महत्त्वाचें कार्य केलें. १८८५ सालीं स्थापन झालेल्या इंडियन कॉंग्रेसच्या संस्थापनेमध्यें वाटा. १८८५ ते १८८९ पर्यंत कॉंग्रेसचे सेक्रेटरी म्हणून काम केलें. शास्त्र व रुढी यांच्या "बलाबलाविषयीं विचार" व "सामाजिक विषयासंबंधीं तडजोड" हे निबंध प्रसिद्ध आहेत. प्राच्यविद्या पंडित म्हणून यांचें स्थान महत्त्वाचें आहे. इ. स. १८८९ सालीं झालेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेचे अध्यक्ष.

न्यूटन – सर इझॅक न्यूटन : ( १६४२ ते १७२७ ).

इंग्लिश तत्त्वचिंतक व शास्त्रज्ञ. गणित आणि optics या क्षेत्रांत मोठी कामगिरी. परंतु यांचें नाव प्रसिद्ध आहे तें मुख्यतः गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्तामुळें. मोठ्या ज्ञानोपासकाप्रमाणेंच साधे जीवन व्यतीत करणारे धर्मनिष्ठ खिश्चन.

बसवराज – ( इ. स. सुमारें ११६० )

सुप्रसिद्ध कानडी कवि व लिंगायत धर्माचे प्रणेते. यांनीं कर्नाटकामध्यें जातिव्यवस्थे-विरुद्ध बंड पुकारलें व अध्यात्मिक समतेचा पुरस्कार केला. १२ – १३ व्या शतकांत दक्षिण हिंदुस्थानांत विदर्भामध्यें महानुभाव पंथ, पश्चिम महाराष्ट्रामध्यें भागवत संप्रदाय व कर्नाटकांत लिंगायत संप्रदाय यांनी धर्मसुधारणेच्या चळवळी केल्या. चक्रधर, ज्ञानेश्वर, व बसव हे अनुक्रमे या चळवळींचे प्रवर्तक होते. त्यांच्या स्वरूपामध्यें फरक होता; परंतु स्थूल मानानें त्यांनीं जातिव्यवस्थेविरुद्ध आवाज उठविला.

बॅबिलोनिया – ( इ. स. पू. २२०० ते ७५० )

इ. स. पू. २२०० च्या सुमारास सेमेटिक वंशापैकीं अमोराहा या टोळीनें सिरियामधून आकडियन, सुमेरियन या साम्राज्यावर स्वारी केली व तें साम्राज्य उध्वस्त केलें. आणि त्या जागीं टायग्रीस व युफ्रायटीस नद्यांच्या मधल्या प्रदेशांत आपलें साम्राज्य स्थापन केलें. हें साम्राज्य इराणी आखातापासून भूमध्यसमुद्रापर्यंत पसरलें होतें. या साम्राज्याची राजधानी यूफ्राइटीस नदीच्या काठीं बॅबिलॉन या ठिकाणीं होती. यावरून या साम्राज्यास 'बॅबिलोनियन साम्राज्य' असेंच म्हणतात. या संस्कृतीमध्यें हमुराबी ( इ. स. पू. २०६७ ते २०२५ ) हा प्रसिद्ध व पराक्रमी सम्राट होऊन गेला. त्यानें दोन नद्यांच्यामध्यें कालवे खणून शेतीस उत्तेजन दिलें. हमुराबी यानें सुमेरियांत चालत आलेल्या पूर्वापार कायदेकानू व रीतिरिवाज यांचा अभ्यास करून बॅबिलोनियामध्यें सुमेरियन संस्कृतीमधील चांगला भाग आणला. त्यामुळें बॅबिलोनियाची संस्कृति प्रगत झाली. बॅबिलोनियाचा प्राचीन काळीं इजिप्त, ग्रीट, इराण, हिंदुस्थान या देशाशीं व्यापार होता.

**जगदीशचंद्र बोस : ( १८५८ ते १९३७ ).**

जागतिक कीर्तीचे भारतीय वनस्पतिशास्त्रज्ञ. वनस्पतींना जीव असतो, इतर प्राण्यांप्रमाणें ते व्यवहार करतात, हें यांनीं प्रथम जगासमोर शास्त्रीय पद्धतीनें मांडलें. इंडियन सायन्स कॉंग्रेसचे अध्यक्ष ( १९२७ ).

**कुमारिल भट्ट : ( ६५० ते ७५० ).**

हे मीमांसेतील भट्ट विचारधारेचे संस्थापक होते. दुसरी मीमांसा वा विचार-शाखा प्रभाकरांनीं सुरू केली. भट्टांची कामगिरी प्रामुख्यानें तत्त्वज्ञानाच्या ज्ञानमीमांसा शाखेंत आहे. त्यांच्या मतें आपणाला जें ज्ञान होतें त्याची सत्यता ही ज्ञानप्राप्तीच्या प्रक्रियेंतच अंतर्भूत असते म्हणजे ज्ञानाची सत्यता स्वतःसिद्ध असते. ती सिद्ध करण्यास बाह्यप्रमाणाची आवश्यकता नाहीं. यास स्वतः प्रामाण्यवाद म्हणतात. प्रभाकर हे ज्ञानाची पांच प्रमाणें मानतात. तीं म्हणजे प्रत्यक्ष, अनुमान, शब्द, उपमान व अर्थपत्ती. कुमारिल भट्ट हें पांचाशिवाय आणखी एक प्रमाण मानतात. ते म्हणजे अनुपलब्धी होय.

*त्यांची महत्त्वाची कामगिरी ख्यातीच्या विवरणांत आहे.* ज्ञानांत चूक कां होतें या विषयीं अनेक मतें प्रचलित आहेत. यांपैकीं भट्टांच्या मतास विपरित ख्यातिवाद म्हणतात. या मताप्रमाणें दोरीऐवजीं आपणांस साप दिसतो. यांचें कारण आपला पूर्वानुभव व सध्यांचें प्रत्यक्ष ज्ञान यांत गल्लत करून त्यांत चुकीचा संबंध प्रस्थापित करतो. दोरी व साप दोन्ही अस्तित्वांत असल्यानें त्यांचा संबंध चुकीचा आहे. म्हणून ही चूक पूर्वानुभव व सध्यांचा अनुभव यांच्या विपरित संबंधामुळें होते.

**राजारामशास्त्री भागवत : ( १८५१ ते १९०८ )**

जुन्या पद्धतीतील शास्त्री पंडिताजवळ ५-६ वर्षे संस्कृतचें अध्ययन केलें. सेंट झेविअर कॉलेजमध्यें १८७७ ते १९०८ पर्यंत संस्कृतचें अध्ययन केलें. कोल्हापूर येथील वेदोक्त कीं पुराणोक्त या प्रकरणामध्यें सुधारणावादी भूमिका घेऊन वेदाचा अधिकार सर्वांना आहे असें सांगितलें. महाराष्ट्रांतील भाषाशास्त्राचें व्यासंगी, मराठ्यांचेसंबंधीं चार उद्‌गार, ब्राह्मण व ब्राह्मण धर्म, विधवाविवाह शास्त्र कीं अशास्त्र हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

**प्रा. गो. चि. भाटे : ( १८७० ते १९४६ )**

सांगलीच्या विलिंग्टन कॉलेजचे पहिले प्राचार्य. प्रसिद्ध समाजसुधारक व लेखक. हिंदु चालीरीती, तीन तत्त्ववेत्ते, कलाविषयक तत्त्वज्ञान, कान्ट व शंकराचार्य, मराठी वाङ्मयाचा इतिहास हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**सर डॉ. भांडारकर – रामकृष्ण गोपाळ भांडारकर : ( १८३७ ते १९२५ )**

आंतरराष्ट्रीय कीर्तीचे प्राच्यविद्या संशोधक. मुंबई सरकारच्या हस्तलिखित खात्याचे संपादक म्हणून महत्त्वाची कामगिरी केली. जैन विहारांत जाऊन जैन वाङ्मयाचा अभ्यास केल्यामुळेंच नवीन संशोधन शाखा सुरूं झाली. प्राचीन वैष्णव पंथ, चालुक्य घराणें, काश्मीरांतील शैव संप्रदाय व रामानुजाचें तत्त्वज्ञान या संबंधींचें संशोधन महत्त्वाचें. मुंबईच्या विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चरची पहिली व्याख्यान-माला गुंफण्याचा मान यांना देण्यांत आला. प्रसिद्ध पुस्तकें :— Outlines of Vaishnavism, Shivaism and Minor Religions.

**भारतीय निराश्रित सहाय्यकारी मंडळ :**

१८ आक्टोबर १९०६ रोजीं मुंबई येथें या मंडळाची स्थापना झाली. मुंबई प्रार्थना समाजाचे उपाध्यक्ष श्री. दामोधरदास गोवर्धनदास सुखडवाला यांनीं प्रारंभीं या संस्थेस देणगी दिली. मंडळाच्या वतीनें अस्पृश्य समाजासाठीं शाळा सुरूं झाल्या. या संस्थेचे जनरल सेक्रेटरी म्हणून श्री. कर्मवीर वि. रा. शिंदे यांनीं १९०६ ते १९२३ पर्यंत काम केलें. या काळांत संस्थेला आर्थिक स्थैर्य मिळालें व कामाचा पसाराहि वाढला. बंगालमधील बॅकवर्ड क्लासेस मिशन या संस्थेचें उगमस्थान महाराष्ट्रांतील ही संस्था होय. संस्थेचें कार्य अद्याप चालू आहे.

**महायान :**

इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या सुमारास हा धर्मपंथ पुढें आला. बहुसंख्य समाजामध्यें भक्तिमार्गाचा प्रसार करण्याच्या कामीं या पंथानें महत्त्वाचें कार्य केलें. या पंथाचा मूर्तिपूजेवर विश्वास आहे. या धर्मपंथांतील आचारविचार बहुसंख्य समाजाला पेलेल, झेपेल असे आहेत. त्यामुळेंहि या पंथाचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झाला. केवळ आत्मनिर्वाणावर भर देणें इष्ट नव्हे, समाजाच्या मुक्तीवरहि भर दिला पाहिजे असें या पंथियांस वाटतें. त्यामुळें बहुजनसमाजाच्या दृष्टीनें त्यांनीं जुन्या कडक आचारविचारांत कांहीसा फरक केला. हिंदुस्थानच्या उत्तरेकडे हा धर्मपंथ मोठ्या प्रमाणावर पसरला. अशोकापासून कनिष्कापर्यंत या धर्मपंथाला राजाश्रय मिळाला होता.

**मॅक्समुलर – फ्रेडरिक मॅक्सिमिलन मॅक्समुलर : ( १८२३ ते १९०० )**

जर्मनीमधील प्रसिद्ध प्राच्यविद्या संशोधक व तुलनात्मक भाषाशास्त्राचे व्यासंगी. तुलनात्मक धर्मशास्त्राच्या अभ्यासाकडून ऋग्वेदाकडे वळले. हिंदुस्थानांतील संस्कृतीला आर्यांच्या आगमनानंतरच सुरवात झाली असे विचार प्रतिपादन केले. प्रसिद्ध

पुस्तकें:—( १ ) Science of Language, (२) An Introduction to Science of Religion, ( ३ ) History of ancient Sanskrit literature ( १८५९ ).

राजा राममोहन राय : ( १७७२ ते १८३३ )

१८३० साली कलकत्ता येथें स्थापन झालेल्या ब्राह्मोसमाजाचें संस्थापक. ईस्ट इंडिया कंपनींत नोकरी. पुढें १८१४ सालीं नोकरींतून निवृत्त. जगांतील सर्व धर्मांचा तौलनिक अभ्यास करून एकेश्वर वादाच्या निष्कर्षाला आले. सामाजिक सुधारणेचे पुरस्कर्ते. सतीची चाल बंद करण्यास ब्रिटिश सरकारला महत्त्वाचें सहाय्य केलें. १८३० सालीं इंग्लंडला गेले. १८३३ सालीं तिकडेच वारले.

डॉ. रामन चंद्रशेखर व्यंकट : ( १८८८ )

विज्ञानाच्या क्षेत्रांत महत्त्वाचें संशोधन. १९३० सालीं त्यांना या संशोधनाबद्दल नोबेल पारितोषक मिळालें. १९३४ सालीं बंगलोर येथे ' इंडियन ॲकॅडमी ऑफ् सायन्स ' ही संस्था स्थापन केली. इंडियन सायन्स कॉंग्रेसचे अध्यक्ष.

चि. वि. वैद्य : ( १८६१ ते १९३८ )

सुप्रसिद्ध इतिहास संशोधक ग्वाल्हेर. संस्थानांत हायकोर्टामध्यें मुख्य न्यायाधीश म्हणून १८९६ ते १९०५ या काळांत काम केलें. भारत इतिहास संशोधक मंडळाचे अनेक वर्षे अध्यक्ष. महाराष्ट्र साहित्य समेल्नाचे अध्यक्ष ( १९०८ ) पुणें. मध्ययुगीन भारत ( भाग १ ते ३ ), महाभारताचा उपसंहार, श्रीराम चरित्र, Shivaji the Founder of Maratha Swaraj हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

शाहू महाराज : ( १८७४ ते १९२२ )

महाराष्ट्रांतील एक मोठे समाज सुधारक. अस्पृश्यता निवारणासाठीं मोठा प्रयत्न. खेड्यांपाड्यांतून शिक्षण प्रसार व्हावा म्हणून १९१२ सालीं कोल्हापूर संस्थानांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें केलें. १९०१ पासनच सर्व जाती जमातींच्या विद्यार्थ्यांसाठीं कोल्हापुरांत वसतीगृहें चालू केली. अस्पृश्यासाठींसुद्धां मिस क्लार्क अस्पृश्य बोर्डींग सुरू केले. वेदोक्त प्रकरणांमुळे यांचें लक्ष समाजसुधारणेकडे विशेष लागलें. वेदाचा अधिकार सर्व व्यक्तींना आहे, स्यात जातीभेद येऊं नयेत असे त्यांना वाटत होतें.

शंकराचार्य : ( ७४८ ते ८२० )

अद्वैतवादाचे पुरस्कर्ते. सर्व विश्वातील अंतीम सत्ता व सत्य ब्रह्म आहे. जग हें ब्रह्माच्या तुलनेनें मिथ्या व आभासात्मक आहे. जीवाचें मूळ स्वरुप म्हणजे ब्रह्मस्वरुपच

आहे. जीव आणि ब्रह्म एकच आहे. त्यांच्यांत अद्वैत आहे. हें अद्वैतवादाचें तत्त्वज्ञान समजण्यासाठीं मायावादाची भूमिका समजावून घेणें आवश्यक आहे. ज्या शक्तीमुळें जग मिथ्या असूनहि सत्य भासतें त्या शक्तीस माया असें म्हटलेलें आहे. या मायाशक्तीचें कार्य दोन प्रकारचें आहे. (१) विक्षेप – आहे त्यापेक्षां निराळें भासविणें. (२) आवरण – सत्य झाकून ठेवणें.

ब्रह्म हें सत्‌चित् आनंदमय आहे. या ब्रह्मज्ञानानें मोक्षप्राप्ती होतें.

सयाजीराव महाराज : (१८६३ ते १९३८)

१८७५ सालीं सयाजीराव नांवानें बडोद्याच्या गादीवर दत्तक घेण्यांत आलें. १८८१ सालीं महाराजांना राज्याधिकार देण्यांत आले. १८८३ सालीं बडोदें संस्थानांत अस्पृश्यता निवारणाची चळवळ सुरू केली. १८९२ सालीं बडोदें संस्थानच्या एका भागांत सक्तीचें प्राथमिक शिक्षण सुरू केलें व १९०६ सालीं सर्व संस्थानभर ही योजना लागू केली. अस्पृश्यता निवारण सक्तीचें, सार्वत्रिक प्राथमिक शिक्षण या क्षेत्रांत बडोदें संस्थान हें महाराष्ट्रांत पुष्कळच आघाडीवर होतें. १९१८ सालीं भारतीय निराश्रित सहाय्यकारी मंडळाच्या वतीनें मुंबईस अखिल भारतीय अस्पृश्यता निवारक परिषद् भरली होती. तिचें अध्यक्षस्थान महाराजांनी भूषविलें होतें. १९०४ सालीं मुंबई येथें भरलेल्या सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. सामाजिक सुधारणेचें व उदारमतवादी विचारांचे एक प्रवक्ते म्हणून त्यांचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे.

स्पेन्सर : (१८२० ते १९०३)

१९ व्या शतकांच्या उत्तरार्धांतील सुप्रसिद्ध समाजशास्त्रांत उत्क्रांतिवादाच्या सिद्धान्तामध्यें महत्त्वाची भर. व्यक्ति आणि समाज यांच्यामध्यें सेंद्रिय संबंध कसे आहेत हें दाखविण्याचा प्रयत्न. यांच्या या विचाराचा राजकीय विचारावर इष्ट व अनिष्ट दोन्हीं परिणाम झाले. Proper Functions of the State हा ग्रंथ प्रसिद्ध. महाराष्ट्रांतील सुधारणावाद्यांवर या विचाराचा परिणाम.

डॉ. सुरेंद्रनाथ सेन (१८९० ते १९६२)

मराठ्यांचा इतिहास हा आवडता विषय. फॉरेन बायग्रॉफीज ऑफ शिवाजी (परकीय शिव चरित्र) हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. १९३९ ते १९४९ या काळात दिल्ली येथे किपर ऑफ रेकॉर्डस्. या नतर दिल्ली विद्यापीठात रेक्टर व कुलगुरु. १८५७ हा ग्रंथ मृत्युपूर्वी कांहीं वर्षें प्रकाशित झाला. इतिहासातील संशोधनासाठी ऑक्सफर्ड विद्यापीठानें १९५८ सालीं डी. लिट्. ही पदवी दिली. १९४४ साली भारतीय इतिहास परिषदेचे अध्यक्ष.

## परिशिष्ट तिसरें

**संस्कृत आणि पाली अवतरणांची सूचि.**

[ या सूचीतच मुळांतील मुद्रणदोष दुरुस्त केले आहेत. ]

१. पृ. १७ : रुद्राणां शङ्करश्चास्मि । — गीता १०-२३.

ब्रह्माणमीशं कमलासनस्थम् । — गीता ११-१५.

सर्वलोकमहेश्वरम् । — गीता ५-२९.

२. पृ. १९ : प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।
उपास्यानामनियम एष धर्मः सनातनः ॥

३. पृ. २१ : तद्धैतद् घोर आङ्गिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वोवाचापिपास एव स बभूव । — छान्दोग्योपनिषत् ३-१७-६.

४. पृ. २४ : अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः ।
— छांदोग्योपनिषत् ३-१७-४.

५. पृ. २५ : नराणां च नराधिपः । — गीता.

६. पृ. २९ : उद्यानानि विमानानि ... दिवौकसाम् ।
यन्त्रदुर्गाणि वाप्यश्च कवचान्यायुधानि च ॥
वाजिकर्माणि ... चित्राणि विविधानि च ।
मृदश्च हेमकुप्यादिधानूनां विक्रियाः क्रियाः ॥

— विश्वम्भरवास्तुशास्त्र.

७. पृ. ३३ : स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् । — गीता.

८. पृ. ३५ : भृगुरत्रिर्वसिष्ठश्च विश्वकर्मा मयस्तथा ।
नारदो नग्नजिच्चैव विशालाक्षः पुरन्दरः ॥
ब्रह्मा कुमारो नन्दीशः शौनको गर्ग एव च ।
वासुदेवोऽनिरुद्धश्च तथा शुक्रबृहस्पती ॥
अष्टादशैते विख्याताः शिल्पशास्त्रोपदेशकाः ।

— मत्स्यपुराण—सं. १. पृ. ५१.

९. पृ. ३५ : तेषामेव स्थपत्याख्यो विश्वकर्मेति सत्कृतः ।
एभिर्विना हि ... कर्म कर्तुं न शक्यते ॥
तस्मादेते सदा पूज्याः स्थपत्यादि च पञ्चकन् ।
एभिः स्थपत्यादिभिश्च लोके
विना ग्रहीतुं संस्कृतं न शक्यते ॥ — शिल्पनयनत – अ. ५.

१०. पृ. ४१ : कृतादिषु प्रजा राजन् कलाविच्छन्ति सम्भवम् ।
कलौ खलु भविष्यन्ति नारायणपरायणाः ॥ ३८ ॥
क्वचित् क्वचिन्महाराज द्रविडेषु च भूरिशः ।
ताम्रपर्णी नदी यत्र कृतमाला पयस्विनी ॥ ३९ ॥
कावेरी च महापुण्या प्रतीची च महानदी ।
ये पिबन्ति जलं तासां मनुजा मनुजेश्वर ॥ ४० ॥
प्रायो भक्ता भगवति वासुदेवेऽमलाशयाः ।
उत्पन्ना द्राविडे साऽहं वृद्धिं कर्णाटके गता ।
क्वचित् क्वचिन्महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता ॥ ४८ ॥
— भागवत ११-५.

११. पृ. ६६ : महो अर्णस्य राजति । — ऋग्वेद ४-५३-२.
गायत्रं च त्रैष्टुभं चानु राजति — २-४३-१.
य एको वस्वो वरुणो राजति — १-४३-४.

१२. पृ. ६६ : अतीते मल्लरट्ठे कुशावतीराजधानीयं ओक्काक्को नाम राजा धम्मेन रज्जं कारेति । सोलसन्न इत्थिसहस्सानं जेट्ठिका सीलवती नाम अग्गमहेसी अहोसि । सा न एव धीतरं न पुत्तं लभती'ति नागरा च रट्ठवासिनो च राजनिवेसनद्वारे सन्निपातेत्वा 'रट्ठं नसिस्सति विलुम्पिस्सती'ति उपक्कोसिंसु ।

१३. पृ. ६७ : कुबेरादिन्द्रो ब्रह्मवर्चा नान्यत्रैव तुभ्यं स्पृहाः ।

१४. पृ. ७७ : महाजनो येन गतः स पन्थाः ।

१५. पृ. १०१ : द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद् ब्रह्मविदो वदन्ति परा चैवापरा च ॥ ४ ॥ तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति ॥ अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ५ ॥ —मुण्डकोपनिषद्.

१६. पृ. १०१ : यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह । — मुण्डकोपनिषद्.

१७. पृ. १३२ : पथ्याङ्गनेव नृपनीतिरनेकरूपा —नीतिशतक.

१८. पृ. १५० : यच्चिद्धि ते विशो यथा प्र देव वरुण व्रतम् ।
मिनीमसि द्यवि द्यवि ॥ —ऋग्वेद.

१९. पृ. १५१ : अखिलभोगानुभवे नृणां तैलाभ्यङ्गात् सपदि कुरुते सूर्यतनयः ।
—श्रीपति.

२०. पृ. १५२ : निद्दरो होति निप्पापो धम्मपीतिरसं पिबं । —धम्मपद, वग्ग १५.

२१. पृ. १७५ : वर्णानां ब्राह्मणो गुरुः ।

२२. पृ. १८९ : वाचि वीर्य द्विजानाम् ।

२३. पृ. २१२ : पुराणसंहितां चक्रे पुराणार्थविशारदः ।
प्रख्यातो व्यासशिष्योऽभूत् सूतो वै रोमहर्षणः ॥ १ ॥
—विष्णुपुराण ३-६-१५.

२४. पृ. २१३ : अष्टादशपुराणानि कृत्वा सत्यवतीसुतः ।
भारताख्यानमखिलं चक्रे तदुपबृंहितम् ॥ —मत्स्यपुराण ५३-७०.

२५. पृ. २२४ : स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।

२६. पृ. २४३ : सुविशालमिदं विश्वं पवित्रं ब्रह्ममन्दिरम् ।
चेतः सुनिर्मलं तीर्थं सत्यं शास्त्रमनश्वरम् ॥
विश्वासो धर्ममूलं हि प्रीतिः परमसाधनम् ।
स्वार्थनाशस्तु वैराग्यं ब्राह्मैरेवं प्रकीर्त्यते ॥

२७. पृ. २४४ : ॐ स्वस्ति । साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं माहाराज्यमाधिपत्यमयं समन्तपर्यायी स्यात् सार्वभौमः सार्वायुष आन्ताद् आ परार्धात् ॥ पृथिव्यै समुद्रपर्यन्ताया एकराळिति ।
तदप्येष श्लोकोऽभिगीतो,
मरुतः परिवेष्टारो मरुत्तस्यावसन् गृहे ।
आविक्षितस्य कामप्रेर्विश्वेदेवाः सभासद ॥ इति ।

२८. पृ. २८५ : यथा राजा तथा प्रजाः ।

२९. पृ. २९० : दौर्मन्त्र्यात्नृपतिर्विनश्यति ।

## शुद्धिपत्र

*अर्थभेद होईल अशा ठळक चुकांची दुरुस्ती येथें देण्यांत आलेली आहे.*

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २ | अथर्वांगिरम् | अथर्वांगिरस् |
| २ | ११ | त्रैविद्या | त्रयीविद्या |
| ४ | १९ | मागाचा | मार्गांचा |
| ४ | २२ | घम | घर्म |
| ४ | २३ | अतिसंक्षेमाने | अतिसंक्षेपानें |
| ६ | ७ | चितनीय | चिंतनीय |
| ६ | १२ | गुरुवय | गुरुवर्य |
| ६ | १५ | देवीचा | देवाचा |
| ८ | १३ | वगात | वर्गात |
| ११ | १५ | कालनिणयाच्या | कालनिर्णयाच्या |
| ११ | २१ | मारु | मार |
| ११ | ३० | अर्वांगी | अर्वाणी |
| १३ | १८ | उशनाशुक्राचार्य | उशनस् शुक्राचार्य |
| १३ | १९ | तुर्वसु | तुर्वश |
| १६ | ९ | श्वेताश्वेतरोपनिषद | श्वेताश्वतरोपनिषद |
| १९ | ११ | विजिगिपुनेपुडे | विजिगीषुनेपुढें |
| १९ | १४ | हृदयद्रावक | हृदयद्रावक |
| २३ | २२ | अश्वलायन | आश्वलायन |
| २४ | ९ | वेष्णव | वैष्णव |
| २५ | २ | एकांनिक | ऐकांतिक |
| २६ | ३० | एकांतिक | ऐकांतिक |
| ३० | २ | पूजेसाठाटी | पूजेसाटीं |
| ३३ | २५ | उपनिषद् — | उपनिषत् — |
| ३३ | २७ | परागतिम् | परां गतिम् |
| ३३ | ३१ | परागतिम् | परां गतिम् |
| ४३ | ३२ | सत्यसत्य | सत्य सत्य |
| ५४ | २५ | उपसना | उपासना |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६६ | २० | रट्ट | रट्ठ |
| ६७ | २८ | रथो हिपः | रथो हि पः |
| ६९ | ३३ | देखमुख | देशमुख |
| ७७ | २० | पंथा | पन्थाः |
| ७८ | १० | अगमन | आगमन |
| ९३ | १ | शमला | शेमला |
| ९३ | ५ | शमल्यांचें | शेमल्यांचें |
| ९५ | १४ | सद्यस्थितींत | सद्यःस्थितींत |
| ९५ | १५ | वाहून जाण्याचा | वाहून न जाण्याचा |
| १०१ | १५ | पृथ्यकर | पथ्यकर |
| १०९ | ३० | मनसासह | मनसा सह |
| ११६ | १३ | डीन, इंग गॉल्टन | डीन इंग, गॉल्टन |
| ११८ | २ | १८३० | १९३० |
| ११८ | ७ | आराव्या | आरोळ्या |
| ११९ | १८ | ब्रह्मनाल | ब्रह्मजाल |
| १२० | २८ | सर पाटील | सरपाटील |
| १२१ | २१ | विसकळीत | विस्कळीत |
| १२३ | १२ | विर्विकार | निर्विकार |
| १२६ | ३ | कोर्टमर्ध्येहि | कोर्टांमर्ध्येहि |
| १२६ | ७ | बॅंक वेची | बॅंकवेची |
| १२८ | ११ | लवाटेमारख्या | लवास्थांसारख्या |
| १३५ | २२ | वालभापेसारखी | बोलभापेसारखी |
| १३७ | ७ | म्हैसुरास | म्हैसुरांत |
| १३८ | २२ | " महाराष्ट्री " | " माहाराष्ट्री " |
| १३९ | २ | आतां गोष्ट | आतां सिद्ध गोष्ट |
| १४० | १७ | वैय्याकरणीय | वैयाकरणी |
| १४० | २८ | पोतुगिर्जांच्या | पोर्तुगिजांच्या |
| १४४ | ११ | द्भतव | तद्भव |
| १४६ | २० | दिर्तीया | द्वितीया |
| १४६ | ३० | जसें, माइंन किंवा माझ्याच्यानं | जसें, ' माइयेंन ' किंवा ' माइयाच्यानं ' |
| १५१ | २६ | स्वरवशिष्ट्य | स्वरवैशिष्ट्य |
| १५२ | २४ | सम्प्रदाय | संप्रदाय |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १५५ | ३ | सत्पुरष | सत्पुरुष |
| १५७ | ८ | आभिर | आभीर |
| १६४ | १८ | मिरवणारा | मिरवणारा |
| १७४ | ७ | उगमाविषयीं | उगमाविषयीं |
| १७४ | २३ | किंव | किंवा |
| १७५ | १६ | महारट्टे | महारट्टे |
| १७६ | १ | महत् | बृहत् |
| १७६ | ४ | महारठ्यांहून | महारट्ट्यांहून |
| १७६ | ५ | महरठ्याची | महरट्ट्यांची |
| १७७ | ६ | महारठ | महारट्ट |
| १७६ | ७ | घडामोडीमुळें | घडामोडीमुळें |
| १७६ | १९ | झालेले | झालेल्या |
| १७६ | १९ | एतिहासिक | ऐतिहासिक |
| १७९ | २२,२२,२५ | गणराज | गणराज्य |
| १८० | १० | माळ्या भोळ्या | भोळ्यामाळ्या |
| १८१ | १६ | ऐत्तिरेय | ऐतरेय |
| १८२ | ८ | उपटमुळाला | उपटमुळाला |
| १८२ | १४ | संग्रहित | सगृहीत |
| १८३ | ३ | आदिभांतील | आशियांतील |
| १८३ | १४ | कलच्चुरी | कलचुरी |
| १८४ | ३४ | आयगारचा | अय्यंगारचा |
| १८५ | ३२ | आयंगार | अय्यगार |
| १८५ | ३२ | ...ण | ताण |
| १८६ | २ | क्षेत्र | क्षत्र |
| १८६ | ३ | विश | विश् |
| १८६ | १९ | भाळे भोळे | भोळेभाळे |
| १८७ | १६ | पुरुषांलाच | पुरुषांनाच |
| १८७ | ३१ | रथयेद्वारः | रथेद्वारः |
| १९० | १२ | मुक्या-पांगुळ्यांना | मुक्या-पांगळ्यांना |
| १९२ | २४ | राजवाड्यांसारखे | राजवाड्यांसारख्या |
| १९२ | २५ | केळकरांसारखे | केळकरांसारख्या |
| १९२ | २५ | सरदेसायांसारखे | सरदेसायांसारख्या |
| १९७ | २९ | रसमिश्रता | रसमिश्रता |

